पुणे विद्यापीठाच्या पीएच. डी. (मराठी) पदवीसाठी
सादर केलेला शोधप्रबंध

प्रबंध शीर्षक

# भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास


**अभ्यासक**

**श्री. विठ्ठल बापूराव ठोंबरे**

मु. पो. दुधेबावी, ता. फलटण,
जि. सातारा, पिन - ४१५५२३.



**मार्गदर्शक**

**प्रा. डॉ. कल्याणी हर्डीकर**

अ/६, सागर संकुल, परांजपे वसाहत,
श्रीमान परिसर, कर्वेनगर, पुणे - ४११ ०५२.


**अभ्यासकाची सही** **मार्गदर्शकाची सही**

# प्रतिज्ञापत्र

मी, श्री. विठ्ठल बापूराव ठोंबरे प्रतिज्ञापूर्वक नमूद करतो की, प्रा. डॉ. कल्याणी हर्डीकर यांच्या मार्गदर्शनाखाली ***''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास''*** या विषयावर संशोधन करून माझा त्यावरील प्रबंध पुणे विद्यापीठाच्या कलाशाखांतर्गत मराठी विषयातील पीएच. डी. पदवीसाठी सादर करीत आहे. माझ्या माहितीप्रमाणे या विषयावर कोणीही अशा प्रकारचे संशोधन केले नाही. माझे सर्व संशोधन स्वतंत्र व नवे असून जेथे इतरांचे संदर्भ स्वीकारलेले आहेत तेथे त्या त्या व्यक्तींचा नामनिर्देशपूर्वक उल्लेख करून त्यांचे ऋण मान्य केलेले आहे.

पुणे.

दि.: ०८/०८/२०११

**अभ्यासक**
**श्री. विठ्ठल बापूराव ठोंबरे**

## प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, श्री. विठ्ठल बापूराव ठोंबरे यांनी पुणे विद्यापीठाच्या कलाशाखांतर्गत मराठी विषयातील पीएच. डी. पदवीसाठी सादर केलेला ***''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास ''*** या प्रबंधाचे काम माझ्या मार्गदर्शनाखाली पूर्ण झालेले आहे. यातील विवेचन पूर्णपणे स्वतंत्र व नवे असून जिथे इतर संदर्भसाहित्याचा उपयोग केलेला आहे, तिथे त्यांचा कृतज्ञतापूर्वक नामनिर्देश केलेला आहे.

सदर प्रबंध पुणे विद्यापीठाच्या पीएच.डी. (मराठी) पदवीसाठी सादर करण्यास माझी अनुमती आहे.

पुणे.

दि.: ०८/०८/२०११

**मार्गदर्शक**
**प्रा. डॉ. कल्याणी हर्डीकर**
प्रमुख,
मराठी विभाग,
सरस्वती मंदिर कला व
वाणिज्य रात्र महाविद्यालय,
बाजीराव पथ, पुणे - ४११००२.

## तांत्रिक तपशील

१. **शोधविषय :** *''भारतीय लोकदैवक 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास''*

२. **शोधविषयाचा प्राथमिक आराखडा (Synopsis) पुणे विद्यापीठ, मराठी विभाग कार्यालय येथे जमा केल्याचा दिनांक : १८/९/२००६.**

३. **शोधविषयासंदर्भातील प्राथमिक सादरीकरणाचा (Presentation) दिनांक : २९/९/२००६, दुपारी ३.३० वाजता. स्थळ : पुणे विद्यापीठ, मराठी विभागप्रमुख कार्यालय.**

४. **पुणे विद्यापीठ, मराठी विभागाकडून 'तात्पुरत्या स्वरूपाचे शोध विषय मान्यता पत्र'(Provisional Admission Letter) मिळाल्याचा दिनांक :** १४/११/२००६ (संदर्भ क्र. : मराठी / ५८४).

५. **पुणे विद्यापीठ, मराठी विभागाकडून 'कायम स्वरूपाचे शोध विषय मान्यता पत्र' (Registration Letter) मिळाल्याचा दिनांक :** ७/६/२००७ (पत्रांक : मराठी/३८३).

६. **रजिस्ट्रेशनचा दिनांक :** १८ सप्टेंबर २००६.

७. **रजिस्ट्रेशनचा कालावधी :** १७ सप्टेंबर २०११.

८. **संशोधन-अभ्यास-प्रंबधलेखनासाठी व्यतीत झालेला प्रत्यक्ष कालावधी :** ४ वर्षे, ५ महिने.

९. **''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास'' या विषयावर लिहलेल्या प्रबंधाच्या प्रती 'कुलसचिव कार्यालय' व 'मराठी विभाग कार्यालय', पुणे विद्यापीठ येथे जमा करण्यापूर्वी, घेतलेल्या मुलाखतीचा (pre-submission seminar) दिनांक :** ०३/०३/२०११, दुपारी ३ वाजता. स्थळ : मराठी विभाग प्रमुख कार्यालय, पुणे विद्यापीठ.

१०. **पुणे विद्यापीठ, मराठी विभाग कार्यालयातून मिळालेले 'Eligibility 2006-07' (दि. ९/५/२०११) हे पत्र 'उपसचिव कार्यालय' पुणे विद्यापीठ येथे जमा केल्याचा दिनांक :** ९/५/२०११.

११. **''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास'' या विषयावर लिहलेल्या प्रबंधाची (Thesis) एक प्रत व सारांशपत्रिकेच्या (Synopsis) ४५ प्रती पुणे विद्यापीठ, मराठी विभाग कार्यालयात जमा केल्याचा दिनांक :** ९/५/२०११.

१२. **''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास'' या विषयावर लिहलेल्या प्रबंधाच्या सारांशपत्रिकेच्या १२ प्रती 'कुलसचिव कार्यालय', पुणे विद्यापीठ येथे जमा केल्याचा दिनांक :** २३/५/२०११.

१३. **''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास'' या विषयावर लिहलेल्या प्रबंधाच्या ३ प्रती व सारांशपत्रिकेच्या ५ प्रती अंतिम तपासणीसाठी 'कुलसचिव कार्यालय', पुणे विद्यापीठ येथे जमा केल्याचा दिनांक :** ८/८/२०११.

१४. **पुणे विद्यापीठ, 'मराठी विभाग कार्यालय' व 'कुलसचिव कार्यालय' येथे वेळोवेळी सादर केलेल्या प्रबंधातील प्रकरणांचे संशोधन अहवाल (Half Yearly Research Reports) :**

| दिनांक | प्रकरण क्र. | पूर्ण झालेली प्रकरणे |
|---|---|---|
| १९ मार्च २००७ | १.<br>२. | खंडोबा उपासनेची पार्श्वभूमी.<br>चतुर्दश खंडोबा स्थल दर्शन. |
| २० सप्टेंबर २००७ | ३.<br>४. | खंडोबा संदर्भातील ऐतिहासिक दस्तऐवज.<br>मल्हारीमाहात्म्यातील खंडोबा. |
| २१ मार्च २००८ | ५.<br>६. | संत साहित्यातील खंडोबा.<br>खंडोबाचे उपासक वाघ्या-मुरळी. |
| २२ सप्टेंबर २००८ | ७. | लोकवाणीतील व शाहिरी वाङ्मयातील खंडोबा. |
| २३ मार्च २००९ | ८. | खंडोबाची प्रतीके आणि उपासनापद्धती. |
| २४ सप्टेंबर २००९ | ९. | संशोधकांच्या नजरेतून खंडोबा आणि परिवार. |
| २५ मार्च २०१० | १०. | म्हाळसा देवताविज्ञानातील चमत्कार. |
| २६ सप्टेंबर २०११ | ११. | विविध पंथीय वाङ्मयातील टीकात्मक खंडोबा. |
| २७ फेब्रुवारी २०११ | १२. | उपसंहार. |

# मनोगत

खंडोबा हे महाराष्ट्रातील अठरा-पगड जाती जमातींचे तसेच विविध धर्मीयांचे कुलदैवत आहे. देश-विदेशातील कोट्यावधी भक्तांना तो आपला 'लोकसखा' वाटतो. 'लोकप्रिय भारतीय लोकदैवत' म्हणून वैश्विक कीर्ती त्याला लाभलेली आहे. मध्ययुगीन कालखंडापासून संत, पंत, वरदी शाहीर, कवी, लेखक तसेच देशी-विदेशी संशोधक अभ्यासक यांचा हे दैवत अभ्यासदृष्ट्या आणि श्रद्धाविषयक प्रेरणास्रोत बनून राहिलेले आहे. खंडोबाचे उपासक 'वाघ्या - मुरळी' यांना महाराष्ट्रीय लोकसंस्कृतीचा 'केंद्रीय मानबिंदू' मानले जाते. म्हणूनच भारतीय लोककलाविश्वात वाघ्या-मुरळ्यांच्या 'जागरण' या लोककला प्रकाराला अनन्यसाधारण महत्त्व आहे.

या विषयावर काही लेखकांनी माहितीवजा छोट्या पुस्तिका लिहिल्या आहेत, त्यात नावीन्याचा विचार न करता अनुकरणावरच जास्त भर दिल्याचे आढळून येते. तसेच काही देशी-विदेशी अभ्यासकांचे यावरील स्फुट संशोधनात्मक लेखन प्रसिद्ध झाले आहे. परंतु खंडोबाच्या वाङ्मयीन अभ्यासाच्या विविध पैलूंचे दर्शन त्यातून प्रतीत होत नव्हते, याचीच बोचणी सतत माझ्या चिकित्सक मनाला लागनू राहिली होती. या वैचारिक-बौद्धिक संघर्षातून आपसुकच मी या विषयाच्या संशोधनाकडे वळलो. ८ मार्च १९९८ ला सुरू केलेली ही शोधयात्रा आजपर्यंत अखंडपणे सुरूच आहे. या तपसाधनेची सांगता होत असताना शोधयात्रेतील अभ्यासाच्या स्थित्यंतराचे टप्पे येथे नमूद करणे उचित ठरेल.

जेजुरीचा खंडोबा आमच्या घराण्याचे पिढ्यान् पिढ्यांपासून कुलदैवत. माझे आई-वडील जयाद्रिवासी (कै.) सौ. जगुबाई व श्री. बापूजी मारुतीराव ठोंबरे हे खंडोबाचे परमभक्त होते. खंडोबाची शेकडो अवीट गोडीची लोकगीते आईच्या मुखी सतत रेंगाळत असत. पहाटेच्या प्रहरी जात्यावर दळण दळताना आईच्या तोंडची गाणी ऐकत-ऐकतच आम्हा भावंडाना सकाळी जाग यायची.

माझ्या साध्या-भोळ्या निरक्षर माऊलीने गायलेल्या व थेट हृदयाला भिडणाऱ्या या लोकगीतांचे संस्कार माझ्या मनावर घट्ट रुतून बसले. त्यामुळे मनात असणारी कुलदैवतावरील डोळस श्रद्धा वाढली. फलटणच्या मुधोजी महाविद्यालयाच्या कनिष्ठ विभागात विज्ञान शाखेत शिकत असताना मला महाराष्ट्रातील विख्यात विचारवंत आणि प्रभावी वक्ते प्राचार्य शिवाजीराव भोसले यांचा सहवास लाभला. ... आणि मी महाविद्यालयीन जीवनातच खंडोबाच्या अभ्यासाकडे आकृष्ट झालो.

पुढे घरचा परंपरेने चालत आलेला मेंढपाळी व्यवसाय सांभाळीत व कलाशाखेत महाविद्यालयीन बहिस्थ शिक्षण घेत जमेल तसे आणि वेळ मिळेल तसा मी खंडोबावरील साहित्याचे संकलन करू लागलो... परंतु परिस्थितीचे दाहक चटके बसू लागल्यावर, काही कालावधी उलटून गेल्यानंतर नोकरीनिमित्त पुण्याला आलो. काही दिवस नोकरीत रूळल्यावर विद्येच्या या माहेरघरात खंडोबाच्या वाङ्मयीन संकलनाला अधिकच गती आली.

साधारण १९९८ च्या पूर्वार्धात, 'वेगवेगळ्या विषयांवरील कित्येक हजार पुस्तके वाचून पचविलेले मराठी साहित्याचे जाणकार व साहित्य जगतातील घडामोडी मुखोद्गत असणारे पुण्यातील श्री. विलासराव बबनराव पडवळ यांना एके दिवशी मी विचारले, ''माझ्याकडे खंडोबाविषयीचे पुष्कळ संदर्भसाहित्य जमले आहे. मला या विषयावर मोठा ग्रंथ लिहायचा आहे. परंतु अभ्यासाची दिशा स्पष्ट होत नाही, कृपा करून मला मार्गदर्शन कराल काय ?'' यावर पडवळ म्हणाले, '' संग्रहित संदर्भ साहित्याचा अभ्यास करता - करता तुम्ही प्रत्यक्ष 'फिल्डवर्क' करा. खंडोबाच्या विविध स्थळांना भेटी द्या. तिथे तुम्हाला खंडोबा दर्शनासाठी आलेले वेगवेगळ्या ठिकाणांचे वेगवेगळ्या स्तरातील लोक भेटतील. त्यांच्याकडून खंडोबाविषयीची नवनवीन माहिती मिळेल. तसेच मंदिर स्थापत्याचा जवळून निरीक्षणात्मक अभ्यास करता येईल''. नंतर लवकरच दीर्घप्रवासाची तयारीही सुरू केली. माझी या कामाविषयीची तळमळ आणि

प्रचंड उत्साह पाहून पडवळसुद्धा माझ्याबरोबर प्रवासासाठी तयार झाले. एवढेच नाही तर संपूर्ण प्रवासखर्चाची आर्थिक जबाबदारीही त्यांनी स्वत:च्या शिरावर घेतली. 'खंडोबाभक्ती' हा आमच्यामध्ये समानधागा असल्यामुळे पुढे याचे गाढ स्नेहामध्ये रूपांतर कधी झाले हे कळलेसुद्धा नाही. १९९८ ते २००५ या काळात आम्ही महाराष्ट्र - कर्नाटक-मध्यप्रदेश-आंध्रप्रदेशामधील प्रमुख खंडोबा स्थळांना तसेच या राज्यांसह केरळ, गोवा या राज्यांतील म्हाळसा स्थळांना प्रत्यक्ष भेटी दिल्या. समक्ष 'खंडोबा-म्हाळसा-बाणाई' स्थळांचे सूक्ष्म अवलोकन केले. तेथील पुजारी, रहिवासी, काही जाणकार यात्रेकरूंशी संवाद साधला. त्यांच्याकडून मिळालेली दुर्मिळ माहिती संकलित केली. काही लिखित संदर्भ, प्रत्येक ठिकाणचे छायाचित्रण यामुळे माझ्याकडे खंडोबासंदर्भातील माहितीचे अक्षरश: समृद्ध 'भांडार'च तयार झाले. २००५ च्या अखेरीस शेकडो अतिदुर्मिळ संदर्भांनी युक्त अशा डेमी आकारातील तब्बल आठशे पृष्ठ संख्येचा ग्रंथ लिहूनही पूर्ण झाला. फक्त देवताविज्ञानाचे संशोधक, अभ्यासक यांनाच नव्हे तर सर्वसामान्य वाचक, भक्त, यांनाही ग्रंथातील भाषा आपली वाटावी म्हणून मुद्दामच या ग्रंथाची भाषा अत्यंत साधी-सोपी, सुटसुटीत व ललितरम्य अशी ठेवली. तोपर्यंत महाराष्ट्रातील विविध भाषांतील प्रादेशिक वृत्तपत्रांमधून ''खंडोबावरील समग्र माहितीचा ग्रंथ 'कुलदैवत खंडोबा' प्रकाशनाच्या मार्गावर '' अशा आशयाच्या बातम्या प्रसिद्ध झाल्या होत्या... होत होत्या. तर काही ज्येष्ठ पत्रकारांनी याच विषयावर लिहिलेले अभ्यासपूर्ण लेखही प्रसिद्ध झाले होते. एकंदरीत, प्रकाशनापूर्वीच वृत्तपत्रीय माध्यमातून 'कुलदैवत खंडोबा' हा ग्रंथ महाराष्ट्र, कर्नाटक व गोव्यातील अनेकांच्या परिचयाचा झाला होता. माझे लेखन साहित्यक्षेत्रातील वेगवेगळ्या तंज्ज्ञांनी तपासून त्यावरचे अभिप्रायही चांगले दिले होते.

... तरीही एके दिवशी मनात विचार आला की, प्रा. डॉ. कल्याणी हर्डीकर-मॅडम यांच्याकडून पुन्हा एकदा हे लेखन तपासून घ्यायचे. लोकसाहित्याच्या संशोधक - अभ्यासक, सरस्वती मंदिर कला व वाणिज्य रात्र महाविद्यालयाच्या मराठी विभाग प्रमुख, शिस्तप्रिय आणि विद्यार्थीप्रिय प्राध्यापिका अशी साहित्य आणि शैक्षणिक क्षेत्रात हर्डीकर-मॅडम यांची ओळख आहे.

मी एके दिवशी रात्र महाविद्यालयामध्ये मॅडम यांना भेटलो. सुरुवातीचे औपचारिक बोलणे झाल्यानंतर माझ्याकडील हस्तलिखित मी मॅडम यांच्याकडे सुपूर्द केले. थोड्याच वेळात संपूर्ण हस्तलिखित नजरेखालून घातल्यानंतर मॅडम यांनी मला विद्यापीठीय पीएच.डी. संशोधनासाठी प्रवृत्त केले.

पुस्तक प्रकाशित करायला निघालेलो मी विचारांती पीएच.डी. संशोधनाच्या मार्गाला वळलो. विद्यापीठीय पातळीवरील संशोधन हा वेगळाच प्रकार असतो हे त्यामुळे कळले. खंडोबा विषयावर अगोदर तब्बल नऊ वर्षे अभ्यास, लेखन केले असले तरी पीएच.डी. 'प्रबंध' पूर्ण व्हावयास तब्बल ४ वर्षे ५ महिने कालावधी लागला. अर्थातच, विद्यापीठीय संशोधनाच्या सर्व अंगांचा सांगोपांग विचार करून आणि पुन्हा पुन्हा नवसंदर्भाचा समावेश करून हे प्रबंधलेखन मी जास्तीत जास्त सशक्त करण्याचा मनोभावे प्रयत्न केला आहे. महत्त्वाचे म्हणजे, ढोबळ पद्धतीने प्रबंधातील प्रकरणांचे वाचन न करता पान न् पान आणि ओळ न् ओळ पुन्हा पुन्हा वाचून त्यात योग्य ते बदल आणि सूचना सुचवून मॅडम यांनी माझ्याकडून सदर प्रबंधलेखनाचे काम अतिशय शिस्तबद्ध पद्धतीने करून घेतले आहे. पीएच. डी. च्या संशोधनासाठी असा 'मार्गदर्शक' मिळणे सध्या तरी दुर्मिळच. परंतु मला हा लाभ झाला हे मी माझे परमभाग्य समजतो. ''भारतीय लोकदैवत 'खंडोबा' विषयीच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास'' हा संदर्भ प्राप्तीच्या दृष्टीने अतिशय आव्हानात्मक असा प्रबंध माझ्या हातून तावून-सुलाखून तयार झाला तोच मुळी डॉ. कल्याणी हर्डीकर-मॅडम यांच्या बहुमूल्य आणि दूरदर्शी मार्गदर्शनामुळे. त्यामुळे पुन्हा पुन्हा त्यांचे आभार.

ज्यांच्या आर्थिक पाठिंबा आणि मानसिक आधाराशिवाय इथपर्यंत पोहचणे शक्य नव्हते,त्रिवार शक्य नव्हते, त्या श्री. विलासराव पडवळ तथा 'दादा' यांचे ऋण तरी कोणत्या शब्दात मांडू ? हा ऋणानुबंध असाच अखंड राहो हीच परमेश्वरचरणी प्रार्थना.

स्नेह, प्रेम, जिव्हाळा, आपुलकी हे शब्द ज्यांच्या मायेपुढे थिटे पडावेत त्या माझ्या अतिशय प्रेमळ भगिनी सौ. जनाबाई ज्ञानेदव दडस- श्रीराम (बाई), श्रीमती बबई बाबूराव दडस - श्रीराम (बीबी), सौ. छबूताई महीपती लोंखडे-पाटील (जिजि), श्रीमती ठकुबाई महादेव झंजे (आक्का), सौ. शोभा पंढरीनाथ कोळपे (सोबा).

दाजी : श्री. ज्ञानदेव गणपत दडस- श्रीराम, श्री. महिपती बाबासो लोखंडे - पाटील, श्री. पंढरीनाथ सावळाराम कोळपे.

भाच्या : सौ. कुसुम, सौ. संगीता, सौ. मंगल, सौ. नंदा, सौ. वंदना, सौ. राणी, सौ. जयश्री (पिंकी), कु. सीमा, कु. आधिका (पप्पी).

भाचे : श्री. बाळकृष्ण, धनंजय, बाळू, सोमनाथ, अमोल (पिन्टू), सचिन, संभाजी (दादा), बापूराव (चिक्क्या), प्रकाश (पप्पू) यांच्यासाठी सध्यातरी माझ्याकडे शब्द नाहीत.

प्रबंधाची संगणकीय अक्षरजुळणी अतिशय सुरेख आणि वेळेत करून दिल्याबद्दल कु. सीमा बोकील, अनिल शंकरराव खंडाईत (चव्हाण), अमितकुमार नारायण डुबल, पुणे यांचे तसेच मुद्रित शोधनाचे किचकट काम अतिशय आपुलकीने परंतु चिकित्सकपणे करून देणारे माझे मित्र प्रा. डॉ. रघुनाथ शेळके , प्राचार्य, साईकृपा कला महाविद्यालय, घारगाव, ता. श्रीगोंदा, जि. अहमदनगर यांचे विशेष आभार !

महाराष्ट्र-कर्नाटकातील माझ्या 'चर्तुदश खंडोबा स्थलदर्शन' च्या शोध यात्रेत श्रध्येय भावनेतून सामील झालेले माझे मित्र-पत्रकार व वृत्तपत्रीय छायाचित्रकार श्री. विजयकुमार हरिश्चंद्रे, दैवतशास्त्राचे अभ्यासक श्री. गणेश टाक, जेजुरी तसेच पुणे येथील दै. सकाळचे मुख्य छायाचित्रकार श्री. मिलिंद वाडेकर, पुणे यांनी खंडोबाविषयीची आकर्षक छायाचित्रे उपलब्ध करून दिल्याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच !

बारोमास दुष्काळी स्थिती अनुभवणाऱ्या दुधेबावी गावातील, महारखिंडीच्या पायथ्याशी वसलेला धनगरवाडा. पिढ्यान् पिढ्यापासून चालत आलेली कुटुंबातील निरक्षरता आणि भयानक दारिद्रय. अशा मानसिकतेत, आणि परिस्थितीमध्ये झालेला माझा इथपर्यंतचा खडतर प्रवास.  यामध्ये मला जीवनात वेगवेगळ्या वळणावर भेटलेल्या विविध क्षेत्रातील व्यक्ती, त्यांनी वत्सल भावनेतून केलेले सहकार्य, यामुळेच ते शक्य झाले. या सर्व ज्ञात-अज्ञात व्यक्तींचे मन:पूर्वक आभार.

**विठ्ठल बापूराव ठोंबरे**

# ऋणनिर्देश

प्रा. डॉ. मनोहर जाधव (प्रमुख, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. अविनाश आवलगावकर, (माजी प्रमुख, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ.), प्रा. डॉ. पंडित विद्यासागर (माजी संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. बजरंग कोरडे (प्रमुख, इंग्रजी विभाग, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. तुकाराम पाटील (माजी प्रमुख, हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. कांचन मांडे (प्रमुख, संस्कृत विभाग, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. सरोजा भाटे (माजी प्रमुख, संस्कृत विभाग, पुणे विद्यापीठ), प्रा. डॉ. कल्पना कुलकर्णी, प्रा. डॉ. विवेकानंद ससाणे, प्रा. डॉ. माधवी खरात, प्रा. डॉ. चंद्रकांत अभंग, डॉ. अरुण प्रभुणे,डॉ. अनुराधा कुलकर्णी, डॉ. सरोज तपस्वी, डॉ. सुधीर तारे, प्रा. राजेश बाळासाहेब आगावणे, प्रा. शाम रामभाऊ कांबळे, प्रा. बाळासाहेब दामोदर घाडगे, प्रा. रूपाली लंबाते-अवचरे, श्रीमती पूर्णिमा लिखिते, श्रीमती जयश्री बागाईतकर, श्रीमती रंजना गुजर, श्रीमती लक्ष्मीबाई बबनराव पडवळ, सौ. मंगला विलासराव पडवळ, ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. युवराज निवृत्ती लोंढे (नोटरी -भारत सरकार) , ॲड. वसंतराव बापूराव बरकडे (नोटरी -भारत सरकार), ॲड. विठ्ठलराव ढेकळे (नोटरी -भारत सरकार), ॲड. रोहिदास पिसाळ (नोटरी -भारत सरकार), ॲड. हनुमंत बी. टकले, ॲड. शंकरराव वाघमोडे, ॲड. सुभाष शंकरराव कुबडे, ॲड. महादेव व्यंकटराव नागवडे, तानाजी नाना शिंदे, बाळू शंकर पडळकर, किशोर तथा राजाभाऊ लासुरे, प्रभाकर मारुती पवार, वा. ल. मंजूळ, सतीश सांगळे, सुभाष क्षीरसागर, स्वामी योगनाथानंद तथा विजय महाराज, अनंत कोंटडकर, कै. ना. वि. काकतकर, इतिहासतज्ज्ञ पांडुरंग बलकवडे, महेश तेंडुलकर, मंदार लवाटे, रणजित जगताप, चित्रकार अनिल उपळेकर, नागेश घाटपांडे, श्रीरंग राजेन्द्र खरात, रा.आ.कदम, अभिनेते सोमनाथ शेलार, रविंद्र सोमनाथ साळवे, प्रशांत सुभाष मालपुरे, प्रा. धर्मराज पवार, प्रा. मोहन वासुदेवराव निकम, मा. प्रतापराव गोविंदराव पवार (अध्यक्ष, सकाळ इंडिया फाऊंडेशन, पुणे), डॉ. ए. एस. कालगावकर (कार्यकारी सचिव, सकाळ इंडिया फाऊंडेशन, पुणे), श्री. मधुकर द. मुळे (पुणे).

पत्रकार : ''विजय अंबाडे, राज काझी (नाट्य समीक्षक व चित्रपट कथालेखक), यमाजी बाळाजी मालकर, सुनित भावे, दीपक दराडे, संतोश शेणई, प्रदीप निफाडकर, संजय आवटे, कमलेश ढवळीकर, राजाभाऊ पाटील, संभाजी पाटील, प्रमोद गिरी, अबिद शेख, राजेंद्र पंढरपुरे, गणेश पुजारी, महेश जांभुळकर, संतोश गव्हाणे, स्वप्नील पोरे, विवेक सबनीस, मिलिन्द बोरकर, चंदू पालकर, सौ. मेधा पालकर, संतोष चौरे, विनायक कुलकर्णी, जनार्दन कारळे, पंकज केळकर (पुणे).''

कै. सखाराम गेनबा रसाळ, विलास विष्णू जाधव, श्रीकांत बबनराव पडवळ, रामदास तुकाराम रसाळ, संतोष सोपान जाधव(जांभळी, ता. भोर), नथू पर्बती गोरड (गोरड म्हसवली, ता. भोर),

प्रकाश फाळके, शरद खोमणे, दिलीप कोलते, सौ. योजना विजयकुमार हरिश्चंद्रे, जगन्नाथ बारभाई, कु. सारिका दिडभाई, मार्तंड देव संस्थानचे विश्वस्त - अशोकराव टेकवडे(मुख्य विश्वस्त), नितीन राऊत, ॲड. दिलीप निरगुडे, रामचंद्र ज. दिडभाई (मुख्य विश्वस्त, श्रीखंडोबादेवता लिंग-कऱ्हेपठार पब्लिक ट्रस्ट) जेजुरी (ता. पुरंदर).

बबनराव बापूराव ठोंबरे, हनुमंत माधवराव ठोंबरे, लक्ष्मण माधवराव ठोंबरे, दुधेबावी (ता. फलटण), राजकुमार लक्ष्मण साळुंके (सातोली, ता. करमाळा), संतोष देशपांडे , नाझरे (ता. पंढरपूर), प्रा. सुधाकर जगन्नाथ बोरसे, शिरसोंडी (ता. मालेगाव), डॉ. मंगला वैष्णव, (औरंगाबाद), ह.भ.प. रामदास महाराज परभणीकर तथा प्राचार्य रामदास डांगे (परभणी), कै. प्रा. श्री. मा. कुलकर्णी (नागपूर), डॉ. प्रमोदानंद थळी, सुखदेव गायकवाड (मुंबई), प्रा. डॉ. ॲन फेल्डहौस, स्टेट ॲरिझोना युनिव्हर्सिटी (अमेरिका).

**ग्रंथालये :** जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ, भारत इतिहास संशोधक मंडळ, भांडारकर प्राच्याविद्या संस्था, महाराष्ट्र साहित्य परिषद, डेक्कन महाविद्यालय, शासकीय पुरातत्त्व विभाग, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे शब्दकोश कार्यालय, संतकृपा प्रतिष्ठान, रामकृष्ण मठ, शासकीय ग्रंथालय विश्रामबागवाडा, पुणे मराठी ग्रंथ वाचनालय (पुणे), सरस्वती ग्रंथ महाल, तंजावर (तामीळनाडू).

# विषयानुक्रम

## खंडोबा उपासनेचा पूर्वतिहास

खंडोबा उपासनेस प्रारंभ नक्की केव्हा झाला हे ठोस पुराव्याअभावी निश्चितपणे सांगता येत नसले, तरी काही पौराणिक संदर्भांच्या आधारे खंडोबाची उपासना त्याच्या अवतार प्रकटीकरणापासून म्हणजेच त्रेता युगापासून सुरू झाली असावी आणि इसवीसनाच्या आसपास ती प्रचारात व प्रसारात आली असावी, असे वाटते. त्यासाठीचे आधारभूत संदर्भ पुढीलप्रमाणे नोंदविता येतील.

१) महाभारतकार महर्षी वेदव्यासांनी लिहिलेला व ब्रह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडांतर्गत समजला जाणारा खंडोबा उपासनेतला आद्यसंस्कृत ग्रंथ 'मल्लारिमाहात्म्यम्' हा होय. या ग्रंथात खंडोबा अवताराचे प्रयोजन किवा महात्म्यकथा सांगितली आहे.[१]

२) भगवान श्रीकृष्णाचे कुलदैवत 'खंडोबा' असल्याचा उल्लेख नामदेव गाथेत[२] आणि श्रीधरस्वामी नाझरेकरकृत 'हरिविजय'[३] या पौराणिक पोथीत तसेच खंडोबाविषयक इतर आध्यात्मिक ग्रंथात, लोककथा व लोककाव्यात आढळतात.

३) माहात्म्य पावलेल्या खंडोबाच्या एकूण चौदा महत्त्वाच्या ठिकाणांपैकी एक असलेल्या कर्नाटकातील बेळ्ळारी जिल्ह्यातील मैलार या प्रसिद्ध तीर्थक्षेत्री स्थानिक ब्राह्मण मल्हारीभक्त व आद्यशंकराचार्य यांच्या खंडोबाभक्तांच्या श्वानवत भाषेवरून बौद्धिक वाद झाला होता. याचा उल्लेख आनंदगिरींच्या शङ्करविजय या संस्कृत ग्रंथात आढळतो.[४] आद्यशंकराचार्यांचा कार्यकाल इ.स. सातव्या शतकातला आहे.

४) 'बालाजी पुराणम' या तुळू ग्रंथात व काही तत्कालीन स्मृतींमध्ये खंडोबाचा इतर देवतांशी सबंध कसा आला? याचे उल्लेख आढळतात. हे संदर्भ सातव्या शतकातील आहेत.[५]

५) बाराव्या शतकात खंडोबा उपासनेचा प्रचार आणि प्रसार मोठ्या प्रमाणात सुरू होता. याचे पुरावे यादवकाळातील महानुभवांच्या 'लीळाचरित्र' या म्हाईंभटाने लिहलेल्या आद्यचरित्र ग्रंथामध्ये[६] तसेच कर्नाटकातील त्यावेळचे अग्रणी समाजसुधारक महात्मा बसवेश्वर यांच्या वचन साहित्यात आढळतात.[७]

## मल्हारीमाहात्म्याची पूर्वपीठिका

खंडोबाच्या अवताराचे प्रयोजन किवा माहात्म्यकथा ही महर्षी वेदव्यासलिखित 'मल्लारिमाहात्म्यम्' या मूळ संस्कृत ग्रंथात सांगितली असून, बह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडात ती समाविष्ट केल्याचे प्रस्तुत ग्रंथकर्त्याने म्हटले आहे. ग्रंथातील प्रत्येक अध्यायाच्या शेवटी, 'इतिश्री ब्रह्मांडपुराणे क्षेत्रखंडे मल्लारिमहात्म्ये' अशी समाप्तिमुद्रा आहे. महर्षीवेदव्यास तथा कृष्ण द्वैपायन यांचा कार्यकाल त्रेतायुगातील. मल्हारीप्रकटीकरणाचा आणि ग्रंथकर्त्याचा कार्यकाल हा त्रेतायुगातीलच असल्यामुळे याच काळात केव्हा तरी हा ग्रंथ रचला असावा. परंतु ब्रह्मांडपुराणाच्या कुठल्याच अधिकृत छापील प्रतीमध्ये 'मल्लारिमाहात्म्यम्' ची नोंद आढळत नाही. त्याची तार्कीक कारणमीमांसा अशी : ''मल्हारी हे बहुजनांचे लोकप्रिय कुलदैवत असल्यामुळे त्याची उत्तरोत्तर वाढत जाणारी लोकप्रियता याचा बारकाईने विचार आणि अभ्यास करून, जर ब्रह्मांडपुराणाच्या छापील आवृत्तीमध्ये 'मल्लारिमाहात्म्यम्' चा समावेश केला तर मल्हारीची एक विशिष्ट प्रकारची भक्तिपरंपरा निर्माण होईल व भारत वर्षातील अवघ्या बहुजनांसह विविध प्रांतातील उच्चकुंलीनामध्येही त्याचे अढळ श्रद्धास्थान निर्माण होईल. या सामाजिक-धार्मिक द्वैती भावनेतून अध्यात्म क्षेत्रातील सनातनी विचारप्रवृत्तीच्या काही जाणकार लोकांनी ब्रह्मांडपुराणांतर्गत क्षेत्रखंडातील प्रस्तुत मल्लारिमाहात्म्यम्चा हस्तलिखित भाग छपाईतून हेतुपुरस्सर गाळला असावा. (अर्थात् खंडोबाची वर्तमानस्थित वैश्विक परिमाण लाभलेली आध्यात्मिक, धार्मिक लोकप्रियता तसेच विद्यापीठीय पातळीवर देशी-विदेशी अभ्यासंकाकडून होणारे या विषयावरील संशोधन याबाबी लक्षात घेतल्यास एका विशिष्ट समाजसमूहातील सनातनी धर्मवाद्यांना खंडोबाच्या लोकप्रियतेबद्दल वाटणारी अनाठायी भीती किती तकलादू स्वरूपाची होती याचे प्रत्यंतर येते.) काही वर्षांनतर ही हस्तलिखित प्रत बहुजन समाजातील एखाद्या चाणाक्ष मल्हारीभक्ताच्या हाती लागून त्याने यावरून काही हस्तलिखित नकला तयार केल्या असाव्यात. ''पुढे शके १५०७ (इ. स. १५८५) मध्ये प्राकृत मराठी कवी सिद्धपाळ केसरी नामक मल्हारीभक्ताला अंत:स्फूर्ती होऊन त्याने या ग्रंथाचे मराठी ओवीबद्ध भाषांतर केले असावे,''[८] आणि अगदी नजीकच्या काळामध्ये संस्कृत व मराठी अशा दोन्ही हस्तलिखित ग्रंथाची छपाई स्वतंत्ररीत्या झाली असावी.

हेमाद्री पंडिताने लिहिलेल्या 'चतुर्वर्ग चिंतामणी' या व्रतचर्चा करणाऱ्या व्रतखंडात लोकप्रचलित अनेक

व्रतांची वर्णने दिली आहेत. त्यात खंडोबाच्या चंपाषष्ठीचा उल्लेख आढळत नाही. चंपाषष्ठीचे व्रत दिले आहे. परंतु ते कुमारांचे व्रत म्हणून. 'चतुर्वर्ग चिंतामणी' या ग्रंथाची रचना इ.स. १२६० ते १२७१ या काळातील आहे. ''जर 'मल्लारि-महात्म्या' ची रचना मैलाराच्या लैखिक उल्लेखांपूर्वी म्हणजेच अकराव्या शतकापूर्वी झालेली असती, तर व्रतचर्चा करणाऱ्या 'चतुर्वर्ग चिन्तामणी' त चम्पाषष्ठीच्या व्रताची नोंद व्हावयास हवी होती''[९] असे मत डॉ. रा. चिं. ढेरे यांनी व्यक्त केले आहे. परंतु 'कुठलीही कलाकृती परिपूर्ण असू शकत नाही' या तत्त्वाचा आधार घेतल्यास व तत्कालीन वाङ्मयीन परिस्थिती लक्षात घेतल्यास संदर्भप्राप्तीच्या मर्यादेमुळे, 'चंपाषष्ठी' हे कुमारांचे व्रत आहे, त्याचबरोबर ते खंडोबाचेही व्रत आहे, असा उल्लेख करण्याचे हेमाद्रिपंडिताच्या हातून राहून गेल्याचे नाकारता येत नाही आणि 'चतुवर्ग चिंतामणी' म्हणजे सर्व व्रतांची माहिती असणारा परिपूर्ण अंतिम ग्रंथ नव्हे. त्यामध्ये कितीतरी लोकप्रचलित व्रतांच्या नोंदी आढळत नाहीत म्हणून डॉ. ढेरेंचे वरील विधान 'प्रमाण' मानता येण्यासारखे नाही.

हेमाद्रीनंतरचा विख्यात धर्मनिबंधकार कमलाकर भट्ट यांनी आपल्या 'निर्णयसिंधू' या ग्रंथात चंपाषष्ठी व्रताचा खंडोबाशी सबंध सांगितला असून, त्यासाठी मल्हारीमाहात्म्याचाच आधार दिला आहे.

**मार्गशीर्षशुक्लषष्ठी चम्पाषष्ठीति महाराष्ट्रेषु प्रसिद्धा...**
**तदुक्तं ब्रम्हाण्डपुराणे मल्लारिमाहात्म्ये...**[१०]

असे वर्णन 'निर्णयसिंधू' मध्ये आढळते. हा ग्रंथ इ. स. १६१२ मध्ये रचल्याची नोंद आहे. संत ज्ञानेश्वरांच्या नावावर असलेल्या योगवासिष्ठ ग्रंथात असे वर्णन आहे.

**सप्तपुंत्रासहितु। युधिष्ठिरु तपोवनां आतु।**
**मळमणि दैत्यें निभ्रांतु। पराभविला॥**
**तो योगिया देखौनि स्वभावें। शंकर काढावेयासी धावे।**
**तो मल्लमणि वधावे। बहिरवरूपें॥**[११]

या श्लोकात मल्ल-मणि दैत्य आहेत, आणि त्यांना मारणारा बहिरवरूपी शंकर म्हणजेच मार्तंडभैरव आहे. मूळ संस्कृत मल्हारिमाहात्म्यात सप्तर्षींच्या मागे 'धर्मपुत्रा' असे विशेषण आढळते. येथे युधिष्ठिर म्हणजे 'धर्म' असे मानून धर्माचे रक्षण करणारे सात ऋषी म्हणजेच 'सप्तपुत्र' असा अर्थ प्रस्तुत ग्रंथकर्त्याला अभिप्रेत असावा.

परंतु ''हा ग्रंथ ज्ञानेश्वरांनी नक्कीच लिहिला नाही. त्याची रचना गोव्यात हिंदूचा धर्मछळ सुरू झाल्यानंतर म्हणजे इ. स. १५४१ मध्ये किंवा नंतर नजीकच्या काळात केव्हा तरी झाली असावी. फादर स्टिफन्सने लिहिलेल्या ख्रिस्त पुराणात ' योगवासिष्ठ' ग्रंथाचे अनुकरण केल्याचे आढळते'' अशा प्रकारचे मत मराठी संशोधन पत्रिकेत अ. का. प्रियोळकरांनी व्यक्त केले आहे.

ज्ञानेश्वरांच्या नंतर एकनाथांच्या स्फुट वाङ्मयात खंडोबाच्या रूढ चरित्रकथेची सूचने आढळतात. नाथमहाराजांचा समाधीकाळ इ.स. १५९९ असा आहे. म्हणजे 'निर्णयसिंधु' चा कर्ता कमलाकर भट्ट, 'योगसंग्राम' चा कर्ता शेख महंमद आणि एकनाथ हे तिघेही समकालीन आहेत. योगसंग्राम या ग्रंथात घोड्यावर बसलेल्या खंडेराव-बाणाईच्या मूर्तीचा उल्लेख **'सुवर्णाचा खंडेराव तेज्या (घोडा) स्वार। सुवर्णाची बाणाई पाठीशी सुंदर'**[१३] असा आहे. 'मल्हारीमाहात्म्य' निर्मितीच्या कालमर्यादा निश्चित करताना भक्कम पुष्टी न देणाऱ्या, वरवरच्या संदर्भावरून अडाखे बांधून डॉ. ढेरे म्हणतात, ''इ.स. १२६० ते इ. स. १५४० या दोन-अडीच शतकांच्या अवधीत 'मल्लारि-महात्म्य' हा संस्कृत ग्रंथ रचला गेला''[१४] . परंतु हा केवळ तर्क आहे. प्रतिभेच्या जोरावर मारलेली उत्तुंग 'काल्पनिक' भरारी आहे. सबळ पुरावा नव्हे. पौराणिक संदर्भ व श्रद्धा यांना कागदोपत्री पुराव्यांच्या, विज्ञानाच्या नियमात नेहमीच चौकटबद्ध करता येईल असे नाही.

## मल्हारीमाहात्म्य कथासार

मल्हारीमाहात्म्याविषयीचे अनेक उल्लेख लोकसाहित्य तसेच पौराणिक ग्रंथ साहित्यात विपुल प्रमाणात आढळतात. या सर्व साहित्याचा धांडोळा घेतल्यानंतर, त्यातील वेगवेगळ्या रंजक संदर्भांची एकत्र गुंफण केल्यानंतर मल्हारीमाहात्म्यकथासाराचे स्वरूप कसे समृद्ध होते, हे पाहणे उद्‌बोधक ठरेल.

पूर्वी कृतयुगात मणिचूल पर्वतावर धर्मपुत्र सप्तर्षी तपसाधना करीत होते. पर्वतावरील निसर्गरम्य व शांत स्थळी आश्रम बांधून कुटुंबीय आणि शिष्य परिवारासह अतिशय समाधानात ते जीवन व्यतीत करीत होते. परंतु एके दिवशी त्यांच्यावर महाअरिष्ठ ओढविले. मल्लासुर नावाच्या महाभयंकर दैत्याने ससैन्य येऊन अचानक ऋषीआश्रम

उद्‌ध्वस्त केला. धडधडत्या यज्ञकुंडात जिवंत गाई ढकलून दिल्या. ऋषी पत्न्या आणि कन्यांची ऋषीसमोरच घोर विटंबना केली, ऋषींच्या शेंड्यांना पकडून विहिरीत ढकलून दिले. परत निघताना दैत्याने अनेक सुंदर ऋषीस्त्रिया, कन्या आणि गाई पळवून नेल्या.

अचानक झालेल्या या प्रकाराने भयभीत आणि शोकाकुल झालेल्या ऋषींनी नारदमुनींच्या सल्ल्याने कुटुंबीयांना व शिष्य परिवाराला जयाद्रि पर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या लवथळेश्वर या सुरक्षित ठिकाणी नेऊन ठेवले. नंतर ते स्वर्गस्थित इंद्राकडे प्रस्थानकर्ते झाले. इंद्राजवळ घडली हकीकत कथन करून तत्काळ दैत्यविनाशाची तसेच आपल्या परिवाराच्या अभयाची मागणी केली. त्यावर इंद्र म्हणाला '' मल्ल आणि मणि या दैत्यबंधूंनी घोर तपश्चर्या करून ब्रह्मदेवाकडून अजिंक्यपदाचा वर मिळविला आहे. त्यांचा नाश करण्यास मी असमर्थ आहे. तेव्हा आपण भगवान महाविष्णूकडे जावे. ते नक्कीच त्या महापापी दैत्यांचे पारिपत्य करतील.''

इंद्राच्या सांगण्यावरून ऋषी वैकुंठामध्ये विष्णूकडे आले. विष्णूनेही दैत्यसंहाराची असमर्थता दर्शविल्यानंतर त्याच्याच सांगण्यावरून व त्याच्यासह ऋषी कैलासपर्वतावर भगवान शंकराकडे आले.

ऋषीमुखातून दैत्यछळाची कहाणी श्रवण करताच क्रोधित झालेला शिव भयंकर तांडवनृत्य करू लागला. आपला विस्कटलेला जटाभार त्याने प्रचंड गतीने भूमीवर आपटला. तत्क्षणी, महामारी नामक महाप्रचंड, अक्राळ विक्राळ दैत्यशक्ती निर्माण झाली. ऋषींनी तिला तूप पाजून शांत केली. म्हणून तिचे नाव 'धृतमारी' असे पडले.

नंतर शिवाने मणि-मल्ल दैत्यांच्या विनाशासाठी भव्य-दिव्य आणि अतिशय उग्र असा 'मार्तंडभैरव अवतार' धारण केला. अतिशय उंच व धिप्पाड अशा मार्तंडभैरवाच्या गळ्यात रूंडमाळ रूळत होती. त्यावर महासर्पाचे भूषण धारण केले होते. कानामध्ये चंद्र-सूर्यासारखी तेजस्वी कुंडले तळपत होती. चंद्रकोरीने युक्त असा रत्नजडित सुवर्णमुकुट त्याने मस्तकावर धारण केला होता. हातात खडग्, त्रिशूल, डमरू, पात्र इत्यादी शस्त्रे विराजत होती. त्रिनेत्रधारी, कपाळावर भंडारा चर्चिलेला असा तो मार्तंडभैरव नंदीवर आरूढ होऊन सेनापती पुत्र कार्तिकस्वामींच्या नेतृत्वाखालील सातकोटी गणांच्या सैन्यासह युद्धासाठी मणिचूल पर्वतावर उतरला.

मल्ल दैत्याला ही वार्ता समजताच तो भयंकर चिडला. ''अरे स्मशानात राहणारा, व्याघ्रचर्म परिधान करणारा तो वृध जटाधारी शिव माझ्याशी काय युद्ध करणार ? सर्प ही त्याची भूषणे आणि वृषभ हे त्याचे वाहन असणाऱ्या त्या दरिद्री शिवाची माझ्यापुढे एवढी थोरवी गाता कशाला ? एका क्षणार्धात त्याच्यासहीत त्याचा कैलासपर्वत मी उलथून टाकीन '' अशा फुशारक्या मारत तो असुरराज आपल्या भव्य राजप्रासादाच्या उत्तुंग शिखरावर चढला व मार्तंडभैरवाच्या विराट देवसेनेचे अवलोकन करू लागला. परंतु मार्तंडभैरवाचे ते विशाल सैन्यदल पाहून तो अत्यंत भयभीत झाला. मात्र, वरकरणी तसे न दाखविता त्याने युद्धाची जय्यत तयारी सुरू केली.

मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा. मणिचूल पर्वताच्या रणभूमीवर मार्तंडभैरवाची सातकोटी देवसेना आणि त्याहून दुप्पट असलेली मल्लासुराची दैत्यसेना समोरासमोर येऊन युद्ध पवित्र्यात उभ्या ठाकल्या. युद्धाला तोंड फुटले. देवसेना इंद्राच्या नेतृत्वाखाली लढत होती. तर दैत्यसेनेच्या नेतृत्वाचा मानकरी होता महाबलाढ्य दैत्य निर्जरध्वंसी. बघता बघता तुंबळ युद्ध सुरू झाले. युद्धगर्जना, तलवारीचे खणखणाट, प्रचंड वेगाने येऊन एकमेकावर आदळणारे धनुष्यबाण इत्यादी शंस्त्रास्त्रांच्या आघातामुळे अग्निज्वाळा निर्माण होऊन चौफेर पसरलेल्या धुरामुळे आकाश कोंदून गेले. रक्ताचे पाट वाहू लागले. साऱ्या समरांगणावर मृत सैनिकांच्या प्रेतांचे खच दिसू लागले. शेवटी इंद्राने आपल्या भात्यातील एक दिव्यबाण काढला व मार्तंडभैरवाचे स्मरण करून निर्जरध्वंसीच्या दिशेने सोडला. सू-सू करीत गेलेल्या त्या बाणाने निर्जरध्वंसीचा कंठछेद केला. दैत्यसेनेचा पराजय झाला. इंद्रासहित सर्व देवसेनेला अपार आनंद झाला.

मार्गशीर्ष शुद्ध द्वितीया. दुसऱ्या दिवशीच्या युद्धामध्ये देवसेनापती कार्तिकेयाकडून खडगद्रष्ट हा दैत्य मारला गेला. मार्गशीर्ष शुद्ध तृतीया आणि चतुर्थी या दिवसांच्या युद्धामध्ये अनुक्रमे देवसेनेच्या गजाननाकडून उल्सामुख तर जयनंदीकडून कुंतलोमा हे महाभयंकर दैत्य मारले गेले.

मार्गशीर्ष शुद्ध पंचमी. युद्धाच्या पाचव्या दिवशी खुद्द मार्तंडभैरव आणि मल्लासुराचा महापराक्रमी धाकटा बंधू मणि यांच्यामध्ये घनघोर रणसंग्राम झाला. अखेरच्या क्षणी मार्तंडभैरवाने अंत्यत आवेशाने आपला दिव्य त्रिशूल दैत्याच्या वक्षस्थळावर मारला. त्या त्रिशुलाच्या प्रचंड आघाताने रक्तबंबाळ झालेला दैत्य क्षणातच भूमीवर कोसळला व प्राणांतिक वेदनांनी तळमळू लागला. मार्तंडभैरवाने धावत जाऊन त्याच्या मस्तकावर पाय ठेवला, त्याच क्षणी दैत्याच्या मनात अष्टसात्विक भाव जागृत झाले. पूर्वजन्माची स्मृती झाल्याने मणि दैत्याने देवाचा पाय तसाच आपल्या डोक्यावर धरून ठेवला. नेत्रातून अखंडपणे आनंदाश्रू झरत असतानाच, ''हे शिवा, मी अनन्यभावाने तुला शरण

आलो आहे, तुझे पाय मी कधीच सोडणार नाही'' असे म्हणून दैत्य मार्तंडभैरवाची स्तुती करू लागला. अशी प्रेमळ स्तुती ऐकून मार्तंडभैरव प्रसन्न झाले. मणिदैत्यास म्हणाले, ''तुझे युद्धकौशल्य आणि भक्ती पाहून मी संतुष्ट झालो आहे, तुला इष्ट वाटेल असा वर माग, तो मी देण्यास उत्सुक आहे.'' तेव्हा दैत्य म्हणाला, ''हे मार्तंडभैरवा, मला असा 'वर' दे की, मी केलेली तुझी स्तुती जो कोणी करेल, त्यास अखंड लक्ष्मी प्राप्त व्हावी, तसेच, हा तुझा पाय माझ्या मस्तकावर सतत राहावा आणि घोड्यासहित माझे स्थान नित्य तुझ्या जवळ राहावे.'' मार्तंडभैरवाने ''तथास्तु'' म्हणताच मणि दैत्याने समाधानाने प्राण सोडला.

मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी. युद्धाचा सहावा आणि शेवटचा दिवस. मणिदैत्याच्या युद्धकौशल्याने आणि भक्तीने परमसंतुष्ट पावलेल्या मार्तंडभैरवाने संभाव्य युद्धापासून मल्लासुराला परावृत्त करण्यासाठी त्याच्याकडे श्रीविष्णूला शिष्टाईसाठी पाठविले. परंतु श्रीविष्णूने केलेला प्रेमळ उपदेश त्या हट्टी आणि दृष्टबुद्धी मल्लासुराने साफ धुडकावून लावला. श्रीविष्णूची शिष्टाई असफल झाल्यामुळे संभाव्य युद्ध होणे अटळ ठरले. सुरुवातीला मल्लासुराबरोबर लढण्यासाठी धृतमारीला युद्धमैदानात पाठविले. बराच वेळ लढत झाल्यानंतर अखरेच्या क्षणी मल्लासुराने धृतमारीचा पराजय केला. नंतर स्वत: मार्तंडभैरव मल्लासुरदैत्यावर चाल करून आला. अनेक मायावी रूपे धारण करून आणि अस्त्रयुद्ध खेळून मल्लासुराने मार्तंडभैरवाशी तोडीस तोड लढत दिली. अखेरीस मार्तंडभैरवाने पाशुपत अस्त्राच्या दिव्य मंत्रांनी आपला त्रिशूळ भारून तो मल्लासुराच्या दिशेने सोडला. प्रत्युत्तर म्हणून ब्रह्मदेवाकडून मिळवलेले ब्रह्मास्त्र मल्लासुराने त्या त्रिशुळावर सोडले. परंतु मल्लासुर दुष्ट बुद्धीने मार्तंडभैरवाबरोबर युद्ध करत असल्यामुळे सत्कार्यार्थ दिलेल्या त्या शक्तीने आपणहून माघार घेतली. प्रचंड वेगाने येणारा तो त्रिशूळ मल्लासुराच्या छातीत आरपार घुसला. मल्लासुर रक्तबंबाळ झाला. जमिनीवर कोसळला.

त्रिशुळाच्या आघाताने तळमळत असलेल्या मल्लासुरास पाहून मार्तंडभैरवाने विकट हास्य करीत आपला पाय त्याच्या मस्तकावर ठेवला. तत्क्षणी त्याचा गर्व, अहंकार नष्ट होऊन त्याच्यामधले अष्टसात्विक भाव जागृत झाले. मार्तंडभैरवाचे दोन्ही पाय आपल्या हातात धरून तो मार्तंडभैरवाची स्तुती करू लागला.

मृत्युशय्येवर पडून मल्लासुराने केलेली प्रेमळ स्तुती ऐकून मार्तंडभैरव म्हणाला, ''हे मल्लासुरा तुझ्या भक्तीवर मी प्रसन्न झालो आहे, तुला हवा तो वर माग.'' यावर मल्लासुर म्हणाला, ''हे मार्तंडभैरवा मला असा वर दे की, माझे नाव तुझ्या नावाच्या अगोदर घेतले जावे आणि माझे मस्तक निरंतर तुझ्या पायाखाली राहावे. जे तुझी भक्ती करतील त्यांना तू प्रसन्न व्हावेस. त्यांना तू दर्शन द्यावेस. तुझ्या भक्तांना दु:खाचा वारा लागू नये. ते सुखी, आरोग्यसंपन्न असावेत. सदैव त्यांच्या घरी लक्ष्मी नांदावी.'' भक्तकल्याणासाठी मागितलेला वर ऐकून संतुष्ट झालेल्या मार्तंडभैरवाने 'तथास्तु' म्हणताच मल्लासुराने अत्यंत समाधानाने प्राण सोडला. मणि-मल्ल दैत्यांचा नाश केल्यानंतर शंकराच्या 'मार्तंडभैरव' अवताराचे प्रयोजन इथेच संपले.

त्याचवेळेस, देव, ऋषींनी मार्तंडभैरवाला विनंती केली, 'देवा, जिथे तू मार्तंडभैरव अवतार धारण करून दुष्टशक्तींचा नाश केला व आमच्यांसह सर्व देवादिकांचे रक्षण केले, तिथेच तू स्वयंभू लिगांच्या रूपाने भक्तासाठी सदैवं राहावे.' मार्तंडभैरवाने ऋषींची विनंती मान्य केली. ''काही काळानंतर याच दिवशी, याच स्थळी प्रगट होईन,'' असे म्हणून मार्तंडभैरव नंदीसहित गुप्त होऊन कैलासपर्वताकडे रवाना झाले.

पुढील वर्षी याच दिवशी म्हणजेच मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी, शततारका नक्षत्रावर रविवारच्या शुभ मुहूर्तावर मणिचूल पर्वताजवळील युद्ध मैदानात दोन धनुष्यकृती लिंगे प्रकट झाली. मणि-मल्ल दैत्यांचा मार्तंडभैरवाने ज्या ठिकाणी वध केला होता, त्याच ठिकाणी ते शक्ती म्हाळसासह लिंगरूपाने प्रगट झाले. कुटुंबे-शिष्यांसहित सप्तर्षी, ब्रह्मदेव, विष्णू, इद्रांसह तेहतीस कोटी देव, भूत, पिशाच्च, शाकिणी, डाकिणी इत्यादी सर्वजण मार्तंडभैरवाच्या महायात्रेला आले होते.

ती दोन धनुष्यकृती लिंगे प्रगट होताच त्यांचे दर्शन घेऊन बह्मदेवाने मार्तंडभैरवाचे मृण्मय ध्यान केले. हे पाहून यात्रेला आलेल्या देव, ऋषींनी पूजेसाठी एक मातीची मूर्ती तयार करून त्याला 'मैलार' हे नाव दिले. वेदव्यासांनी लिहिलेल्या संस्कृत 'मल्लारिमाहात्म्यम्' मध्ये मैलार या नावाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे दिले आहे -

**म: शंभुश्च विष्णुश्च ताविलायां यदा स्थितौ।**
**तदा मेलापदं जातं तामारातीति विग्रहात्॥**
**मैलार इति मल्लारेर्नामध्येयमभूत्तदा।**
**सावर्ण्यं रलयो: प्रोक्तं मैराल इति तेन वा॥**[१५]

‘म’ म्हणजे शंभू (महादेव), ‘र’ म्हणजे विष्णू (रघुनंदन) आणि ‘इला’ म्हणजे पृथ्वी (माती). देव, ऋषींनी त्या वेळेस मार्तंडभैरवाची आणि विष्णूची मानसपूजा करून त्यांना मातीच्या मूर्तीमध्ये स्थित केले, तेव्हा त्या देवमूर्तीस ‘मैलार’ हे नाव प्राप्त झाले. म + इला (इळा) + र = मैलार. पुढे याचा अपभ्रंश होऊन मैलाराचे ‘मैराल’ किंवा ‘मैराळ’ हे नाव रूढ झाले असावे.

तात्पर्य : भगवद्‌गीतेतील वचनाप्रमाणे, ज्या ज्या वेळेला धर्माला ग्लानी येते. अनाचार हा शिष्टाचाराचे स्थान बळकावतो. भ्रष्टाचार हा नित्याचार होतो. आसुरी संपत्तीची उपासना होऊ लागते. सत्य-अहिंसेचा डांगोरा पिटीत असत्य आणि हिंसाचाराची कास धरली जाते. सदाचार अप्रतिष्ठा पावतो. न्याय-नीतीचा विक्रय होतो. सारे मानवी जीवन, समाजजीवनच गढूळ होऊन जाते. अवनत होते. अशा वेळी अधर्माचा मोड करण्यासाठी, दुष्कृताचा विनाश करण्यासाठी साधूंच्या परित्राणासाठी आणि धर्म संस्थापनेसाठी भगवंताला नवा अवतार घेणे अपरिहार्य ठरते. हे अवतार विविधरूपी विविध अंगी असतात. त्यांचे कार्यही ठरलेले असते. ते कार्य पूर्ण झाले की, त्या त्या अवताराची समाप्ती होते. याचेच प्रतीक म्हणजे भगवान शंकराने ‘मार्तंडभैरव’ हा नवा अवतार धारण करून मणि-मल्ल दैत्यांचा केलेला वध होय.

## खंडोबा-म्हाळसा, बाणाई विवाहकथा

खंडोबाला एकूण पाच बायका. म्हाळसा, बाणाई, फुलाबाई, रंभाई, चंदाबाई (‘चाँदबिबि’ या अर्थाने) ही त्यांची नावे खंडोबावरील अनेक लोककथा व लोकगीतांमध्ये डोकावताना दिसतात. त्यांच्या जाती अनुक्रमे अशा : वाणी, धनगर, माळी, शिंपी, मुसलमान. अशा भिन्न जाती-धर्मातील स्त्रियांशी लग्न करून वर्णव्यवस्थेचे बीज खोलवर रुजलेल्या भारतात खंडोबाने आंतरजातीय व आंतरधर्मीय विवाहपद्धतीची मुहूर्तमेढ रोवून राजा आणि प्रजा यांच्यामध्ये भेदभाव नाही हे स्वकृतीने दाखवून दिले. सनातनी वैदिक परंपरा लाभलेल्या तत्कालीन पौराणिक भारतात ही घटना विशेष क्रांतिकारी व समाजपरिवर्तनीय अशीच म्हणावी लागेल. म्हणूनच खंडोबा हे वर्ण-वर्ग विरहित समाज मानसिकतेचे रूप आहे. या अर्थानेच, जाती-धर्मांच्या भिंती पार करून समाजाशी एकरूप झालेल्या खंडोबाला ‘लोकदेव’ ही उपाधी शोभून दिसते.

लोकवाङ्मयात खंडोबाच्या एकूण पाच बायकांचा उल्लेख येत असला तरी लोककथांमध्ये फक्त म्हाळसा व बाणाई यांनाच स्थान मिळाल्याचे दिसते. इतर तीन बायकांचा उल्लेख हा एखाद्या हौशी लोककवीचा कल्पनाविष्कार असावा असे वाटते. कालानुरूप म्हाळसा व बाणाई यांच्या कथांमध्ये वेगवेगळे पाठभेद शिरत गेल्यामुळे दोघींच्याही कथांची वेगवेगळी रूपे लोकसाहित्यात ठळकपणे निदर्शनास येतात. भाषाशास्त्रीय दृष्टीने ‘बाणू’ या शब्दाची व्युत्पत्तीही या संदर्भांच्या अनुषंगाने तपासून पाहणे मनोरंजक ठरेल.

## खंडोबा-म्हाळसा विवाहकथा

म्हाळसा ही खंडोबाची प्रथम पत्नी. थोरली. खंडोबाच्या वेगवेगळ्या माहात्म्यकथा आणि लोककथांमध्ये खंडोबा-म्हाळसाच्या विवाहाची कथा साधारण पुढीलप्रमाणे सांगितली जाते.

देवांनी दैत्यांच्या मदतीने केलेल्या समुद्रमंथनाच्या वेळी समुद्रातून एकूण चौदा रत्ने बाहेर निघाली. त्यातील लक्ष्मी, कौस्तुभमाळ, पाचजन्य शंख, शारंग धनुष्य व धन्वंतरी विष्णूने घेतले. इंद्राने ऐरावत हत्ती, परिजातक, रंभा व धेनू मागून घेतली. सूर्याने अश्व घेतला. शंकराने चंद्र व विष घेतले. बाकी राहिली दोन रत्ने. एक अमृत आणि दुसरे मदिरा. तेव्हा, अमृताच्या वाटणीवरून देव आणि दानवामध्ये कलह निर्माण झाला. देव दैत्यांना अमृत देण्यास तयार नव्हते. कारण, समुद्रमंथनाच्या वेळी उठलेल्या हलाहलाच्या वेळेस निर्माण झालेले विष स्वत: शंकराने प्राशन केले होते. युद्धाचा प्रसंग उद्‌भवू नये म्हणून विष्णूने स्त्रीवेशातले मोहिनीरूप धारण केले. मोहिनीच्या महामायेत सर्व दैत्य पार गुरफटून गेले. याच संधीचा फायदा घेऊन विष्णूने देवांना अमृत दिले, तर दैत्यांना अमृत म्हणून मद्य. परंतु, मोहिनीच्या अलौकिक सौंदर्याने मोहित झालेल्या दैत्यांच्या लक्षात ही फसवणूक आली नाही.

या प्रसंगी शंकर तिथे नव्हते. कालांतराने त्यांना ही सुरसकथा समजली. एके दिवशी, शंकर व विष्णूमध्ये सुसंवाद चालू असताना शंकराला समुद्रमंथनाची आठवण झाली. शंकर विष्णूस म्हणाले, ‘‘तुम्ही त्या वेळेस धारण केलेले मोहिनीरूप आज मला दाखविले पाहिजे,’’ यावर विष्णू काहीसे लाजले. शंकराच्या विनंतीस मान देऊन ते

पुन्हा मोहिनीरूपात प्रगट झाले. मोहिनीच्या त्या अप्रतिम लावण्याने मोहित व कामविव्हल होऊन शंकर तिच्या पाठीमागे धावू लागले. तेव्हा ती विष्णुरूप मोहिनी शंकरास म्हणाली, ''पुढे जेव्हा तुम्ही मार्तंडभैरव अवतार धारण कराल तेव्हा म्हाळसा या नावाने मी तुमची पत्नी होऊन तुमची अतृप्त राहिलेली इच्छा पूर्ण करेन.'' असे म्हणून मोहिनी तत्काळ गुप्त झाली. मग, कामज्वराने बेभान झालेल्या शंकराने पार्वतीला आपल्या अंकी बसविले. त्याच वेळेस मोहिनी पुन्हा प्रगट होऊन तिने पार्वतीच्या देहात प्रवेश केला. मोहिनी रूपातल्या पार्वतीने पुढे शंकराच्या मार्तंडभैरव अवतारात 'म्हाळसा' नावाने नवा अवतार धारण केला.

शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण करून मणि-मल्ल दैत्यांना युद्धात ठार केले. ऋषींच्या विनंतीवरून प्रेमपुरी येथे येऊन देव, ऋषींनी स्थापन केलेल्या नंदीवाहन मृण्मय मूर्तीत शक्ती म्हाळसासह गुप्तरूपाने राहू लागले. एके दिवशी म्हाळसाने मार्तंडभैरवास विनंती केली, '' स्वामी, आपले अवतार कार्य पूर्ण झाले आहे. मी असे गुप्तरूपाने आपल्याबरोबर किती दिवस राहावे ?'' तेव्हा मार्तंडभैरव म्हणाले, ''म्हाळसा, तू नेवासेगावच्या परमशिवभक्त तिम्मशेठ वाण्याच्या घरी अवतार घ्यावास, योग्यवेळी मी तुझे पाणिग्रहण करीन.''

ठरल्याप्रमाणे म्हाळसाने तिम्मशेठ वाण्याच्या घरी जन्म घेतला. कलेकलेने ती वाढू लागली. वयात आली. एके दिवशी वाण्याने म्हाळसाजवळ तिच्या लग्नाचा विषय काढला. तेव्हा म्हाळसा म्हणाली, '' बाबा, माझ्या लग्नाची तुम्ही मुळीच काळजी करू नका. ज्याच्या प्राप्तीसाठी मी रात्रं-दिवस चिंतन करते आहे, ते राजा शिवमल्हारी माझ्या बरोबर लग्न करणार आहेत.'' मग म्हाळसाने आपल्या पूर्वायुष्याची हकीकत वडिलांना सांगितली.

कालांतराने मार्तंडभैरवाने तिम्मशेटच्या स्वप्नात येऊन सांगितले, ''तू आपली कन्या घेऊन सहकुटुंब, सहपरिवार पालीस यावे. तिथे मी तुझ्या कन्येचे पाणिग्रहण करीन.'' मग तिम्मशेठ, वऱ्हाडी मंडळीच्या मोठ्या लवाजम्यासह म्हाळसाला घेऊन पालीस आला. नवरदेव मार्तंडभैरवही प्रेमपुरीहून तेहतीस कोटी देवांसह पालीस आले.

पौष शुद्ध पौर्णिमेला सिंह लग्नाच्या शुभमुहूर्तावर मानवदेहधारी खंडोबाबरोबर म्हाळसाचे थाटामाटात लग्न लावून देण्यात आले. म्हाळसाबरोबर लग्न झाल्यानंतर खंडोबादेव 'म्हाळसाकांत' झाले.

### खंडोबा-बाणाई विवाहासंबंधीची पहिली लोककथा

बाणाई तथा बाणूबाई ही खंडोबाची दुसरी पत्नी. धाकटी बाणाईसंबंधी जरी तीन भिन्नकथा प्रचलित असल्या तरी पुढील कथाच जनसामान्य भक्तांमध्ये जास्त रुजली गेली आहे.

स्वर्गस्थित देवराज इंद्राला एकूण सात मुली होत्या. एकदा त्याने सातही मुलींना गंभीर प्रश्न विचारला, '' हे मुलींनो, तुमचा भाग्यविधाता कोण आहे ? तुम्ही कोणावर अवलबून आहात ? '' मुलींनी उत्तर दिले, ''बाबा, तुम्हीच आमचे भाग्यविधाता असून आम्ही पूर्णपणे तुमच्यावर अवलंबून आहोत.'' मात्र, हे उत्तर होते सहा मुलींचेच. सातव्या मुलीने उत्तर दिले, '' मी स्वत:वर अवलंबून असून माझे भाग्य मीच घडविणार आहे.'' या उत्तराने क्रोधीत झालेल्या इंद्राने तत्काळ त्या मुलीला तहान्या बालीकेचे रूप देऊन एका चंदनाच्या पेटीत बंद केले. दूताकरवी ती पेटी भूतलावरील चंदनपुरीच्या जंगलात सोडून दिली.

तिथे मेंढरे चारत असलेल्या एका धनगराला ती पेटी अचानक दिसताच त्यांने ती उघडली. त्यात एक सुंदर बालिका दिसताच त्याला अतिशय आनंद झाला. त्याच्या पोटी संतान नसल्यामुळे त्याने मुलीला घरी नेले. सांभाळ करू लागला. मुलीचे नाव बाणू ठेवले. बघता बघता बाणू वयात आली. बाणू एके सकाळी शिवपूजेत मग्न असताना तिथे साक्षात शिवशंकर प्रगटले. बाणूला म्हणाले, ''तुझ्या भक्तीने मी संतुष्ट झालो आहे. तुला हवा तो वर माग. तुझी जी इच्छा असेल ती मी आवश्य पूर्ण करीन''. बाणू म्हणाली, ''वर म्हणजे नवराचना ? मग देवा तुम्हीच माझे वर व्हा!'' यावर शंकर म्हणाले, ''माझे लग्न झाले आहे, तुला सवत चालेल का?'' बाणू म्हणाली, '' सवत म्हणजे मोठी बहीण. चालेल मला सवत.'' बाणाईचा प्रेमळ हट्ट आणि निश्चय पाहून शंकर तिला म्हणाले, '' तुझी इच्छा लवकरच पुरी होईल. मी थोड्याच दिवसांत मार्तंडभैरव अवतार धारण करून 'खंडोबा' या नावाने पत्नी म्हाळसासह जेजुरी गडावर राहायला येणार आहे. तिथे मला भेटायला ये.'' मग शंकराने तिला भेट म्हणून अद्‌भुत खडावा दिल्या. ''या खडावा पायात घालताच ईप्सित कार्य सिद्धीस जाईल'' असे सांगून शंकर अदृष्य झाले.

काही कालावधीनंतर एका मध्यरात्री खंडेराय बाणूच्या स्वप्नात आले. ''उद्या मला जेजुरी गडावर भेटायला

ये'', असा दृष्टांत दिला. दुसऱ्या दिवशी पायात अद्‌भुत खडावा पायात घालून बाणू आकाशमार्गे थेट जेजुरी गडावर आली. त्याचवेळेस खंडेराय आणि म्हाळसा यांच्यामध्ये सुसंवाद चालू होता. म्हाळसासमोर खंडेरावांना भेटता येणार नाही म्हणून तिने डोळ्यांतील काजळाने पत्र लिहिले. डोळ्याने खूण करून व पत्र दरवाजाजवळ टाकून बाणू आली त्या मार्गाने निघून गेली.

बाणूच्या रूपाने आधीच घायाळ झालेला खंडोबादेव प्रेमपत्र वाचल्यानंतर अधिकच अस्वस्थ व चंचल झाला. बाणूला कोणत्याही स्थितीत भेटायचेच, असा निश्चय करून देवाने म्हाळसा बरोबर सारिपाट खेळण्याचे ठरविले. ''हरणाऱ्याने बारा वर्षे वनवास भोगायचा'' अशी अटही घातली. खेळात खंडोबादेव मुद्दामच हरले. ठरल्याप्रमाणे बारा वर्षांचा वनवास भोगण्यासाठी महालाबाहेर पडले. माणदेशी धनगराच्या वेशात, चंदनपुरीच्या जंगलात बाणू जिथे मेंढ्याचे खांड चारत होती तिथे आले. बाणूला देवाचे खरे रूप कळले नाही. तिने ठसक्यात विचारले,

''कोन पाव्हनं ? कंच्या गावाचं म्हणायचं सा ?''

'' मी खंड्या धनगर माणदेशावरनी आलूय. चाकरीच्या शोधात हाय. ठिवाल का तुमची मेंढरं राखायला?'' खंड्या धनगर उत्तरला. मग बाणूने वडिलांना विचारल्यानंतर खंड्याची चाकरी पक्की झाली. आता हा नवखा पाव्हुनाही बाणूबरोबर रोज मेंढरामागे भटकू लागला.

बघता बघता बारा वर्षांचा काळ सरला. एके दिवशी खंड्या धनगराने धुण्याच्या निमित्ताने सर्व मेंढरे गिरणा नदीच्या डोहावर नेली. धुतली. काही वेळातच सर्व मेंढरे खडकावर आपटून मारली. त्यांच्या हाडांचे, मासांचे व कातड्यांचे वेगवेगळे ढिग रचून ठेवले. हा झालेला विचित्र प्रकार हा हा म्हणता साऱ्या गावभर समजला. सारे गावकरी नदीवर जमले. बाणूही धावतच तिथे आली. झालेले नुकसान पाहून वडिलांच्या गळ्यात गळा घालून हुसमसून रडू लागली.

''अत्ताच्या आत्ता माझी सगळी मेढरं जित्ती करून दे न्हायतर या धनगराम्होरं तुझी काय धडगत न्हाय,'' असे म्हणून खंड्या धनगराला ती शिव्याशाप देऊ लागली. यावर खंड्या धनगर म्हणाला, ''मी आत्ताच्या आत्ता तुझी सगळी मेंढर जित्ती करून देतो, पण माझ्याशी तुला लगीन करावं लागेल गडे बाणू !'' जेजुरीच्या खंडोबाच्या प्रेमात पडलेली बाणू नाईलाजाने मेंढ्यासाठी त्या बावळट खंड्या धनगराबरोबर लग्नास तयार झाली. क्षणार्धात, खंड्याने सर्व मेंढरे जिवंत केली. सर्व मेंढरे बॅ-बॅ करीत नदीच्या कडेला चरू लागली. खंड्या धनगराने क्षणात आपले रूप बदलून जेजुरीच्या खंडोबाचे खरे रूप धारण केले. साक्षात्‌ खंडोबादेवाला पाहून हरखून गेलेली बाणू काहीशी लाजली. मग देवाच्या प्रत्यक्ष दर्शनाने आनंदित झालेल्या गावकऱ्यांनी खंडोबा-बाणाईचा गांधर्व पद्धतीने विवाह लावला.

खंडोबा देव घोड्यावर बसून बाणूसह थेट जेजुरीगडावर आले. बारा वर्षांनंतर पतीदेव घरी आले म्हणून म्हाळसाचा आनंद गगनात मावेनासा झाला. परंतु बाणाईकडे लक्ष जाताच म्हाळसाचा क्रोधाचा पारा अचानक चढला. देवाला तिने प्रश्न विचारला,

''ही कोण टवळी ?''

''ही तुझी धाकटी सवत, बाणू''

असे सांगून खंडोबादेवाने म्हाळसाला बाणाई विवाहाची हकीकत सांगितली. ते ऐकून म्हाळसा दु:खित झाली. त्याच क्षणापासून सवती-सवतीचे काही केल्या पटेना. रोज नित्यनियमाने त्यांच्यात भांडणे होऊ लागली. शेवटी नेहमीच्या तंट्याला कंटाळून नाईलाजाने देवाने दोन्ही बायकांची वेगवेगळी बिऱ्हाडे थाटण्याचा निर्णय घेतला. डोंगराचा वरचा अर्धा भाग (गडाचा) म्हाळसाला दिला आणि डोंगराचा खालचा अर्धा भाग बाणाईला दिला. प्रत्येक रविवारी बाणूकडे मुक्काम आणि इतर वारी म्हाळसाकडे, अशी खंडोबादेवाची डोंगराप्रमाणेच वाटणी झाली. परंतु बाणूच्या प्रीतीने वेडा झालेला भोळा मल्हारी रोजच बाणूला चोरून भेटू लागला.

## खंडोबा-बाणाई विवाहासंबंधीची दुसरी लोककथा

जयाद्रि माहात्म्यात बाणाईसंबंधी सांगितलेली ही वेगळी कथा. गंगा आणि पार्वती शंकराच्या आवडत्या भार्या. कैलास पर्वतावरील वास्तव्यात या दोघी सवतींची अधूनमधून भांडणे होत असत. परंतु त्या दोघींचीही आवडती दासी जया मध्यस्थी करून त्या दोघीमंध्ये समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करीत असे. दोघीही सवतींना जयाचा सहवास

हवाहवासा वाटणारा होता. म्हणून गंगा-पार्वतीने निश्चय केला की, कोणत्याही परिस्थितीत जयाला आपली तिसरी सवत करून घ्यायची. एकदा तिघींमध्ये सुसंवाद, हास्यविनोद चालू असताना दोघीही सवती जयाला म्हणाल्या, ''आम्ही तुला शंकराचे तिसरे भार्यत्व दिले आहे, शिवप्रभूंनाही ही वार्ता कळविली आहे, तेही तुझ्यावर फारच संतुष्ट आहेत.''

एके दिवशी शिवप्रभू एकांतात बसले असताना जयाने पुन्हा या गोष्टीची आठवण करून दिली व आपला स्वीकार करण्याची प्रार्थना केली. भोळ्या शंकराने तत्काळ सहमती दर्शविली. जयाची शंकराशी लवकरात लवकर विवाहबद्ध होण्याची प्रबळ इच्छा असली तरी ते लगेच शक्य नव्हते. शंकर जयाला म्हणाले, ''जया, पूर्वी किरातार्जुन युद्धात अर्जुनाचा जो बाण मला लागला होता, तो बाण माझ्याकडे असून तो तुला देत आहे. हा बाण घेऊन तू पृथ्वीतलावर जा आणि बाणासुर पत्नीच्या उदरी जन्म घे. मार्तंडभैरव अवतार धारण करून मी जेव्हा मणि-मल्ल दैत्यांचा वध करीन, तेव्हा काही दिवसांनंतर मी तुझे पाणिग्रहण करीन.''

शंकराची आज्ञा शिरसावंद्य मानून जया पृथ्वीतलावरील श्रोणितापुरात आली. बाणासुर पत्नीच्या उदरी गर्भाशयामध्ये अर्भकाच्या रूपात राहू लागली. काही दिवसांनंतर बाणासुराची पत्नी प्रसूत झाली. पूर्वाश्रमीची जयादाशी कराच्या मध्यभागी बाणाची खूण घेऊन जन्माला आली. बाणासुर व त्याच्या पत्नीने आनंदाने बाणाच्या खुणेवरून त्या मुलीचे नाव ठेवले 'बाणा'. बाणू वयात येताच बाणासुराने देशोदेशीचे राजे बोलावून तिचे स्वंयवर मांडले. बाणूने सर्व राजे लोकांना अव्हेरून सर्वात उठून दिसणाऱ्या अत्यंत देखण्या अशा मुरदैत्याच्या गळ्यात वरमाला घातली. त्याच वेळेस ''आपण काही दिवस भेटायचे नाही,'' अशी अटही त्याला घातली.

पुढे काही दिवसांनंतर भगवान श्रीकृष्ण बाणूला भेटावयास श्रोणितापुरास आले. तिने श्रीकृष्णाचा आदरसत्कार केला. निरोप घेतेवेळी श्रीकृष्णाने आपल्याजवळील मुरली बाणूला भेट म्हणून दिली. त्याच मध्यरात्री बाणू निद्रावस्थेत असताना उशाशी ठेवलेली ती मुरली अचानक बोलू लागली. बाणूने ''तू कोण आहेस ?'' असा प्रश्न विचारताच मुरली आपला पूर्ववृत्तांत सांगू लागली -

''मी तिलोत्तमा नावाची स्वर्गातील अप्सरा. माझ्या सौंदर्याचा व नृत्यकलेचा मला गर्व झाल्याने एके दिवशी मी इंद्र दरबारात गेलेच नाही. दुसऱ्या दिवशी इंद्र दरबारात पाऊल टाकताच इंद्र भयंकर संतापला. त्याने 'तू पृथ्वीतलावर जाऊन नृत्य करशील,' असा शाप दिला. मग मी त्याची क्षमाराधना केली. तेव्हा त्याने उ:शाप दिला की, ''द्वापारयुगात मुरली होऊन श्रीकृष्णाची सखी होशील. त्यावेळेस श्रोणितापूरच्या बाणासुराची कन्या बाणूचा व तुझा सहवास होईल. त्या वेळेस ती तुला शाप देईल. मग भगवान शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण केल्यानंतर तू शापमुक्त होशील.'' एवढे सांगून मुरली काही क्षण स्तब्ध राहून पुन्हा बोलू लागली, ''तू ज्या मुरदैत्यास वरले आहेस, त्याचा मृत्यू श्रीकृष्णाच्या हस्ते होणार आहे.'' हे ऐकताच बाणूने अत्यंत क्रोधित होऊन मुरलीला शाप दिला, ''तू मार्तंडभैरवाच्या अंगणात 'मुरळी' म्हणून नर्तन करशील. '' त्या क्षणापासून मुरली स्त्रीरूप धारण करून मार्तंडभैरवाच्या अंगणात नर्तन करू लागली.

थोड्याच दिवसांत मुरलीने बाणूला दिलेला शब्द खरा ठरला. श्रीकृष्णाचे मुरदैत्याशी घनघोर युद्ध झाले. त्यामध्ये श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राने मुराचे शिर धडावेगळे केले. परंतु मार्तंडभैरवालाच आपले पती मानल्याने बाणूने श्रीकृष्णाशी विवाह करण्यास नकार दिला.

पिता बाणासुरास बाणूने आपल्या पूर्वजन्माची कहाणी सांगून, त्याची आज्ञा घेऊन, ती कावेरीस आली. जलरूप धारण करून घोर तप करू लागली. एके दिवशी मार्तंडभैरवाने बाणूच्या स्वप्नात येऊन दृष्टांत दिला, ''बाणू वचन दिल्याप्रमाणे मी तुला प्राप्त झालो आहे. नळदुर्गचा राजा नळ हा माझा आवडता भक्त आहे. त्याच्या नगर पंचक्रोशीत तू राहा. काही कालावधीनंतर रूप व लावण्या यायोगे तू प्रगट होशील'' मार्तंडभैरवाच्या आज्ञेप्रमाणे बाणू नळदुर्गाच्या पंचक्रोशीत वायुरूपाने येऊन एका चंदनाच्या झाडावर गंधरूपाने राहू लागली.

एके दिवशी अजामिळ धनगर आपली मेंढरे चारत चारत चंदनवृक्षाखाली आला असता मेंढ्या आणि त्याच्यामधील संवाद ऐकून बाणाई स्त्रीरूपात प्रकट झाली. तिने आपली पूर्व हकीकत अजामिळ धनगरास सांगितली व त्यास विनंती केली, ''तुम्ही माझे मार्तंडभैरवाशी लग्न लावून द्या.''

यावर अजामिळ म्हणाला, ''माझ्याकडून शक्य तेवढे प्रयत्न करतो. तोपर्यंत तू या चंदनवृक्षावरच गंधरूपाने रहा.'' यानंतर बाणाई तत्काळ तिथेच गुप्त झाली. मग अजामिळाने ही वार्ता आपल्या सहकाऱ्यांना सांगितली. सहकाऱ्यांसह तो नळदुर्गास नळराजाकडे आला व घडली हकीगत त्याच्यासमोर कथन केली. त्याच रात्रीला नळराजा व त्याच्या पत्नीला मार्तंडभैरव आणि बाणाई यांचा विवाह लावून देण्याविषयी स्वप्नदृष्टांत झाला. मग नळराजा

मोठ्या लवाजम्यासह चंदनवृक्षाखाली आला. धनगरांच्या प्रार्थनेवरून बाणाई पुन्हा स्त्रीरूपात प्रकट झाली. नळराजाने वाजत गाजत सन्मानपूर्वक बाणाईला नळदुर्गास आणले. विवाहाबद्दल लोकाशी सुसंवाद करण्यासाठी नळाने मोठी सभा भरविली. सभा चालू असतानाच तिथे मार्तंडभैरवाचे बाणयुक्त लिंग उत्पन्न झाले. राजाने ब्राह्मणांना बोलावून मंत्राच्या निनादात थाटामाटात बाणाईचा लिंगरूपी मार्तंडभैरवाबरोबर विवाह लावून दिला. तो दिवस होता श्रावण शुद्ध पौर्णिमेचा. नळाच्या भक्तीने संतुष्ट झालेल्या मार्तंडभैरवाने साक्षात प्रकट होऊन नळास दर्शन दिले. मार्तंडभैरव म्हणाला, ''मी प्रेमपुरीहून विवाहाकरिता येथे आलो आहे. आता आम्ही उभयता जेजुरीस जयाद्रि पर्वतावर वास्तव्यास जातो. नळा, तुझ्या भक्तीचे प्रतीक म्हणून तुझ्या किल्ल्यात बाणूसह माझे लिंग सदैव राहील.''

हाती खड्ग, डमरू, त्रिशूल इत्यादी आयुधे धारण करून शुभ्र अशा भव्य अश्वावर आरूढ होऊन मल्हारीदेव अदृष्यरूपात जेजुरीत आले. तिथे गडाच्या वायव्येस बाणाईची स्थापना केली. तिच्या रक्षणाकरिता विष्णूला सांगितले. बाणाईच्या पाठीमागील शिळेपासून ते थेट मंदिरातील आपल्या आसनापर्यंत एक छिद्र पाडले व म्हणाला, ''बाणू, या छिद्राद्वारे मी नेहमी हरिद्राचूर्ण टाकीत जाईन व तुला मध्यरात्री भेटत जाईन.''

## खंडोबा-बाणाई विवाहासंबंधीची तिसरी लोककथा

बाणाईची चंदनपुरीशी संबंधित असलेली विवाहकथा पहिल्या कथेत येऊन गेलेली आहेच. तीच कथा चंदनपुरी आणि एकूणच खानेदशात सध्या वेगळ्या रूपात प्रचलित आहे. इ.स.१९७८ साली लिहिलेल्या एका छोटेखानी पुस्तकात ही कथा दिली आहे. ही कथा प्रस्तुत पुस्तकाच्या लेखकाला त्या वेळी चंदनपुरीच्या खंडोबा मंदिरात वास्तव्यास असलेल्या 'सटवा वाघ्या' ने सांगितलेली आहे. सध्या हा वाघ्या हयात नाही. खंडोबा मंदिराच्या आवारात प्रवेश केल्यानंतर उजव्या बाजूला जी दिवडी दिसते तिथे वाघे कायम वस्तीला असतात. कथा पुढीलप्रमाणे

अमृत गावडे, महिपत गावडे आणि मुकुंद गावडे हे चंदनपुरीचे धनगर समाजातले तीन भाऊ होते. शेळी, मेंढी, कोकरू धरून चौदाशे खिल्लार त्यांच्याजवळ होती. एके दिवशी मेंढ्या धुण्यासाठी ते निमडोहावर गेले. (गिरणा-मोसम नदीच्या संगमावर हा डोह आहे.) मेंढ्या धुताना मुकुंद गावडेच्या पायाला एक पेटी लागली. त्याने ही गोष्ट महिपतला सांगितली आणि आपण ही पेटी पाहू असे म्हणाला. त्यांनी पेटी ओढून किनाऱ्यावर आणली. पेटी फोडून पहिली तो तिच्यात एक सहा महिन्यांची कन्या दिसली.

मुकुंदा म्हणाला, 'बरे झाले, मला मूलबाळ नाही, देवानेच मला मुलगी दिली'. तिचे पालन-पोषण या मुकुंद गावडेने केले. तिचे नाव त्यांनी 'बाणू' असे ठेवले. पुढे बाणू मोठी झाली. ती जेजुरीच्या खंडेरावाच्या स्वप्नात गेली. खंडेराव धनगराचे रूप घेऊन चंदनपुरीस यायला निघाले. वाटेत निमगाव निंबयतीला त्यांनी मुक्काम केला. तेथून लोकांना विचारत विचारत ते चंदनपुरीला आले.

या वेळी चंदनपुरीला लेंडीपारावर धनगरांची सभा भरली होती. तू इकडे मेंढरं घेऊन जा, तू तिकडे जा, अशी कामाच्या वाटणीची चर्चा चालली असतानाच खंडेराव त्या ठिकाणी आले आणि 'रामराम हो मामाजी' असे लोकांना उद्देशून म्हणाले.

धनगर म्हणाले, '' हा जावाई कोन उत्पन्न झाला हो आपल्याकडे ?''

''आहो, मी गरीब गावड्या आहे, तुमच्या शेळा-मेंढ्या राखीन, करीन चाकरी, खाईन भाकरी.'' खंडेराव उत्तरला. धनगर माझ्याकडे राहा, माझ्याकडे राहा असे म्हणू लागले. खंडेराव म्हणाले, ''माझ्या पोटाची व्यवस्था तुमच्याकडे होईल का ?'' लोक म्हणाले, ''काय लागेल तुला ?''

खंडेराव म्हणाला, ''न्याहारीला सव्वा खंडी अन्न, दुपारी जेवायला दोन खंडी आणि संध्याकाळी उगाच आपलं खंडीभर.'' धनगर म्हणाले, ''अरे बाबा, तू आपली वाट धर, एवढं अन्न रोजच्याला कोठून आणायचं ?''

मग बाणूला वाड्याव बोलावणं पाठविलं. तिने विचारलं, ''का बोलावणं पाठवलं ?'' लोकांनी तिला सर्व हकीकत सांगितली. बाणूने त्याचे रूप क्षणभर न्याहाळले आणि म्हणाली, '' राहीना बिचारा, करील चाकरी, खाईल भाकरी.'' बाणू शेळ्या-मेंढ्या, कोकरं चौदाशे खिल्लार घेऊन नित्याने रानात त्यांना चारायला आजवर एकटीच जात असे. आता तिच्या बरोबर हा पाहुणा जाऊ लागला. बाणूबाईने एकदा त्याला कुऱ्हाड दिली आणि चारा घेऊन यायला सांगितले. खंडेराव चारा आणायला गेले. कुऱ्हाडीनं झाडावर घाव मारला तरी फांदी तुटली नाही. कितीही घाव घातले तरी तेच. क्षणात त्याला बाणूचे स्मरण झाले आणि मग त्याने ईर्षेने बाभळीच्या झाडाला आळा (हातांचा विळखा) घातला. उपटून बाभळ घेतली खांद्यावर आणि आणून टाकली कोकराव. दहा-वीस कोकरं मरून गेली.

बाणूने ही घटना धनगरांना सांगितली. धनगर आले, जमा होऊन म्हणाले, ''फुकटचा चाकर आन् लाखाची हानी. एवढी कोकरं मेली, कशाला ठेवा याला चाकर म्हणून?'' त्यांना या चाकराचा संताप आला आणि ते काठ्या घेऊन आले.

खंडेराव म्हणाले, ''कारे बाबा, आम्हाला मारायला आले ?''

धनगर म्हणाले, ''ही कोकरं मारलीस ती का ?''

खंडेराव म्हणाले, ''आहो, ती तर चारा खातायत.'' त्यानं बाभळ उचलली आणि पाच-पन्नास हात दूर घेऊन गेले. धनगर पाहतायत तो त्यांना ती सर्व कोकरे त्यामागे चारा खायला पळत असताना दिसली. धनगर म्हणाले, ''काय बाणू, गरीब गावड्यावर का आरोप केलास ? आम्ही उगाच त्याला मारलं असतं.'' बाणू म्हणाली, ''मला काय या तुमच्या गरीब गावड्याची तऱ्हा माहीत ?''

आखाड महिना आला. मेंढरं धुण्याचा हा वखत. आपणच मेंढरं धुयाला लागू, असे म्हणून बाणूने खंडेरावाला पुढे लावले. ती मागाहून भाकरी घेऊन येणार होती. खंडेरावानं गिरणा डोहात मेंढरं धुवायला सुरुवात केली. पण लक्ष लागेना. बाणाईला उशीर झाला. मग मेंढ्यांच्या शेपटीला धरून खडकावर आपटायला सुरुवात केली अन् अशा रीतीने शेळी-मेंढी कोकरं मिळून चौदाशे खिल्लार साफ धुऊन काढलं. कातडं काढून वाळत घातलं.

इतक्यात सूर्य डोईवर यायच्या सुमारास बाणू आली न्याहारी घेऊन. फुलाई माळणीनं हे सारं पाहिलेलं होतं. नदीकडं बघून तिने बाणूला विचारलं, ''लाल लाल पाणी चाललंय, बया काय ह्ये ?''

बाणू म्हणाली, ''कुकवाचं पाणी असेल, कुणी कुंकवाच्या गोण्या धुतल्या असतील.'' यावर माळीण उगा राहिली. बाणू डोहाजवळ जाऊन पाहत्ये तर यानं सारी मेंढरं खल्लास केलेली दिसली. एकही नाही राहिलं दारापुढं बांधायला. आता आमचा धंदा चालेल कसा ? तिला चिंता वाटू लागली. दोघी गेल्या धनगराकडे आणि म्हणाल्या, ''शेळ्या, मेंढ्या, कोकर चौदाशे खिल्लार, यांनी समदेच केले बराबर.'' धनगर जमा होऊन आले, त्यांना मागची आठवण झाली आणि मनात ओळखून म्हणाले, ''बाणूचा छंद लागला, मल्यादेव येडा झाला, धर-मेंढी आपट खडकाला. आता मामाजी, करा तयारी बाणू आणि खंडेरायाच्या लग्नाची. नाही लावले लग्न तरी या शेळ्या-मेंढ्या मारलेल्या खाईल घारगिधाडी.''

ते खंडेरायाला उद्देशून म्हणाले, ''आम्ही तुमचे लग्न करू. पण या शेळ्या-मेंढ्या आम्हाला जिवंत करून द्या.'' खंडेराव म्हणाले, ''आधी लग्न लावा आमचं, काय घ्या तुम्हा येड्या धनगरांच ? जाताल बदलून.'' मास्कंडाचा घातला गंज (ढीग). मुंडक्यांची बनवली पाड (ओळ) अन् बसला त्यावर गोफण - धोंडा घेऊन हाऱ्याऽऽ हाऱ्या म्हणत. ''आम्ही करू या लग्नाची तयारी, तुम्ही मेंढरं जिवंत करा सारी.'' लग्नाचा बेत तिथंच ठरला, पण मेंढरांचा गंज तिथेच पडला. म्हणून धनगर खंडेरायास म्हणाले, ''असंच गोड बोलून फसवून आमची बाणू घेऊन जाता काय?'' धनगरांनी केलेली लग्नाची तयारी पाहून खंडेरायानं सारी मेंढरं उठविली. आनंदीआनंद झाला. मेढरांच्या ओरडण्यानं सारा आसमंत गजबजला. धनगरांनी लग्नाच्या तयारीचा जोर वाढवला. जंगलात अक्षता म्हणून तांदूळ कोठून आणणार ? म्हणून त्यांनी लेंड्या गोळा केल्या. मग बाणूच्या शेल्याची आणि खंडेरायाच्या घोंगडीची गाठ मारली. थडीवर चरणारी मेंढरं गोळा झाली अन् त्यांच्या बॅऽऽ, बॅऽऽ ओरडण्याच्या आवाजात बाणूचं लग्न त्या 'येड्या गावड्याशी'- खंडेरायाशी लागलं. खंडेरायानं सर्वांचा निरोप घेतला. धनगरांनी भरल्या अंत:करणानं त्याला आलिंगन दिले. खंडेरायानं साऱ्यांना अभय दिलं आणि सारा आसमंत जयघोषानं निनादून गेला, 'येळकोट, येळकोट, खंडेरायाचं चांगभले.' खंडेराय जायला निघाले, बाणूला घेऊन टेंभाऱ्यावर एक दिवस मुक्कम केला. पुढे नांदगावच्या जंगलात बाणूला घेऊन आले. तिथे बाणूसह त्यांची वरात निघाली. तिथून निघाले ते भडगावच्या पेठात मुक्काम केला. तिथून सकाळी निघाले ते काकणबरडीवर देव आले आणि बाणूने काकणे सोडली. त्या स्थानाची 'काकण बरडी' झाली. ( पाचोऱ्यापासून दोन मैल अंतरावर ) तेथून खंडेराय जे निघाले, ते तडक जेजुरीला बाणूसह येऊन पोहोचले. म्हाळसेला त्यांच्या आगमनाची वार्ता समजली. म्हाळसा मोठी कठीण. तिनं आपल्या सवतीला - बाणाईला गडाची पायरी चढू दिली नाही. खंडेरायाने तिला गडाच्या खालीच ठेवले. मात्र, 'ऐतवाराच्या दिवशी, भंडार चोरून टाकतो बाणूच्या अंगावरी' अशी ही खंडेराव आणि बाणाईची प्रेमकथा.

### बाणाईचे जनमानसातील स्थान

पुराणग्रंथ, लोककथा, लोकगीते यांमध्ये खंडोबा-बाणाईच्या सांगितलेल्या, प्रीतीच्या वेगवेगळ्या धाग्यांनी

गुंफलेल्या प्रीतिकथांनी जनसामान्यांच्या मनाची चांगलीच पकड घेतली आहे. म्हाळसा आणि बाणाई या दोघीही खंडोबाच्या आवडत्या भार्या. दोघींमध्ये जरी संघर्ष असला तरी दोघींचेही अंतिम उद्दिष्ट 'खंडोबाप्राप्ती' हेच आहे. परंतु, म्हाळसा आणि बाणाई यांच्यामध्ये सामाजिक आणि तात्त्विकदृष्ट्या बरीच भिन्नता आढळते. म्हाळसा ही तिम्मशेट वाण्याच्या सुसंस्कृत आणि सुसंपन्न कुटुंबात वाढलेली मुलगी. समुद्रमंथनाच्या वेळेस भगवान विष्णूने मोहिनीरूप धारण करून दैत्यांना मोहविले होते आणि नंतर तेच मोहिनीरूप पार्वतीला बहाल केले होते. त्या वेळेची ती मोहिनीरूप पार्वती म्हणजेच खंडोबापत्नी 'महालसा' तथा म्हाळसा होय. त्यामुळे म्हाळसाचे उच्च संस्कृतीत स्थान निर्माण झाले आहे.

साऱ्या जीवसृष्टीचे रक्षण करणारा आणि क्षणात संहारही करू शकणारा तिन्ही जगांचा स्वामी अशी पुराणग्रंथामध्ये ज्याची ओळख सांगितली जाते असा जो शिवशंकर, त्याचा खंडोबा हा अवतार. नागर संस्कृतीत वाढलेला खंडोबा अनागर धनगर संस्कृतीत वाढलेल्या अडाणी परंतु सात्त्विक वृत्तीच्या लावण्यवती तरुण मुलीवर जिवापाड प्रेम करतो. तिच्याशी लग्न करतो. मेंढरे राखणारी धनगराची साधी मुलगी बाणू ते आदिशक्ती, आदिमाया बाणाई अशा तिच्या खडतर जीवनप्रवासामुळे म्हाळसापेक्षा बाणाई सर्व जाती-धर्मांतील लोकांच्या जिव्हाळ्याचा विषय झाली आहे. लोककथांमध्ये सांगितल्याप्रमाणे खंडोबा-बाणूच्या प्रीतिकथा समाजातील सर्व थरांमध्ये रुजण्यामागे दोन महत्त्वाची कारणे आहेत. पहिले कारण जेजुरी गडावर बाणाईला मिळालेला दर्शनाचा पहिला मान. खंडेरायाने गडाच्या केलेल्या वाटणीत बाणाईला जरी गडाखालचा अर्धा डोंगर दिला असला तरी दर्शनाचा पहिला मान बाणाईलाच दिला आहे, हे विशेष. कारण त्याच वेळेस खंडेरायाने बाणाईला वर दिला होता की, ''जेजुरीला जे लोक माझ्या दर्शनाला येतील, त्यांनी प्रथम तुझी पूजा केली तरच माझे दर्शन फलद्रुप होईल.''

जेजुरी गडाच्या पायऱ्या चढत असताना डोंगराच्या मध्यभागी रस्त्याच्या उजव्या बाजूकडील मंदिरात बाणाई आदिशक्तीच्या रूपात राहू लागली, तेव्हापासून भक्त लोक प्रथम तिचे दर्शन घेतात. जेजुरी गडावर एक दुर्मिळ प्रथा अशी आहे की, वेशीमधून प्रवेश केल्यानंतर किल्ल्याकडे जाताना नंदीला नमस्कार केल्यानंतर प्रथम बाणूचे दर्शन, मग बाणूचा भाऊ हेगडीप्रधान व त्यानंतर भक्त खंडोबा-म्हाळसाचे दर्शन घेतात. दुसरे कारण असे की, जिथे खंडोबा आणि बाणाईच्या प्रेमाला बहर आला आणि प्रेमाचे रूपांतर लग्नात झाले त्या चंदनपुरीत खंडोबा मंदिरात खंडोबाशेजारी मानाने विराजमान झालेली बाणाईची देखणी मूर्ती होय. अशा कारणांमुळेच जनमानसात 'खंडोबाची आवडती राणी बाणाई' ही कल्पना रूढ झाली असावी. म्हणूनच धनगर समाज स्वत:ला खंडोबा आणि बाणाईची उत्पत्ती मानतो. मेंढपाळ धनगर, शेळ्यामेंढ्यांना आजार झाली की, तो बरा होण्यासाठी बाणाईला नवस बोलतात. आजार बरा झाल्यानंतर नवसाप्रमाणे लाकडाची शेळी किंवा मेंढी बनवून ती बाणाईला अर्पण करतात. एवढेच नव्हे, तर समाजामध्ये एखाद्या कुटुंबातील लावण्यवती मुलीला पाहिल्यानंतर 'खंडोबाच्या बाणाईसारखीच दिसतेय' असे तिचे वर्णन केले जाते. यावरून धनगर समाजाला बाणाई किती व्यापून राहिली आहे याची कल्पना येते. म्हणून केवळ महाराष्ट्रातीलच नव्हे, तर भारतातील वेगवगळ्या राज्यांमध्ये राहणाऱ्या आणि वेगवेगळ्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या धनगर समाजातील भक्तांची जेजुरी आणि चंदनपुरीला वर्षभर दर्शनासाठी अक्षरश: रीघ लागलेली असते.

कुठल्याही ठिकाणी, खंडोबाच्या जागरणाच्या कार्यक्रमामध्ये वाघ्या-मुरळींनी 'खंडोबा-बाणाईची प्रीतिकथा' सांगितल्याशिवाय कार्यक्रम पूर्ण होत नाही हे वैशिष्ट्य आहे. यावरून बाणाईचे जनमानसातील स्थान आपल्या लक्षात येते.

## धनगर समाज आणि खंडोबा-बाणाई

'खंडोबा' व 'शिखर शिंगणापूरचा श्री शंभू महादेव' या पुस्तकामध्ये डॉ. रा. चिं. ढेरे अनुक्रमे नमूद करतात की :

''खंडोबाच्या परिवारात त्याच्या दोन पत्नीपैकी म्हाळसा ही लिंगायत वाण्याची कन्या आहे, तर बाणाई (आणि तिचा भाऊ हेगडी प्रधानही) धनगर आहे. धनगर जातीने तर मैलाराला अत्यंत उत्कट भक्तीने स्वीकारले आहे. मैलाराचा आणि या जातीचा संबंध देवाच्या उदयकाळापासून असावा असे वाटते. या जातीतून उदयास आलेले होळकर घराणे पेशवाईच्या काळात खंडोबाचे वैभव वाढवायला मोठ्या प्रमाणात उपयोगी पडलेले आहे. अलीकडच्या काळात पुणे जिल्ह्यातील चांदखेड या गावी रामजीबाबा नामक धनगर संताच्या मल्लारीभक्तीमुळे चांदखेडला खंडोबाचे ठाणे निर्माण झाले आहे.''[१७]

'कृष्णदासाने असे सूचित केले आहे की, मोरगावचा गणेश आणि कऱ्हेच्या सान्निध्यातील पठारावर विसावलेले हे बलिपाच्या मूलभूमीतून, म्हणजे उत्तर कर्नाटकातून इकडे आलेले आहेत. 'कऱ्हेपठार' (कडेपठार) हे स्थान खंडोबा आदी कर्नाटकीय देवतांचे आहे, हे सूर्यप्रकाशवत् स्पष्ट आहे. खंडेराय हा 'कानडा' आहे, हे त्याच्या मराठी भक्तांना मान्य आहे, त्याच्या 'प्रधाना'साठी असलेली हेगडे ही संज्ञा कन्नड आहे. त्याची म्हळसा नामक एक सहचारी मूळची कर्नाटकीय लोकदेवी आहे आणि त्याची प्रिया बाणाई ही धनगरकन्या आहे. तो आता उभ्या महाराष्ट्राचा लोकदेव बनलेला असला, तरी तो मूळचा धनगर समाजाचा देव आहे.'[१८]

## खंडोबाची प्रिय पत्नी बाणाई

'महाराष्ट्राचा लोकदेव खंडोबा' या पुस्तकात डॉ. रामचंद्र देखणे यांनी म्हाळसा आणि बाणाई यांच्या लोकप्रियतेमधील फरक पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे :
''जेजुरीस कडेपठारावर खंडोबाच्या एका मूर्तीबरोबर जोगेश्वरी व बाळाई यांच्या मूर्ती आहेत. ही बाळाई म्हणजे बाणाईच होय. निमगावास बाणाईची मूर्ती असून, ती म्हाळसेप्रमाणेच कमलकलिका पानपात्रधारिणी आहे. पाली येथे बाणाईची हात जोडलेल्या स्थितीतील उभी शिलामूर्ती आहे. काही ठिकाणी तिची लिंगेही आहेत. '' खंडोबाच्या देवालयात देवाच्या शेजारी म्हाळसेबरोबर जरी बाणाईला स्थान मिळाले नसले तरी खंडोबाची प्रिय पत्नी म्हणून जनमानसात तिचे स्थान जिव्हाळ्याचे आहे. म्हणूनच लोककथांमध्ये म्हाळसापेक्षा बाणाईला अधिक महत्त्व दिले गेले आहे.''

## खंडोबावरील विवाहकथांचा सामाजिक परिणाम

असे म्हणतात की, दैवतचरित्रे ही समाजाची प्रतिकृती आहे. ते या अर्थाने की, समाजातील तत्कालीन घडामोडींचे प्रतिबिंब अनेक दैवतचरित्रांमध्ये पाहावयास मिळते. खंडोबावरील लोककथांमध्ये अशा प्रकारचे समूहमन चित्रित झालेले आढळते. विवाहकथांच्या अंगाने विचार करावयाचा झाल्यास, खंडोबाची द्विपत्नीत्व किंवा बहुपत्नीत्व पद्धती त्याच्या भक्तपरिवारामध्ये चांगलीच रुजली आहे. सर्वच जाती-धर्मांतील खंडोबाभक्तांचा या दृष्टिकोनातून विचार करावयाचा झाल्यास वरील विधान काहीसे सरधोपट वाटले तरी धनगर, कोळी, रामोशी या जातींमध्ये अशा विवाहांचे प्रमाण तुरळकपणे का होईना आढळते ही वस्तुस्थिती आहे. ''खंडोबाला दोन बायका आहेत. मग आम्ही भक्तांनी अशा प्रकारे विवाह केले तर ही देवाची सेवाच आहे ना !'' हे या विवाहकंथामागचे लोकतत्त्व समाजामध्ये रुजले गेले आहे. म्हाळसा-बाणाई यांच्या बाबतीत हे वास्तव असले तरी इतर तीन बायकांचा उल्लेख आला कुठून, एखाद्या लोककथेमध्ये किंवा लोकगीतांमध्ये त्यांचा खंडोबाशी संबंध जोडण्यामागे निर्माणकर्त्याचे प्रयोजन काय, या दृष्टीने आता विचार करू.

जेजुरी किंवा इतर खंडोबाक्षेत्री माळी समाजातील स्त्रिया फुले, पाने, दवणा इ. देवपूजासंबधित वस्तूंची विक्री करतात. त्यातील काही स्त्रिया नित्यनियमाने किंवा आलटून-पालटून केवळ श्रद्धेपोटी देवस्थानला या वस्तू विनामोबदला देत असतात. या देवाण-घेवाणीतूनच 'फुलाबाई' या काल्पनिक पात्राचा जन्म झाला असावा !

पूर्वी 'सेवा' म्हणून विनामोबदला किंवा देवस्थानकडून मिळणाऱ्या अत्यल्प मोबदल्यात 'खंडोबा - म्हाळसा - बाणाई' मूर्तींचे पोशाख शिवून देण्याचे काम एखाद्या शिंपी कुटुंबाकडे असावे. कदाचित, कुटुंबातील एखादी 'रंभाई' नावाची स्त्री हे कपडे देवस्थानकडे पोहचविण्याचे काम करीत असावी. यातूनच ही स्त्री खंडोबा पत्नींच्या पंक्तीत येऊन बसली असावी !

फुलाबाई व रंभाई यांचा उल्लेख जेजुरीच्या शाहीर सगनभाऊ विरचित भूपाळ्यांमध्ये आला आहे. 'फुलाबाई' चा उल्लेख चंदनपुरीशी निगडित खंडोबा-बाणाई विवाहसंबंधित लोककथेतही आला आहे. परंतु 'खंडोबाची पत्नी' असा तिचा स्पष्ट उल्लेख या लोककथेत केला नाही.

जेजुरी येथील प्रचलित लोककथा 'औरंगजेब आणि सव्वा लाखाचा भुंगा' यामध्ये औरंगजेबाने खंडेरायाची 'मुल्लुखान' या नावाने आळवणी केली असा उल्लेख आढळतो. तर, शाहीर आज्ञानदासाच्या पोवाड्यामध्ये शाहिस्तेखानाने पालीच्या खंडोबासमोर 'अजामतखान' असा पुकारा केला, असा संदर्भ मिळतो. यावरून एखाद्या लोककवीने खंडोबाच्या पाचव्या काल्पनिक पत्नीला 'चंदाई बागवानीन' असे नाव देऊन ती मुसलमान जातीची आहे

असा भासविण्याचा प्रयत्न केला असावा.

शाहीर सगनभाऊच्या भूपाळ्यांमध्ये ‘मालावती’ मुरळीचाही उल्लेख येतो. खंडोबाची सहावी पत्नी म्हणून या मुरळीला प्रस्थापित करण्याचा शाहीरांचा या मागचा उद्देश असावा. परंतु खंडोबाशी विधिवत लग्न केल्यामुळे सर्वच मुरळ्या त्याच्या बायका असतात. असे म्हणतात की, श्रीकृष्णाला एकूण सोळा सहस्र बायका होत्या ! परंतु महाराष्ट्रात मुरळीची प्रथा सुरू झाल्यापासून सद्यःस्थितीपर्यंत खंडोबाबरोबर लग्न केलेल्या मुरळींची संख्या गृहीत धरल्यास वरील संख्येचा आकडाही कदाचित पार होऊ शकतो.

खंडोबाच्या पत्नी अनेक का, त्यामागील कोणत्या जाणिवा असाव्यात, जनमानसांत त्याबद्दलच्या कोणत्या भावना रुजलेल्या आहेत, याचा धांडोळा घेतला. आता महाराष्ट्र - कर्नाटकातील माहात्म्य पावलेल्या प्रसिद्ध खंडोबा स्थानांचा विचार करूयात.

□

**संदर्भ - टिपा**

१. महर्षी वेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम् (संस्कृत पोथी).
२. श्रीनामदेव गाथा, पृ. ३३-३४.
३. श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित हरिविजय, पृ. १३३-१३५.
४. आनंदगिरी विरचित, शङ्करविजय, पृ. १६०-१६३.
५. दै. प्रभात, पुणे दि. २ ऑगस्ट २००६, पृ. ३.
६. तुळपुळे श. गो. (सं.), म्हाईंभटकृत लीळाचरित्र, उत्तरार्ध (भाग २), लीळा - २९८.
७. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. १३.
८. सिद्धपाल केसरी विरचित मल्हारीमाहात्म्य.
९. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ८.
१०. भट्ट कमलाकर, निर्णयसिंधु, पृ. २२८.
११. श्रीज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठ, १.१९३-१९४.
१२. मराठी संशोधन पत्रिका, व ६, अं. १, पृ. १०१.
१३. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, शेख मंहमदकृत योगसंग्राम, पृ. ९८.
१४. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ८.
१५. महर्षी वेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम्, १८.११-१२.
१६. प्रा. गोसावी र. रा., जेजुरीचा खंडोबा मल्हारी-मार्तण्ड, पृ. १६-१८.
१७. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ८१-८२.
१८. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, शिखर शिंगणापूरचा श्री शंभुमहादेव, पृ. ३०६-३०७.
१९. (डॉ.) देखणे रामचंद्र , महाराष्ट्राचा लोकदेव खंडोबा, पृ. ७१.

* खंडोबा-म्हाळसा, बाणाई विवाहकथा क्र. १ ते ३ पर्यंतच्या सारांश लेखनासाठी पुढील गोष्टीरूप लघुग्रंथांचा उपयोग झाला.

**अ.** घोलप म. स., गोष्टीरूप श्रीमल्हारी मार्तंड, पृ. ४४-५४.
**आ.** बिडकर न. वि., सचित्र श्रीमल्हारी कथासार, पृ. १०७-१११, ११९. १२३.
**इ.** जोशी र. म. (निर्मळ गुरुजी), श्रीखंडोबाच्या गोष्टी, पृ. १४-२३.
**ई.** खाडे बापूराव खंडेराव, श्रीक्षेत्र जेजुरी माहात्म्य, पृ. ४८-५२.
**उ.** गोवंडे श्रीकांत, श्रीखंडोबाच्या गोष्टी, पृ. ११-१८.
**ऊ.** जोशी द. दा., श्रीमल्हारी माहात्म्य, पृ. १०६, ११३.
**ए.** (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर, महाराष्ट्राचे कुलदैवत श्रीमल्हारी मार्तंड कथासार, पृ. १६४-१७२, १८४-१८७.
**ऐ.** (पंडित) नाईक कृष्णकांत, येळकोट येळकोट जयमल्हार, पृ. १४-१७.

महाराष्ट्र आणि कर्नाटकात खंडोबाची एकूण १२ महत्त्वाची खंडोबा स्थाने म्हणून ओळखली जातात. त्याखालोखाल खंडोबाच्या दोन सासुरवाड्या म्हणून महाराष्ट्रातील अनुक्रमे नेवासा (जि. अहमदनगर) व चंदनपुरी (जि. नाशिक) या स्थानांना विशेष माहात्म्य प्राप्त झाले आहे. या स्थानांव्यतिरिक्त दोन्ही राज्यांत खंडोबाची अनेक गाजती स्थाने आहेत. 'ग्रामदैवत' म्हणून महाराष्ट्रातील गावा-गावांतून पुजले जाणाऱ्या खंडोबाच्या मंदिरांची संख्या सहजरीत्या मोजता न येण्याएवढी आहे. याशिवाय मध्य प्रदेशात 'मल्हार' (विलासपूर), बडी देवरी (सागर) व अलमपूर, जि. बिड (मल्हारनगर) ही ठिकाणे खंडोबाची प्रसिद्ध स्थाने म्हणून ओळखली जातात. होळकर घराण्यातील श्रीमती उषाराजे होळकर यांनी इंदूर येथील होळकर राजवाड्याच्या आवारात मूळ स्थानी पाच कोटी रुपये खर्च करून नुकतेच खंडोबाचे भव्य मंदिर उभारले आहे. इंदूरमध्ये माणिकबाग येथे होळकरांचे आणखी एक खंडोबा मंदिर आहे. याशिवाय मध्य प्रदेशातील इतर खंडोबा स्थानांविषयी माहिती मिळू शकणारी पुस्तिका उपलब्ध असल्याचे अजून तरी ऐकिवात नाही. खंडोबाला 'मल्लण्णा', 'मल्लेश', 'गंगाराम' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या आंध्र प्रदेश-तेलंगणामध्येही खंडोबाची उपासना मोठ्या प्रमाणात चालते. तिकडे मल्लाण्णाचे आख्यान लोकसाहित्यातून 'ओग्गूकथा' म्हणून तेलगुतून गावोगावी सांगितले जाते. 'ओग्गू' हे एक प्रकारचे मृदंगवाद्य आहे. कोमीरेली, ता. चेरियल, जि. वारंगळ येथे मल्लनाचे प्रसिद्ध मंदिर आहे. मल्लण्णाचे 'मूळ' कर्नाटकातील बीदरजवळील मैलारपूर हे मानतात. 'मल्लार' ही आंध्र प्रदेशातील काकतीय राजघराण्याची कुलदेवता (कुलदैवत) आहे, असे मत प्रसिद्ध जर्मन अभ्यासक जयाद्रिवासी डॉ. गुन्थर डाएटस् सोन्थायमर यांनी व्यक्त केल्याचे 'किंग ऑफ हंटर्स वॉरिअर्स ॲण्ड शेफर्ड्स : एस्सेज ऑन खंडोबा' या इंग्रजी संपादित ग्रंथात म्हटले आहे. मात्र, आंध्रातीलच (हैदराबाद) एक व्यासंगी अभ्यासक डॉ. माणिक धनपलवार यांनी 'दाक्षिणात्य साहित्य-संस्कृतीचा मराठीशी अनुबंध' (इ. स. १९९७) या आपल्या ग्रंथात दुर्लक्षित संदर्भांच्या आधारे आंध्रातील मैलारभक्तीचा थोडक्यात परिचय घडवून दिला आहे. याशिवाय छत्तीसगड, गुजरातमधील काही भागामध्ये तसेच केरळमधील 'मैलारपूर' या भागात खंडोबाची उपासना चालते.

या प्रकरणात, महाराष्ट्र-कर्नाटकातील एकूण चौदा महत्त्वाच्या स्थानांना प्रत्यक्ष भेटी देऊन या स्थानांचे वेगळेपण संशोधक दृष्टीने सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

## १. जेजुरीचा खंडोबा

भारतातील खंडोबाभक्तांची 'दक्षिण काशी' समजली जाणाऱ्या आणि खंडोबाच्या एकूण चौदा मुख्य तीर्थस्थानांपैकी सर्वच दृष्टीने महत्त्वाचे तीर्थस्थान असलेल्या श्रीक्षेत्र जेजुरी या पवित्र स्थानाबद्दल लिहायचे झाल्यास सुरुवातच अशी करावी लागेल की,

**''देवा तुझी सोन्याची जेजुरी**
**गडाला नवलाख पायरी !''**

जेजुरी म्हटले की खंडोबा आणि खंडोबा म्हटले की जेजुरी, असे चित्र चटकन आपल्या डोळ्यांसमोर उभे राहते. महाराष्ट्र, कर्नाटकासहित देशातील वेगवेगळ्या प्रांतांमध्ये खंडोबाची अनेक मंदिरे असली तरी सर्व ठिकाणचा खंडोबा एकच असून तो भगवान शंकराचा अवतार आहे, हे जरी माहीत असले तरी 'जेजुरी आणि खंडोबा' यांच्या अलौकिक अशा वेगळ्या नात्याबद्दल भक्तांच्या मनामध्ये अनन्यस्थान निर्माण झाले आहे. म्हणूनच बाराही महिने देशाच्या कानाकोपऱ्यातून भक्त जेजुरीला दर्शनाला येतात. इतके या जेजुरीच्या खंडेरायाने भक्तांच्या हृदयामध्ये आपले अढळ स्थान निर्माण केले आहे.

जेजुरीत खंडोबाची दोन ठाणी आहेत - पहिले लिंग कऱ्हेपठार (जुने ठाणे/मूळ पीठ) आणि दुसरे गडकोट (नवे ठाणे)

### लिंग कऱ्हेपठार

जेजुरीपासून चार मैल अंतरावर नैर्ऋत्य दिशेस सुमारे ८०० फूट उंचीच्या डोंगरावर 'लिंग कऱ्हेपठार' हे देवस्थान वसले आहे.

मणि-मल्लाबरोबर झालेल्या युद्ध समाप्तीनंतर मार्तंडभैरव प्रेमपुरीहून येऊन येथे लिंगरूपाने प्रगट झाले म्हणून 'लिंग', गावालगतच कऱ्हा नदी वाहते म्हणून 'कऱ्हे' आणि मंदिर जरी डोंगरावर असले तरी मंदिराभोवतालचा

बराचसा भाग मैदानाचा (पठाराचा) आहे, म्हणून पठार. यावरून देवस्थानाला 'लिंग कऱ्हेपठार' असे नाव पडले आहे. जेजुरी गावातील 'गडकोट' या मुख्य खंडोबा मंदिरापासून कऱ्हेपठारी जाण्यासाठी डोंगरातून एक पाऊलवाट आणि चिंचेच्या बागेवरून विंजाळ विहिरीमार्गे दुसरी वाट असली तरी आसपासच्या डोंगराळ भागात राहणारे भक्त दर्शनाला येण्यासाठी इतर वाटांचाही वापर करतात. या वाटा बहुधा डोंगरकड्यातूनच वर येतात. म्हणून याच देवस्थानाला काही भक्त 'लिंग कडेपठार' असेसुद्धा म्हणतात. कृतयुगात हा डोंगर 'धवलगिरी पर्वत' या नावाने ओळखला जात असे.

कऱ्हेपठारावरील खंडोबा मंदिर पूर्वाभिमुख असून त्याचे सोपा (बाह्यगृह), मंडप (मध्यगृह) व गाभारा (गर्भगृह) असे तीन भाग आहेत. सोपा तिकमानी असून चार मुख्य दिशांना भासमान तर उपदिशांना खोल व टोकदार अशा कमानींनी बनला आहे. मंडपाच्या मध्यभागी एक पितळी कुत्रा ठेवला असून गाभाऱ्याच्या दिशेस त्याचे मुख आहे. तिथेच अगरबत्ती लावण्यासाठी आणि कापूर जाळण्यासाठी एक लहान कुंड आहे. गाभारा साधारण चौकोनी असून त्यात पश्चिमेच्या भिंतीत मध्यभागी एक देवळी आहे. त्यामध्ये तीन फूट उंच व एक फूट दहा इंच रुंद अशी आसनमांडी घातलेली खंडोबाची मूर्ती असून तिच्या बैठकीच्या उजव्या-डाव्या अंगास मणि-मल्ल दैत्यांची मुंडकी दाखविली आहेत. खंडोबाच्या चार हातात खड्ग, त्रिशूळ, डमरू व परळ अशा वस्तू आहेत. यांपैकी केवळ परळ अंगचा व दगडी असून खड्ग लोखंडी आणि त्रिशूळ व डमरू पितळी आहेत. खंडोबा मूर्तीला पांढरा अंगरखा व डोक्यावर शिंदेशाही पगडी आहे. (साधारण नेहमीचा पोषाख असाच असतो) मूर्तीचा चेहरा शेंदरी रंगाने रंगविला असून भंडाराविभूषित भाळावर मध्यभागी कुंकुमतिलक रेखला आहे. सरळ नाक, क्रोधायमान डोळे, काळ्याभोर मोठ्या मिशा असलेली मूर्ती उग्रस्वरूप दिसते. मूर्तीच्या दोन्ही बाजूंस दोन उभ्या दगडी स्त्रीमूर्ती असून त्यास बाळाई (बाणाई) व जोगेश्वरी (म्हाळसा) असे म्हणतात. याशिवाय इथे एक खंडोबाची व एक म्हाळसाची अशा दोन पितळी मूर्ती आहेत. मुख्य खंडोबा मूर्तीच्या उजव्या बाजूस शेजघर आहे, तर डाव्या बाजूस संगमरवरी पांढरीशुभ्र गणपतीची मूर्ती आहे. समोर जमिनीवर दोन स्वयंभू लिंगे असून एक खंडोबाचे व दुसरे म्हाळसाचे आहे. यापासून सुमारे दीड फुटावर असलेले लिंग बाणाईचे आहे. या लिंगांवर कवच घालून पितळी मुखवटे घातलेले आहेत. म्हाळसाच्या उजव्या हातात कमलकलिका असून डावा हात गजहस्त मुद्रेचा आहे. जागोजागी पाषाणमय शिल्पांनी मंदिराचे शिखर सुशोभित झाले आहे.

मंदिराच्या प्रवेशद्वारासमोर पितळी पत्र्याने मढविलेले एक मोठे कासव असून, त्याचा उपयोग रंगशिलेप्रमाणे देवाच्या रंगभोगासाठी करतात. कासवाच्या पूर्वेस असलेल्या दगडी मेघडंबरीत दोन नंदी व तीन मारुती आहेत. त्यांच्या पूर्वेस मंदिराकडे येण्यासाठी दगडांनी बांधलेली मुख्य वेस आहे. सध्या या वेशीचा फारसा उपयोग होत नाही. खंडोबा मंदिराच्या मागील बाजूकडूनच भक्तगण दर्शनाला येत असतात. वर उल्लेखलेल्या वेशीच्या वरच्या मजल्यावर नगारखाना आहे. नगारखान्याच्या प्रवेशद्वारालगत एक भव्य दीपमाळ आहे. त्याच्या थोडे अलीकडे देवाच्या नावाने वाटीभर तेल जाळण्यासाठी एका दगडी खांबावर एक छोटे दगडी कुंड आहे. मंदिराच्या उत्तरेस काही अंतरावर हेगडी प्रधानाची देवळी असून, त्याची मूर्ती आसनमांडी घातलेली, आपले दोन्ही हात गुडघ्यावर ठेवलेली व उजव्या हातात काही तरी वस्तू धारण केलेली आहे. मंदिराच्या आग्नेय दिशेस दत्तमठ असून त्यामध्ये गुरुदेव दत्त, अत्री ऋषी, परशुराम, अनूसयामाता, रेणुकामाता यांच्या मूर्ती असून त्याच दिशेला हाकेच्या अंतरावर 'घोडेउड्डाण' हे प्रख्यात स्थान आहे. तिथे आजही घोड्याच्या टापांचे (खूर) व्रण पाहावयास मिळतात. मंदिराच्या मागील बाजूस पत्र्याच्या मंडपाखाली पाषाणमय खंडोबाची अश्वारूढ रेखीव मूर्ती आहे. त्याच्यामागे काही अंतरावर पूर्वाभिमुख पंचलिंग महादेवाचे मंदिर आहे. त्या मंदिरात उजव्या सोंडेची संगमरवरी पांढरीशुभ्र गणपतीची मूर्ती आहे. याशिवाय कऱ्हेपठारावर श्रीराम, वाघजाईमाता, श्रीगणेश, भगवानगिरीबाबा, लक्ष्मणगिरीबाबा व हेगडीप्रधान आदी दैवतांची थोड्या थोड्या अंतरावर देवालये आहेत. पैकी राममंदिरात

**।। श्रीराम चरणी तत्पर रामचंद्र मल्हा ।। रढगे जोसि बायजाबाईचे जेऊर ।।**
**कर जिल्हा अहमदनगर याणी ।। श्री जेजुरीस कडेपठारि शके ।।१७१२।।**
**हेमंलबिनाम संवत्सरे माहे ज्येष्ठ ।। कृष्ण १३ भृगुवारी श्रीरामकृपेकरू।।**
**न श्रीचे देवालय सिद्धीस पाविजे ले असे'**

असा आठ ओळींचा शिलालेख आहे. हेगडी प्रधानाच्या मंदिरात दोन पाषाणमूर्ती असून, त्याच्यासमोर शाळुंका व स्वयंभू लिंग आहे. पहिल्या हेगडीप्रमाणेच याही मूर्तीच्या उजव्या हातात तलवार धारण केलेली आहे.

कऱ्हेपठारावर खंडोबा मंदिराच्या पूर्वेस एक पाण्याचे तळे आहे. अहमदनगरचे रामचंद्र मल्हार ढगे, मुन्सफ यांनी हे तळे बांधले असून एका मंदिरात संगमरवरी गणपतीची स्थापना केली आहे, असा उल्लेख आढळतो. परंतु गणपती खंडोबा मंदिरातील की शिवमंदिरातील, याचा मात्र उल्लेख आढळत नाही.

कऱ्हेपठारावर सूर्योदय आणि सूर्यास्त पाहण्यासारखा असतो. खंडोबा मंदिरासमोरील नगारखान्याच्या अंगणातून (सध्या त्या अंगणात बांधकाम केले आहे) सूर्योदय आणि राममंदिरापासून काही अंतरावर असलेल्या 'यशवंत रखवालदार' यांच्या स्थळापासून सूर्यास्त पाहिल्यास सूर्याचे मनोहारी रूप आपले लक्ष वेधून घेते. पावसाळ्यात तर कऱ्हेपठारावरील विलोभनीय सृष्टिसौंदर्याने खंडोबाभक्तांचे भान पार हरपून जाते.

शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांनी आपल्या 'राजा शिवछत्रपती' या पुस्तकात कडेपठाराचे वर्णन वेगळ्या बाजाने परंतु सुंदर ललितरम्य भाषेत केले आहे. शाहीर पुरंदरे लिहितात :

''उगवतीच्या उजव्या अंगाला पुण्यापासून साडेसहा कोसांवर दिव्याच्या घाटाची दरड उभी आहे. दिव्याचा घाट चढून वर गेले की, कऱ्हेच्या मुलखात पाऊल पडते. दिव्याचा घाट म्हणजे कऱ्हेपठाराचा उंबरठाच आहे. जेजुरीपासून वज्रगड, पुरंदर, बोपदेव घाट, दिव्याचा घाट, सोनारीचा घाट, ढवळगड असा बाकदार वळसा घेऊन भुलेश्वराभोवती सह्याद्रीने एक चंद्रकोर रेखली आहे. या डोंगरी चंद्रकोरीच्या एका टोकावर भुलेश्वर महादेव आणि दुसऱ्या टोकावर **जेजुरीचा खंडोबा** आहे अन् या चंद्रकोरीच्या ऐन मध्यावरून कऱ्हा नदी झुळूझुळू वाहते. सह्याद्रीवरून ही गंगा भुई भिजवीत, मोत्याची कणसे पिकवीत, फळाफुलांच्या बागा फुलवीत पूर्वेकडे धावत निघाली. शतके लोटली, युगे लोटली, अजून कऱ्हा वाहतेच आहे. सह्याद्रीच्या या चंद्रकोरी मुलखातून कऱ्हाबाई जाते. म्हणून या पठारी मुलखाला 'कऱ्हेपठार' म्हणतात.''

लिंग ही शैव परंपरा असली तरी शिव मंदिरामध्ये शिव-पार्वतीचे लिंग आढळत नाही. परंतु शिवावतार खंडोबा मंदिरात त्याच्यासहीत त्याच्या दोन्ही पत्नीची लिंगे आढळतात. क्षेत्रभेटीत निरीक्षण केल्यानंतर शैवांची मंदिरस्थाने आणि लिंगाचा समावेश असलेली खंडोबास्थाने यांच्यामधला फरक नजरेत आला.

### जेजुरीगड (गडकोट)

पुण्यापासून सुमारे ४८ कि.मी. अंतरावर, पुणे-पंढरपूर या राष्ट्रीय महामार्गावर जेजुरी गाव वसले आहे. जेजुरी बसस्थानकापासून अंदाजे अर्धा कि. मी. अंतर पुढे आल्यानंतर गडाच्या उत्तरेस एक भव्य दगडी वेस लागते. वेस ओलांडून आत पाऊल टाकले की प्रथमदर्शनीच येथे छोटे दक्षिणमुखी नंदीमंदिर लागते. या मंदिराला पाच दगडी खांब आहेत, म्हणून याला 'पंचखांबी नंदीमंदिर' असे म्हणतात. त्याला उजवी घालण्याचा प्रघात आहे. तिथून थोडे पुढे गेले की, एक दगडी कासव लागते. तिथूनच गडाकडे जाण्यासाठी दगडी पायऱ्यांच्या मजबूत रस्त्याला सुरुवात होते. पायऱ्या ओलांडत महाद्वाराजवळ जाईपर्यंत एकूण आठ कमानी व अनेक दीपमाळा लागतात. कमानींची धाटणी बंगाली पद्धतीची आहे. दीपमाळा नवस फेडण्याच्या उद्देशाने बांधल्या असाव्यात. नंदीमंदिराच्या पुढील कमानीतून पुढे जायला निघालो की, जवळच रस्त्याच्या डाव्या बाजूला वीरभद्राचे मंदिर लागते. तिथून पुढची तिसरी कमान ओलांडली की मुख्य रस्त्याच्या उजव्या बाजूला एक फाटा फुटतो. त्या मार्गाने दगडी पायऱ्या चढत पुढे गेले की, एका कमानीतून आपण बाणाईच्या मंदिरात प्रवेश करतो. मंदिर उत्तराभिमुख असून, त्याचा गाभारा डोंगर पोखरून तयार केला आहे. खंडोबा-म्हाळसाच्या आधी प्रथम बाणाईचे दर्शन घेण्याचा इथे प्रघात आहे. कारण 'जेजुरीला जे लोक माझ्या दर्शनाला येतील, त्यांनी प्रथम तुझी पूजा केली तरच माझे दर्शन फलद्रुप होईल,' असा खंडोबाने बाणाईला वर दिला होता, अशी लोककथा इथल्या मातीत चांगलीच रुजली आहे.

बाणाई मंदिराच्या डाव्या बाजूस आणि गडाकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्याच्या उजवीकडे लागून हेगडी प्रधानाचे लहानसे उत्तराभिमुख मंदिर आहे. या मंदिरात तीन फूट उंच व सुमारे पावणेदोन फूट रुंद सिद्धासनात बसलेल्या हेगडीप्रधानाच्या दोन मूर्ती आहेत. मुख्य रस्त्याने गडाकडे जात असताना सहावी वेस ओलांडून पुढे गेल्यावर सातव्या वेशीच्या थोडे अलीकडे रस्त्याच्या उजव्या बाजूला गणपतीचे मंदिर लागते.

तिथून थोड्याच अंतरावर पुढे गेले की, चार-पाच दीपमाळा अशा प्रकारच्या आहेत की, त्या आतून पोकळ असून प्रत्येकी एक प्रवेशद्वार आहे. त्या प्रवेशद्वारातून आत शिरल्यावर पायऱ्यांनी वरच्या टोकाला जाऊन वर तेलवात लावता येते. यानंतर आपण थेट महाद्वाराजवळ येऊन पोहोचतो. महाद्वारात प्रवेश करण्याअगोदर डाव्या हाताला एक नंदी असून महाद्वाराच्या दिशेला त्याचे मुख आहे. नंदी मदिराच्या मागील बाजुस अडीच पायऱ्या

आहेत. त्या पायऱ्या शहाजी आणि शिवाजी यांच्या भेटीचे प्रतीक म्हणून बांधण्यात आल्या आहेत, असे येथे सांगितले जाते. यात्रेकरू त्या कुतूहलाने पाहतात. नंदीस प्रदक्षिणा घालून वर मंदिराकडे जात असताना डाव्या हातास मारुतीची मूर्ती आहे. तिची प्राणप्रतिष्ठा श्रीसमर्थ रामदासांनी केली आहे. उजव्या हाताला महाद्वाराजवळ यशवंतराव रखवालदाराचे स्थान आहे. या ठिकाणी तटाच्या भिंतीला एक भोक आहे. त्यासंबंधीची आख्यायिका (औरंगजेब आणि सव्वा लाखाचा भुंगा) आपण पुढे पाहणार आहोतच. महाद्वाराच्या डाव्या तटाच्या भिंतीत एक तसूभर रुंदीचा चिरा आहे. नंदी मंदिराच्या मागील अडीच पायऱ्या व हा तसूभर रुंदीचा चिरा ज्या व्यक्तीने पाहिला नाही, त्या व्यक्तीने जेजुरीगड पाहिला नाही, असे समजतात. म्हणून क्षेत्रोपाध्ये या गोष्टी आस्थेने यात्रेकरूंना दाखवितात. महाद्वार उत्तराभिमुख असून त्याच्या आत दुसरे एक द्वार आहे. महाद्वाराच्या आतील दोन्ही बाजूंस देवड्या आहेत, तर लहान दरवाजाच्याही आतील दोन्ही बाजूंस आणखी दोन देवड्या आहेत. महाद्वाराच्या बाहेरील दरवाजा पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकरांनी बांधलेला असून आतील काम खटाव (जि. सातारा) येथील राघो मंबाजीने केले आहे. महाद्वारावर नगारखाना आहे. हा नगारखाना घात नाम संवत्सर शके १६१८ मध्ये थोर खंडोबाभक्त, माळवा प्रांताचे श्रीमंत सुभेदार, मल्हारराव होळकर यांनी बांधला आहे.

महाद्वार ओलांडून वर गेले की मुख्य देवालयाचे भव्य पटांगण लागते. हे चांगले प्रशस्त, दगडी, फरसबंदी, चुनेगच्ची आहे. पटांगणाभोवती जुना भक्कम, चिरेबंदी कोट असून त्याला ६३ ओवऱ्या आहेत. कोटाच्या प्रत्येक कोनास बुरुजासारखे सुबक बांधकाम असून शिरोभागी चौफेर प्रमाणबद्ध अशा कमानी आहेत. हा कोट व पुढची सदर यांचे बांधकाम राघो मंबाजीने शके १५५७ (इ. स. १६३५) मध्ये केल्याचा उल्लेख आढळतो. परंतु कालांतराने पडझड झाल्यामुळे पुढे पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकरांनी हा भव्य कोट आणि ओवऱ्या यांचे नव्याने बांधकाम केले. हे काम शके १६६४ ते १६९९ म्हणजेच इ. स. १७४२ ते १७७७ पर्यंत चालले होते. ओवऱ्यांपैकी पाच ओवऱ्या बहुधान्य नाम संवत्सर शके १६८० कार्तिक शुद्ध पंचमीला (इ. स. १७५८) त्रिंबकराव शिवदेव यांनी बांधल्या आहेत. गडकोटाला मुख्य महाद्वाराशिवाय पूर्वेला एक आणि पश्चिमेला एक, असे दोन दरवाजे आहेत. पैकी पश्चिम दरवाजाचे काम शके १६६४ (इ.स. १७४२) मध्ये श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दीत पूर्ण झाले, तर पूर्वेकडील दरवाजाचे काम श्रीमंत माधवराव पेशवे यांच्या कारकिर्दीत शके १६९० (इ.स. १७६८) मध्ये झाले. पूर्वी तिसरा म्हणजेच पूर्वेकडील दरवाजा मुख्य होता. या बाजूकडून गडावर येण्यास पायऱ्याही आहेत. जुने जेजुरी गावही गडाच्या पायथ्याशी पूर्वेलाच आहे. परंतु नवे जेजुरी गाव जसे जसे गडाच्या उत्तरेस वाढू लागले, तस तसे जुने जेजुरी गाव मागे पडू लागले. याचा परिणाम असा झाला की, जुन्या जेजुरीकडून येणाऱ्या-जाणाऱ्यांची वर्दळ हळूहळू कमी होऊ लागली व पूर्वेकडचा दरवाजा कायमचा बंद करण्यात आला. परंतु अलीकडच्या काळातही गर्दीच्या वेळेस हा दरवाजा तात्पुरता उघडण्यात येतो. पश्चिमेकडील दरवाजातून बाहेर गेल्यास दोन फाटे फुटतात. एक पाऊलवाट नैर्ऋत्य दिशेस कऱ्हेपठाराकडे डोंगरमार्गाने जाते, तर दुसरा दगडी पायऱ्यांचा रस्ता बाणाई मंदिराच्या जवळून जाऊन मुख्य गडकोट रस्त्यास मिळतो. या रस्त्याने खाली उतरल्यास बाणाईच्या देवळाला प्रदक्षिणा घालण्याचे अनायासे श्रेय मिळते. गडकोटाच्या पश्चिम दरवाजाबाहेर कऱ्हेपठार रस्त्याला लागून पाण्याचा एक टाक (विहीर) आहे. तिकडील सर्व पायऱ्या श्रीमंत गायकवाड घराण्यातील एका खंडोबाभक्त स्त्रीने बांधल्या आहेत.

मुख्य उत्तर महाद्वारातून देवालयाच्या प्रांगणात प्रवेश केला की, प्रथम आपले लक्ष वेधून घेते ती सुमारे नऊ फूट उंचीची मणि दैत्याची पाषाणमय भव्य उग्र मूर्ती. ही मूर्ती ओबडधोबड असून तिच्या सर्वांगावर शेंदूर फासलेला आहे. मूर्तीचे मुख पश्चिमेकडे म्हणजे मार्तंडभैरवाच्या दिशेला आहे. बाजूलाच रखवालदाराची खोली व देवसंस्थान समितीचे कार्यालय आहे.

दैत्यमूर्तीच्या काही अंतरावर खंडोबा मंदिरासमोर चार भव्य दीपमाळा आहेत. त्यांच्याजवळच एक मंडपी (मेघडंबरी) असून तिच्यात एक पश्चिमाभिमुख नंदी आहे. तो तांब्याच्या पत्र्याने मढविला आहे. नंदीला टेकून एक मारुतीची मूर्ती आहे. नंदी व मुख्य देवालयाच्या मध्यभागी पितळी पत्र्याने मढविलेले एक २० फूट व्यासाचे व सुमारे १४ हात लांबीचे कासव आहे. ते आतून पाषाणाचे आहे. साष्टी तालुक्यातील दांडेगावच्या लोकांनी वर्गणी काढून इ. स. १८८५ साली ते पितळी पत्र्याने मढवून घेतले आहे.

नंदी मंडपीच्या समोर वरच्या बाजूस एक जीर्ण असा लाकडी खांबाचा अवशेष दिसतो. याला बगाडाचा खांब किंवा गाडीबगाड असे म्हणतात. या मंडपीलाही बगाड लावण्याची मंडपी असे म्हणतात. (पूर्वी बगाड घेणे ही अत्यंत निष्ठुर, क्रूर व अंगावर शहारे आणणारी चाल होती. जमिनीत पुरलेल्या खांबावरील आडव्या लाकडास

असलेला आकडा पाठीत खुपसून घेणे व त्यावर लोंबकळणे अशी ही चाल होती). पूर्वी नवस फेडण्यासाठी हा विधी करण्यात येत असे. विशेषत: स्त्रियांकडून हे गळ टोचून घेतले जात व त्यातही रामोशी स्त्रियांचाच विशेष भरणा असे. परंतु ही चाल इंग्रजी राजवटीत कायद्याने बंद करण्यात आली.

खंडोबा मंदिर पूर्वाभिमुख असून त्याचे सोपा (बाह्यगृह), मंडप (मध्यगृह) व गर्भागर (गर्भगृह) असे तीन मुख्य भाग पडतात. सदरेवर (सोप्यात) दक्षिण बाजूस पहारेकऱ्यांची बसण्याची जागा आहे. उत्तर बाजूच्या छतास दोन पितळी घंटा टांगलेल्या आहेत. त्यातील एक देशी व एक विदेशी (ख्रिस्ती चर्चवरील धाटणीची) आहे. पेशवाईत पुण्याचे श्रीमंत बाजीराव पेशवे यांचे धाकटे बंधू श्रीमंत चिमाजीअप्पा पेशवे यांनी पोर्तुगिजांकडून वसईचा किल्ला सर केला त्या वेळी किल्ल्यातून आणलेल्या चीजवस्तूंपैकी या घंटा असाव्यात, अशी माहिती मिळते. सोप्यातच हाताच्या देवडीत भिंतीला लागून ठेवलेले चार फूट लांब व साडेचार इंच रुंद पात्याचे 'खंडा' नावाचे खड्ग (तलवार) ठेवलेले आहे. तिचे वजन ४० शेर म्हणजे एक मण आहे (४० किलो). खड्गाशेजारीच कासवाच्या पाठीची ढाल ठेवली आहे. सोनोरीचे सरदार महीपतराव लक्ष्मण व रामराव लक्ष्मण पानसे यांनी नवसाखातर ही तलवार व ढाल देवास अर्पण केली आहे. उजव्या हाताच्या देवडीत तळी भरण्याचा-उचलण्याचा विधी होत असतो. देवालयाचा मुख्य दरवाजा लहान असून तो चांदीने मढविलेला आहे. इ. स. १८९० च्या सुमारास धारचे श्रीमंत पवार देवदर्शनास आले असता त्यांनी सदरेवरील हा दरवाजा चांदीने मढविला आहे. या दरवाजातून आत गेल्यानंतर आपण सभामंडपात प्रवेश करतो. सर्वसाधारण हा मंडप २० - १८ फूट इतक्या क्षेत्रफळाचा आहे. मंडपात डाव्या व उजव्या बाजूस दोन दगडी घोडे असून ते गर्भागाराकडे (पश्चिममुखी) मुख करून उभे आहेत. उजव्या बाजूच्या घोड्यावर मल्हारीमार्तंड स्वार झाले आहेत, तर डाव्या बाजूचा जीन कसलेला घोडा स्वाररहित आहे. मार्तंडभैरवाशी युद्ध करताना मणि दैत्याने घोड्याचे मायावी रूप धारण केले होते. त्यामुळे हा घोडा मणि दैत्याचे प्रतीक मानतात. सध्या देवसंस्थान समितीने मंदिराचा मुख्य पूर्वाभिमुख दरवाजा बंद ठेवल्यामुळे मंडपातील डाव्या बाजूच्या छोट्या दक्षिण दरवाजातून भक्तलोक आत येतात व गर्भगारातील खंडोबादेवाचे दर्शन झाल्यानंतर मंडपातीलच उजव्या बाजूच्या उत्तर दरवाजातून बाहेर पडतात. डाव्या आणि उजव्या बाजूचे दोन्ही दरवाजे समोरासमोरच आहेत.

मंडपातून आपण गर्भागारात प्रवेश करतो. गर्भागार संपूर्ण चांदीने मढविले असून ते १५-१५ फूट क्षेत्रफळाचे आहे. पाठीमागील भिंतीच्या मध्यभागी कडेला चार खांबी मेघडंबरी आहे. मेघडंबरीचे मागचे दोन्ही खांब चांदीच्या पत्र्याने व पुढील दोन्ही खांब पितळी पत्र्याने मढविलेले आहेत. चांदीच्या पत्र्याचे काम मेघडंबरीवरील लेखावरून श्रावण शुद्ध ७ शके १६९७ म्हणजेच इ. स. १७७५ ला रखमाजी जाचक यांनी करून दिले आहे. याच मेघडंबरीमध्ये एका नक्षीदार महिरपीतील खंडोबाची भव्य मूर्ती लक्ष वेधून घेते. मूर्ती पाषाणातील असून पूर्वाभिमुख आहे. रागीट डोळे व भरघोस पिळदार मिशा यामुळे मूर्ती करारी दिसते. आसनमांडी घातलेली ही मूर्ती चतुर्भुज आहे. तिच्या वरच्या उजव्या हातात त्रिशूळ तर डाव्या हातात डमरू आहे व दुसऱ्या डाव्या हातात पान-पत्र आहे. परळ हा दगडी व अंगचाच आहे. त्रिशूळ व डमरू पितळी असून सुटे आहेत. रिकाम्या हातात खड्ग असावे; परंतु ते हरवले असल्यामुळे तो हात रिकामा दिसतो. खंडोबाच्या अंगात बाराबंदीवजा अंगरखा आणि डोक्यावर शिंदेशाही पगडी असा नेहमीचाच पोषाख दिसतो. भंडाराभूषित भव्य कपाळावर मध्यभागी कुंकुमतिलक रेखले आहे. खंडोबाच्या दगडी बैठकीवर उजवीकडे वाममूर्ती घोडा कोरलेला आहे. त्याच्या डाव्या व उजव्या हातालगत दोन दगडी पुतळ्या आहेत. त्यांना जोगेश्वरी म्हणतात. शेजारी पाषाणाच्या तीन मूर्ती आहेत. खंडोबाच्या मुख्य मूर्तीपुढे खंडोबा-म्हाळसाचे चांदीचे व पंचधातूचे पाच जोड आहेत. पहिला जोड प्रभावळीसहित असून शुद्ध चांदीचा आहे. हा जोड पेशव्यांनी नवसप्राप्तीनंतर दिला आहे. त्या जोडाच्या पाठीवर 'वजन तोळे १५६१ ॥' असे लिहिले आहे. याचा सविस्तर वृत्तांत आपण पुढे वेगळ्या पानावर पाहणार आहोत. दुसऱ्या व मधल्या चांदीच्या जोडाच्या मागे रुप्याची पाटी आहे. त्यावरील लेखावरून ती शके १८५४ (इ. स. १९३२) मध्ये साताऱ्याच्या छत्रपती शाहूमहाराजांनी अर्पण केली आहे. तिसरा प्रभावळीसहित असलेला पंचधातूचा जोड छत्रपती शिवाजीमहाराजांचे सावत्र भाऊ तंजावरचे राजे व्यंकोजी महाराजांचे वंशज शरीफजीराजे यांनी इ.स. १७११ ते १७२७ या काळात देवालयाला दिला आहे. या जोडाच्या पायाजवळ एक छोटा पितळी कुत्रा आहे. जोडाच्या प्रभावळीवर मागच्या बाजूस खालीलप्रमाणे लेख आहे :

**॥ श्री शंकर श्री ॥**

**श्री मालोजी भोसल्यांचे उदरजलनिधी शाह शींताशु झाला ।**

**तद्गर्भी येक राजा तनयवर तिथें त्यास दीपांबिकेला ॥**
**शाह क्ष्माप: शरीफावनिपसुगुण तुक्कोजि भूपार्कवंशीं ।**
**खंडेराया स्वदैवा शरभनृपवरें स्थापिले जेजुरीशी ॥१॥**

या लेखावरून वंशावळ समजते ती अशी : मालोजी भोसले - शहाजी- येंकोजी - शाहजी - शरीफजी - तुकोजी. यांपैकी शरीफजी किंवा शरफोजी याने या मूर्ती मंदिरात स्थापन केल्या आहेत. येंकोजीपासूनचे राजे तंजावरास राज्य करीत होते. शरफोजीचा काळ इ. स. १७११ ते १७२७ असा असल्यामुळे सदर जोड या काळात सहकुटुंब जेजुरीला येऊन अर्पण केला असावा. मल्हारी म्हाळसाच्या या तीन जोडांपैकी मधला चांदीचा जोड कमी उंचीचा आहे. (पुणे गॅझेटियरप्रमाणे एक सोन्याचा जोड पवारांनी, एक रुप्याचा व एक पाषाणाचा जोड पेशव्यांनी दिला आहे. त्यातील सोन्याचा जोड १९४२ च्या आंदोलनात चोरीला गेला आहे. पाषाणाच्या जोडाचा पत्ताच नाही) वरील वर्णन केलेल्या तीन जोडांमध्ये खंडोबाच्या चार हातात खड्ग, त्रिशूळ, डमरू आणि परळ अशी आयुधे आहेत. खंडोबा मूर्तीच्या कानात मकरकुंडले आहेत. म्हाळसाच्या तिन्ही मूर्तींच्या प्रत्येक उजव्या हातात एक एक कमळ आहे. डावे हात गजहस्त मुद्रेत आहेत. प्रत्येक मूर्तीला दोनच हात दाखविले आहेत. म्हाळसा मूर्तीच्या कानात कर्णफुले, बुगड्या आहेत. या सर्व तीन जोडांच्या पुढे मोठे खोबाचे व आकाराने लहान असलेले म्हाळसाचे लिंग आहे. खंडोबा लिंगाच्या उजव्या बाजूस बाणाईचे लिंग (शाळुंका) आहे. या लिंगाशेजारी आणखी चौथा खंडोबा-म्हाळसाचा जोड ठेवलेला आहे. हा जोड शिवाजीमहाराजांनी व जेजुरीच्या गावकऱ्यांनी अर्पण केला आहे, असे परंपरेनुसार येथील पुजारी सांगतात.

अलीकडेच गाभाऱ्यामध्ये संगमरवरी गणेशमूर्तीची प्रतिष्ठापना करण्यात आली आहे. गाभाऱ्याच्या डाव्या बाजूस शेजघर (शयनमंदिर) आहे, तर उजव्या बाजूस कोपऱ्यात गुप्तमल्लेश्वराचे स्थान आहे. फक्त शिवरात्रीच्या दिवशीच या मंदिराचे द्वार उघडले जाते व भाविकांना गुप्तमल्लेश्वराचे दर्शन होते. आत शिव-पार्वतीची दोन प्रतीकरूप लिंगे आहेत. गुप्तमल्लेश्वराची लोककथा पुढीलप्रमाणे :

''शंकराने जयाला दिलेल्या वचनाप्रमाणे, मार्तंडभैरव अवतारात चंदनपुरी येथे जाऊन, बारा वर्षे राहून शेवटी बाणाईशी विवाह केला आणि जेजुरीगडावर राहायला आले. परंतु म्हाळसा आणि बाणाईचे दररोज भांडण होऊ लागले. त्यामुळे देवाने डोंगराचा वरचा निम्मा भाग म्हाळसाला आणि खालचा निम्मा भाग बाणाईला देऊन दोघींना विभक्त केले. देवाचा प्रत्येक रविवारी बाणाईकडे आणि इतर दिवशी म्हाळसाकडे मुक्काम होऊ लागला. परंतु बाणूवरील अतीव प्रेमामुळे एकदा खंडोबादेव बाणूसह गडावरच गुप्त झाले. एका रविवारी बाणाईला भेटण्यासाठी गेलेले खंडोबादेव परत आले नाहीत म्हणून म्हाळसाने बाणाईच्या निवासस्थानी येऊन पाहिले तर बाणाईचाही तिथे पत्ता नाही म्हटल्यावर झाला प्रकार तिच्या लक्षात आला. तेव्हा पार्वती तथा म्हाळसाने नारदमुनींना ही सर्व हकीगत सांगितली. त्यावर उपाय म्हणून नारदांनी तिला महादेवाचे एकवीस दिवसांचे अनुष्ठान करण्यास सांगितले. नारदमुनींच्या सल्ल्याप्रमाणे म्हाळसाने पती खंडोबादेवाच्या भेटीसाठी सखी गंगाच्या साथीने जयाद्री पर्वताच्या पायथ्याशी शिवलिंगाची प्रतिष्ठापना करून तेथे एकवीस दिवसांचे अनुष्ठान केले. तेव्हा तिथेच जननीतीर्थ निर्माण झाले. त्याच ठिकाणी म्हाळसाने जानाई नावाने वास्तव्य केले (आजही भक्त जननीतीर्थ व जानाई मंदिरात जाऊन आवर्जून दर्शनाचा लाभ घेतात).''

महादेवाचे एकवीस दिवसांचे अनुष्ठान करूनही खंडोबा देव भेटले नाहीत म्हणून नारदांनी म्हाळसाला पुन्हा अकरा दिवसांचे अन्नपूर्णा अनुष्ठान करण्यास सांगितले. त्यानंतर म्हाळसाने अन्नपूर्णादेवीची प्रतिष्ठापना करून अकरा दिवसांचे अनुष्ठान केले. (जेजुरीगडावर मुख्य खंडोबा मंदिराच्या मागील बाजूस प्रतिष्ठापना केलेली अन्नपूर्णा देवीची शिळा आहे.)

अशा प्रकारे दोन वेळा अनुष्ठान करूनही खंडोबादेव भेटले नाहीत. चिंताक्रांत झालेली म्हाळसा, गजानन आणि नारदमुनींनी नंदीला विचारले असता खंडोबा देवानेच नंदीला बोलण्याची मनाई केली असल्यामुळे त्याने या तिघांकडे पाहून वायव्य दिशेकडे मान वळवून खंडोबा देव तिथे गुप्त झाल्याची खूण केली (त्यामुळे आजही कासवाचे तोंड वायव्य दिशेला आहे अशी समजूत आहे).

तेव्हा म्हाळसा, गजानन आणि नारदमुनींनी तिथे जाऊन शोध घेतला असता मंदिराच्या गर्भगृहातील भुयारात खंडोबा आणि बाणाई सापडले. तो दिवस महाशिवरात्रीचा होता. म्हाळसाने खंडोबाप्राप्तीसाठी दोन वेळा केलेल्या अनुष्ठानाचे फळ तिला मिळाले. ज्या ठिकाणी देव गुप्त अवस्थेत धाकटी प्रिय पत्नी बाणाईसोबत राहत होते, ते

ठिकाण नंतर गुप्तमल्लेश्वर म्हणून ओळखले जाऊ लागले. जेजुरीगडावरील देवसंस्थानच्या नियमाप्रमाणे आजही वर्षातून एकदा म्हणजे शिवरात्रीलाच गुप्त मल्लेश्वराचे दर्शन घेता येते. कारण हे छोटेसे मंदिरही फक्त त्याच दिवशी उघडले जाते.

मंदिराच्या शिखराच्या अंतर्भागामध्ये महादेवाचे लिंग आहे. त्याचे दर्शनही फक्त महाशिवरात्रीलाच घेता येते. वर दर्शनाला जाण्यासाठी पायऱ्यांचा रस्ता नाही. त्यामुळे फक्त महाशिवरात्रीच्या दिवशीच देवसंस्थानाकडून लावलेल्या तात्पुरत्या कृत्रिम शिडीचा उपयोग करून भाविक दर्शनाचा लाभ घेतात.

खंडोबा देवालयाच्या पाठीमागे तुळजाभवानीचे एक छोटे मंदिर आहे. या मंदिराच्या पाठीमागे श्रीपंचमलिंगाचे देऊळ आहे. काशी, नीलाद्री, मातापूर, हरिद्वार व जेजुरी या ठिकाणची ही पंचलिंगे आहेत. या देवालयाच्या दर्शनी भिंतीवर पुढीलप्रमाणे लेख आहे:

**''आमचे घराण्याचे मूळ पुरुष श्री राजे विठ्ठल शिवदेव (सासवडकर दाणी) विंचूरकर स. विंचूर यांनी शके १६७७ मध्ये बांधलेल्या श्रीपंचलिंगेश्वराच्या मंदिराचा श्री गिरजाबाई उर्फ वहिनीसाहेब यांनी आपले भ्रतार कै. शिवदेवराव रघुनाथराव उर्फ भाऊसाहेब विंचूरकर यांचे स्मरणार्थ जीर्णोद्धार केला. (मिती अधिक वैशाख वद्य १४ शके १८५६ जेजुरी). ''**

वरील लेखावरून हे देवालय सरदार विंचूरकर घराण्याचे मूळ पुरुष विठ्ठल शिवदेव दाणी-सासवडकर यांनी श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या कारकिर्दीत शके १६७७ (इ. स. १७५५) मध्ये बांधले आहे, हे स्पष्ट होते.

तुळजाभवानी मंदिराच्या डाव्या बाजूस भांडाराघर आहे. या भंडाराघराचे काम श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दीत इ.स. १७५६ साली श्रीगोंदेकरांकडून पूर्ण झाले. भंडाराघरात म्हाळसाकांताच्या दोन पितळी मूर्ती आहेत. सोमवती व दसरा या दोन दिवशी या मूर्ती पालखीत घालून मिरवितात. या मूर्तींना उत्सवमूर्ती असेही म्हणतात. या भंडाराघरात अन्नपूर्णेचीही मूर्ती आहे.

पंचलिंगाशेजारी भुलेश्वराचे देऊळ आहे. त्याच्या पाठीमागे अबदारखाना व तुळशीवृंदावन आहे. मुख्य देवालयाच्या पाठीमागील पश्चिम ओवऱ्यातून श्रीसाक्षी विनायक (गंगा आणि पार्वती या शंकरभार्यांनी जया नावाच्या दासीला, एका जिवलग सखीला 'तू शिवाची तिसरी भार्या होशील,' असा वर दिला असता जयाने त्या वेळेस गजाननाला साक्षी ठेवले होते. त्याचे प्रतीक म्हणजेच साक्षी विनायकाचे हे मंदिर होय, अशी लोककथा आहे), कडेपठाराचे दर्शन घेण्याचा झरोका, काशीविश्वेश्वर, उमाजी नाईकांची तालीम, धृतमारीची शिळा ही स्थाने आहेत. उत्तरेकडील ओवऱ्यामधून विष्णुपादुका, मारुती, बारद्वारी, देवस्थान कचेरी व नगारखाना, खंडेरायाची पालखी ही स्थाने आहेत. उत्तरेकडील ओवरीत दसरा दरबार भरतो, त्या वेळेस वाघ्या-मुरळ्यांच्या नाच-गाण्याचा कार्यक्रम होतो. पूर्वी पूर्वेकडील दरवाज्याच्या ओवऱ्यातून पेशव्यांची सदर होती.

खंडोबा मंदिराला जाण्यासाठी व भोवताली एकूण ३८४ पायऱ्या आहेत. 'नऊलाख पायरी गडाला' असा सरधोपट उल्लेख होत असला तरी नऊ लाख पायऱ्या नसून तेवढे दगड वापरले असावेत असा अंदाज व्यक्त केला जातो. गडाला एकूण अठरा कमानी असल्याचा संदर्भ आढळत असला तरी यांपैकी फक्त तेरा कमानीच सुस्थितीत असून दोन कमानी अर्धवट स्थितीत आहेत. बाकीच्या कमानी नष्ट झाल्या असाव्यात.

## २. निमगावचा खंडोबा

पुण्यापासून सुमारे ४० कि.मी. अंतरावर पुणे-नाशिक महामार्गावर वसलेल्या राजगुरूनगर शहराच्या (ता. खेड) आग्नेयेस ८ कि.मी. अंतरावर श्रीक्षेत्र निमगाव हे गाव वसले आहे. राजगुरूनगर-पाबळ मार्गावरील रेहटवडी गावाच्या दक्षिणेस अंदाजे ३ कि.मी. अंतरावर निमगाव असून, गावाच्या उत्तरेस सुमारे १.६ कि.मी. अंतरावर एका उंच टेकडीवर खंडोबाचे प्रसिद्ध देवस्थान आहे. पूर्वी भीमा नदीच्या काठी दक्षिणेस 'नागणा' नावाचे एक लहान खेडे होते. त्यामुळे निमगावला 'निमगाव-नागणा' या नावाने लोक ओळखत असत. पुढे काही कारणामुळे हे गाव पूर्ण उद्ध्वस्त झाले. सध्या तिथे पूर्वीचा अवशेष म्हणून मारुतीचे एक छोटे पुरातन मंदिर आहे. कालांतराने शेजारच्या दावडी गावाचे नाव निमगावला जोडण्यात आले. म्हणजे सध्याचे खंडोबाचे निमगाव-दावडी होय. पुणे जिल्ह्यात निमगाव नावाची एकूण सहा गावे आहेत. परंतु प्रसिद्ध खंडोबा देवस्थानामुळे या निमगाव-दावडीला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

निमगाव टेकडीच्या पायथ्यापासून उत्तरेचा वळणावळणाचा घाट चढून वर गेले की, खंडोबा देवस्थानचा

भव्य तट लागतो. चारी बाजूस गढीप्रमाणे दगडी बुरुज व २४ फूट उंच असा हा तट आहे. मंदिरात प्रवेश करण्यासाठी तटाच्या पूर्व, पश्चिम व दक्षिण अशा तीन बाजूंस मोठे दरवाजे आहेत. यांपैकी पश्चिमेचा दरवाजा छिनून टाकलेला असून तो कायमचा बंद असतो. दक्षिण दरवाजा फक्त यात्रेच्या किंवा एखाद्या विशेष उत्सवाच्या दिवशीच उघडून त्याचा वापर केला जातो. या दरवाजाला 'निमगाव दरवाजा' असे नाव आहे. पूर्वेस मुख्य प्रवेशद्वार असून त्याला 'दावडी दरवाजा'असे म्हणतात. या दरवाजाबाहेर उत्तर-दक्षिण देवड्यांच्या पश्चिम बाजूच्या देवड्यांत हनुमान व गणपती यांच्या मूर्ती आहेत. या मुख्य प्रवेशद्वारातून प्राकारात प्रवेश केल्यानंतर खंडोबाचे भव्य मंदिर आपले लक्ष वेधून घेते. मंदिराभोवतालचा सर्व भाग फरसबंद केला असून फरसबंदी प्राकाराची लांबी-रुंदी अनुक्रमे १९५-११८ फूट आहे. तटाच्या आतल्या चारही बाजूंस मिळून एकूण ७६ ओवऱ्या काढण्यात आल्या आहेत. पूर्वाभिमुख दरवाजातून आत शिरताच डाव्या व उजव्या अंगास मिळून तीन दीपमाळा तसेच दोन दीपमाळांचे चौथरे व दोन पाषाणमय अश्वमूर्ती आहेत. उत्तरेकडील एका दीपमाळेवर ११ व दुसऱ्या दीपमाळेवर १७ ओळींचे दोन शिलालेख आहेत. त्यातील मजकूर पुढीलप्रमाणे :

(१) **श्री गजानन । श्री मार्तंड । चरणी तत्प। र खंडेराव ।**
**सुत मल्हारराव गाय ।**
**कवाडणी रत रसक १६९१ (५) वी जयसव । त्सरे ॥**

(२) **श्री मार्तंडे । तत्पर । गाय । कवा ।**
**ऽसर । कार सयाजीराव महाराज श ॥**
**क १८-०१ (५) सुभानु । नाम । स माघ शु. ११**

या दीपमाळांच्या समोरच थोड्या अंतरावर नंदीची मंडपी आहे. मंडपीच्या डाव्या हातास दोन उंच दगडांवर पोर्तुगीज घडावाची घंटा टांगलेली आहे. ती फिरंगाण घंटा असून तिच्यावर 1891 असा इंग्रजी आकडा आहे. तिच्या दक्षिणेस नुसताच चौथरा आहे. या नंदीसमोरच श्रीखंडेरायाचे भव्य मंदिर आहे. याचे सोपे, मंडप-खोल्या आणि गर्भागार असे प्रामुख्याने तीन भाग पडतात. सोपे दोन असून प्रत्येकी दोन दोन खणांचे आहेत. त्यात दक्षिणेच्या बाजूला भिंतीत विठ्ठल-रखुमाई यांच्या उत्तराभिमुख मूर्ती बसविलेल्या आहेत. तिथे गोडेतेलाच्या दिव्याची ज्योत अष्टौप्रहर तेवत असते. तसेच शेजारच्या जागेत निरनिराळ्यात ऋषीमुनींच्या व अप्सरांच्या मूर्तीही बसविलेल्या दिसतात. दरवाजाच्या दोन्ही बाजूंस हातामध्ये दंडा घेतलेल्या दोन भालदार-चोपदारांच्या मूर्ती बसविलेल्या आहेत. याच भागात उजव्या बाजूला देवाची पालखी दोराने टांगून ठेवलेली असते. (ही पालखी दसरा, सोमवती अमावास्या, पौर्णिमा इत्यादी महत्त्वाच्या दिवशी गावातील भोयांकडून खाली उतरवली जाते व देवाच्या उत्सवमूर्ती पालखीत बसवून पालखी मिरवली जाते.) या भागाला सदर असेही म्हणतात.

हा सदरेचा भाग ओलांडून आत गेले की, आपण मंडपात प्रवेश करतो. मंडप घुमटाकार असून अष्टकमानींनी युक्त पण खांबविरहित आहे. त्यास तीन दरवाजे आहेत. मंडपाच्या मध्यभागी देवाकडे मुख करून ठेवलेली पाषाणमय कासवाची कोरीव मूर्ती आहे. त्यावरच छताला एक मोठी घंटा अडकवलेली आहे. उत्तर-पश्चिम बाजूच्या खोलीत देवस्थानची भांडी ठेवलेली आहेत. दक्षिण-पश्चिम बाजूच्या खोलीत देवाचे भंडारघर अथवा शेजघर आहे. तर पश्चिम बाजूच्या भिंतीत काही पाषाणमय मूर्ती बसविलेल्या दिसतात. येथेही गोडेतेलाचा दिवा सतत तेवत ठेवलेला असतो. मंडपाच्या भिंतीवर काही देवतांचे फोटो टांगून ठेवलेले दिसतात.

मंडपाच्या पश्चिम बाजूला लागून चौकोनी गाभारा आहे. गर्भागारातील खांब सुरूचे असून नक्षीकाम केलेले व वरच्या बाजूला निमुळते होत गेलेले आहेत. गर्भागाराच्या मध्यभागी एक पिंड असून जवळच उत्तराभिमुख योनियुक्त स्वयंभू लिंगे आहेत. त्यांच्या शेजारी एक उखळ आहे. त्यात सदैव भंडारा असतो. त्याच्या पलीकडे अनुक्रमे बाणाई, मल्हारी, म्हाळसा, भैरव व जोगेश्वरी यांच्या धातूच्या मूर्ती ठेवलेल्या आहेत. बाणाईची मूर्ती तांब्याची असून उभी, द्विभुज आहे. तिच्या एका हातात कमलकलिका व दुसऱ्या हातात पानपात्र आहे. मल्हारीची मूर्ती पितळेची असून आसनमांडी घातलेली आहे. डाव्या मांडीखाली मल्लाचे (दैत्याचे) मुंड आहे. मल्लारीच्या तीन हातांत अनुक्रमे त्रिशूळ, डमरू व पानपात्र आहे. तर चौथ्या हातातील खड्ग केव्हा तरी नष्ट झाले असल्यामुळे तो हात रिकामाच आहे. विशेष म्हणजे येथे खंडोबाला दाढी-मिशा दाखविलेल्या आहेत. म्हाळसाची मूर्ती पितळेची असून उभी आहे. मूर्ती द्विभुज असून कमलकलिका व पानपात्र धारण केलेले आहे. तर भैरवाची मूर्ती तांब्याची असून बैठी, चतुर्भुज आहे. त्याच्या प्रत्येक हातात खड्ग, त्रिशूळ, डमरू व परळ धारण केलेला आहे. जोगेश्वरीची मूर्ती तांब्याची,

बैठी आणि कमलकलिका व पानपात्र धारण करणाऱ्या दोन हातांची आहे. यांपैकी मल्हारी व म्हाळसा यांच्या मूर्ती आधुनिक आहेत. या मूर्ती चैत्री पौर्णिमा, दसरा, सोमवती अमावास्या, माघी पौर्णिमा या दिवशी बाहेर आणून पालखीत घालून मिरविल्या जातात.

या सर्व मूर्तींच्या पाठीमागील भिंतीत मल्हारी-म्हाळसा-बाणाई यांच्या पाषाणमय मूर्ती असून बाणाईची उभी तर मल्हारी-म्हाळसा यांच्या मूर्ती बैठ्या स्वरूपात आहेत. पैकी बाणाईने आपला उजवा हात डोक्यास लावला आहे, तर डाव्या काखेत मेंढरू घेतलेले आहे. तिचा पोशाख महाराष्ट्रीय पद्धतीची साडी-चोळी असा आहे. श्री मल्हारीरायाची मूर्ती भव्य, चतुर्भुज आहे. त्याच्या प्रत्येक हातामध्ये तलवार, डमरू, त्रिशूळ व पानपात्र या वस्तू आहेत. देवाचा पोशाख पांढरेशुभ्र धोतर, तशाच रंगाची बाराबंदी अंगरखा, उपरणे, डोक्यावर पगडी व गळ्यात रुद्राक्षाच्या माळा अशा स्वरूपात नेहमीच असतो. वर उल्लेख केल्याप्रमाणे मल्हारीच्या दोन्ही हातात पितळी चिलखत असलेल्या दोन तलवारी ठेवलेल्या असून रात्रीची पूजा झाल्यानंतर त्या उतरवून ठेवल्या जातात. हे वर्णन शूर लढवय्या योद्धा पुरुषाचेच आहे हे प्रथमलक्षणी जाणवते. प्रदेशानुसार या मूर्तींच्या हातातील शस्त्रास्त्रे किंचित स्वरूपात बदललेली आढळतात. म्हाळसाचे दोन्ही हात गुडघ्यावर असून पानपात्र धारण केलेले आहेत. तिचा पोशाख बाणाईसारखाच साडी-चोळी परिधान केलेला आहे. म्हाळसाच्या मूर्तीसमोर एक भली मोठी सहाण असून त्यावर गुरव-पुजारी सकाळ-सायंकाळ पूजेच्या अगोदर गंध उगाळत असतात. हेच ताजे गंध दररोज स्वयंभू लिंगास व शेजारच्या मूर्तीस लावले जाते. आत गाभाऱ्यात स्वयंभू लिंगावर आच्छादन करण्यासाठी एक चारखांबी मंडप असून त्याला हंड्या-झुंबरे टांगलेली आहेत. गाभाऱ्यात दोन नगारे व सहा घंटा टांगलेल्या असून पूजेच्या वेळी त्या नित्यनेमाने वाजवल्या जातात. गाभाऱ्याच्या दक्षिण भिंतीत एक खिडकी असून त्याला कुलूप लावलेले असते. त्याला कोठी म्हणतात. नवस केलेले भाविक यात्रेकरू या कोठीत आपल्या इच्छेप्रमाणे पैसे टाकतात. देवाचे एक पितळेचा व एक तांब्याचा असे दोन मुखवटे असून ते स्वयंभू लिंगावर चढविले जातात. चंपाषष्ठीस देवाचे हे पितळी मुखवटे दागिने घालून बाहेर मंडपात कासवाच्या ठिकाणी ठेवले जातात. गाभाऱ्यामध्ये आतील मंडपाला लागूनच एक लाकडी खांब साधारणपणे तीन फूट उंचीवर दक्षिण-उत्तर ठोकलेला आहे. याला 'आगळ' असे म्हणतात. या आगळाच्या जवळ फक्त गुरव व भगत यांनाच अंगातील सदरा काढून जाण्यास परवानगी आहे. पूर्वी यात्रेकरूंनी या आगळाला एक रुपया, आठ आणे, चार आणे याची चांदीची नाणी ठोकलेली आहेत. याबद्दलची सविस्तर माहिती येथील पुजारी सांगतात. गाभाऱ्याच्या दक्षिणेस एक भंडारघर (शेजघर) आहे.

गाभाऱ्यावर लहानसे शिखर आहे. मंडप व सोपा यावर घुमटाकार व अर्धघुमटाकार छते असून त्याच्या माथ्यावर असलेल्या वेदिकेच्या दर्शनी भागावर साधू, हत्ती, घोडे इत्यादींच्या सुबक मूर्ती आढळतात. गाभाऱ्याच्या कळसामध्ये एका जागेवर लाल माती टाकलेली आहे. त्याला 'तालीमखाना' म्हणतात. येथे देव रोज तालीम (मेहनत) करतात, अशी पूर्वापार चालत आलेली जनश्रद्धा आहे.

गाभाऱ्याच्या पाठीमागील पश्चिमाभिमुख देवळीत अष्टभुजा महिषासुरमर्दिनीची उभी मूर्ती आहे. परंतु ही देवळी म्हाळसाची देवळी म्हणूनच ओळखली जाते. येथे म्हाळसाबाईची स्वयंभू शिळा म्हणून ओळखली जाणारी एक शिळा आहे. सदरील देवळी फारच जुनी झाल्यामुळे १९७८ साली येथील यात्रामंडळाने ती पुन्हा बांधली. दर पौर्णिमेस येथे देवाची पालखी (छबीना) निघते, त्या वेळेस या देवळीच्या समोर कमीत कमी पाच अभंग गायिले जातात.

खंडोबा मंदिरात एकूण चार भुयारे आहेत, असे येथील लोक सांगतात. यांपैकी एक भुयार गाभाऱ्याच्या उत्तर बाजूस तटाच्या आत आहे. या भुयारातून हा रस्ता खाली निमगावातील चंद्रचुडांच्या वाड्यात जातो. परंतु सध्या या भुयाराची अवस्था अत्यंत भग्न झालेली आहे. इतर भुयारांबद्दल इतकी तंतोतंत माहिती मिळत नाही. चौकात चांदी देण्याकरिता दगडी खांबांचे दोन चबुतरे आहेत. तिथे दोन थडगीही आहेत. दक्षिणेस असलेले थडगे एका मुरळीचे आहे, तर वायव्य कोपऱ्यातील थडगे गायकवाडांच्या वंशातील कोणाचे तरी असावे, अशी माहिती मिळते. मंदिराच्या चौफेर असलेल्या तटावर जाण्यासाठी दक्षिण व उत्तर बाजूस दोन जिने आहेत. तट साधारणत: १० ते १२ फूट रुंदीचा आहे. तटावरील रस्ता फरसबंदीपासून अंदाजे ५० फूट उंचीचा आहे. तटावरून फेरफटका मारताना भोवतालचा नयनरम्य परिसर आपले लक्ष वेधून घेतो.

तटाच्या पूर्व बाजूस नगारखाना असून तो तटापासून २४ फूट उंच म्हणजेच फरसबंदापासून ५० फूट उंचीचा आहे. नगारखान्यात चार-पाच मोठमोठे नगारे ठेवलेले आहेत. नगारखान्याच्या छोट्या दरवाजातून हे नगारे आत कसे

गेले, असा प्रश्न पाहणाऱ्यास पडतो. कदाचित आतच हे नगारे तयार केले असावेत. पहाटे, सकाळी, दुपारी, सायंकाळी आरतीच्या वेळेस नित्यनेमाने हे नगारे वाजविले जातात. त्यासाठी बडोद्याच्या गायकवाड संस्थानामार्फत इथे चार चौघडेवाल्यांची नेमणूक केलेली आहे. परंतु सध्या त्यांना पगार मिळत नाही. आश्चर्याची बाब म्हणजे सुमारे ४० वर्षांपूर्वी मल्लारी गुरव नावाचा इसम याच नगारखान्यावरून ५० फुटांवरून खाली फरसबंद दगडावर पडला होता. परंतु त्याला कसलीही इजा झाली नाही. मंदिराच्या दक्षिण बाजूस हेगडी प्रधानाचे पश्चिममुखी लहानसे देऊळ आहे. त्यातील हेगडी प्रधानाची मूर्ती बैठी व द्विभुज असून हात गुडघ्यावर ठेवलेले आहेत. तर मंदिराच्या उत्तर बाजूस पादुकांचा पूर्वाभिमुख दगडी सोपा आहे. यात पादुका ठेवलेल्या आहेत. त्याच्या उत्तरेस एक 'पाऊदके' किंवा ओटा असून माघ पौर्णिमेला येथे देव पालखीतून आणले जातात. मंदिराच्या टेकडीला एकूण ९० पायऱ्या आहेत. या पायऱ्यांच्या पायथ्याशी भैरवनाथाचे मंदिर आहे. येथे माघ पौर्णिमेला खंडोबादेवाला भैरवनाथाच्या भेटीसाठी पालखीतून मिरवत आणले जाते.

## ३. पालीचा खंडोबा

पाली तथा पाल हे गाव सातारा-कोल्हापूर राष्ट्रीय महामार्ग क्र. ४ वरील काशिळ या गावापासून पश्चिमेस ७ कि.मी. अंतरावर आहे. सातारा ते काशिळ हे अंतर २४ कि. मी. आहे. काशिळपासून एस.टी.ने किंवा खासगी वाहनाने पालीस जाता येते. पालीतून तारळी नदी वाहते. या नदीमुळे पालीचे दोन भाग झाले आहेत. नदीच्या दक्षिण-पश्चिमेच्या भागास पाल म्हणतात, तर उत्तर-पूर्वेच्या भागास राजापूर म्हणतात. खंडोबाचे मंदिर राजापूर भागात पूर्वेकडच्या बाजूस आहे. येथील श्रीखंडोबा मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिराभोवतालचा प्राकार फरसबंदी असून त्याच्याभोवती भव्य तटबंदी आहे. तटाच्या पूर्व, दक्षिण आणि उत्तर बाजूंना दरवाजे आहेत. दक्षिण दरवाजा बाकीच्या दोन्ही दरवाजांपेक्षा मोठा असून, याचाच वापर अधिक प्रमाणात होतो. तटाला लागून आतील बाजूस सर्वत्र ओवऱ्या काढण्यात आल्या आहेत. त्यांचा उपयोग बाहेरून येणाऱ्या भाविक यात्रेकरूंसाठी विश्रांतीकरिता होतो. तटाच्या पूर्व दरवाजाने प्राकारात प्रवेश करताच दोन्ही बाजूंस दोन दीपमाळा लागतात. उजव्या बाजूकडील दीपमाळेच्या नैर्ऋत्येस आणखी एक दीपमाळ आहे. तिच्या पलीकडे पितळी पत्र्याने मढविलेल्या हत्तीची मंडपी असून, जवळच तिच्या ईशान्येस आणखी एक दीपमाळ आहे. खंडोबा मंदिराच्या मुख्य दरवाजासमोर नंदीची मंडपी असून तिच्या उत्तर-दक्षिण बाजूस चार दीपमाळा आहेत. या दीपमाळांच्या जवळ तुळशीवृंदावन व खंडोबाचे एक लहानसे पश्चिमाभिमुख मंदिर आहे. यातील मूर्ती बैठी, चतुर्भुज, खड्ग, डमरू, त्रिशूळ व पानपात्र धारण केलेली आहे. मूर्तीच्या मांडीखाली दोन्ही बाजूस मणि व मल्ल यांची मुंडे आहेत. मुख्य खंडोबा मंदिरासमोरील आवारात पितळी पत्र्याने मढविलेली कासवाची मोठी आकृती आहे. मंदिराच्या महाद्वाराच्या पायरीवर 'पालाईची समाधी' आहे. तेथून आत प्रवेश केल्यावर सोळा खांबी दगडी मंडप लागतो. त्याच्या बाहेरच्या सर्व खांबांस लागून टेकण्याचा कट्टा असून मधले सर्व खांब पितळी पत्र्याने मढविले आहेत. पत्र्यावर काही ठिकाणी उठावाच्या तर काही ठिकाणी रेखामय आकृत्या काढल्या आहेत. मंडपात फरशी असून, त्यातील एका फरशीवर 'धनाजी बीन संताजी जाधव' असा कोरीव लेख आहे. यातील नाम व उपनाम यांच्या साधर्म्यामुळे हा मंडप प्रसिद्ध मराठा सेनापती धनाजी जाधव यांनी बांधला असल्याची समजूत आहे. या मंडपाच्या पश्चिमेस एक फरसबंदी, दुघाई सोपा असून त्यातील फरशीवर 'पडळोजी अबाबीन बाबसेटी कर दोई' अशा अक्षरांचा कोरीव लेख दिसतो. याचेच वाचन 'अबांबिन शेटी पधोडे' असे केले जाते. सातारा गॅझेटियरमध्ये पालीचे वर्णन खालीलप्रमाणे करण्यात आले आहे.

सदर खंडोबाचे हे मंदिर ५०० ते ५५० वर्षांपूर्वी आबाबिन शेटी पाघोडे नावाच्या वाण्याने बांधले. मंदिराचा मूळ ढाचा म्हणजे दगडी बांधकामाचे गर्भगृह व त्याच्या बाहेरील बाजूस १०.६६ ह्व ८.५३ मीटरचा द्वारमंडप आहे. द्वारमंडप चार स्तंभांवर आधारलेला असून स्तंभ साधे आहेत. स्तंभाचे मध्यस्तंभ (Shaft) चौरसाकृती, अष्टकोनी व गोलाकार आहेत. सर्व स्तरांतील लोकांचे पालीचा खंडोबा दैवत आहे. गर्भगृह १.४८ ह्व १.४८ मीटरचे असून त्यात दोन लिंगे आहेत. त्यांपैकी एकावर खंडोबाचा तर दुसऱ्यावर म्हाळसाबाईचा पितळी मुखवटा आहे. त्यांच्या शेजारीच उजव्या बाजूला काळ्या दगडाची खंडोबाची दुसरी पत्नी बाणूबाईची मूर्ती आहे. तसेच पाठीमागे त्याचा मुख्य प्रधान हेगडी पेंढारी व त्याची पत्नी यांच्या घोड्यावर बसलेल्या पितळेच्या मूर्ती आहेत. द्वारमंडपातील उत्तरेकडील देवळीत गणपतीची व दक्षिणेकडील देवळीत सिद्धवासिनीची मूर्ती आहे. मुख्य मूर्तीवर सतत पाण्याचा अभिषेक होण्यासाठी उत्तरेकडून एक दगडी नाली काढण्यात आली असून, तिच्याखाली दगडी घोड्याची मूर्ती आहे. शिवाजी व राजारामाच्या

कालावधीत प्रसिद्धीस असलेल्या सेनापती धनाजी जाधवाने मंदिराच्या प्राकारात ६.३ x ६.३ मीटरचा मंडप बांधला आहे. तो सर्व बाजूंनी उघडा आहे. हा १२ स्तंभांवर आधारलेला असून, गाभाऱ्याच्या देवडीच्या उंचीएवढा आहे. त्यात सभोवती लोकांना बसण्यासाठी दगडी बैठक (बाक) आहेत. मंडपाचे छत विस्तीर्ण असून, त्यावर पागोळ्या व त्याखाली कोरीव भिंती आहेत. संपूर्ण मंडपाचे बांधकाम दगडी असून त्यातील स्तंभांना रंगरंगोटी केलेली आहे. त्यांपैकी काही स्तंभ नक्षीकाम केलेल्या पितळी पत्र्याने मढविलेले आहेत. मंडपाच्या प्रत्येक कोपऱ्यावर लहान कळस आहेत व मध्यभागी लहान शिखर आहे. द्वारमंडपावर शिखर असून गाभाऱ्यावरही मुख्य शिखर आहे. सर्व शिखरे विटांची असून त्यास ठिकठिकाणी देवळ्या आहेत. त्यामध्ये देवदेवतांच्या मूर्ती बसविलेल्या आहेत.

मंदिराच्या प्राकारामध्ये पूर्व-पश्चिम ४२.६२ मीटर लांब व उत्तर-दक्षिण २४.३८ मीटर रुंदीचा फरसबंदी चौक आहे. या चौकात वायव्येस ओंकारेश्वर महादेवाची मूर्ती व नैर्ऋत्येस हेगडीची मूर्ती आहे. मंडपाच्या समोर पूर्वेला दगडी छताखाली पितळी पत्र्याचे आवरण असलेला नंदी आहे. त्याच्या दोन्ही बाजूला घडीव दगडांच्या ३.५७ मीटर उंचीच्या दोन दीपमाळा आहेत. दीपमाळा गज व वृषभांनी तोलून धरलेल्या असून खालच्या बाजूस मानव, पशू व वृक्षवेलींचे कोरीव काम आहे. याच्यापुढे पूर्वेला नक्षीकाम केलेल्या पितळी पत्र्याने आच्छादलेला दगडी हत्ती आहे. यावर दगडी छत आहे. नंदीच्या दक्षिणेस शिवाजी महाराजांच्या काळातील लहान देऊळ असून त्याच्या उत्तरेला तुळशीवृंदावन आहे. प्रांगणाची भिंत ६.०९ मीटर उंचीची असून, तिच्या पश्चिमेला, वायव्येला, दक्षिणेकडील अर्धा भाग व पूर्व बाजूच्या उत्तरेकडील अर्ध्या भागात चिरेबंदी दगडांचे बांधकाम केलेले मठ आहेत. त्यांना नक्षीकाम केलेल्या कमानी आहेत. या मठाचे सुरुवातीचे बांधकाम मराठा सरदार शिंदे व उर्वरित बांधकाम धनाजी जाधवाने केलेले आहे. मठाचे बाहेरील छत सपाट असून त्याचा गच्चीसारखा उपयोग केला जातो. मठाची दालने एकसारखी नाहीत. याचा उपयोग भक्तांना व प्रवाशांना राहण्यासाठी तसेच देवाचा घोडा ठेवण्यासाठी होतो. प्रांगणात मध्यभागी कोरलेल्या कूर्मशिला आहेत. नंदी व द्वारमंडप यांच्या मधोमधही कोरलेली मोठी कूर्मशिला असून ती पितळी पत्र्याने मढविली आहे. प्रांगणाला तीन प्रवेशद्वारे आहेत. पूर्वेकडील प्रवेशद्वार लहान असून आतील बाजूस ९.१४ मीटर उंचीच्या दोन दीपमाळा आहेत. प्रत्येकीवर दिवे लावण्यासाठी १२ कोरीव खोबण्या आहेत. प्रवेशद्वाराचे व या दीपमाळांचे बांधकाम नेरचा पाटील गमाजी चव्हाणने केले आहे. उत्तरेकडील प्रवेशद्वार (शिंद्यांच्या मठाजवळील) लहान असून ते शिंद्यांनी बांधले आहे. दक्षिणेकडील धनाजी जाधवाच्या मठाजवळील प्रवेशद्वार मुख्य असून ते ३.६५ मीटर उंच व ५.२ मीटर रुंद आहे. हे सुस्थितीत असून सुंदर आहे. याच्या आतमध्ये भिंतीच्या बाजूला मठाची दोन दालने असून ती मुधोळच्या घोरपड्यांनी बांधली आहेत. त्यांपैकी एका दालनात गणपतीची मूर्ती आहे. प्रवेशद्वाराच्या वर सुशोभित नगारखाना असून नगारखान्याचे व प्रवेशद्वाराच्या कमानीचे बांधकाम रहिमतपूरच्या मान्यांनी केले आहे. प्रांगणाबाहेरील जागाही दगडी फरसबंदीची आहे. प्रांगणाच्या पूर्व बाजूची भिंत कच्ची असून, तिला लागून असलेल्या दालनांची पडझड झालेली आहे. दक्षिण बाजूला धनाजी जाधवाच्या वेळची अर्धवट राहिलेली दगडी चौकोनी इमारत आहे. दक्षिणेकडे पूर्व बाजूला काही इमारती आहेत. या इमारतींच्या बाजूला घडीव दगडांचे ९.१४ मीटर उंचीचे, ६.०९ मीटर रुंदीचे व आतील बाजूने १.८२ मीटर रुंदीची कमान असलेले महाद्वार आहे. याचे बांधकाम कऱ्हाडच्या मुतालिक घराण्यातील यमाजी शिवदेवने केले आहे. सन १९९० मध्ये याचा जीर्णोद्धार केला आहे.

'' या देवस्थानास दक्षिणेतील राजघराण्याकडून पुष्कळे देणग्या व इनाम मिळाले आहेत. सन १८८५ मध्ये या देवस्थानास शासनाकडून यात्रेकरिता वार्षिक ३०९ रुपये अनुदान मिळत होते. या देवस्थानाचे वर्षातून बरेच उत्सव व यात्रा भरतात. यावेळी प्रत्येक यात्रेकरूकडून यात्राकर घेतला जात असे. आता फक्त मुख्य यात्रेच्या वेळीच कर घेतला जातो. अजूनही शासनाकडून यात्रेरिता अनुदान मिळते. पूजेचा खर्च भागविण्यासाठी देवस्थानास काही जमीन इनाम मिळाली आहे ''[१]

## ४. शेगूडचा खंडोबा

अहमदनगरपासून ८५ कि. मी. अंतरावर (अहमदनगर ते मिरजगाव ५२ कि. मी., मिरजगाव ते कर्जत १९ कि. मी. आणि कर्जत ते शेगूड अंतर १४ कि. मी.) 'शेगूड' हे गाव (ता. कर्जत) वसले आहे. कर्जत-करमाळा रस्त्याच्या उजव्या बाजूस मुख्य गाव आहे, तर रस्त्याच्या डाव्या बाजूस अंदाजे १०० मीटर अंतरावर खंडोबा मंदिर आहे. मंदिराच्या पूर्वेस १०० ते १५० मीटर अंतरापासून सोलापूर जिल्ह्याची हद्द सुरू होते. म्हणजे शेगूड हे प्रसिद्ध खंडोबा तीर्थस्थान अहमदनगर-सोलापूर जिल्ह्याच्या अगदी सीमारेषेवर आहे.

मुख्य मंदिराच्या भोवताली चारी बाजूस उंच असा भक्कम दगडी तट आहे. तटाच्या दक्षिण बाजूस मध्यभागी मुख्य प्रवेशद्वार आहे. त्यातून आपण प्राकारात प्रवेश करतो. पूर्व आणि पश्चिम बाजूंच्या प्रवेशद्वारातूनही प्राकारात प्रवेश करता येतो.

सध्याच्या मंदिरातील गर्भगृहात ज्या ठिकाणी खंडोबा-म्हाळसाची दोन स्वयंभू लिंगे आहेत, त्यावर पूर्वी मंडपीवजा अतिशय लहान मंदिर होते. १९९७-९८ ला ती मंडपी काढून तेव्हापासून त्या जागी नवीन मंदिराचे बांधकाम सुरू झाले. ते नुकतेच पूर्ण झाले आहे. पूर्वीच्या मंडपीचे (मंदिराचे) सुबक नक्षीकाम असणारे खांब तटाच्या बाहेर दक्षिण प्रवेशद्वारासमोर आजही पाहावयास मिळतात.

सध्याचे नवीन मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिराला सोपा नाही. आपण थेट मंडपात प्रवेश करतो. मंडपात प्रवेश करण्यासाठी दक्षिणेच्या भिंतीलाही एक छोटासा दरवाजा आहे. भाविक यात्रेकरू प्रथम प्रवेशासाठी याच दरवाजाचा मुख्यत्वे वापर करताना दिसतात. मंडपाच्या मुख्य पूर्वाभिमुख प्रवेशद्वाराच्या आतील उजव्या बाजूच्या भिंतीला मध्यभागी देवाचा ढोल अडकविण्याची खुंटी आहे. इथेच ढोल अडकविलेला असतो, तर डाव्या बाजूच्या भिंतीलगत अब्दागिरी ठेवण्याची जागा आहे. मंडपाच्या छताला प्रामुख्याने तीन घंटा अडकविल्या आहेत. तुलनेने त्यातील तिसरी घंटा छोटी आहे. ती परभू बळी गिते, येरवलीकर यांनी दिली आहे. पहिल्या दोन मोठ्या घंटा अनुक्रमे 'समस्त म्हाळजकर परिवार, नानेमावळ' यांनी व 'सतीश भीमराव भोसले-काळीवाडीकर' यांनी दिलेल्या आहेत. काळीवाडीकर यांनी दिलेल्या घंटेवर २६.१२.२००४ अशी तारीख आहे. गर्भगृहाच्या समोर जमिनीवर छोटीशी कासवमूर्ती आहे.

गर्भगृह खुले असल्यामुळे छोट्या दरवाजातून गर्भगृहात प्रवेश करताना दोन पायऱ्या ओलांडून खाली उतरावे लागते. गर्भगृहाच्या मध्यभागी जमिनीवर देवाचे सिंहासन आहे. तिथे खंडोबा-म्हाळसाची दोन स्वयंभू लिंगे आहेत. त्यावर पितळी मुखवटे चढविण्यात आले आहेत. या मुख्य मूर्तीच्या मागे भिंतीलगत विटा-सिमेंटचा चौथरा असून, तो मंदिराच्या दक्षिण-उत्तर भिंतीला जोडला आहे. त्यावर उजवीकडे म्हाळसा, हेगडीप्रधान, बाणाई यांच्या वाळू-सिमेंटपासून तयार केलेल्या सुबक, मोठ्या मूर्ती आहेत. हेगडीप्रधानाच्या उजव्या हातात तलवार व दैत्यशिर दाखविण्यत आले आहे, तर डाव्या हातात फक्त दैत्यशिर दाखविण्यात आले आहे. डोक्यावर शिंदेशाही पगडी दाखविण्यात आली आहे. म्हाळसामूर्तीच्या उजव्या बाजूस मोठी समई आहे. म्हाळसा आणि हेगडीप्रधानाच्या मध्यभागी छोटी दगडी घोड्याची मूर्ती आहे, तर बाणाई मूर्तीच्या डाव्या बाजूस भिंतीला लागून देवाचा पलंग व छत्रीची जागा आहे. गर्भगृहातील चौथरा व जमीन मार्बलने सुशोभित केली आहे. चौथऱ्याच्या दर्शनी भिंतीवर पुढील मजकूर पाहावयास मिळतो :

खंडेराय प्रसन्न<br>
कै. गुलाब, धर्माजी, भिमाजी<br>
गबाजी, यमाजी, पोटावळे,<br>
यांचे स्मरणार्थ<br>
कोटावळे परिवारातर्फे<br>
मार्बलचे काम केले.

गाभाऱ्याचे बांधकाम श्री. गंगाराम भाऊसाहेब साखुरे, मु. पो. केंदूर, ता. शिरूर, जि. पुणे यांनी केले आहे. मंदिराच्या कळसाचे काम गावकऱ्यांच्या वर्गणीतून झाले आहे. मंडपाचे काम श्री. रामदास डावरे, मु. पो. झरेगाव, ता. करमाळा, जि. सोलापूर यांनी केले आहे, तर मंडपातील फरशीचे काम यात्रेकरूंच्या मदतीतून करण्यात आले आहे.

मंदिरासमोर, मंडपात प्रवेश करण्यापूर्वी जमिनीवर पोटफोडे नावाच्या भक्ताची मूर्ती असून, कासवासारखी त्याची रचना आहे. त्याच्या पाठीमागे एक छोटी दगडी मंडपी आहे. त्यात मंदिराच्या दिशेस मुख असणारा एक छोटा दगडी नंदी आहे. नंदीशेजारी दैत्याची पावका (तांदळा) आहे. या मंडपीच्या पाठीमागे पुन्हा एक मोठी मंडपी असून त्यात डावीकडून अनुक्रमे गणपती, विठ्ठल, रखुमाई यांच्या मूर्ती व बाणूबाईच्या न्हाणीची जागा आहे. ही मंडपी पाठीमागून बंदिस्त असल्यामुळे तटाचे पूर्वाभिमुख प्रवेशद्वार दिसत नाही. त्यामुळे या प्रवेशद्वाराकडे जाण्यासाठी

मंडपीला उजव्या किंवा डाव्या बाजूने वळसा घालूनच जावे लागते. पहिल्या मंडपीच्या उजव्या बाजूस दोन भव्य दीपमाळा आहेत. त्यातील एक दीपमाळ सिमेंटने लिंपली आहे. या दीपमाळांना लागूनच उजव्या बाजूस सुबक दगडी कोरीव काम असलेली एक सुंदर बारव आहे. पूर्वाभिमुख प्रवेशद्वारावर पुढील मजकुराचा शिलालेख आहे :

| | |
|---|---|
| **मार्तंड भैरव हरिहर एक मुर्ती मारूनी**<br>**मणिमल्ल दैत्य उदार किर्ती**<br>**केले सुखीजन पदी ह x x x है**<br>**लिंगद्वय म्हणुनिया शिव महालया है** | **मल्हारी**<br>**शंकर**<br>**सयाजी**<br>**महिपत**<br>**विठ्ठल**<br>**महिपत**<br>**राव पुंडे** |
| **शके १६९५ विजय संवत्सरे विजया दशमी रवि :** | |

## ५. नेवासेचा खंडोबा

नेवासा गावामधून प्रवरा नदी वाहत असल्यामुळे गावाचे खुर्द आणि बुद्रूक असे दोन भाग पडले आहेत. पैकी 'खुर्द'मधे मोहिनीराजाचे (म्हाळसाचे) प्रसिद्ध मंदिर आहे. गावात खंडोबाची तीन लहान-लहान मंदिरे आहेत. नदीच्या पलीकडे 'बुद्रूक' मध्येही एक खंडोबामंदिर आहे. खंडोबादेवाची सासुरवाडी म्हणून नेवासे गावाला पौराणिकदृष्ट्या महत्त्व असले तरी खंडोबाची मंदिरे येथे अगदीच प्राथमिक स्वरूपात आहेत.

## ६. नळदुर्गचा खंडोबा

सोलापूरपासून सुमारे ६२ कि. मी. अंतरावर ईशान्य दिशेस मुंबई-हैद्राबाद राष्ट्रीय महामार्गावर 'नळदुर्ग' हे गाव वसले आहे. या भागात थोड्या-थोड्या अंतरावर खंडोबाची एकूण सात स्थाने आहेत. पैकी पहिले स्थान नळदुर्ग येथील सुप्रसिद्ध किल्ल्यात आहे. या किल्ल्याचे दोन भाग आहेत. पहिला 'न' आकाराचा किल्ला नळराजाने बांधला असून, सध्या तो भग्नावस्थेत आहे, तर दुसरा भाग या किल्ल्याच्या पूर्वेस जवळच आहे. हा दुसरा किल्ला आदिलशाहीतील दुसरा इब्राहिम आदिलशहा याने इ. स. १६९४ मध्ये बांधला आहे. दोन्ही किल्ल्यांना पाणीमहालाने जोडले आहे. आदिलशाहाने बांधलेल्या किल्ल्यात 'उपरी' नावाचा एक उपरी बुरूज असून, त्यावर चढून जाण्यासाठी दगडी पायऱ्यांचा जिना आहे. पूर्वी याच भागात नळराजाला खंडोबा सापडला होता. या बुरुजाच्या पूर्वेकडील वाटोळा भाग, जिथे पायऱ्यांच्या भागाशी टेकतो, तिथे पायथ्याशी एक लांबट चौकोनी मोरीवजा भोक आहे. येथेच खंडोबाचे शेंदूरमर्जित स्थान आहे. परंतु ऐतिहासिक कागदपत्रांमध्ये शके १५३६ (इ.स. १६१४) मध्ये किल्ल्यात खंडोबाचे स्थान असल्याचा उल्लेख आढळतो. परंतु हा किल्ला इ. स. १६९४ मध्ये बांधल्याचा पुरावा उपलब्ध असल्यामुळे आणि नळदुर्ग येथील जाणत्या लोकांच्या सांगण्यावरून असा निष्कर्ष निघतो की, पूर्वी येथे खंडोबाचे छोटे मंदिर होते. येथे यात्राही भरत होती. परंतु इब्राहीम आदिलशहाच्या काळात हिंदू देवतेचे हे पवित्र स्थान आदिलशाही धर्माभिमान्यांनी उद्ध्वस्त केले. नंतर याच ठिकाणी उपरी बुरुजाचा किल्ला बांधण्यात आला. साहजिकच येथील यात्रा उत्सव बंद पडला. असे म्हणतात की, हा उपरी बुरूज बांधल्यामुळे इब्राहिम आदिलशहाला खंडोबाने चांगलीच चाणक्षा दाखविली. त्यामुळे त्याने पुन्हा यात्रा-उत्सव भरविण्याचे फर्मान सोडले. परंतु उपरी बुरुजामुळे 'मूळ खंडोबास्थान' गाडल्यामुळे येथे यात्रा भरविणे शक्य नव्हते. तेव्हा किल्ल्याच्या उत्तर तटाच्या बुरुजाखाली, दक्षिणमुखी कमानींपैकी पश्चिमेकडील कमानीत पूर्वाभिमुख ओटा बांधून त्यावर मल्हारी मार्तंडाची स्थापना केली गेली आणि पूर्वीप्रमाणेच विधिवत यात्रा भरू लागली. नळदुर्ग येथील खंडोबा यात्रेचे हे दुसरे ठिकाण. परंतु खंडोबाच्या मूळ स्थानाची आठवण म्हणून येथील स्थानिक लोकांनी इब्राहिम आदिलशाहाच्या परवानगीने वर उल्लेख केल्याप्रमाणे उपरी बुरुजामध्ये शेंदूरमार्जित खंडोबादेवाची स्थापना केली. आजही या ठिकाणी भाविक भक्त दर्शनासाठी गर्दी करतात, नारळ फोडतात, भंडारा-खोबऱ्याची उधळण करतात.

कालांतराने या दुसऱ्या ठिकाणीही यवनांचा उपद्रव वाढू लागल्याने गावकऱ्यांनी गावाच्या वायव्य दिशेला बोरी नदीच्या काठावर उत्तराभिमुख व तीन कमानींनी युक्त असे एक मंदिर बांधले आणि त्या ठिकाणी खंडोबादेवाचा यात्रा-उत्सव सुरू झाला. खंडोबाच्या यात्रा-उत्सवस्थानाचे हे तिसरे स्थान.

पुढे मात्र या ठिकाणी यात्रेनिमित्त फारच गर्दी होऊ लागली. त्यामुळे गावकऱ्यांनी पुन्हा नळदुर्ग गावच्या उत्तरेस दोन मैलांवर बोरणा नदीच्या दक्षिण तटावर एक खंडोबा मंदिर उभारले व त्या ठिकाणी मार्गशीर्ष, पौषातील यात्रा-उत्सव साजरे करण्यात येऊ लागले. खंडोबा यात्रा-उत्सवाचे हे चौथे स्थलांतर. हे मंदिर पूर्वाभिमुख असून 'तिघई' आहे. पहिल्या घईत चार, दुसरीत व तिसरीत एक अशा कमानी व खण आहेत. पहिल्या घईच्या पूर्व-दक्षिण-उत्तर या बाजू उघड्या असून पहिला व चौथा हे खण पश्चिमेकडून बंद केले आहेत. दुसऱ्या घईचा तिसरा खण उत्तरेकडून बंद असून, तिसऱ्या घईचा असलेला एकच खण फक्त पूर्व बाजूने उघडा आहे. या खणात पश्चिम बाजूच्या भिंतीस लागून परंतु दक्षिण-उत्तर बाजूचा अर्धा खण व्यापणारा एक उंच कट्टा आहे. त्यावरच उत्तरावर्ती सयोनिलिंग आहे. या खणाच्या पाठीस लागून दक्षिणमुखी तिखणी सोपा आहे. त्यालाच जोडून पूर्वाभिमुख दोन खणी सोपा आहे. या वास्तूच्या प्रत्येक खणाचे छत उभ्या कपऱ्या व चुना यांनी बनविण्यात आले आहे. तिसऱ्या घईवर विटांचे, तारकाकारी व षट्तली कलशयुक्त शिखर आहे. या ठिकाणाला 'मैलारपूर' असे म्हणतात.

पुढे इ.स. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात मैलारपूर येथे 'गोवध' करण्यात आला आणि नळदुर्गच्या सत्ताधाऱ्यांचा फारच उपसर्ग पोहोचू लागल्यामुळे काही दिवस ही यात्रा अणदूरला भरू लागली. खंडोबाच्या यात्रा-उत्सवाचे हे पाचवे स्थलांतर; परंतु कालांतराने मैलारपूर मंदिराच्या पश्चिमेस साधारण दोन फर्लांग अंतरावर एका ओट्यावर श्रींची स्थापना करण्यात आली व यात्रा उत्सवाला येथे सुरुवात झाली. पुढे या जागेवर पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकरांनी मंदिर बांधले. खंडोबा यात्रेचे हे सहावे स्थलांतर. हे मंदिर उत्तराभिमुख आहे. याच्या आरंभी दुतळी (पहिला तळ दगडी, दुसरा विटांचा) नगारखाना आहे. त्याच्या उत्तरेस पूर्व-पश्चिम कोपऱ्याजवळ दोन दीपमाळा आहेत. नगारखान्याच्या दक्षिण बाजूस एकाहून एक उंच अशा पातळीत दोन लंबचौकोनी फरशी पटांगणे असून प्रत्येकाच्या ईशान्य व वायव्य कोपऱ्यात एकेक दीपमाळ आहे. याच्या दक्षिण-उत्तर व पश्चिम बाजूस प्रत्येकी कट्टे, तीन कमानी व तीन वाटा असलेल्या नऊ कमानींचा चौरस मंडप आहे. मध्यभागी कासव असून मंडपाचा अर्धगोल छत पायाशी अष्टकोनी, तर वरच्या बाजूस क्रमाने निमुळता होत गेला आहे. मंडपाच्या दक्षिण बाजूस लंब चौकोनी अंतराल आहे. गाभारा साधारण चौरस असून त्याच्या दक्षिण बाजूच्या भिंतीस लागून पूर्व-पश्चिम असा पोकळ पट्टा आहे. या पोकळीत कट्ट्याइतके उंच सिंहासन असून त्यावर पूर्वावर्ती सयोनिलिंग आहे. मंदिराच्या चारी बाजूंनी फरसबंदी आहे. या मंदिरास शिखर नाही. बांधकाम मात्र भक्कम आहे.

### अणदूरचा खंडोबा

नळदुर्ग-अणदूर येथील श्री खंडोबाचे हे सातवे, शेवटचे आणि येथील स्थळांपैकी सर्वांत महत्त्वाचे प्रसिद्ध स्थान आहे. श्रीक्षेत्र अणदूर हे उस्मानाबाद जिल्ह्यातील तुळजापूर तालुक्याच्या दक्षिण भागात वसलेले पुरातन गाव असून सोलापूर-हैदराबाद या राष्ट्रीय महामार्ग क्र. ९ वर सोलापूरपासून सुमारे ४० कि.मी. अंतरावर आहे. नळदुर्ग ते अणदूर हे अंतर ५ कि.मी.आहे.

हे मंदिर उत्तराभिमुख असून चारी बाजूंनी भक्कम तटबंदी आहे. याची पूर्व-पश्चिम लांबी १९० फूट असून दक्षिण-उत्तर लांबी १०५ फूट आहे. तटाची उंची ३५ फूट आहे. तटाच्या चारी बाजूंना चार दरवाजे असून पूर्व व दक्षिण बाजूंचे दरवाजे लहान असून ते सध्या बंद आहेत. पश्चिम व उत्तर बाजूंचे दरवाजे मोठे असून सध्या तेच वापरात आहेत. उत्तर बाजूचे महाद्वार हे शके १६६८ (इ. स. १७४६) मध्ये बांधल्याची नोंद असून ते फारच कोरीव आणि आकर्षक आहे. त्यावर पूर्वी नगारखाना होता. सध्या तो पश्चिम द्वारावर आहे. तटाच्या पश्चिम महाद्वारातून प्राकारात प्रवेश केल्यावर समोरच खंडोबाचे भव्य मंदिर दिसते. मंदिरासमोर नंदीचा कट्टा आहे. नंदीची मूर्ती अखंड पाषाणाची असून अत्यंत कोरीव आहे. येथील मंदिराच्या बांधकामाचे विशेष म्हणजे खंडोबाचे पीठस्थान, त्यासमोरील नंदी आणि उत्तर महाद्वारावरील मध्य यांना साधणारी रेषा ही ध्रुव ताऱ्यापर्यंत जाते. ध्रुवताऱ्याशी संधान बांधूनच या मंदिराची रचना करण्यात आली आहे. उत्तर द्वाराच्या पूर्वेकडील उत्तर तटाला ओवऱ्या काढल्या असून, प्रत्येक कमानीच्या दर्शनी भागावर वानरांच्या मूर्ती व 'यंत्रे' कोरण्यात आली आहेत. परंतु हे काम अर्धवट झाल्याचे स्पष्ट दिसते.

गर्भगृह, बंदिस्त मंडप आणि खुले सभामंडप असे या मंदिराचे मुख्य तीन भाग पडतात. गर्भगृहात पाठीमागील भिंतीला लागून एक उंच चौथरा बांधण्यात आला असून त्यावर श्रीखंडोबाची मूर्ती आहे. मूर्ती नेहमी सजवलेल्या अवस्थेत असते. मूर्तीभोवती पितळी मखर व प्रभावळ असून मूर्तीच्या मागील बाजूस म्हाळसा, बाणाई व हेगडीप्रधान यांच्या मूर्ती ठेवलेल्या आहेत. श्रीखंडोबाच्या मूर्तीखाली पूर्व-पश्चिम अशी शिवपिंड आहे.

गाभाऱ्यापुढील बंदिस्त मंडपात पूर्व-पश्चिम अशा दोन्ही बाजूस दोन खोल्या असून, पूर्वेकडील खोली ही श्रींच्या जामदारखान्याची आहे, तर पश्चिमेकडील खोलीत देवाचे शेजघर आहे. यात देवाचा एक पलंग असून त्यावर खंडोबादेवाचा पितळी मुखवटा, म्हाळसा व हेगडी प्रधानाच्या जुन्या मूर्ती, तलवारी ठेवण्यात आल्या आहेत. मंदिराच्या या भागाचे बांधकाम पूर्णपणे हेमाडपंथी पद्धतीचे आहे. बाहेरील खुला सभामंडप शालिवाहन शके १६६१ (इ. स. १७३९) मध्ये कालयुगनाम संवत्सरात बांधला आहे. बांधकाम दगडी असून त्यावर सुंदर नक्षीकाम करण्यात आले आहे.

कालखंडानुसार बदलत गेलेले मंदिरांचे स्वरूप, तरीही अंखडित वाहत राहिलेला भक्तिप्रवाह हे जनश्रद्धेच्या बळावरच घडू शकते.

**मंदिरासंबंधीची ऐतिहासिक माहिती :**

या मंदिराच्या व्यवस्थापनासाठी छत्रपती शाहू महाराजांनी ३०० एकर जमीन देणगी म्हणून दिली आहे. ती आजतागायत मंदिराकडेच वहिवाटीस आहे. याची देखभाल देवसंस्थानच्या वतीने केली जाते. तसेच पेशवाईत निलेगावचे सरदेशमुख यांनीही मंदिराला मोठ्या देणग्या दिल्याच्या नोंदी आहेत. याशिवाय कै. रामजी पाटील अणदूरकर यांनी २७ तोळे सोन्याचा कंठा, पितळेचे मखर, गर्भागार व बंदिस्त मंडपाचे दरवाजे पितळेने मढवून दिले आहेत. कै. वामनराव नारायण कुलकर्णी यांनी २०० तोळे चांदीचा मुकुट, श्री. जावळे-बामणीकर यांनी चांदीच्या दोन काठ्या व पितळी पालखी (वजनभार ५२ शेर), श्री. कोंडकर यांनी शिंदेशाही पगडी व मोत्याचा तुरा, श्री. गोविंद सखाराम मोकाशे-अणदूरकर यांनी ६०० भार वजनाचा चांदीचा एक अश्व, श्री. जग्गा सोलापूरकर यांनी एक पितळी प्रभावळ व चवरी अशा प्रकारच्या देणग्या मंदिराला दिल्या आहेत.

**नळदुर्ग-अणदूरविषयी ऐतिहासिक माहिती :**

इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या अखेरीस, इ.स. ९७३ मध्ये कल्याणीच्या चालुक्य घराण्याचा उदय झाला. पुढे काही काळानंतर याच घराण्यातील जयसिंहाने सत्ता हाती घेतली त्याचा मुलगा. सोमेश्वर (पहिला) हा महान पराक्रमी पुरुष होता. इ. स. १०४२ ते १०६८ हा त्याचा कालखंड. इ.स.१०१५ ते १०६८ या काळात होऊन गेलेला राजा नळ हा सोमेश्वराचा मांडलिक होता. मांडलिक असूनही त्या काळी नळ राजाचा 'सम्राट' असा उल्लेख केला जाई. नळाची राजधानी 'अणदूर' होती. आजही अणदूर येथे राजवाडा, हत्तीखाना, हसलखाना इत्यादी स्थाने आढळून येतात. अणदूरचे त्या काळचे नाव 'आनंदऊर' किंवा 'आनंदऊरू' असल्याचा उल्लेख आढळतो. कालांतराने 'आनंदऊर' या नावाचा अपभ्रंश होऊन 'अणदूर' असे नाव पडले. नळराजाच्या राणीचे नाव दमयंती होते. परंतु महाभारतातील निषधराज नळ-दमयंतीचा या नळ-दमयंतीशी काहीही संबंध नाही. मात्र, त्या काळातील नळपत्नीच्या नावावरूनच या नळाच्या पत्नीचे नाव 'दमयंती' ठेवण्यात आले असावे. याच नळ राजाने रणमंडळ (नळदुर्ग) येथे 'न' आकाराचा भक्कम किल्ला बांधला, जो सध्या भग्नावस्थेत आहे. इ.स. १९६३ सालामध्ये एक मोठा कन्नड शिलालेख सापडला असून, हा शिलालेख विसाव्या शतकातील आहे. त्याचे वाचन मराठवाडा विद्यापीठात करण्यात आले. त्यातून अणदूरविषयी बरेच ऐतिहासिक संदर्भ सापडले आहेत. यातील काही महत्त्वाची माहिती पुढीलप्रमाणेः

''इ. स. १९६३ मध्ये अणदूर येथे एक मोठा कन्नड शिलालेख सापडला. त्याचे वाचन मराठवाडा विद्यापीठात करण्यात आले असून, त्यावरूनही अणदूरचे काही संदर्भ सापडले आहेत. हा शिलालेख २० व्या शतकातील आहे. त्यात या गावाचा उल्लेख 'आनंदऊर-३००' असा केला आहे. त्याचा अर्थ आनंदऊर हे मुख्य ठाणे असून त्याखाली ३०० गावे होती. या ३०० गावापैकी सोन्नलगी हे गाव (सध्याचे सोलापूर) होते. हे ठाणे त्रिभुवन मल्ल विक्रमादित्य या चालुक्य राजाच्या ताब्यात होते. हा काळ इ.स. १०७६ ते ११२६ या दरम्यानचा आहे. त्यानंतर सहाव्या विक्रमादित्यानंतर भूलोक मल्ल हा सत्तेवर आला. त्याची राणी राजलदेवी हिने अणदूरच्या माणकेश्वर देवाच्या नंदादीपासाठी मोठी देणगी दिली, असा उल्लेख आढळतो.''[२] तेव्हाचे 'माणकेश्वर' सध्या अस्तित्वात नाही. परंतु त्या काळापासून अणदूर हे तीर्थक्षेत्र प्रचलित आहे, याची साक्ष पटते.

## ७. चंदनपुरीचा खंडोबा

चंदनपुरी हे गाव लहान असले तरी येथील खंडोबा देवस्थानामुळे आणि खंडेरायाची आवडती राणी बाणाईचे हे 'माहेर' असल्यामुळे नुसत्या खान्देशाचेच नव्हे, तर साऱ्या महाराष्ट्राचे आणि महाराष्ट्राबाहेरील खंडोबाभक्तांचे श्रद्धास्थान म्हणून माहात्म्य पावले आहे. चंदनपुरी हा पूर्वीचा धुळ्याच्या गरुड घराण्याचा जहागिरीचा गाव. सध्या ही घराणी धुळ्यातच स्थायिक झालेली आहेत. चंदनपुरी गावात सुमारे आठशे-नऊशे कुटुंबे राहत असून लोकसंख्या सुमारे दहा हजाराच्या आसपास आहे.

मालेगावहून मनमाडकडे जाताना एका मैलाच्या अंतरावर गिरणा नदीवर बांधलेला प्रशस्त पूल लागतो. पूल ओलांडला की लगेच डाव्या हाताला चंदनपुरीला जाणारा फाटा गिरणा नदीस सुमारे पाऊण मैल समांतर रेषेने जाऊन शेवटी चंदनपुरीच्या वेशीला संपतो. थोडक्यात, मालेगावच्या दक्षिणेस सुमारे तीन कि.मी. अंतरावर चंदनपुरी हे खंडोबाचे प्रसिद्ध तीर्थस्थान वसले आहे.

गावाच्या वेशीजवळच खंडेरायाचे मंदिर आहे. मंदिर प्रशस्त दगडी बांधणीचे असून चारी बाजूला भक्कम तट आहेत. मंदिरासमोर अगदी थोड्या अंतरावरून गिरणा नदी वाहते. नदीपात्राच्या उजव्या किनाऱ्यालगत मंदिरासमोर हाकेच्या अंतरावर बाणाईची न्हाणी पाहावयास मिळते. तटाच्या पूर्व बाजूस प्रवेशद्वार असून प्राकारात प्रवेश करताच पूर्वाभिमुखी खंडोबा मंदिरासमोरील भव्य दीपमाळ आपले लक्ष वेधून घेते. या दीपमाळेच्या आतल्या बाजूस जिना असल्यामुळे वरच्या टोकाला जाऊन तेलवात लावता येते. मंदिराच्या डाव्या बाजूला एक दीपमाळ असून त्याच बाजूला शंकराची पिंड आणि पिंडीसमोर नंदी आहे. मंदिराच्या उजव्या बाजूलाही एक दीपमाळ आहे. या मंदिराला सोपा नाही. मंदिरात मंडप आणि गाभारा असे दोन भाग असून गाभाऱ्यापेक्षा मंडप बराच मोठा आहे.

मंडपातून गाभाऱ्यात प्रवेश केल्यावर पश्चिमेकडील मागच्या भिंतीत एक महिरपी आकाराची देवळी दिसते. त्या देवळीमध्येच खंडोबा, म्हाळसा आणि बाणाई यांच्या संगमरवरी दगडाच्या सुबक उभ्या मूर्ती आहेत. खंडोबाची मूर्ती द्विभुज आहे. उजव्या हातात खड्ग असून ते डोक्यावर धरलेले आहे. डावा हात कमरेवर आहे. खंडोबाची वेशभूषा धोतर, शेला आणि झगा अशी आहे. बाणाई आणि म्हाळसा यांच्या मूर्तींत सर्वच दृष्टीने साम्य दिसून येते. दोघींचेही हात अभय दाखवितात, तर डावे हात कमलकलिका धारण केलेले आहेत. दोघींच्याही डोईला अंगचेच मुकुट आहेत. समोर एक स्वयंभूलिंग आहे.

मध्यभागी खंडोबा, उजव्या बाजूला म्हाळसा व डाव्या बाजूला बाणाई, एकत्रितपणे या तिन्ही मूर्ती एका बैठकीवर फक्त येथील मंदिरातच पाहावयास मिळतात. इतरत्र कोठेही नाहीत. हेच चंदनुपरीच्या मंदिराचे वेगळेपण आणि खास वैशिष्ट्य आहे. कारण येथे खंडोबाच्या शेजारीच बाणाई प्रतिष्ठितपणे स्थानापन्न झालेली आहे. येथील सद्य:स्थितीतील मूर्तींत आणि जेजुरी-पाली किंवा इतर ठिकाणच्या मूर्ती यामध्ये बराच फरक जाणवतो. चंदनपुरी येथील गावकऱ्यांच्या मते, येथील जुन्या मूर्ती भग्न पावल्यामुळे साधारण सत्तर सालच्या आसपास जुन्या मूर्ती काढून त्या जागी सद्य:स्थितीतील नव्या मूर्तींची स्थापना केली आहे. नव्या मूर्ती जयपूरहून तयार करून आणल्या आहेत. मात्र, खंडोबाच्या हातात खंजीर दाखविल्यामुळेच या तिन्ही मूर्तींची ओळख पटते. इतर ठिकाणच्या खंडोबा मंदिरांच्या गाभाऱ्यात दिसून येणारी घोडा, कुत्रा, मणि-मल्ल दैत्यांची मुंडकी इत्यादी चिन्हे या ठिकाणी दिसत नाहीत. येथील वृद्ध जाणकार लोक सांगतात की, पूर्वीच्या तिन्ही मूर्ती पाषाणाच्या होत्या. त्यामध्ये सर्वत्र आढळणाऱ्या खंडोबा मूर्तीतल्या चिन्हांचा समावेश होता. येथे नवीन संगमरवरी मूर्तीची स्थापना केल्यानंतर येथील जुन्या मूर्ती गावकऱ्यांनी गिरणा नदीच्या डोहात विसर्जित केल्या. कालांतराने शेजारच्याच येसगावच्या गावकऱ्यांनी त्या मूर्ती पाण्यातून बाहेर काढल्या आणि वाजत-गाजत येसगावात नेऊन मंदिराजवळ नव्याने बांधलेल्या ओट्यावर त्यांची विधिपूर्वक प्राणप्रतिष्ठा केली.

काही लोक असेही सांगतात की, वरील मूर्तींच्याही अगोदरच्या म्हणजे अहिल्याबाई होळकरांच्या काळातील पाषाणमय मूर्ती भग्न झाल्यामुळे त्याच्या जागी वरील मूर्तीची (सध्या येसगावात असलेल्या) स्थापना केली होती. या मूर्ती मालेगावच्या 'घोंगड्याबाबा' नामक शिल्पकाराने बनविल्या होत्या. परंतु मूळ मूर्तींच्या ठावठिकाण्याबाबत येथे समाधानकारक माहिती मिळू शकत नाही. म्हणजेच सध्याच्या मूर्ती दुसऱ्या किंवा तिसऱ्या वेळेस नव्याने प्रस्थापित केलेल्या असाव्यात. हा मुद्दा जरी गुंतागुंतीचा असला तरी 'चंदनपुरीचे खंडोबा मंदिर' पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकरांनी बांधले आहे, यावर येथील सर्व लोकांची एकवाक्यता दिसून येते, परंतु याचा ऐतिहासिक पुरावा आढळत नाही. अलीकडील काळात येथील देवसंस्थान समितीने मंदिराची बरीच डागडुजी केली आहे.

**खंडेराव-बाणाई प्रीतिच्या जिवंत स्मृती :**

चंदनपुरी येथील खंडोबा मंदिराच्या उत्तरेस गिरणा नदीच्या मध्यभागातील खडकाळ भागात एक स्वयंभू शिवलिंग आहे. याच ठिकाणी खंडेरायाने मेंढ्या खडकावर आपटून त्यांच्या मांसाचे व हाडांचे वेगवेगळे ढीग रचले होते अशी जनश्रद्धा येथे रुढ आहे. या स्वयंभू लिंगाच्या शेजारी खडकात रोवलेला एक लोखंडी खुंटा असून, त्याला एक कडी आहे. छोट्या पहारीच्या आकाराचा हा खुंटा असून, त्याला खंडेराव आपला घोडा बांधत असत, अशी येथे समजूत आहे. परंतु या खुंट्यापासून ते बाणूबाईच्या न्हाणीपर्यंत घोड्याच्या टापांचे (खुरांचे) जिवंत ठसे आजही पाहावयास मिळतात तेही खडकावर, ही येथील विशेष बाब आहे. ज्या ठिकाणी खंडेराव-बाणूचा विवाह झाला, त्या लेंडीपारावर (विवाहाच्या वेळेस 'अक्षता' म्हणून मेंढ्यांच्या लेंड्या गोळा केल्या होत्या ते ठिकाण) बाणूचे पूर्वाभिमुखी छोटे मंदिर आहे. खंडेराव-बाणाई प्रीतीच्या स्मृतींना उजाळा देणारी ही स्थाने येथील भक्तलोक नवख्या यात्रेकरूंना आवर्जून दाखवितात.

## ८. सातारेचा खंडोबा

औरंगाबाद रेल्वे स्टेशनच्या आग्नेयेस सुमारे ३.२२ कि.मी. अंतरावर डोंगराच्या पायथ्याशी सातारे हे गाव वसले आहे. गावाच्या उत्तरेकडील बाजूने गावात प्रवेश करताच खंडोबाचे पूर्वाभिमुख मंदिर लागते. गावाच्या उत्तरेला प्राचीनकालीन शैव पंथीयांची पवित्र तीर्थाटने आहेत. एकूण पंधरा पायऱ्या चढून गेल्यानंतर एका उंच कट्ट्यावर बांधलेल्या या मंदिराच्या आवारात आपण प्रवेश करतो. महाराष्ट्र आणि कर्नाटकातील प्रत्येक प्रसिद्ध खंडोबा मंदिराभोवती तट आहेत. परंतु येथे तट नाही आणि त्यामुळे अर्थातच येथे ओवऱ्याही नाहीत, हा या मंदिराचा अपवाद म्हणावा लागेल. परंतु अगदी अलीकडच्या काळात मंदिराभोवती चौफेर वीट-सिमेंटचा वापर करून छोट्या उंचीचा संरक्षक कठडा उभारण्यात आला आहे.

खंडोबा मंदिराच्या आवारात प्रवेश करताच उजव्या बाजूस एक दीपमाळ लागते. दीपमाळेच्या अलीकडे तटाच्या प्रवेशद्वारावर वरच्या मजल्यावर नगारखाना आहे. दीपमाळेच्या थोडे पुढे तीन पायऱ्या चढून गेल्यावर देवालयाचा मंडप लागतो. तो अर्धवट म्हणजे केवळ चारी बाजूंचा पहिला थर व सोळा खांबांचे तळखेडे असलेला चौरस मंडप आहे. मंडपाच्या उत्तर व दक्षिण या दोन्ही बाजूस प्रत्येकी एक-एक खोली काढलेला सोपा आहे. खोल्यांच्या पूर्वेकडील दर्शनी बाजूस पुढे प्रत्येकी एक देवळी असून तीमध्ये अनुक्रमे गणपती व मारुती यांच्या मूर्ती आहेत. सोप्याच्या दर्शनी तुळईला दोन खांबांचा टेकू दिला आहे. याचा अर्थ येथे स्थापत्य तत्त्वाला किंवा नियमाला पूर्णपणे डावलले आहे. तरीही दोन खांबांच्या मध्ये उभे राहून डाव्या व उजव्या बाजूस पाहिल्यास दोन्ही बाजूची स्थापत्य कलाकुसर किंवा शिल्पकला समसमान (द्विपार्श्वसमितीय) दिसतात. दक्षिण बाजूच्या खोलीच्या दारवंट्यावर श्रीजलाशयी व सूर्य यांची शिल्पे आहेत, तर गाभाऱ्याच्या दारवंट्यावर दशावताराची आणि उत्तरी खोलीच्या दारवंट्यावर कृष्ण-गवळणींची शिल्पे आहेत. दशावतारात बुद्धाऐवजी विठोबा खोदल्याचे आढळते. याचा अर्थ बौद्ध तत्त्वज्ञानापेक्षा वैष्णवांच्या तत्त्वज्ञानाचा प्रभाव दक्षिण भारतातील तत्कालीन समाजावर व्यापक प्रमाणात होता हे यातून सिद्ध होते. सोप्याच्या पश्चिम बाजूस गाभारा असून, याच्या दरवाजाच्या दर्शनी भागावर बऱ्याच वेलपत्ती आणि मूर्ती दिसतात.

गाभारा चौरसाकृती असून त्याच्या पश्चिम बाजूच्या भिंतीत किंचित पुढे आलेली तिखणी देवळी आहे. देवडीमध्ये तीन पायऱ्या असून, तिच्या तीन खणांवर तीन मेघडंबऱ्या आहेत. ''पहिल्या पायरीवर अश्वारूढ खंडोबाच्या पाच पितळी मूर्ती आहेत. पहिली मूर्ती द्विभूज असून, एका हातात खड्ग व दुसऱ्या हातात मोर धारण केला आहे. दुसरी मूर्ती चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू आहेत. तिसऱ्या मूर्तीने आपल्या चार हातात खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र धारण केले आहे. शिवाय मूर्तीच्या डाव्या मांडीवर खड्ग व पानपात्र हाती घेतलेली म्हाळसा आहे. या मूर्तीचा घोडा लाकडी असून जागोजागी शोभेसाठी पितळी खिळे ठोकलेले आहेत. चौथी मूर्ती चतुर्भुज असून, तिच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू आहेत. या खंडोबामूर्तीच्या पुढे म्हाळसा व पाठीमागे बाणाईची मूर्ती असून, दोघीही द्विभुज आहेत. त्यांच्या एका हातात खड्ग व दुसऱ्या हातात पानपात्र ही आयुधे आहेत. पाचवी मूर्ती द्विभुज असून एका हातात तलवारीची मूठ व दुसऱ्या हातात पानपात्र या वस्तू आहेत. मूर्तीच्या डाव्या मांडीवर खड्ग व पानपात्र घेतलेली म्हाळसाची मूर्ती आहे,'' अशा स्वरूपाचा उल्लेख काही जुन्या ग्रंथांमधून आढळत असला, तरी बऱ्याच वर्षांपूर्वी या मूर्ती चोरीला गेल्या आहेत.

त्यांचा अद्याप शोध लागलेला नाही. त्या जागी अलीकडच्या काळात औरंगाबादच्या प्रा. मोटे नावाच्या एका खंडोबाभक्ताने अश्वारूढ खंडोबा-बाणाईची एक नवीन मूर्ती ठेवलेली आहे. येथे हेगडी प्रधान व कुत्रा हे खंडोबा परिवारातील सदस्य आढळत नाहीत. दुसऱ्या पायरीवर कमलार्धदलाकारी, शेंदूर फासलेला घडीव दगड असून त्यास त्या पाषाणातूनच बनविलेले नाक व तोंड असून, एनमलचे डोळे बसविले आहेत. अर्थातच ही खंडोबाची मुख्य मूर्ती आहे. तिसऱ्या पायरीवर दोन उशा व पगडी या वस्तू ठेवलेल्या आहेत. ही जागा जमिनीपासून अंदाजे चार फूट उंच आहे. गाभाऱ्यात नैर्ऋत्य दिशेच्या कोपऱ्यात एका घोडेस्वाराची दगडी मूर्ती असून, मूर्तीच्या हातात ढाल व तलवार आहे. तिथेच आठ फूट लांबीची दुधारी खांडा (तलवार) ठेवलेली आहे. मुख्य मूर्तीच्या समोर जमिनीवर डाव्या उजव्या बाजूस एक एक दानपेट्या ठेवलेल्या आहेत. गाभाऱ्यातून बाहेर जाण्यासाठी प्रवेशद्वाराव्यतिरिक्त उजव्या बाजूस एक छोटा दरवाजा आहे. (म्हणजेच गाभाऱ्याला दोन दरवाजे आहेत), तर डाव्या बाजूला शेजघर आहे. त्यात देवाची भांडी व इतर पूजासंबंधी साहित्य ठेवले आहे. गाभाऱ्यात मुख्य मूर्तीच्या समोरील व उजव्या बाजूच्या भिंतीला मध्यभागी छोट्या छोट्या सुरेख देवड्या काढण्यात आल्या आहेत. या व्यतिरिक्त मुख्य खंडोबा मूर्तीच्या डाव्या व उजव्या बाजूस एक एक मोठी देवडी आहे. पैकी उजव्या बाजूची देवडी रिकामी असून, डाव्या बाजूस देवडीत मोठी समई ठेवली आहे. ती रात्रं-दिवस तेवत ठेवलेली असते. उजव्या बाजूच्या छोट्या दरवाजाच्या दोन्ही बाजूंनाही एक एक मोठी देवडी आहे. तसेच मुख्य मूर्तीच्या समोरील दरवाजाच्या आतील उजव्या-डाव्या बाजूस एक एक मोठी देवडी असून, या सर्व देवड्या आखीव-रेखीव आहेत. गाभाऱ्यात मध्यभागी छताला टांगलेली एक ४० किलो वजनाची घंटा आहे. ही घंटा सातारे गावातीलच श्री. पंडितराव सातारकर नावाच्या एका खंडोबाभक्ताने देवास अर्पण केली आहे. गाभारा आठ कमानींचा असून बाहेरून तारकाकृती बनविण्यात आला आहे. मंदिराचा कळस विटांनी बनविलेला असून, त्याला छोट्या छोट्या शिखरांनी सुशोभित केले आहे.

मंदिरासाठी वापरण्यात आलेला दगड जांभा आणि गारेचे ठिपके व रेषा असलेला आहे. सोप्याचे छत, सोप्यातील खोल्या, त्यांचे दरवाजे व भिंती तसेच पुढे आलेल्या देवळ्या (देवड्या), गाभाऱ्यातील मेघडंबऱ्या यांच्यावरील जाळ्या, पानवेली व वेगवेगळ्या प्राण्यांची चित्रे हे सारे काम फारच सुरेख आणि आकर्षक स्वरूपाचे झाले आहे. या सर्व गोष्टींवरून आणि इथल्या भक्त-पुजाऱ्यांनी दिलेल्या माहितीवरून हे मंदिर पेशवाईच्या काळातच बांधले असावे, या मताला दुजोरा मिळतो. हे मंदिर औरंगाबादच्या पश्चिमेस असलेल्या बोरसर येथील कुलकर्णी (भालेराव) या घराण्याने बांधले आहे. सातारे गाव कायगावकर-दीक्षितांचे इनाम असल्याने त्यांचाही या देवस्थानाशी जवळचा संबंध आहे.

## ९. माळेगावचा खंडोबा

महाराष्ट्रातील खंडोबाच्या एकूण नऊ मुख्य खंडोबा तीर्थस्थानांपैकी माळेगाव हे एक आहे. नांदेड जिल्ह्यातील लोहा तालुक्यात हे गाव वसले आहे. मंदिराकडे जाणाऱ्या रस्त्यालगत मोठी कमान उभारली आहे. तटभिंतीच्या आत प्रशस्त अशा मोकळ्या आवारात, वर पत्रे घातलेला सभामंडप आहे. हा सभामंडप सुधाकर नरहरराव कनकदंडे नावाच्या खंडोबाभक्ताने इ. स. १८८९ मध्ये बांधला आहे. (कनकदंडे कुटुंबीय दरवर्षी चंपाषष्ठीला व मार्गशीर्ष महिन्यातील मुख्य यात्रेच्या वेळी दोन दिवस, असे एकूण तीन वेळा अन्नदान करतात.) या सभामंडपानंतर त्याला लागूनच जुन्या मंदिराचा दगडी सभामंडप व गाभारा आहे. गाभाऱ्यात ३ फूट उंचीवर एका लाकडी देव्हाऱ्यात खंडोबा व म्हाळसाचे दोन पितळी मुखवटे आहेत. या मंदिराच्या पाठीमागे खंडोबाची द्वितीय पत्नी बाणूबाईचे मंदिर आहे. साधारण हे स्थान ३५० वर्षांपूर्वीचे आहे, असे येथील जाणकार सांगतात.

## १०. मंगसुळीचा खंडोबा

मंगसुळी हे गाव बेळगाव जिल्ह्याच्या अथणी तालुक्यात पुणे-मिरज-बेळगाव रेल्वे रस्त्यावरील शेडबाळ स्टेशनच्या पूर्वेस शेडबाळ-विजापूर रस्त्यावर सुमारे ८-९ कि. मी. अंतरावर आहे. येथील खंडोबा मंदिर मंगसुळी गावाच्या अलीकडे म्हणजे शेंडबाळपासून सुमारे ७ कि. मी. अंतरावर रस्त्याच्या डाव्या अंगाला रस्त्यापासून १ कि. मी. अंतरावर आहे. महाराष्ट्र-कर्नाटक वेशीवरील मिरजेपासून हे तीर्थक्षेत्र १९ कि.मी. अंतरावर आहे.

येथील खंडोबा मंदिर पूर्वाभिमुख असून बाहेरून मजबूत तट आहे. मंदिराभोवती मोठे आवार आहे.

मंदिरासमोरील पूर्वाभिमुख महाद्वार (प्रवेशद्वार) तीन मजली उंच व प्रशस्त आहे. महाद्वारावरच नगारखाना आहे. महाद्वाराच्या आत तटास लागून चौफेर कमानीवजा ओवऱ्या बांधल्या आहेत. त्यातील काही ओवऱ्यांचा वापर येथील पुजारी व भक्त करतात, तर बाहेरून येणारे भाविक राहिलेल्या ओवऱ्यांचा विश्रांतीसाठी उपयोग करतात.

महाद्वारातून प्राकारात प्रवेश करताच भव्य आणि सुंदर असलेले पुरातन खंडोबा मंदिर आणि त्या शेजारील विष्णू मंदिर आपले लक्ष वेधून घेतात. खंडोबा मंदिरात शिरताच प्रथम तीन खणी सोपा लागतो. सोप्यातून आत गेले की, मुसलमानी स्थापत्यशैलीच्या कमानींचा नवरंगी मंडप लागतो. मंडपातून आपण गाभाऱ्यात प्रवेश करतो. गाभाऱ्याच्या मधोमध एक सुटी भिंत आहे. तिच्या माथ्यावर तीन मिनार व दोन कमानी असून त्याखाली छोट्या दहा-पंधरा कोनाड्यांची एक ओळ आहे. या ओळीखाली दोन कमानी किंवा देवळ्या आहेत. प्रचलित लोककथेनुसार हे मंदिर अलिअदिलशहाच्या काळात बांधले गेले असावे असे वाटते. दक्षिणेच्या कमानीत फक्त खंडोबा किंवा मल्लया यांचे लिंग आहे तर उत्तरेच्या कमानीत गंगा, म्हाळसा व बाणाई यांची लिंगे आहेत. खंडोबाच्या स्वयंभू लिंगावर काहीशा उंचीवर बसविलेल्या छोट्या चक्रामधून आहोरात्र जलाभिषेक चालू असतो. याशिवाय येथे आणखी चार मूर्ती आहेत. यापैकी एक पंचरसी घोड्यावरील खंडोबा आहे. ही मूर्ती चतुर्भुज असून प्रत्येक हातात खड्ग, त्रिशूल, डमरू, अलिंगणी या वस्तू आहेत. मांडीवर म्हाळसा बसलेली दाखविली आहे. दुसऱ्या तीन मूर्ती अनुक्रमे म्हाळसा, खंडोबा व बाणाई यांच्या आहेत. तिन्ही मूर्ती उभ्या असून म्हाळसाच्या हातात खड्ग व पानपात्र, खंडोबाच्या दोन हातात खड्ग व ढाल आणि बाजूस कुत्रा दाखविला आहे. बाणाईच्या डोक्यावर उजव्या हाताने तोलून धरलेली चार घागरींची उतरंड आणि छातीपाशी धरलेल्या डाव्या हातात (बगलेत) कोकरू व कोंबडा आहे. म्हाळसाच्या हातात धारण केलेली शस्त्रे हे समाज लढवय्या स्त्रीच्या शौर्याचे प्रतीक आहे तर बाणाईची वेशभूषा आणि तिने धारण केलेल्या वस्तू घर सांभाळणाऱ्या संसारी परंतु व्यवहारचतुर घरधनीणीचे प्रतीक आहे. देवालयात नऊ नंदादीप आहेत. या मंदिराचे शिखर खाली चौरस व वर निमुळते होत गेले आहे. तसेच शिखराभोवती चारी कोपऱ्यांवर मिनार आहेत. इथले विशेष म्हणजे देवापुढे कोणतेही 'वाहन' दाखविलेले नाही.

खंडोबा मंदिराच्या शेजारीच उत्तरेस हेगडी प्रधानाचे पूर्वाभिमुख मंदिर आहे. या मंदिराचे मंडप व गाभारा असे दोन भाग आहेत. मंडप अणकुचीदार कमानीचा, दुघई, तीन खणी परंतु बंदिस्त आहे. गाभारा चौरस आकाराचा असून, त्याच्या पश्चिम भिंतीपाशी एक देवळी आहे. या देवळीत सुमारे २॥ फूट उंचीची हेगडी प्रधानाची कोरीव मूर्ती आहे. ती शिळेची मांडी घालून बसलेली, चतुर्भुज असून तिच्या हातात कमलकलिका, चक्र, शंख व चोपडी (पुस्तक) या वस्तू आहेत. हेगडी (प्रधान) हा श्रीविष्णूचा अवतार असल्यामुळे अशी मूर्ती तयार केली असावी. त्यामुळे या मंदिराला श्री विष्णूचे किंवा हेगडी प्रधानाचे मंदिर म्हणतात.

या मूर्तीच्या डोक्यावर (मुकुटावर) बैठा, डाव्या मांडीवर म्हाळसा घेतलेला खंडोबा (मूर्ती) खोदलेला असून दोघेही द्विभुज आहेत. खंडोबाच्या एका हातात खड्ग, दुसऱ्या हातात अलिंगणी व पानपात्रधारी आहे. म्हाळसाच्या हातात कमलकलिका व पानपात्र या वस्तू आहेत. मागे प्रभावळ आहे. त्यामधील पितळी नागाचे पाचफणीछत्र हेगडी प्रधानाच्या डोक्यावर आले आहे. या मंदिराचे शिखर खंडोबा मंदिरासारखेच परंतु आकाराने लहान आहे. मंदिरासमोर नंदी आहे.

खंडोबा उपासनेमध्ये शैव-वैष्णव संस्कृतीचा मिलाफ अनेक ठिकाणी झाल्याचे आढळते. अशा अनेक संस्कृती संगमाच्या प्रक्रियेतून शांतस्थीर जीवन जगण्याची जनसामान्यांची वृत्ती दिसून येते. म्हणुनच जाती-धर्मांच्या, पंथ-संप्रदायांच्या तसेच विविध संस्कृतींच्या भिंती पार केलेला खंडोबा लौकीकार्थाने सर्वधर्मसमभावाचे प्रतीक आहे.

'मल्ल' या दैत्यास जेथे मल्लयाने (मार्तंडभैरवाने) सुळी (फासावर) दिले, तेच मल्लसुळी स्थान होय. त्याचा अपभ्रंश होऊन त्याला सध्याचे 'मंगसुळी' हे नाव मिळाले आहे, अशी आख्यायिका येथील परिसरात रुजली आहे.

## ११. देवरगुड्डचा खंडोबा

धारवाड जिल्ह्यातील राणेबेन्नूर तालुक्यात पुणे-बेंगलोर मार्गावर देवरगुड्ड नावाचे रेल्वे स्थानक असून, ते पुण्यापासून सुमारे ५२४.५८ अंतरावर आहे. येथून देवरगुड्ड हे गाव अंदाजे ६-७ कि. मी. अंतरावरील दक्षिणोत्तर डोंगरपट्टीवर वसले आहे. याच डोंगराच्या दक्षिण टोकावर खंडोबा तथा मालतेशाचे मंदिर उभे आहे. कन्नड भाषेतील

'देवरगुड्ड'चा मराठी अर्थ 'देवाची टेकडी'. यावरूनच या गावाला 'देवरगुड्ड' हे नाव पडले असावे. या टेकडीची उंची पायथ्यापासून २०० फूट इतकी आहे.

मंदिराकडे जाण्यासाठी दोन मार्ग आहेत. त्यातील पहिला मार्ग म्हणजे देवरगुड्ड स्थानकावर उतरून पायी अथवा एखाद्या भाडोत्री वाहनाने टेकडीच्या पायथ्याशी जाणे व तेथून १२० पायऱ्या चढून दक्षिण दिशेला असलेल्या थोड्या अंतरावरील मंदिराकडे जाणे. दुसरा मार्ग म्हणजे देवरगुड्ड स्थानकाच्या पुढचे स्थानक राणेबेन्नूर येथे उतरून तेथून खासगी वाहन अथवा एस.टी. बसने देवरगुड्ड गावास येणे. देवरगुड्ड हे गाव राणेबेन्नूर-गुंटूर बसमार्गावर असून, राणेबेन्नूरपासून सुमारे १२ कि. मी. अंतरावर आहे. हा मार्ग काहीसा सोयीस्कर वाटतो. येथून सुमारे १ कि. मी. अंतर चालत जावे लागते. म्हणजे पहिल्या मार्गापेक्षा हा मार्ग काहीसा सुकर वाटतो. त्यामुळे दूरवरून येथे येणारे बहुतांश भाविक-यात्रेकरू याच मार्गाचा वापर करताना दिसतात.

येथे खंडोबा मंदिराच्या आवारात जाण्यासाठी मुख्य वाट उत्तरेकडील महाद्वारातून आहे. आवारात खंडोबा मंदिराशिवाय म्हाळसांबा (म्हाळसा), तुप्पद माळाम्मा (घृतमारी) व हेगप्प (हेगडी प्रधान) यांची मंदिरे आहेत. उत्तर महाद्वाराच्या बाहेर उजव्या बाजूस हेगप्प किंवा हेगडी प्रधानाचे पूर्वाभिमुख मंदिर आहे. या मंदिराचे मंडप व गर्भगृह असे दोन भाग आहेत. मंडपात तीन नागशिला आहेत. तर शिवलिंगामागे आसनमांडी घातलेल्या हेगप्पाची मूर्ती आहे. या मूर्तीच्या पुढे शिवलिंग आहे. हेगप्प किंवा हेगडी प्रधान हा श्रीविष्णूचा अवतार असल्यामुळे इतर ठिकाणांप्रमाणेच येथेही त्याची मूर्ती चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, गदा, शंख व पोथी या वस्तू दाखविण्यात आल्या आहेत.

आवाराच्या उत्तर भिंतीला लागूनच काळव्व अथवा कालीदेवीचे मंदिर आहे. काळव्वाची मूर्ती बैठी, चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, डमरू, लिंग या वस्तू धारण केल्या आहेत. मूर्तीजवळ सव्यावर्ती सिंह हे देवीचे वाहन दाखविले आहे. सिंहाच्या दोन बाजूस त्याच्याकडे तोंड केलेले दोन उंट खोदले आहेत.

मुख्य दरवाजाच्या दोन्ही बाजूस अनुक्रमे मारुती व भैरव यांच्या कोनाडेवजा देवळ्या आहेत. भैरवाची मूर्ती नग्न, उभी व चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व नरमुंड या वस्तू आहेत. भैरवाच्या मस्तकाच्या दोन्ही बाजूस नाग दाखविले आहेत. त्याचबरोबर नरमुंडातून गळणारे रक्त चाटणारा कुत्रा व भैरवाचे वाहन म्हणून विंचूही दाखविला आहे.

या मुख्य दरवाजाच्या माडीवर नगारखाना असून, आत प्रवेश करताच उजव्या बाजूच्या सोप्यात देवसंस्थानची कचेरी आहे. कचेरीच्या नैर्ऋत्येस घृतमारी किंवा तुप्पद माळव्व हिचे छोटे मंदिर आहे. या मंदिराच्या सोप्यात परंतु गाभाऱ्याच्या दरवाजाच्या एका बाजूला बैठा, मोठ्या पोटाचा आणि चारी हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपत्र धारण करणारा मार्तंडभैरव तर दुसऱ्या बाजूला मारुतीची मूर्ती आहे. गाभाऱ्यात भैरवीची बैठी, चतुर्भुज मूर्ती असून ती खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र धारण करणारी आहे.

कचेरीच्या दक्षिण बाजूला गंगीमाळव्व तथा म्हाळसादेवीचे पूर्वाभिमुख मंदिर आहे. हे एकामागे एक असे दोन सोपे व गाभारा अशा तीन विभागात मांडणी केली आहे. गाभाऱ्यातील माळव्वाची मूर्ती बैठी व चतुर्भुज असून तिच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र धारण केलेले आहे.

गंगीमाळव्व मंदिराच्या दक्षिणेस खंडोबाचे मुख्य मंदिर असून ते पूर्वाभिमुखी आहे. पाचखणी तिघई मंडप, नवरंगी मंडप, अंतराळ, गर्भगृह व अंतर्गृह अशा पाच भागांत हे मंदिर विस्तारले आहे. तिघई मंडपाच्या आतल्या घईत दरवाजाच्या दोन्ही बाजूंस दगडी चबुतरे असून त्यावर देवाच्या पालख्या व घोडे ठेवलेले आहेत. नवरंगी मंडपाचे मधले चार खांब कातीव असून दरवाजाच्या गणेशपट्टीवर श्री किंवा गजलक्ष्मीची आकृती कोरण्यात आली आहे. या मंडपाच्या उत्तर भिंतीस लागून असलेल्या बाहेरच्या बाजूस दोन देवड्या असून त्यावर देवाचा झोपाळा व इतर वाहने आहेत. अंतराल(ळ) व दोन्ही गृहे फारच साधी आहेत. गाभाऱ्यात श्रीमार्तंडभैरवाची शिलामय बैठी मूर्ती असून मूर्तीच्या चारी हातांत अनुक्रमे खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र या वस्तू धारण केलेल्या आहेत. या मूर्तीपुढे पितळेची उत्सवमूर्ती ठेवलेली आहे. अंतर्गृहात स्वयंभू लिंग (स्थानिक शब्द स्वयम् उद्भव) आहे. या स्वयंभू लिंगाचे स्त्रियांनी दर्शन घेऊ नये, असा येथे प्रघात आहे. याशिवाय गर्भागारात मार्तंडभैरवाच्या दोन धातूच्या मूर्ती असून एक मूर्ती बैठी तर दुसरी म्हाळसासह अश्वारूढ आहे.

येथील मंदिराच्या बांधणीत चुन्याचा भरपूर उपयोग करण्यात आला आहे. पहिल्या मंडपाचे खांब खाली चौरसाकृती व वर निमुळते होत गेलेले आहेत. सर्वच मंदिरांची शिखरे खुजी व मुसलमानी स्थापत्यशैलीचा प्रभाव

असणारी आहेत. येथे दीपमाळा नसल्या तरी दीपस्तंभ आहेत. या देवळांतून सुमारे चाळीस नंदादीप अखंड तेवत असतात. त्यातील काही तुपाचे तर काही तेलाचे आहेत. नंदादीपावर होणारा सर्व खर्च येथील धनगरांच्या (कुरूब) देणगीतून होतो, हे इथले वैशिष्ट्य आहे.

## १२. मैलारचा खंडोबा

कर्नाटकातील बेळ्ळारी जिल्ह्याच्या हडगल्ली तालुक्यात तुंगभद्रा नदीच्या काठी 'मैलार' नावाचे एक छोटे गाव आहे. मैलारलिंग देवस्थानामुळेच या गावाला मैलार असे नाव मिळाले आहे. या गावाच्या उत्तरेस एका मोठ्या खंडित प्राकारात मैलारलिंगाचे मंदिर आहे. या प्रकाराचे मुख्य महाद्वार पूर्वाभिमुख असून, त्यावर देवाचा नगारखाना आहे. गावकरी किंवा यात्रेकरू मात्र प्राकारात येण्यासाठी प्राकाराच्या खंडित दक्षिण बाजूचाच वापर करताना दिसतात. महाद्वारातून प्राकारात प्रवेश करताच प्रथम एक उंच दीपस्तंभ लागतो. त्याच्या चबुतऱ्यावर देवाकडे तोंड करून व खांबाला टेकून उभी असलेली व रंगवलेली एक मूर्ती असून, ती हातांच्या ठेवणीवरून सूर्याचीच असावी, असे वाटते. मार्तंड म्हणजे सूर्य. खंडोबाचे एक पर्यायी नाम मार्तंड असल्यामुळे त्यांच्याशी सूर्याचा संबंध कल्पून येथे सूर्यमूर्तीची स्थापना करण्यात आली असावी. या खांबापुढे मंदिराचा चौघई व पाचखणी मंडप आहे. त्याच्या अगदी आतल्या घईत दोन्ही बाजूस दोन-दोन खणी चबुतरे किंवा देवळ्या आहेत. त्यावर घोडे, पालख्या इत्यादी वाहने ठेवण्यात आली आहेत. या मंडपाचे चार खांब कातीव आहेत तर बाकीचे चौरसाकृती व वर निमुळते आहेत. मंडपाच्या उत्तर-दक्षिण बाजूस भिंती आहेत तर पूर्व बाजू मोकळी आहे. याच्या पश्चिम दरवाजाने आत प्रवेश केल्यानंतर नवरंगी मंडप लागतो. मंडपाच्या मधल्या चार खांबांच्या अवकाशात चौकोनी रंगशिला आहे. या मंडपाच्या पश्चिमेस अंतराल व अंतरालाच्या पश्चिमेस गाभारा असून, नवरंगी मंडप व अंतराल यांच्या गणेशपट्ट्यावर अनुक्रमे गजलक्ष्मी व मार्तंडभैरव यांच्या मूर्ती खोदलेल्या आहेत. यातून यक्ष-किन्नर संस्कृतीचे दर्शन होते.

गाभाऱ्यात अनुक्रमे स्वयंभू लिंग (स्वयंम् उद्भव), त्याच्या पश्चिमेस कल्याण महोत्सवी किंवा धातूची भोगमूर्ती आहे. या मूर्तीच्या पश्चिमेस एका प्रशस्त कमानीत मृण्मय (मातीपासून बनविलेला) मैलार किंवा हिरे (मोठा) मैलार यांची मूर्ती आहे. मूर्ती काळ्या रंगाची टणकदार असल्यामुळे ती शिलेची असावी, असे वाटते. मात्र, ही मैलार मूर्ती मातीचीच आहे, अशी येथील स्थानिक लोकांची समजूत आहे. त्यामुळे या स्थानाला मण्मैलार किंवा मृणमैलार असेही म्हणतात. त्यांच्या मते तेलामुळे मूर्तीस काळा रंग आलेला आहे. ही मैलार मूर्ती बैठी, चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू धारण केलेल्या आहेत. मूर्तीच्या दोन्ही मांड्यांखाली मणि व मल्ल यांची मुंडे आहेत. मूर्तीच्या दोन्ही बाजूस दोन उभ्या चौरीधर स्त्रिया आहेत. त्या बहुदा गंगी माळव्व (म्हाळसा) व कुरूबत्यमाव्वा (बाणाई) यांच्या असाव्यात. गाभाऱ्यातच दक्षिण भिंतीजवळ एका ओळीत सहा उत्तराभिमुख धातूमूर्ती आहेत. पहिली, दुसरी, चौथी आणि सहावी या मूर्ती उभ्या आहेत. तिसरी मूर्ती अश्वारूढ आहे तर पाचवी बैठी आहे. यांपैकी पहिली गंगीमाळव्व तथा म्हाळसाची आहे. दुसरी, तिसरी, पाचवी व सहावी या चार मूर्ती खंडोबा म्हणजेच मैलाराच्या आहेत व चौथी मूर्ती हेगप्प म्हणजे हेगडी प्रधानाची आहे. अश्वारूढ मैलाराच्या चार हातांत अनुक्रमे खड्ग, छडी, डमरू व लगाम अशा वस्तू दाखविलेल्या आहेत. हेगप्पाची मूर्ती चतुर्भुज असून त्याच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, गदा व चोपडी (पुस्तक) या वस्तू आहेत. क्षात्रतेजाबरोबर ज्ञानाचीही उपासना खंडोबा उपासनेमध्ये केली जाते हा संदेश या 'चोपडी' वरून द्यावयाचा असावा. बैठ्या मैलारमूर्तीच्या मांडीवर माळव्व बसली असून ती द्विभुज आहे. तिच्या दोन्ही हातांत अनुक्रमे अलिंगनी मुद्रा व उत्पत दाखविले आहेत. तर उभी गंगीमाळव्वाची मूर्ती चतुर्भुज असून तिच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, डमरू, त्रिशूल व पानपात्र या वस्तू धारण केलेल्या आहेत. दुसऱ्या आणि सहाव्या क्रमांकाच्या मूर्ती चतुर्भुज असून त्यांच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू दाखविल्या आहेत.

पहिल्या किंवा पाचखणी मंडपाच्या दक्षिण बाजूच्या भिंतीच्या बाहेर परंतु भिंतीस टेकून अनेक मूर्ती आहेत. त्या पूर्व-पश्चिम क्रमाने पुढीलप्रमाणे सांगता येतील : १. दोन नाग २. बैठा मैलार (नेहमीच्या वस्तूंसह) ३. तीन हातांत खड्ग, बाण, धनुष्य व भग्न पावलेली उभी मूर्ती, तिच्या बैठकीवर तिचे वाहन घोडा व एक सेवक आहे. ४. बैठा गणपती ५ बैठा मैलार .६ उभा वीरभद्र (बैठकीवर दोन नाग) ७. बैठा मैलार ८.अश्वारूढ मैलार (बरोबर चार कुत्रे आणि मणि व मल्ल) ९. नाग १०. गणेशासह मातृका ११. बैठा मैलार १२. उभा विष्णू १३. बैठा गणपती (बैठकीवर सप्तमुखी अश्व). यातील गरुड असलेली बैठक विष्णूची आहे, तर सप्तमुखी अश्व असलेली बैठक

दीपस्तंभाच्या चबुतऱ्यावर उभ्या केलेल्या सूर्यमूर्तीची आहे. प्राकारातच मंदिराच्या पाठीमागील बाजूस एका छोट्याशा देवळीत उत्कृष्ट योगनारायणाची मूर्ती आहे. या मंदिराशेजारी गंगीमाळव्वाचे एक स्वतंत्र मंदिर आहे. गंगीमाळव्वाची मूर्ती चतुर्भुज असून तिच्या प्रत्येक हातात खड्ग, डमरू, त्रिशूल व पानपात्र या वस्तू आहेत. महाद्वाराने बाहेर पडताच डाव्या बाजूस हेगप्प तथा हेगडी प्रधानाचे मंदिर आहे. त्याची मूर्ती बैठी असून चतुर्भुज आहे. वरच्या दोन्ही हातांत अनुक्रमे पाश व अंकुश या वस्तू आहेत तर खालचे दोन हात भग्नावस्थेत आहेत. विशेष म्हणजे या हेगडी प्रधानाला दाढीमिशा दाखविण्यात आल्या आहेत. येथे वैष्णवपंथी हेगडी प्रधानाच्या हातात धारण केलेला पाश व अकुंश ही शैवांची शस्त्रे आहेत. म्हनूनच शैव-वैष्णवांच्या ऐक्याचे हे प्रतीक आहे.

## १३. मैलारपूर-पेंबरचा खंडोबा

महाराष्ट्र आणि कर्नाटकातील एकूण चौदा मुख्य खंडोबा स्थानांपैकी मैलारपूर किंवा पेंबर हे आद्यस्थळ असून सर्वांत महत्त्वाचे ठिकाण आहे. यालाच 'प्रेमपुरी' म्हणतात. मल्हारीमाहात्म्यातील वर्णनानुसार, युद्धसमाप्तीनंतर ऋषींच्या विनंतीवरून मल्हारी मार्तंड जेथे शक्ती म्हाळसासह प्रकट झाले ते हे ठिकाण.

सेंट्रल रेल्वेच्या विकाराबाद-परळी वैजनाथ या फाट्यावर बीदरच्या पुढे 'खानापूर' नावाचे गाव आहे. या गावाच्या उत्तरेस सुमारे २.२१ कि. मी. अंतरावर आणि बीदरच्या वायव्येस सुमारे ९.६६ कि. मी. अंतरावर बीदर-उदगीर बस मार्गावर रस्त्यापासून सुमारे १ कि. मी. अंतरावर 'मैलारपूर' हे स्थान आहे.

येथील मंदिर पूर्वाभिमुख असून चौफेर भक्कम असा दगडी तट आहे. त्याच्या चार दिशांस चार दरवाजे आहेत. पूर्वेचा दरवाजा मोठा असून ते मुख्य प्रवेशद्वार आहे. त्याच्या वरच्या मजल्यावर देवाचा नगारखाना आहे. परंतु हा दरवाजा फक्त यात्रांच्या दिवशीच उघडतात. नेहमीचा वावर उत्तर-दक्षिण दरवाजाने होतो. तटास लागून आतल्या बाजूस सर्वत्र ओवऱ्या काढल्या आहेत. त्यातील काही उद्ध्वस्त झालेल्या असून, काही लोकांनी येथे वस्ती केल्यामुळे व्यापल्या गेलेल्या आहेत, तर काही मोकळ्या आहेत. पूर्व दरवाजाने प्राकारात प्रवेश केला की, फरसबंदी लागते. फरसबंदी ओलांडून अठरा पायऱ्या उतरून खाली आले की एक देवळी लागते. पूर्वी तिच्या पूर्व, दक्षिण व उत्तर या दिशांस अनेक अस्ताव्यस्त उभारलेल्या दीपमाळा होत्या. परंतु कालांतराने साधारणतः इ.स. १९५८ साली त्या पाडून पायऱ्या मोकळ्या करण्यात आल्या. वरील उल्लेख केलेल्या देवळीत एका भक्ताची मूर्ती असून ती बेढब अवस्थेतील आहे. काहींच्या मते, ती हेगडी प्रधानाची मूर्ती असावी. याशिवाय दोन छोटे व एक मोठा सहा फूट उंचीचा नाग, पंचलिंग, गणपती, उभा विष्णू, स्त्री-पुरुषाचे जोडपे, नर्तिका इत्यादी शिल्पे आहेत.

या देवळीच्या पश्चिमेस मंदिराचा सोळा खांबी, उघडा दगडी मंडप आहे. या मंडपाच्या पश्चिम बाजूस चार कमानींचा गूढ म्हणजेच चारी बाजूंनी भिंती असलेला मंडप आहे. या मंडपाच्या पश्चिमेस गाभारा व त्यास लागून उत्तरेस खोली आहे.

गाभारा चार मोठ्या व चार छोट्या कमानींचा बनवला असून त्यावर आतील बाजूस वाटोळा, अंडाकृती घुमट आहे. पश्चिम बाजूच्या कमानीत एक उंच कट्टा असून त्यावर खंडोबाची उभी चतुर्भुज पाषाणाची मूर्ती आहे. या मूर्तीच्या हातातील आयुधे अस्पष्ट असल्यामुळे ओळखता येत नाहीत. या मूर्तीच्या मागील बाजूस सव्यावर्ती हत्ती आहे. त्याच्या मुखाच्या दोन्ही बाजूस मणि आणि मल्लाची मुंडे दाखविलेली आहेत. या मूर्तीच्या पुढे पादुका, नंदी आणि अश्वारूढ खंडोबा आहे. खंडोबाची मूर्ती चतुर्भुज असून त्याच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र या वस्तू आहेत. खंडोबाच्या पुढे दोन पितळी घोडे आहेत. या सर्व मूर्तींच्या डाव्या बाजूस सव्यललितासनी मार्तंडभैरव तर त्याच्या उजव्या बाजूस तशीच भैरवीची मूर्ती आहे. डावीकडे उभी असलेली महालक्ष्मीची चतुर्भुज मूर्ती असून तिच्या प्रत्येक हातात अनुक्रमे कमल, मुद्गल, ढाल व पानपात्र या वस्तू आहेत. तसेच डोक्यावर नाग व सव्यावर्ती लिंगयोनी आणि डाव्या बाजूस सिंह दाखवला आहे. तटास लागून असलेल्या ओवऱ्यांच्या पुढे अस्ताव्यस्त देवळ्या असून त्यात शिवलिंगे आहेत. दक्षिणेकडील बाजूस एका देवळीत म्हाळसासह खंडोबाची अश्वारूढ मूर्ती असून खंडोबा चतुर्भुज आहे. त्याच्या प्रत्येक हातात लगाम, खड्ग, चक्र, त्रिशूळ या वस्तू आहेत. या मूर्तीच्या पायाजवळ राक्षस, घोडा व चौरीधर आहेत. ईशान्य बाजूस बाणाईची ओवरी असून तिच्यामध्ये स्त्री-पुरुषांचे मुखवटे आणि एक नंदीवर स्वार झालेली चतुर्भुज मूर्ती आहे. मंदिराच्या प्राकारास लागून जवळच दक्षिणेस एक चौसोपी असून बाहेरून येणारे यात्रेकरू भाविक येथे उतरतात.

मैलार मंदिराच्या पाठीमागील बाजूस पश्चिमेस थोड्या अंतरावर एक कुंड असून त्यात स्नानाचा नवस

फेडतात. या कुंडाच्या पश्चिमेस यापेक्षा मोठे कुंड किंवा तलाव आहे. त्यामध्ये ताफ्याचा नवस फेडतात. तलावाच्या पश्चिम बाजूस काठावर एकूण अकरा ओवऱ्यांचा सोपा आहे. या तलावाच्या (कुंडाच्या) नैर्ऋत्येस एक तिकमानी मशीद आहे. मशिदीच्या दक्षिण बाजूस 'मूळलिंग' नावाचे शंकराचे पूर्वाभिमुख मंदिर आहे. या मंदिराच्या प्राकाराच्या दक्षिण बाजूकडील भिंतीस ओवऱ्या आहेत. मुख्य मंदिर मंडप व गाभारा अशा दोन भागांत विभागले आहे. मंदिरासमोर नंदीची मंडपी आहे. खंडोबा प्रथम इथेच होता, असे येथील लोक सांगतात. या मंदिराच्या आग्नेय दिशेस जवळच 'पापशमन तीर्थ' आहे. या तीर्थाच्या पूर्वेस ओढ्याच्या पलीकडे 'पापनाशेश्वर' नावाचे मंदिर आहे. तर उदगीर-बीदर रस्त्यावर, बसमार्गाजवळ मारुतीचे छोटे मंदिर आहे. या मंदिरामध्ये दशभुज नाचता गणपती, तीन फण्यांचा नाग, वराहमुखी नागीण, कलिकाहस्त सूर्य इत्यादी शिल्पे असून यातील काही शिल्पे निश्चितच मुसलमानपूर्व काळातील असावीत. मैलारपूरपासून ३.२२ कि. मी. अंतरावर दक्षिणेस 'म्हाळसापूर' गावी म्हाळसाच्या पादुका असतात.

येथील खंडोबादेवास स्थानिक लोक खंडोबा, मार्तंडभैरव, मैलार, मल्लण्णा आणि मुसलमान लोक 'मल्लुखान' या नावाने संबोधतात. म्हाळसास माळव्व किंवा गंगीमाळव तर हेगडी प्रधानास हेग्गडी किंवा हेग्गण्णु म्हणतात.

येथील मंदिरातील नित्यपूजा म्हाळसापूरचे लिंगायत करतात.

## १४. मैलारलिंगचा (धारवाडचा) खंडोबा

कर्नाटकातील पाच मुख्य स्थानांपैकी धारवाड येथील मैलारलिंग हे खंडोबा तथा मैलारलिंगाचे महत्त्वाचे स्थान आहे. धारवाडपासून सुमारे तीन मैल अंतरावर धारवाड-हुबळी रस्त्याच्या डाव्या बाजूस एका टेकडीवर मैलारलिंगाचे मंदिर आहे. मंदिर पूर्वाभिमुख आहे. या मंदिराला फक्त चार खांब व नवरंगी मंडप आहे. यालाच गाभारा म्हणतात. मंदिरात प्रवेश केल्यानंतर प्रथम लागणाऱ्या दोन कातीव घोटीव खांबांवर पूर्वी एक फारसी लेख होता परंतु तो छिनून काढल्यामुळे सध्या त्याच्या काही खुणाच दिसतात.

मंदिराच्या पश्चिम भिंतीच्या एका कमानीत उंच कट्ट्यावर पाषाणाची सव्य ललितासनी, चतुर्भुज मूर्ती आहे. मूर्तीच्या प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र या वस्तू दिसतात. याशिवाय त्रिशूळ व डमरू यांवर अनुक्रमे वामावर्ती सयोनिलिंग व सव्यावर्ती बसव आहेत. मैलारलिंगाच्या बैठकीवर कुत्रा व घोडा आणि पानपात्राजवळ सन्मुखी एक लहान मूर्ती आहे. ही मूर्ती मैलाराची बायको गंगीमाळव्व म्हणजेच म्हाळसा हिची आहे, असे येथील लोक सांगतात. मैलाराची मूर्ती मुसलमानपूर्व काळातील नसली तरी मंदिराच्या अंतर्भागावर मुसलमानपूर्व काळाचा प्रभाव जाणवतो. या मंदिरात सध्या ब्राह्मण व लिंगायत अशा दोन्ही समाजांतील पुजारी देवाची पूजा करतात. त्यामुळेच पूर्वी मूर्तीमध्ये सयोनिलिंग व बसव खोदला असावा. येथे मैलाराच्या मंत्र्याचे (हेगडी प्रधानाचे) नाव हेग्गप्प, वासर मल्लप्प, मोरप्प किंवा वग्गय असे सांगतात. येथील वाघ्याचा वेश व प्रथा देवरगुड्ड येथील वाघ्याप्रमाणेच आहेत. इथले विशेष म्हणजे वाघ्यांच्या अंगात येते व भक्तांनी विचारलेल्या प्रश्नांना ते उत्तरे देतात. या वाघ्यांचे आचारही डोईफोड्या फकिराप्रमाणे आहेत. हे वाघे कडकलक्ष्मीप्रमाणे अंगावर आसूड मारून घेतात. येथील फार्सी लेखाचे धारवाड गॅझेटियरमध्ये पुढीलप्रमाणे भाषांतर दिले आहे :

''मुहम्मद आदिलशाहाच्या कारकिर्दीत धारवाड किल्ल्याचा सरहवालदार मुहम्मदखान उल्ला याने मुसलमानांनी निर्भयपणे प्रार्थना करावी म्हणून १०८१ सालामध्ये या इमारतीची मशीद बनविली. धारवाड इ. ताब्यात आल्यावर या इमारतीचे पुन्हा मंदिर बनविण्यात येऊन त्यात मैलारलिंगाची प्रतिष्ठापना केली आहे.''[३]

सदर प्रकरणात महाराष्ट्र-कर्नाटकातील मुख्य खंडोबास्थानांचा परिचय स्थापत्य, पौराणिक-ऐतिहासिक संदर्भ, लोककथा, मूर्तीविज्ञानाच्या अंगाने घेतला. पुढील प्रकरणात खंडोबाशी निगडित ऐतिहासिक घटना-प्रसंगांचा परिचय करून घेऊ.

[]

## संदर्भ - टिपा


१. (दै.) लोकसत्ता, १९ जानेवारी २००३, पृ. ११.
२. (सा.) लोकप्रभा, ६ नोव्हेंबर १९९८, पृ. ३२.

३. Cambel James M. (Editor), Gazetteers of Bombay Presidency, Dharwad District, Volume-20, 1984, Page - 706

* चतुर्दश खंडोबा स्थलदर्शन - परिचय लिहिताना प्रत्यक्ष क्षेत्रभेटीबरोबरच खालील ग्रंथांचाही काही प्रमाणात उपयोग झाला आहे.

अ. Palande M. R. (Editor), Maharastra State Gazetteers, Poona Districts, 1954, Pages 618-619.

आ. भगत वामनराव बाळकृष्ण, निमगावचा खंडोबा.

इ. Pagdi Setu Madhavrao (Editor), Maharastra State Gazetteers, Satara District, 1963, Pages - 856-857.

ई. (प्रा.) गोरवाडकर विनोद, चंदनपुरीचा खंडोबा, पृ. ३०.

उ. Kunte B. G. (Editor), Maharastra State Gazetteers, Aurangabad District, 1977.

ऊ. Kunte B. G. (Editor), Maharastra State Gazetteers, Nanded District, 1971.

ए. आलुरकर अनिल, जिल्हा माहिती अधिकारी, नांदेड, मालेगावची आनंदयात्रा (स्मरणिका), २००५.

भारतीय मनाला पूर्वी कोणत्याही गोष्टीची नोंद करून त्याचे पुरावे ठेवण्याची सवय नव्हती. त्यामुळे काही अपवाद वगळता इतिहास घडविणाऱ्या थोर पुरुषांच्या जन्म-मृत्यूच्या आणि त्यांच्या कार्याच्या नोंदी वादंग माजवू शकतात. परंतु भारतीय मन अत्यंत श्रद्धावान असल्यामुळे आपल्या श्रद्धेय दैवतांच्या अस्तित्वाच्या उत्कर्षाच्या नोंदी ते विविध पद्धतीने करते. खंडोबाविषयक वेगवेगळे ऐतिहासिक पुरावे पाहिल्यानंतर निश्चितपणे असे म्हणता येते की, खंडोबा हे लोकदैवत मराठ्यांच्या वीरश्रीला आव्हान करते. या ऐतिहासिक घटना - प्रसगांचे पुरावे म्हणजे शिलालेख, ताम्रपट, पुरातन मूर्तींच्या प्रभावळीवरील श्लोक, ऐतिहासिक रुमाल. या सर्व दस्तऐवजांचा शोध आणि त्या संदर्भांचा विचार या प्रकरणामध्ये केला आहे. या संदर्भामुळे खंडोबा या दैवताचा समाजमानसावरील प्रभाव तसेच त्याच्याबद्दल असणाऱ्या तत्कालीन राजकीय नेत्यांच्या भावना आपल्याला कळतात. या निमित्ताने कोणकोणत्या ऐतिहासिक घटना या दैवताशी जोडल्या गेल्या आणि त्या त्या राजकीय नेत्यांनी देणगीदाखल कोणकोणत्या गोष्टी केल्या हे ही लक्षात येते.

छत्रपती शिवरायांनी स्वराज्याचे पहिले तोरण बांधले ते जेजुरीचा खंडेराय, शिखर शिंगणापूरचा शंभू महादेव आणि तुळजापूरची तुळजाभवानी यांना साक्षी ठेऊनच. मोगलांच्या ताब्यातील गड एकामागून एक सर करीत असताना ‘हर हर महादेव’ आणि ‘येळकोट येळकोट जयमल्हार’ च्या घोषणांनी मराठे मावळ्यांनी महाराष्ट्रातील दऱ्या-खोऱ्या, कडे-कपारी दणाणून सोडल्या होत्या.

पेशव्यांनी नवस-सायास करून आपली भक्ती खंडेरायाच्या चरणी अर्पण केली. अनेक तत्कालीन राजे, सरदार, सामान्य सैनिक तसेच मुत्सद्दी खंडोबाचे उपासक होते. खंडोबाचा टाक आणि भंडाऱ्याने त्यांच्या घरातील देव्हारा सजला होता. कुठलेही कार्य पार पाडायच्या अगोदर खंडोबाला साकडे घातले जात होते. मराठ्यांच्या इतिहासाचा धांडोळा घेतल्यानंतर, अनेक प्रसिद्ध मराठे योद्धयांची नावे खंडेराय व त्याच्या इतर नावावरून ठेवलेली आढळतात. मराठे शाहीतील अनेक घटना-प्रसंगांच्या स्मृती जेजुरीगडाशी-खंडेरायाच्या चरणाशी निगडित होत्या, याच्या नोंदी इतिहासाच्या पाना-पानातून आढळतात. या घटना-प्रसंगांचा परिचय सदर प्रकरणात आपण करून घेणार आहोत.

### जेजुरी येथील शिलालेख

(ज्या ठिकाणीं अक्षराखालीं रेघ दिली आहे, ती अक्षरें शिलालेखांत मोडींत आहेत.)

(१) **(मुख्य वेशीनंतर नंदीपुढील दरवाजाच्या डावे बाजूवरील)**

श्रीमार्तंड भैरव चर
णी तत्पर आपाजी सो
पु व सी सरवपुर
नीरंतर संवत् १५६८ (?)

(२) **(बुळ्यांचे नवीन दीपमाळेजवळच्या ६ दीपमाळांपैकीं ५ वरील)**

श्री मार्तडचरणी
तत्पर कृष्णाजी
++ त निरंतर
सन (?) १७८०

(३) **(हेगडे प्रधान यांचे देवळाजवळील वाटेवरील)**

श्री कमलोजी कदम रावत्म (?) ज रघूजी कदम
राव पाटील कोरेगाव वडगाव त्याचे दि-
वाण गोविंद गणेश कृत सेवा दरव
जा श्री मार्त्तड भैरव चरणारविदी संपूर्ण
मस्तू शुभं भवतु ॥ छ॥ तरफ सांडस प्रा
त पुणे सान्निध्यवती भीमातीर ॥छ॥
शके १६६४ दुंदुभि संवत्सरें श्री
मार्तड चरणी तत्पर गणेशसूत

गोविंद कुलकर्णि श्रीगोंदेकर

(४) **(यापुढील दरवाजावर उजवे बाजूस)**

श्री मार्तंड साहे मनाजी प
त खंडोजीपंत व त्रिंबकपंत आ
कोलकर शके १६७९ ई
श्वर नाम सवच्छरे वैशा
ख शुद्ध त्रीतिया गु
रूवार शुभं भवतु ॥

(५) **(या पुढील दरवाजावर उजवे बाजूला)**

॥श्री॥
श्री सके १६८० बहुध
न्य नाम ? छर श्रावण
सुध ? श्री मार्तंड चरणी त
त्पर ष (?) लाजी +
+

(६) **(प्राकाराच्या आंत शिरल्याबरोबर डाव्या हातास खांबावर)**

श्री मार्तंडचरणी तत्पर
मल्हारजी सुत तुको
जी होळकर नीरतर स
के, १६९२ वीक्रुती नाम
सवछरे श्रवण सुधि
प्रतीपदा सोमवार का
रखाना कीताब तळम
लफात शामजी ना
रायेण राजापुरक
र परगणे दीजेरि

(७) **(शेजारी डाव्या कोपऱ्यात)**

श्री मार्तंड भैरवचा भक्त भार्‌वज
जीने श्र श्रु दीपोवत्ळी व दोन्ही दा
मंडप व दोनी दीपमात्ळा व
दरवाजे देउत्ळ व दोन्ही वीहीरी

(८) **(होळकरांच्या चौघड्याचे दारावरील)**

श्री शके १६७८ धाता
नाम स्वंछर श्री मा
र्तंड भैरवचरणी
खंडोजीसुत मल्हा
रजी होळकर णीरतर्‌

(९) **(मणिमल्लाच्या डाव्या हातात कोटाचे एका खांबावर)**

श्री शके १६८० ब
हु धान्य नाम स
वत्सरे कार्तिक सु
ध पचमी मार्तंडचर
णी त्रींबकराव सीवदेव

(१०) **मुख्य देवळाला जातांना देवडीवरील उजव्या बाजूच्या खांबावर ८ ओळींचा घासून गेलेला (शिलालेख) उतरला नाही.)**

(११) **(मुख्य गाभाऱ्याचे दरवाजावर उजव्या बाजूस यक्षमूर्तीचे पायथ्यास)**

सं १३०३ क्षंर्दा श्री: श्रं नाद्याथे ॥

(॥० वीर पांल वीर मह सातत जा

यऊ त्नू के म स्वाक्ष था स क पा दं

यक्ष प्रति । मयं कारिता

(१२) **(गाभाऱ्यातील मखरावर जें चांदीचें कवच आहे त्याचे मध्यावर)**

श्री मार्तंडचरणी तत्पर

रखमाजि जाचक निरंतर

सके १६९७ श्रावण शुध ७॥

(१३) **(देवळांत खंडोबाच्या व म्हाळसेच्या पितळेच्या मूर्ती आहेत. त्यावर व त्यांच्या प्रभावळीवर असलेला हा श्लोक रा. बाबुराव बेलसरे यांच्या तोंडून उतरून घेतला.)**

मालोजी भोसल्यांचे उदरजलनिधी शाहशीतांशु झाला

तद्धर्भि येक राजा तनयवर तिघे त्यास दीपांबिकेला

शाहक्ष्माप: शरीफा वनिपसुगुण तुक्कोजिभूपार्कवंशी

खंडेराया स्वदैवाशरभनृपवरें अर्पिलें जेजुरीसी

(१४) **(पंचलिंगाचे देवळात शिरतांना उजव्या बाजूस)**

श्री शके १६७७ युवा ना

म सवछरे श्री

पंच त्ळीगचरणी वठिल

शावदेव सासवड

कर हा (?) ना

(१५) **(म्हाळसेची शिळा आहे तेथें बाहेरील खांबावर)**

श्री शके १६६४ दुदु

भी नाम सवत्सरे

श्री मार्तंडभैरव

चरणी खंडोजी सु

त मल्हारजी होळकर

(१६) **(भंडारगृहाच्या दरवाजावरील खांबावर)**

श्री मार्तंड प्रसन

सके १६७८ धाता

नाम सवछरे चैत्र षु

ध प्रतिपदा भाडाग्रर

पैकी दवाजी चेवधरी

श्री गोदेकर याच्य वा?

कर षु भवतु ॥

(१७) **(दोन घंटांपैकी एकावर)**

1711

N.S. DASANGUST

(१८) **(दुसऱ्या घंटेवरील गोलाकार लिहिलेला)**

श्री मार्तड स्थान जेजुरी भक्तराज

वाल्हाजी व हारीबा बीन जानजी

माळा गा?

वनारोडा

(१९) **(उतारावयाच्या रस्त्यावरील मध्यावर दरवाजाचे उजव्या बाजूस)**

श्री सके १७०५ क्रोधी

सवछरे ते दिवसी श्री मार्तंड भै

रवचेरनि तत्प हायेबत

राव सुत रवडोजी ...............आण्णा

गीरवीकर नीरंतर

(२०) **(श्री लवथळेश्वराचे दारावरील शिलालेख)**

जळाशय कर्ता बा

बाजि धर्माजी काट

कार्यकर्ता हेगोजि का

ट परो (प) कारार्थ

धर्म पव्हे काळ

(२१) **(लवथळेश्वराला जातांना पायऱ्यांच्या उजव्या बाजूस ६ ओळींची बरीच अक्षरें फुटलेलीं)**

श्रीगणेशायन

मा: श्री स्व (?) स्ती सके १५३०

सो म श्व (?) छ ो श्री (?) म॥ वाध

रावीवार (?) कामळावीळे ह्व - ह्व धा+

धी क मी

ठी पा (ह्व० ॥००

++ का

(२२) **(तुकोजी होळकर यांनी मल्हारराव होळकर यांचे मंदिर बांधलें आहे त्याचे दरवाजावरील)**

श्रीसके १७१२ साधारणनाम

सवछरे आस्वीन शुध दशमी

श्री मल्हारगौतमेस्वरचरणी

मल्हारजी सुत तुकोजी होळकर [१]

## निमगाव खंडोबा देवस्थानाविषयीचे काही ऐतिहासिक लेख (खुलाशासह)

(मूळ कागदपत्रांत जसे लेख आहेत तसेच इथे दिले आहेत. काही अशुद्ध शब्दामध्येही बदल करण्यात आलेला नाही.)

**लेखांक १**

(यांत मौजे निंबगांव येथें श्रीखंडेराव देव मित्ती शके १३४७ मार्गशीर्ष शुद्ध पंचमी, शनिवार रोजीं कशा रीतीनें प्रकट झाले, याबद्दल उल्लेख आहे. कागद व लिपी शिवकालीन आहे.)

शके १३४७ क्रुधन नांव संवत्सरे मार्गस्वर शुध ५ शनवार ते दिवसी मौजे मजकुरास श्रीदेव आला ठिकान वरसाचे झाड त्याज खाले सील होती ते सिलेखाले श्रीदेवाची लिगे निघाली. ते दिवसी गावात कुललोकास स्वप्नें जाली की आपण त्या टिकाणास आलो आहो म्हणउनु गावातिल्या लोकांनी स्वप्नें देखिली दिवस उगवोन गावीचे लोक एके टायी गोला जाले. येरूणयेरास स्वप्नें सांगितली. मग वाजातरे लाऊन डोगरावर वरसाच्या झाडाखाले गेले सील उचलून पाहिली तो सिलेखाले स्वयंभू लिगे आहेती व भंडार पडिले आहे व तेथे भगताचे खोड पालोन पडिले आहे जीव नाही मग गावकरीयानी त्यास श्रीदेवाचे भंडार लाविले मग सावध जाला मग त्यास पुसिले की तू कोण कोणाचा आहेसी ते सांगणे ह्व ह्व तो बोलिला की आपणास काही टावके नाही व सुचत नाही उबर दहा वरसाचा होता.

**लेखांक २**

(मूळ कागद व लिखाई शिवकालीन आहे. यांत देवास येणाऱ्या हरएक वस्तूवर कोणाचा कितपत हक्क असे व दुकानदार, पासून घेतलेली शेव व रोकड यांवर दिवाण, मोकदम, कुलकर्णी, शेटे, बलुते वगैरे यांचा हक्कवाटा कसा असे हें स्पष्ट आहे.)

व भगत गुरव यांचें भांडण होऊन देवाचें उत्पन्न विजापूरचा सरदार दिलावरखान (शके १५०५ ते १५१२) याचे कारकिर्दीत सरकारजमा झालें. त्यांचा नोकर पंताजीपंत कंदीमचा कर दरमाणशीं दीड रूका होता तो तीन रूका केला. पुढें दिलावरखान याची कारकीर्द सात वर्षे झाल्यानंतर हमीदखान (शके १५१३) या सुभ्याची व्यवस्था पाहूं लागला. तेव्हां त्याचा कारकून रामजी बल्लाळ याने कदीमप्रोदर माणशी दीड रूक्याप्रमाणें कर ठरवून त्याप्रमाणें यात्रेची कमावीस केली.

(पुढे बराच जमाखर्च दिला असून तो फारच किचकट असल्यामुळे इथे दिला नाही.)

**लेखांक ३**

(धामणटेकची टेंकडी निबंगांपासून ईशान्येस सुमारें दोन मैलांवर आहे. तेथें पादुका असून त्यावर लहान देऊळ आहे. व दीपमाळ ही आहे. खंडोबा देव पूर्वी येथें होते या समजुतीनें च गोसाशीकर महारानें येथें पादुकांची स्थापना केली असावी.)

शके १६२३ वृशानाव संवत्सरे पुस शुद १५ ते दिवसी धामणपैकीं हरनाक महार मौजे गोसावी याणे पाऊतकाची स्थापना केली सदरहू थानक मोजे निमगाऊ नागणा खेड मु. सन ११११.

**लेखांक ४**

(शके १६२४ पौष शु॥ १४ मंगळवारी औरंगजेब बादशाहीचे शिपाई यांनी देवाचा मंडप व कळस पाडला. नंदी फोडला. देवचा लेप फोडला. स्वयंभू लिंगास मात्र धक्का लावला नाही.)

शके १६२४ चित्रभान संवत्सरे पूस शुद १४ मंगलवार ते दिवसी अवरंगशाह पातशाह मोजे कोरेगाऊ ता॥ पाबल येथें तलेगावीहून आला तेथून अहादी (?) कनेरसरावरून आले आणि श्रीदेवाचा मंडप व पडशाल पाडिली व कलसही थोडासा वरून पाडिला व देवाचे लेप फोडिले व बैल येक मारिला परतु स्वंयभ लिगे वाचली आहेती त्यास ढका लावला नाही थानक मोजे निमगाव नागणा ता॥ खेड मु//सन ११२०. १२ सा बान.

**लेखांक ५**

(यांत देवालयाचे कामास प्रारंभ केल्याचा मुहूर्त फाल्गून शु॥ १२ शक ११६० दिला आहे.)

श्री

॥ शके १६६० काळयुक्त नाम संवत्छरे
॥ फालगुण श्रुध द्वादसि सोमवार
॥ पुष्पे नक्षत्र व दिनि श्रीमार्तंड
॥ जीच्या सिखरास प्रारंभ सका-
॥ ळचे प्रहरिं पांचा घटीका दक्ष-
॥ णेकडील चिरा मांडला कर्त्ता
॥ राजेश्री गंगाधर येशवंत सो (जो?) सि कु-
॥ ळकर्णी मोजे मजकूर शुभं भवतु ॥१॥

**लेखांक ६**

(शिलालेख - मुख्य देवळाचे मागें पाठभिंतीस म्हाळसाबाईचे देवालयावर दोन बाजूंस दोन श्लोक दगडावर कोरलेले आहेत. सदर शिलालेख रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनी लावण्याचा प्रयत्न केला व लागलेल्या भागावरून हें देऊळ थोरले मल्हारराव गायकवाड यांनी बांधलें असें अनुमानानें लिहिलें परंतु तें चुकीचें आहे, हें या सबंध शिलालेखावरून सहज सिद्ध होतें. माझे इतिहास संशोधक मित्र रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन हे निंबगांवी मंजकडे आले. त्या वेळीं त्यांनीं सदर शिलालेखाचा भाग म्हाळसाबाईचे देवळाचे गच्चींत गेलेला उकरून काढून दोनतीन दिवस अत्यंत परिश्रम घेऊन सर्व लेख लावला. गंगोबा तात्या चंद्रचुड यांनीं खंडोबाचे शिखराचें देवालय शक १६६१ मध्यें बांधलें, गॅझेटियरकार (मुंबई गॅझेटियर व्हा. १८ भाग ३ पान २६२ वर) सदर देवालय गोविंदराव गायकवाड यांनी बांधले असें म्हणतो, तें ही अर्थात चुकीचें ठरतें.)

**निमगाव येथील खंडोबाचे देवालयावरील शिलालेख**

**१. उत्तर बाजू**

१. श्री गणेशायनमः ॥ सोळाशे व

२. रि येकसष्टि वरषे सिद्धार्थि संवत्सरी ॥श॥

३. की वीन शकीं सुबुद्धि उपजे त्या बाजि गंगा

४. धरीं ॥ द्रव्याची ममता ति ही न धरितां अर्पूनि

५. या शीखरीं ॥ जोडूनि कर आणि शीर

६. कमळें भावार्थ या ईश्वरीं ॥१॥

**२. दक्षिण बाजू**

१॥ श्री गणेशायनमः श्रीमार्तंड भैरवाय न

२॥ मः शके १६६१ सिद्धार्थिनामसंवत्सरे ॥

३॥ ये....... पंत बरवे निंग्राम भीमातीरीं ॥

४॥ कुलकर्णी उपनाम चंद्रचूड ते ज्योतीष त्याचे घरीं ॥

५॥ विष्णूवर्धन गोत्र....... र अभ्यंतरी ॥

६॥ तुष्टोनी मग म्हाळसा वर हि दे....... गंगाधरीं ॥

॥२॥

**लेखांक ७**

(देवालयाभोवतीं फरशी करण्याचा मुहूर्त दिला आहे. तो शक १६६२ मधील आहे.)

श्री

गजानन प्रसंन

फर्सास मुहूर्त

*माघ शुत्ध दशमीस गुरुवारीं अठरा १८ घटकांनंतर चार घटा (=घटका) पुढें मुहूर्त

*माघ वद्य व्दितिया गुरुवारीं १७ सत्रा घटकानंतर पुढें ४ घटकांपर्यंत स्वस्त्ययनास प्रारंभ

**लेखांक ८**

(हे पत्र फत्तेसिंगराव गायकवाड यांनीं आपल्या मातोश्रीस पाठविलेले आहे. यांत नगारखाना वगैरे कारखाना चालू असल्याबद्दल उल्लेख आहे. पत्रावर तारीख मित्ती वगैरे कांहीं च नाहीं. तथापि ज्या अर्थी फत्तेसिंगराव तारीख २१ डिसेंबर १७८९ इ. रोजीं वारला त्या अर्थी त्यापूर्वीचें हें पत्र होय.)

श्री

गंगाभागीर्थी मातुश्री बया

वडिलाचे सेवेसी

अपत्य बालके फत्तेसिंग याने चरनावर मस्तक टेऊन शिरसाष्टांग दंडवत विनंती विज्ञापना यैसीजे श्रीचा कारखाना चालातोये हे तो वडिलास माहीत आहे यात कुटुबदार असामी दोन तीन आहेत त्याजपाशी खर्च पडलाये तो मागता म्हणून यैसे परभार कळले. त्यास नगारखानचे घडसी यास व पाथरटा कबीलदार आसामी आहेत याजपासी मागू नये याजपासी दोन चार रुपये घेतल्यानें काही परिनाम लागनार नाही तरी एखाद्याचे सागितल्यावर मागू नये देवली गुरव भगत घडसी नगारखान्याचे व पाथरट यासी बेगार आगार दाखवितात. तरी त्यास वडिलाची ताकीद असावी की घडशास व पाथरट महिनदार यासी तडा करू आसी ताकद असावी कारखानदार व नगारखानेयाचे घडसी यास रोजमुरा दाहा बारा महिने मिलाला नाही. तरी त्यानी द्यावे कोठून यास्तव यास उपद्रव वडिलाकडील न लागावा सर्व कामे होतात ही वडिलाची आहेत तेव्हे मजकडेस काये जे करणे ते वडिलास कलेल तैसे कराव बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

**लेखांक ९**

आश्वीन शु. १४ सन १२०३

'' 'श्रीमार्तंडापासी' थडगे गायकवाड बांधितात त्याचें बोलणें जालें आहे. आणखी येक वेल बोलणें घेऊन खचित लिहून पाठऊ.''

(दादाजी गंगाधर चंद्रचूड यांस त्यांच्या कारकूनानें पाठविलेल्या एका पत्रापैकी मंजकूर घेतला आहे. गायकवाड मार्तंडापाशी थडगें बांधतात वगैरे लिहिलें आहे. कोणाचें थडगे याबद्दल स्पष्ट उल्लेख नाहीं.)

**लेखांक १०**

(जायाजी पाथरवट चासकर याचें हे पत्र आहे. यानें पहिली दीपमाळ बांधली. हा उत्तम कारागीर होता.)

श्री

खंडेराव

राजश्री रामजी सिंदे पा

टील मौजे निबगांव

गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलकृत राजमान्य स्नाो जायाजी पाथरूट व॥ मौजे चास राम राम विनती येथील कुशेल स्वकीये कुशल लेखन करणे यानतर श्री याचे दीपमाल आम्ही बाधली त्यास दाहा वरसे झाली त्याचे रुपये ४५ पचेताळीस राहिले ते आम्हास तुम्ही दिल्हे नाहींत. आम्ही तो काम केले ते तुम्हास विदित आहे तरी आमचे रुपये कामाचे तुम्ही ठेवावे हे गोस्ट उत्तम नाही हाली आमचे रुपये तुम्ही देणे रुपये तुम्हापासी आहेत तेवडे रुपये आमचे तुम्ही देणे याबद्दल गंगाजी भालेराउ पाठविले आहेत. तरी आमचे कामाचे रुपये सदरहू तुम्हापासी आहेत ते देणें मेहेरबानी करून रुपये गंगाजी भालेराउ यांपासी पाटवणे आम्ही चासेमध्ये सरकारचे कामावरी गुतलो आहो तरी रुपये देणे रुपयास तुम्ही भोटाई करून ठेवाल तरी सरकारचा वरातदार येईल मसाला घेईल आणि रुपये द्यावे लागतील यैसे पस्ट समजोन तुम्ही चासपावेतो येणे न या तरी आम्हास बोल नाहीं बहूत काय लिहिण कृपा असो देणे हे विनंती गंगाजी भालेराऊ जबानी सांगता कळो येईल हे विनंती.

**लेखांक ११**

॥ श्री ॥

११७५

ताळेबंद श्री मार्तंडाच्या देवळाचा कलस विजेने पडिला होता तो नवा केला. सु॥ सीत सीतैन मया व अलफ सन ११७५ खर्च ........ रु॥ (पुढे बराच मोठा किचकट हिशोब दिला असल्यामुळे इथे दिला नाही)

(वरील लेखांपैकी ५, ७, ९ व ११ हे कागद श्री. चंद्रचुडांच्या दप्तरापैकीं आहेत; व १ , २, ३, ४, ८ आणि १० हे अत्यंत महत्त्वाचे कागद निंबगांव येथील कुलकर्णी रा. सावळाराम भिकाजी टल्लू यांनी आपलीं सर्व जुनीं दप्तरें विशेष आस्थेनें दाखविली त्यातून निवडलेल्या कागदांपैकीं आहेत. या त्यांच्या आस्थेबद्दल व वर दिलेली माहिती त्यांनीं परिश्रमानें मिळवून दिल्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें. - गं. ना. मुजुमदार)[२]

## पेशवे सरकारकडून जेजुरीच्या खंडोबा देवस्थानासाठी होणारा वार्षिक खर्च

घडणीचा रुमाल क्रमांक १०, पुडके क्रमांक ६,

पत्र क्रमांक : सी २४७८४

**मुसलमानी महिना** — **इंग्रजी व मराठी महिना**

**सु॥ इहीदे सबैन मया व अलफ** — **५ जून १७७० ते ५ जून १७७१**

(या वर्षातील खर्च)

राजमंडळ

स्वारी राजश्री पंतप्रधान

खर्च खेरीज मुशाहीरा देवस्थाने खर्च ............... रुपये

६३७ यैन नख्त पोता पैकी (रोख रक्कम)

२०७२॥. किमत कापड जामदारखानापैकी एकूण सनगे ३९।.

२७०९॥. रुपये

जीनस खाना पै॥ रेसीम वजन ४ तोळे

पोता ............... पैकी

माहे रजब ............... रुपये

**६३७ छ ९ रजब** **२९ ऑक्टोबर १७७०**

**कार्तिक शुद्ध १० सोमवार**

श्री खंडेराव वास्तव्य मौजे
जेजुरी येथे साल गु॥ (गुदस्ता) प्रमाणे
सा. मजकुरी रसानगी यादी रुपये
३०० श्री खंडेराव यांस घोड्याबाबत द्यावे ते
३० जोसी ............... ब्राह्मण
६० धरणे करी ...............
१०० पुजारी ............... (गुरव)
७५ श्री खंडेराव येथे (गडावरील खंडोबा)
२५ पठार लिंगचे (कऱ्हेपठार)
१००
१५ वाघे व मुरळ्या
१० मराठे (मराठे वाघे-मुरळी)
५ माहार (महार वाघे-मुरळी)
१५
५ वाजंत्री
२ कर्णेकरी
३ चितारी
२ पुजारी (पुलारी)
५ माहालदार
१०० भिकारी यांस
१५ भंडारा, खारीक, खोबरे
६३७

जामदारखान्यातील कापडावर झालेला खर्च

**छ ७ रजब** **२७ ऑक्टोबर १७७०**

**कार्तिक शुद्ध ८ शनिवार**

श्री खंडेराव वास्तव्य जेजुरी यांचे देवळात चांदवा किमरवापी व गजनी या जुन्या प्राो (प्रमाणे) नवा करुन देवीला रसानगी कृपाराम चोपदार जबानी नथु चोपदार चीठी छ मजकूर चांदवा १ बेट गु॥ (गुजारह) मल्हारजी सिंदा गज ...............सूमार

४॥ लांबी
४॥ रुंदी
९

सनगे आख
५२॥. रुपये तठयास कीमखाप ...............गज
१॥। रुंदी
१॥। लांबी
३॥.
किमखाप गज ३6५ येकुन
सनगे ॥ = येकुण ...............आख
११२॥. रुपये गजनी बसीयास गज ............... सूमार
१॥ रुंदी
४॥ लांबी
६

गजनी ...............आख

१५॥ बीर्वी गज ४ येकूण ॥ - सनगा आख

३२ काली गज ५।. सनगा .।॥ - आख

६५ प्र॥ लाल ..............................

४० प्र॥ गज ७। सनग १

२५ प्र॥ गज ५ सनग ह्न॥=

६५

| | | गजनी | सनगे |
|---|---|---|---|
| ११२॥. | ६५ | ३ | १॥= |

(रुपये)

७॥. अस्तरास छीटे नीच गज २३॥ येकुण

पन्हे ५ सनगे ३।॥ दर २ प्रो (प्रमाणे)

२३। झालरीस तीवटे केशरी गज

सनगे .............................. आख

| | | |
|---|---|---|
| २४॥ . | २५ | २६ |
| | | आख |
| ७।॥ . | ८।॥. | ६।॥. |
| २३।. | | ३ |
| | | सनगे |
| १९५।॥. रुपये | | १०।= |

**छ ८ रजब इ.स.१७७१ सालची माघी पौर्णिमा (सु॥ इहीदे सबैन मया व अलफ)(या वेळच्या उत्सवप्रसंगी नारायणराव पेशवे हजर होते. त्या वेळी त्यांनी खंडोबा देवास खालील वस्त्रे अर्पण केली.)**

खंडेराव वास्तव्य श्री जेजुरी येथे माघ पुजा केली हे समयी

देवास वस्त्रे वि (विद्यमान) राजश्री नारायणराव ता।.

ता (तर्फे) विठ्ठलराव वाकेनीस सनगे ------- आख

३११॥. रुपये श्री खंडेराव ..............................

| | | |
|---|---|---|
| ९२॥. | चिराबादली | १ |
| ११५ | वोढणी बादली | १ |
| ६६ | जामेवार बादली | १ |
| ३८ | धोत्रे जोड | १ |
| ३११॥ | | ४ |

१९५। रुपये श्री म्हाळसा

| | | |
|---|---|---|
| ६५ | पातळ जरी १ | |
| १२० | वोढणी बादली | १ |
| १०। | खणास कीमखाप | ७= |
| १९५। | रुपये | २७= |

८ वस्त्रास सेला साधा सनग ७≡

५१४।॥. रुपये ६।ह्न

**छ २३ रजब**

**(सु॥ इहीदे सबैन मया व अलफ)**

**१२ नोव्हेंबर १७७०**

**(रोजी माधवराव पेशवे यांनी खंडोबा देवासाठी उडता रुमालाची वस्त्रे पाठविली होती.)**

श्री खंडेराव येथे उडत्या रुमालास विद्यमान राजश्री राव
सेले सनगे आख
११ सेला साधा १
३०॥ गोलदार १
४१॥. रुपये २

**छ ९ रजब**

मोजे (मौजे) जेजुरी येथील ब्राह्मणास सालाबादप्रमाणे
सालमजकूरी रसानगी यादी चिठी छमजफूट
कापड ............... आख
६०॥ बाबा पेसवे (दुसरा बाजीराव) आख ६०
तर्फे रामाजी बाबा लुगडी ४ येकुण आख
६० विस्वंभर बाबा ............... ६० आख
तर्फे रामाजीबाबा लुगडी २
१२०॥. रुपये ६

**छ २२ रजब**

श्री खंडेराव वास्तव्य मौजे जेजुरी याची लगी
जुनी जाहाली सबब जुन्याप्रमाणे नवी लगी
तयार करून देवीला रसानगी बाळाजी वामन दामले
जबानी चापाजी ठोकेकर खीजमतगार चीठी छ ८
रजब हाते गुजारह लछ्या सिंपी ताा (तर्फे) कृष्णाजी
जगथाप समजे येकुण ............... आख
४० जामेवार जरी बादली सनगा ।ह्र
४ ताफता गज १॥. येकुण ७=
४४ रुपये .।≡

**छ २३ रजब**

श्रीमार्तंड वास्तव्य जेजुरी यास
लगी जरी बघुन नवी घेऊन दीवटी त्यास गोंडे व
दोर न्यास तर्फे जीवन पटवेगार रेसीम वजन
तोळे ४[३]

## शिवकालीन व पेशवेकालीन व्यक्तींचा देव 'कुलदैवत खंडोबा'

संत, पंत, वरदी शाहीर आणि लोककवींनी खंडोबावर भक्तीपर पदे लिहून जी पद्यात्म सेवा केली, त्याचप्रमाणे इतिहास काळापासून सद्य:स्थितीपर्यंत अनेक सरस्वतीपुत्रांनी आपल्या कुवतीनुसार कमी-जास्त प्रमाणात खंडोबावर लेखन करून गद्यात्म सेवा केली आहे. कडेपठाराच्या वर्णनाप्रमाणेच, जेजुरी परिसरातील खंडोबाशी निगडित असलेल्या काही घटनांचे स्मृतिचित्र शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांनी रेखाटले आहे. पुढील उतारा त्यांच्याच शब्दांत :

''पुण्याच्या परिसरात जितका इतिहास गाजला आहे, तितकाच जेजुरीच्या परिसरातही पावलापावलावर गाजला आहे. शिवाजीमहाराजांनी स्वराज्य संग्रामात आपली तलवार रणात शत्रूच्या रक्तात प्रथम भिजवली ती जेजुरीच्या जवळच. महाराजांनी विजापूरचा सरदार फत्तेखान यावर सन १६४९ च्या ऑगस्टमध्ये जेजुरीनजीकच्या खळद-बेलसरापाशीच पहिला छापा घातला अन् फत्तेखानाचा पुरता पराभव केला तोही कऱ्हेपठारावरील पुरंदर किल्ल्याखालीच. मराठ्यांनी स्वातंत्र्याकरिता दिलेली ही पहिली लढाई. १८१८ ला स्वातंत्र्य गेल्यानंतर ते परत इंग्रजांकडून हिसकावून घेण्याकरिता जी पहिली बंडाळी उभारली गेली, तीही खंडोबाच्या समक्षच - ह्याच कऱ्हेपठारात. हे बंड उभारणाऱ्या स्वातंत्र्यवीराचं नाव उमाजी नाईक.

याशिवाय सरदार अंताजीपंत पुरंदरे, पिलाजी जाधवराव, भीमराव पानसे, खंडेराव दरेकर, सखाराम बोकील, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, राघो बल्लाळ अत्रे, नीळकंठराव सरनाईक, दमाजी थोरात, जानोजी भिंताडे, मल्हारराव होळकर हे गाजलेले पुरुष आणि त्यांची घराणी जेजुरीच्या सावलीतच मोठी झाली. खंडोबा हेच या साऱ्यांचे कुलदैवत. छत्रपती शिवाजीराजांचे आजोबा मालोजीराजे हे खंडोबाचे मोठे भक्त होते. मालोजी राजांपासून ते शेवटच्या प्रतापसिंह छत्रपतींपर्यंत झाडून सारे राजकारणी पुरुष निदान एकदा तरी खंडोबाचे दर्शन घेऊन गेले आहेत, हे निश्चित.'' [३]

## भोसले घराण्याची खंडोबाभक्ती

### १) मालोजीराव भोसले यांचे नाव खंडोबावरून :

मालोजीराव भोसले यांचे मालोजी हे नाव मळोजी यादवाच्या नावाप्रमाणेच शंभूमहादेवाच्या मूळ नावावरून ठेवले गेले असावे. ते साधार अनुमान करताना 'मालोजी' हे **खंडोबा**चेही एक लोकप्रिय नाव आहे. **खंडोबा** हाही मूलतः गोपजनांचाच एक लोकप्रिय देव असल्यामुळे मळोजी आणि मालोजी ही गोपकुलीन व्यक्तींची नावे **खंडोबा**च्या मळोजी-मालोजी या नावावरून ठेवली जाणे संभवनीय ठरते. शिवभारतकार कवींद्र परमानंद यांनी मालोजीरावांचा उल्लेख 'मालवर्मा,' 'मालभूपाल' असा केला आहे, तर वेदपंडिताने त्यांना 'मल्लक्षितीश' आणि 'मल्लारीराज' अशा नावांनी निर्देशिले आहे. मालोजीराजांच्या नावाने 'मल्लारिराज' असे संस्कृतीकरण करताना वेदपंडितला 'मालोजी' हे **खंडोबा**चे एक नाव आहे , याचे भान आहे, हे उघड दिसते. [४]

### २) खंडोबा-शंभू महादेव-श्रीशैलमल्लिकार्जुन एकत्व :

मालोजी या यादव कुलसमूहातील पुरुषाचा त्याच्या नामकरणाचा संबंध शंभू महादेवाशी असणे, शंभू महादेव हा श्रीशैलावरील मल्लिकार्जुन असल्याची अनेक प्रमाणे उपलब्ध असणे आणि शंभू महादेवाचे मूर्त रूप जेजुरीच्या **खंडोबा**प्रमाणे लिंगद्वयाचे असणे या बाबींचा एकत्र विचार केल्यावर असे मानावे लागते की **खंडोबा**, शंभू महादेव आणि मल्लिकार्जुन हे भिन्न नावांनी नांदणारे तीन देव एकच आहेत ते केवळ आत्मिक दृष्टीने नव्हे, तर ऐतिहासिक दृष्टीनेही त्यांचे एकत्व सिद्ध झालेले आहे. [४]

### ३) भोसल्यांचा 'कुलदेव' जेजुरीचा खंडोबा :

भोसल्यांचा कुलस्वामी शिखर शिंगणापूरचा शंभू महादेव हा मूलतः गवळी धनगरांचा देव आहे. त्या समाजाचा तो जावई आहे आणि त्याला शिखरक्षेत्रात आणणारा आद्य भक्त बळियप्पा हा भोसले कुळाचा मूळ पुरुष आहे, हे अनेक प्रमाणांनी स्पष्ट झाले असल्यामुळे गवळी-धनगर आणि भोसले यांचे एकत्व या श्रद्धाकेंद्राच्या आधारेही दृढ होत आहे. या गोपजनांचे आणखी जे अनेक देव या प्रदेशात आहेत, त्यापैकी **'जेजुरीचा खंडोबा आणि वीरचा म्हस्कोबा'** यांनाही भोसले आपला कुलस्वामी मानतात. तंजावर भोसल्यांनी दिलेली मौल्यवान धातुमूर्ती जेजुरीच्या खंडोबा मंदिरात पूजाविषय होऊन राहिली आहे. [४]

## जेजुरी देवस्थानासंबंधित शिवकालीन पत्रव्यवहार

'खंड १, शिवकालीन पत्र सार संग्रह १९३०' मध्ये जेजुरीतील गुरव पुजाऱ्यांसंबंधी उल्लेख आलेला आहे. इ. स. १६५३ मध्ये श्री शिवाजीराजांनी जेजुरी येथील खंडोबाचे गुरव आणि घडशी यांच्यातील वतनाबाबतच्या तंट्यात गुरवाचे वतन अमानत (जप्त) न करता कायम ठेवण्याचे आश्वासन एका कौलनाम्याद्वारे दिले आहे.

''चि. राजेश्रीराजे यांचे पत्र आले तरीही इनाम अनामत (तहकुब) न करता पूर्वीप्रमाणे चालू ठेवणे अशी जिजाबाई इ.स.१६५१-५२ मध्ये आज्ञा करिते आणि खुद्द शिवाजी राजेच मातुश्रीने १६५३ साली जेजुरी येथील गुरवांच्या मिराशीच्या तंट्यात दिलेला निवाडा अमलात आणावा म्हणून कौलनामा देतात. [५] तो कौलनामा असा :

''कौलनामा प्रतिच्चंद्र मु. व. सी...इ.स.१६५३ जुलै १३ अजर रा. सिवाजी राजे - गुरव पुजारा श्री मार्तंड भैरव जेजुरी गुरूवातील मिरासीचा गरगसा होता. त्याचा निवाडा मातुश्री (जीजाबाई) साहेबी करून सलासा करणे कौल दिधला आहे. तेणेप्रमाणे साहेबांचाही कौल असे पा हुजुर रा/ येसाजी सर खवास (मर्या)'' [६]

(शब्दार्थ - १) गरगसा : भांडण २) मिरासी : वतन)

या कौलनाम्यात संबंधित गुरव पुजाऱ्याचा उल्लेख ''परस दरणा बिन् राघ दरणा गुरव पुजारा, स्थानक मौजे जेजुरी'' असा आला आहे. ('दरणा' हा शब्द खंडोबाचे सेवक, भक्त म्हणून गुरव पुजारी यांचा उल्लेख करताना विशेषण

म्हणून वापरला आहे.)

## राजे शहाजी-शिवाजी भेट

इ. स. १६६२ सालची ही ऐतिहासिक-धार्मिक घटना. छत्रपती शिवाजीमहाराजांनी जुलमी मोगल सत्तेचा प्रतिकार करीत अल्पकाळातच हिंदवी स्वराज्याची स्थापना केली होती. दिवसेंदिवस महाराज मोगलांच्या ताब्यातील एक एक गड सर करीत होते आणि त्यावर शिवशाहीच्या वैभवाचा राजबिंडा भगवा ध्वज दिमाखाने फडकत होता. बघता बघता महाराजांच्या कीर्तीने महाराष्ट्राच्या सीमा कधीच पार केल्या. परंतु मुलाचे कौतुक पाहण्यासाठी आणि त्याच्या पाठीवर कौतुकाची थाप देण्यासाठी शिवरायांचे वडील राजे शहाजी इथे नव्हते. शहाजीराजांचे सारे आयुष्य निजामशाही आणि आदिलशाहीमध्ये चाकरी करण्यात गेले. शहाजीराजांना जरी महाराष्ट्रासाठी काही करता आले नाही, तरी त्यांच्या सुपुत्राच्या - शिवबाच्या रूपाने मराठी माणसांचे स्वराज्याचे स्वप्न पुरे झाले होते.

शहाजीराजे कर्नाटकामध्ये आदिलशहाच्या सेवेमध्ये रुजू होते. सलग बारा वर्षे ते घरी आले नव्हते. मात्र, शिवाजीराजांच्या कीर्तीचा डंका त्यांच्याही कानावर निनादत होता. सर्वच कुटुंबीयांना एकमेकांच्या भेटीची ओढ लागून राहिली होती.

शहाजीराजांनी कुटुंबाच्या भेटीचे मनावर घेऊन तब्बल बारा वर्षांनी बेंगळूर (बेंगळुरू) सोडले. मजल दरमजल करीत, तीर्थक्षेत्रांना भेटी देत ते आपल्या घोडदळ-पायदळासह पुण्याकडे येत होते. त्याच वेळेस शिवाजीराजांसह त्यांच्या छावणीचा मुक्काम जेजुरीमध्ये होता आणि शिवाजीमहाराजांना पकडण्याच्या उद्देशाने शाहिस्तेखान पुण्याच्या लालमहालात तळ ठोकून बसला होता. त्यामुळे शहाजीराजे आणि शिवाजीराजे यांची भेट जेजुरीतच होणे हिताचे होते.

बऱ्याच वर्षांनंतर मुखावलोकन (भेट) करायचे झाल्यास ते एखाद्या तीर्थक्षेत्री करावे, असे हिंदूंचे धर्मशास्त्र सांगते. तो शुभशकुनही मानला जातो. शिवरायांनीही जेजुरीतच वडिलांची भेट घ्यायचे ठरवले.

शहाजीराजे जेजुरीला येताच प्रथम त्यांनी गडावर जाऊन खंडोबाचे दर्शन घेतले. आज ज्या ठिकाणी 'अडीच पायऱ्या' आहेत, त्या ठिकाणी पिता-पुत्राने भेट घ्यायचे ठरले. एकमेकांकडे न पाहता साजुक तुपाने भरलेल्या काशाच्या परातीत दोघांनीही पाहिले. आनंदित झालेले परस्परांचे चेहरे दोघांनाही दिसले. नंतर शिवाजीराजांनी वाकून नम्रपणे आपले मस्तक शहाजीराजांच्या चरणावर टेकवले. पिता-पुत्राने एकमेकांना कडकडून मिठी मारली. दोघांच्याही डोळ्यांतून आनंदाश्रू तरळले. असे झाले राजे शहाजी-शिवाजी यांचे 'मुखावलोकन'.

शिवरायांनी आपल्या वडिलांना खास सजवलेल्या पालखीत बसवून आपल्या मुक्कामी निवासाकडे (वाड्याकडे) नेले. गडावर उपस्थित असलेले सर्वजण हा हृद्य सोहळा डोळा भरून पाहत होते. मराठ्यांच्या इतिहासात अजरामर झालेली जेजुरीगडावरील हीच ती 'राजे शहाजी-शिवाजी' भेट. त्या वेळेस शिवाजीराजांचे वय होते पस्तीस वर्षे.[८]

## 'तारीखे दिल्कुशा' ग्रंथातील जेजुरीच्या खंडोबाचे वर्णन

मूळ फारसी ग्रंथ 'तारीखे दिल्कुशा'. लेखक - भीमसेन सक्सेना. या ग्रंथाचा मराठी अनुवाद 'मोगल आणि मराठे' या नावाने सेतू माधवराव पगडी यांनी केला आहे. धर्माने हिंदू असलेले भीमसेन हे मोगलांचे राजनिष्ठ अधिकारी होते. औरंगजेब बादशहाचा चरित्रग्रंथकार म्हणून त्यांची खास ओळख आहे.

भीमसेनांचा जन्म इ.स. १६४९ चा. याच सुमारास भीमसेनांचे वडील रघुनंदन हे बुऱ्हाणपूर येथे मोगलांच्या सेवेत एका लहान हुद्द्यावर कामाला होते. इ. स. १६५२ ला औरंगजेब दख्खनचा सुभेदार म्हणून औरंगाबादला आला. भीमसेन इ.स.१६६५ ला वयाच्या सोळाव्या वर्षी नोकरीनिमित्त बुऱ्हाणपूरवरून औरंगबादेस आले व दक्षिण सुभ्याच्या तोफखाना खात्यात मुश्रफ (हिशोब तपासनीस) म्हणून आपल्या वडिलांच्या जागेवर काम पाहू लागले. औरंगजेबाबद्दल त्यांना एक प्रकारचा दरारा आणि आदर वाटत होता. इ. स. १६७० ला भीमसेनांच्या वडिलांनी आपल्या हुद्द्याचा राजीनामा दिला. भीमसेन आपल्या पन्नास वर्षांच्या काळात फक्त एकदाच म्हणजे इ. स. १६९८ मध्ये काही महिन्यांसाठी उत्तर हिंदुस्थानात गेले होते. त्यांची जवळ जवळ सर्व हयात दक्षिणेत, विशेषतः महाराष्ट्रात गेली. इ. स. १६५७ ते १७०७ चा पन्नास वर्षांचा काळ इतिहासाचा अत्यंत महत्त्वाचा काळ होता. जुल्फिखानाने इ.

स. १७०२ च्या पावसाळ्यात पुरंदरच्या किल्ल्याजवळ छावणी टाकली होती. त्या वेळी भीमसेनांनी जेजुरीची यात्रा केली. तिथेच 'जेजुरीचा खंडोबा'नावाचे वर्णन लिहिले. (याच सुमारास म्हणजे ४ जून १७०२ ला औरंगजेबाने विशाळगडचा किल्ला जिंकून घेतला). 'मोगल आणि मराठे' या ग्रंथातील 'मराठ्यांची झुंज : मोगलांची दुर्दशा' या प्रकरणातील कथा जशी आहे तशी :

**जेजुरीचा खंडोबा :**

''मोगल फौजेची कूच चालू असता वाटेत खंडोबाची जेजुरी लागली. मी आतापर्यंत हे स्थळ पाहिले नव्हते. ते आता पाहण्यात आले. मोठे प्रेक्षणीय स्थान आहे. दक्षिणी लोक महादेवाला खंडेराय या नावाने संबोधतात. येथे एका उंच डोंगराला लागून एक लहान टेकडी आहे. अहमदनगरच्या निजामुल्मुल्काच्या (निजामशहा) काळात नारो राघव नावाचा एक अधिकारी होता. त्याच्या पूर्वजांनी हे देऊळ बांधले. नारो राघव हा शहाजहानच्या काळातील असून तो हजारी मन्सबदार होता. जेजुरीगाव हे पायथ्यापाशी आहे. तेथून वर देवळापर्यंत चारशे दगडी पायऱ्या आहेत. वर टेकडीवरील देवळाची बांधणी किल्ल्यासारखी आहे. प्रवेशद्वार मोठे आहे. आत शिरताच दगडी फरशी ओलांडल्यावर एक सभागृह लागते. त्यातच एक गर्भागार आहे. आत दोन कबरी (थडगी) दृष्टीस पडल्या. कबरीला लागून एक दगड होता. मी पुजाऱ्याला विचारले की, हा दगड कशाचा आहे आणि या कबरी कशाच्या आणि कुणाच्या? त्यांनी सांगितले की, या डोंगराला खंडेरायाचा डोंगर म्हणतात. हा दगड म्हणजे दक्षिणच्या लोकांचे मोठे तीर्थस्थान आहे. वर्षातून एकापेक्षा अधिक वेळा येथे मोठी जत्रा भरते. त्या वेळी खूप गर्दी होते. लोकांची खंडोबावर फार भक्ती आहे. शिवाजी हा फार मोठा भक्त होता. त्याने अनेक धार्मिक इमारती बांधल्या.

या सुमारास मुसलमानांचा जोर वाढला. त्यांच्या आक्रमणापासून देवळाचे रक्षण व्हावे म्हणून तेथील पुजारी आणि मराठे हे एक झाले. खंडोबाच्या विग्रहावर त्यांनी दोन कबरी (समाध्या) बांधल्या आणि जाहीर केले की, या कबरी मल्लुखानाच्या होत. डोंगरावर पाणी नाही. वर पाणी असते तर डोंगरावर चांगला किल्ला बांधता आला असता. डोंगराच्या पायथ्याशी, जेजुरीच्या गावाजवळ एक मोठी विहीर आहे. कित्येक शेतकरी आणि मराठे या देवाला नवस मागून घेतात. कित्येक लोक नवस फेडण्यासाठी आपली मुले देवाला अर्पण करतात. अशा मुलांना खंडोबाची मुले समजतात. (संग म्हणजे दगड समजतात) काही मूर्ख माणसे देवाला मुली अर्पण करतात. त्यांना मुरळ्या म्हणतात. या ठिकाणी मराठ्यांनी बांधलेली घरे आढळली.'' [१]

## औरंगजेब बादशहा आणि सव्वा लाखाचा भुंगा

मोगल सम्राट औरंगजेब बादशहाने दक्षिणेत पाऊल टाकताच हिंदूंच्या देवतांना बाटवून मंदिरे उद्ध्वस्त करण्याचा सपाटा लावला होता. पुरंदर या मराठी मुलखात येताच कोरीव शिल्पकामासाठी प्रसिद्ध असलेल्या भुलेश्वर मंदिराचा आणि मूर्तींचा विध्वंस करून त्याने आपला मोर्चा जेजुरीच्या खंडेरायाकडे वळविला. ही वार्ता जेजुरीत समजताच गडाचे सर्व दरवाजे बंद करण्यात आले. मोगलांची स्वारी किल्ले जेजुरीवर धडकताच गडावरील सर्व दरवाजे बंद करून मुख्य प्रवेशद्वाराच्या उजव्या बाजूला उभ्या राहिलेल्या हत्यारबंद 'यशवंत रखवालदाराला' पाहून यवन भयंकर संतापले. त्यांनी यशवंत रखवालदाराला ठार करून त्याच ठिकाणी गड उडवून द्यायच्या हेतूने, सुरुंग भरण्यासाठी भिंतीला एक मोठे छिद्र पाडले. सुरुंग भरून बत्ती द्यायचा अवकाश, तोच एक आक्रित घडले ...

त्या छिद्रातून अगणित काळे, टपोरे भुंगे बाहेर पडून मुघल सैन्यावर तुटून पडले. सैन्याच्या सर्वांगाचा चावा घेऊ लागले. असंख्य सैनिक घायाळ होऊन भूमीवर विव्हळत पडले तर काही सैनिक घोड्यावर बसून कऱ्हा नदीच्या दिशेने पळू लागले. भुंग्यांनी त्यांचाही जवळ जवळ पाच कोस पाठलाग केला.

गडाच्या पायथ्याशीच थांबलेल्या औरंगजेबाला जेव्हा हा प्रकार समजला, तेव्हा तो देवाच्या या करामतीने पुरता घाबरला आणि खंडेरायाची करुणा भाकू लागला, क्षमायाचना करू लागला. ''हे मल्लुखान, तुला सव्वालाखाचा सोन्याचा भुंगा अर्पण करीन, परंतु हे भुंगे परत बोलावून घे. मी चुकलो. मला क्षमा कर !'' असा नवस त्याने देवाला केला. नंतर काही वेळातच सर्व भुंगे अदृश्य झाले.

पुढे काही दिवसांनंतर स्वत: औरंगजेब बादशहा जेजुरी गडावर दर्शनाला आला व त्याने सव्वा लाख मोलाचा सोन्याचा भुंगा भक्तीभावाने खंडेरायाच्या चरणी अर्पण केला. 'मल्ल' राक्षसाचा वध करणाऱ्या मल्हारी मार्तंडाची औरंगजेबाने 'मल्लुखान' म्हणून प्रार्थना केली. तेव्हापासून मुसलमानांचाही हा 'मल्लुखान' (खंडोबा) आराध्य दैवत बनला. ज्याने खंडेरायाच्या भक्तीपोटी आपल्या जीवाची बाजी लावली, त्याच 'जयाद्रिवासी' यशवंतराव

रखवालदाराचे हे प्रसिद्ध श्रद्धास्थान आणि ज्यातून असंख्य भुंगे बाहेर पडून मुघल सैन्याची दाणादाण उडवून दिली, तेच हे छिद्र. औरंगजेबाचा या भागातला वावर पाहता ही घटना साधारण १७०० ते १७०७ या काळात घडली असावी, असे वाटते.[१०]

औरंगजेबाने वाहिलेला सोन्याचा भुंगा पुढे उमाजी नाईकांनी चोरून नेला असा उल्लेख महाराष्ट्र शब्दकोषामध्ये आला आहे.[११] परंतु हे साफ खोटे आहे. उमाजी नाईकांची खंडोबा भक्ती उच्च कोटीतली होती. असा अपराध उमाजी नाईकांच्या हातून घडणे त्रिवार शक्य नाही. पूणा गॅझेटियर ग्रंथामध्ये सदर सोन्याचा भुंगा कोळी किंवा देवाचे पुजारी यांनी चोरला असल्याचे नमूद केले आहे.

"The story is that as the Musalmans were beginning to break the carved work a swarm of horhets came out of this hole, put them to fight and so convinced them of the power of the God that they gave up the attempt to harm the temple. Aurangzeb (1658-1707) to show his respect for the God, is said to have presented the temple with a diamond worth (L. 12, 500) Rs.1.4 lakhs. The diamond remained in the temple till 1850-51, when it was robbed by kolis and temple servants."[१२]

## पानसे घराण्याची खंडोबाभक्ती

### १) जेजुरी येथील खंडेरावांची तलवार :

महिपतराव लक्ष्मण व रामराव लक्ष्मण पानसे यांनी जेजुरीच्या खंडेरावास एक मोठी कासवाच्या पाठीची ढाल व वजनदार तलवार (तेगा) अर्पण केली आहे. तलवारीवर या दोघांची नावे कोरलेली आहेत. तलवार फारच जड असून सुमारे ८-९ शेर (४२ किलो) वजनाची आहे. हल्ली या दोन्ही जिनसा जेजुरी येथे देवळात देवाजवळ ठेवलेल्या असून भक्तास पाहावयास मिळतात.[१३]

### २) सोनोरीचा मल्हारगड :

सह्याद्रीचा जो एक फाटा पुरंदर किल्ल्याच्या उत्तरेस पूर्व-पश्चिम पसरला आहे, त्यावर दिवे घाटाच्या पूर्वेस सुमारे तीन मैलांवर एका सुळक्यावर हा किल्ला माधवराव कृष्ण व भीमराव यशवंत पानसे (मराठ्यांच्या तोफखान्याचे मुख्य सरदार) यांनी बांधला आहे. हा किल्ला सोनोरी गावाच्या हद्दीत असून, गावाच्या उत्तरेस सुमारे मैलभर अंतरावर आहे. या कामास शके १६८५ (इ. स. १७६३) मध्ये सुरुवात होऊन पुढे तो दोन वर्षांनी पुरा झाला. (शके १६८७ - इ. स. १७६५) तटाचा पाया खोदत असताना एके ठिकाणी रक्त वाहू लागले, तेव्हा त्या ठिकाणी मल्हारीचे वास्तव्य आहे, असे समजून पानशांनी त्याची प्रार्थना केली की, किल्ल्यास मी आपले नाव देईन. प्रार्थना पुरी होताच रक्त वाहणे बंद झाले. पुढे या प्रार्थनेप्रमाणे मल्हारीची स्थापना करून किल्ल्यास 'मल्हारगड' असे नाव दिले. किल्ल्यात एक मल्हारीचे व एक महादेवाचे अशी दोन देवळे आहेत. मल्हारी व शंकर यांची ही दोन देवळे माती व दगडांनी बांधलेली असून, त्यास उत्तम नक्षीदार शिखरे आहेत. म्हाळसेसह घोड्यावर बसलेली मल्हारीची मूर्ती काळ्या पाषाणाची आहे.[१३]

### ३) पानसे घराण्याचे खंडोबा मंदिर :

सोलापूर जिल्ह्यातील बार्शी तालुक्यात बार्शी रोड स्टेशनपासून उत्तरेस सहा कोसांवर असलेल्या पानगावमध्ये हे मंदिर आहे. हे मंदिर गावालगत पूर्वेस शिवाजी खंडेराव पानसे यांनी शके १६९९ साली बांधले. मंदिर दगडी असून आत खंडेरावाची मूर्ती काळ्या पाषाणाची आहे. देवाचे पुजारीपण पानगाव येथील 'खानदारे' या आडनावाच्या मराठी घराण्याकडे चालू आहे. त्यास पूजा व इतर खर्चाबद्दल पानसे यांनी तीस बिघे जमीन इनाम करून दिली आहे. ही इनाम जमीन त्या घराण्याकडे अद्याप चालू आहे.[१३]

### ४) पानसे घराण्यातील व्यक्तींची खंडोबावरून नामावली

महिपतराव पानसे, खंडेराव पानसे, मल्हार तथा मलबा पानसे ही सर्व नावे खंडोबावरून ठेवलेली आहेत. यावरून पानसे घराण्यावरील खंडोबाचा प्रभाव जाणवतो.

## नाना फडणीसांचा खंडोबाला नवस

पेशवाईत नारायणराव पेशव्यांचा खून आनंदीबाईने गारद्यांकरवी केला. त्या वेळी नारायणराव पेशव्यांची पत्नी गंगाबाई गरोदर होती. तिला मुलगा व्हावा म्हणून नाना फडणीसांच्या नेतृत्वाखाली बारभाईंनी खंडोबाला एक लक्ष रुपयांचा नवस केला. पुढे सवाई माधवराव पेशव्यांच्या जन्मानंतर स्वत: नाना फडणीसांनी जेजुरीला जाऊन नवस फेडला. २५ हजारांपेक्षा जास्त किमतीचा एक चांदीचा जोड देवाला अर्पण केला (खंडोबा-म्हाळसा मूर्ती). जोडाची किंमत वजा जाऊन राहिलेल्या शिलकेतून देवालयाच्या गाभाऱ्यातील छत चांदीने मढविण्यात आले. याशिवाय चांदीच्या शाळुंका, घंगाळ, लिंगावरील कवचे, त्यावर विशेष प्रसंगी चढवावयाचे मुखवटे, छत्री, तुरा वगैरे अलंकार देवाला अर्पण करण्यात आले.[१४]

## होळकर घराण्याची खंडोबाभक्ती

### १) पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकरांची खंडोबाभक्ती :

सुभेदार मल्हारराव होळकर, पुण्यश्लोक अहिल्याबाईंप्रमाणेच इंदूरचा प्रत्येक होळकर खंडेरायाचा निस्सीम भक्त होता. प्रत्येकाच्या मनात खंडेरायाबद्दल पवित्र भक्तिभाव होता.

‘पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर यांनी अनेक मंदिरांना देणग्या दिल्या हे सर्वज्ञात आहेच. जेजुरीस त्यांनी मल्हारी गौतमेश्वरांची छत्री तसेच महादेवाचे देवालय बांधले. यात्रेकरुंना पिण्याच्या पाण्याची सोय म्हणून तलाव बांधला. तर यात्रेकरूनां सावली मिळावी म्हणून चिंचेची बाग निर्माण केली. तसेच देवस्थानाभोवतीच्या तटाच्या डागडुजीचे कामही केले. त्यांनी इ. स. १७७२ साली जेजुरीच्या मार्तंडाला नवस केला. तो इ. स. १७७८ साली फेडला. नवस फेडण्यासाठी त्यांनी ५०,००० रुपये खर्च केले.[१५] जेजुरी येथील मंदिरातील एका खांबावर ‘श्री म्हालसाकांत चरणी तत्पर मल्हारजी सुत तुकोजी होळकर’ असा शिक्का अहिल्याबाईंच्या विद्यमानेच कोरलेला आहे.’[१६]

### २) सुभेदार तुकोजी होळकरांचे अहिल्याबाईस पत्र :

‘कर्मयोगिनी’ या अहिल्याबाईंवरील ऐतिहासिक कादंबरीत उत्तरेकडील लढाईमध्ये होळकरांना विजय मिळाल्यानंतर तुकोजीने अहिल्याबाईंना पाठवलेल्या पत्राचा मचकूर उद्‌धृत करण्यात आला आहे. या पत्रात तुकोजीच्या खंडेरायावरील अपार श्रद्धेचे दर्शन घडते. मचकूर पुढीलप्रमाणे :

तिर्थरूप मातोश्रीस चिरंजीव तुकोजीचा शि. सा. प्रणिपात,

आपल्या आशीर्वादे तलवार माफक-हुकूम चालू आहे. शिंदे आणि रामचंद्र गणेश यांचे मनी आम्हास फिके पाडावे. बक्षीवर आम्हाला अकेले धाडले... आम्हीही त्याचे डोके कापून आणून फौज बरबाद केली. हे समजताच रोहिले चालून आले. त्यांचे कुळ बर्बाद केले. **‘‘त्या रात्री साक्षात मार्तंडे दर्शन दिले. निळा घोडा, पांढरा पोशाख, खांद्यावर भाला, पाठी भांडार असा समोर येऊन बोलला, ‘धनगरा उठ, आठ अक्षरी मंत्राचा जप करू नको. मी पुढे चाललो, तू मागे कूच करून ये,’ जाग आली तो स्वार गेल्याचा भास. तो नगारखान्याचा जमादार म्हणतो, ‘‘तीन डंके नौबतीवर झाले पण वाजवणारा गायब. हे श्रवण करताच हिमत आली.’’** आपल्या फौजेसुद्धा कूच केले. जाटाची गाठ पडताच गोळीगोळी... तो सारे मागेच सिंदे, रामचंद्र गणेश फौजसुद्धा कूच करून आले. धूमसान लढाई झाली. शिद्यांनी, गणेशांनी लूट बहुत केली. लढाई आम्ही मारली. अखेर शिंदे व विसाजीपंत आणि आपण अशी तिन्ही लष्कराची लूट जबरदस्ती एकत्र करून रूरयात न ठेवता समान वाटून दिली. **मार्तंडाची कृपा धनगरावर...** आपण स्वस्थ असावे.[१७]

आपला पुत्र,

तुकोजी

(शब्दार्थ : आठ अक्षरी मंत्र = ‘काय करू कसे करू’, रूरयात = भीडभाड)

### ३) खंडेराव होळकरांची राजमुद्रा :

या मुद्रेचा उपयोग १७९९ पासून सुरू केला. कुंभेरी येथील युद्धात वीरमरण आलेले सुभेदार मल्हारराव होळकरांचे एकुलते एक कुळपुत्र खंडेराव महाराज यांच्या नावाची ही मुद्रा असून शिरोभागी जी 'श्री' आहे तिच्या एका बाजूस चंद्रकोर व दुसऱ्या बाजूस सूर्य दाखविला आहे. काही ठशातून 'श्री'च्या दोन्ही बाजूस बारीक वर्तुळे आहेत. आतील मजकुरात मलहारजी व मल्हारजी अशी नामाक्षरे दृष्टीस पडतात. सूर्यदर्शक किरणे नसलेले साधे वर्तुळ डाव्या बाजूस व चंद्रकोर उजव्या बाजूस असे काही ठसे आहेत.[१८]




### ४) यशवंतराव होळकरांची राजमुद्रा :

१७९९ मध्ये स्वत:च्या नावाचा यशवंतराव होळकरांनी शिक्का तयार केला होता. तो वर्तुळाकारच होता. 'श्री'च्या डाव्या-उजव्या बाजूस अनुक्रमे चंद्रकोर व किरणाचा सूर्य दिसतो. आत वरीलप्रमाणे पहिल्या दोन ओळी आहेत. तिसऱ्या ओळीत 'तुकोजी सुतय', चौथीत 'यशवंतराव हो', पाचवीत 'लकरम' अशी अक्षरे आहेत.[१८]




## नागपूरकर भोसल्यांची खंडोबाभक्ती

सालबाईच्या तहानंतर नागपूरकरांनी (भोसले) पुणे दरबारशीं आपला स्नेहसंबंध दृढ करीत नेला. मागील युद्धांत भोसल्यांनीं इंग्रजांस साहाय्य केलें, हा मोठा दंश पुणेकरांच्या मनात होता. तो घालविण्यासाठीं सवाई माधवरावाच्या लग्नात भोसल्यानीं आपले दोन वकील, बाळाजी विष्णु व भवानी काळो यांस पोषाख देऊन पुण्यास पाठविले. त्या वेळीं नानानें त्यांस इतकाच जबाब दिला कीं, 'लवकरच टिपूवर मोहीम होईल, त्यात भोसल्यांनीं भाग घ्यावा, म्हणजे त्यांजवरचा आमचा राग दूर होईल.' पुढे सन १७८५ च्या बदामीच्या स्वारीत त्यांस बोलावणें गेल्यावरून मुधोजी भोसले तयारीनें निघाला. बरोबर त्याची बायको चिमाबाई व गोतावळा जेजुरीस खंडोबाच्या दर्शनास व छत्रपतीच्या भेटीस म्हणून निघाली. पुण्याहून उभय भोसले आपल्या पाटीलकीच्या मूळगाव वाईजवळ देऊर म्हणून आहे तेथे गेले. तिकडून चिमाबाई वगैरे मंडळी जेजुरीस व साताऱ्यास जाऊन परत देउरास आली. तेथून सर्व कुटुंब समारंभानें सन १७८५ अखेर नागपुरास दाखल झालें.[१९]

## जेजुरीच्या खंडोबाचा 'भगत' कोण? - एक आंग्रेकालीन तंटा

सरखेल पहिले रघोजी यांच्या कारकिर्दीत कोळी लोकांचा खरा भगत कोण हा तंटा विशेष करून उफाळला. हा जुना तंटा काही केल्या मिटेना. कानोजी भगत हा कोळी लोकांचा भगत होत आहे, हे पाहून कमळोजी नावाचा मनुष्य आपण खरा भगत म्हणून दावा मांडून बसला. तेव्हा हा तंटा सोडविण्यासाठी रघोजी आंग्रेंनी तळकोकणच्या सोनकोळी लोकांचे पोस पाटील, सरपाटील व कारकून विष्णुपंत यांना पुण्याला त्या वेळी पेशव्यांच्या गादीवर असलेले श्रीमंत सवाई माधवराव यांच्याकडे पाठविले. दरबारात तंट्याची कैफियत ऐकण्यात आली; पण तेथेही तत्त्वतः निर्णय होऊ शकला नाही. यास्तव पेशव्यांनी आज्ञा केली की, 'हा तंटा जेजुरीचा देव खंडेराय यांचा असल्याने तो देवांनी निवडावा.' या वेळेस पेशव्यांकडून कृष्णाजी देशमुख व गोपाळराव पंडित, रघोजी आंग्र्याकडील वरील निर्दिष्ट मानकरी आणि वादी व प्रतिवादी यांना जेजुरीस पाठविण्यात आले. मकाजी लांगे व इतर पुजाऱ्यांच्या उपस्थितीत

खंडोबाला कौल लावण्यात आला. असे सात वेळा कौल लावण्यात आले. असे प्रसाद दिले की, कोकणामधील सोनकोळी ज्ञातीत कानुचे भक्तीस मी गेलो असे देव बोलिला. ते प्रसाद सात वेळा लाविले ! त्यानुसार भक्तांनी कानु भगत हे गुरू याचे समजून त्यांचे आज्ञेने चालावे. जो कोणी भगत होईल तो काही एक कानुभक्ताचे आज्ञेशिवाय चालो नये जो न चालेल त्याला फार देवाची अडचण आहे.' हा निर्णय पहाता कौल लावण्याखेरीज अंगात वारे आणूनही निर्णय घेतला असल्याचा संभव आहे. हे सांगण्यासाठी सर्वजण पुण्यात गेले. या वेळेस देवाच्या हुकमावरून व सरकारच्या आज्ञेवरून कानोजी भगतला पेशव्यांनी सनद दिली.[२०]

## ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड-९ : भा.इ.सं.मंडळ स्वीय ग्रंथमाला क्र.८७

**१) करवीर पीठाधीश शंकराचार्यांकडून जेजुरीच्या खंडोबास हत्तीदान :**

इ.स.१७९४ च्या सुमारास करवीर पीठाचे शंकराचार्य यांनी जेजुरीच्या खंडेरायास एक हत्ती वाहिला (अर्पण केला) होता. पुढे तो हत्ती आजारी पडला. तेव्हा त्याला उपचारासाठी पुण्यात आणले होते. पुण्यामध्ये त्याच्या खुराकासाठी आणि औषधासाठी केलेल्या खर्चाच्या नोंदी सापडतात. त्यामध्ये खुराकासाठी कणीक, तूप, गूळ, मीठ आणि औषधासाठी हिंग, अफू, सुवनागीच्या नोंदी आढळतात. पुढे हा हत्ती पुण्यातच मेला. त्याची पूजा करून दफनही पुण्यात करण्यात आले. पूजेच्या वेळी वापरण्यात आलेले जिनस नारळ, साखर, शेंदूर, तूप, गुलाल, बुक्का यांच्यादेखील नोंदी आढळतात. हा सर्व खर्च पेशव्यांनी केला. (पत्र क्र.५७-५८.)[२१]

**२) जेजुरीच्या खंडेरायास हत्तीचा नवस :**

मराठेशाहीतील प्रसिद्ध सरदार चत्रौजी बांडे यांना मूलबाळ नव्हते. म्हणून ते जेजुरीच्या खंडेरायाच्या यात्रेस गेले असता त्यांनी नवस केला, 'मला पुत्र झाला तर मी खंडोबाचरणी एक हत्ती वाहीन.' त्याप्रमाणे त्यांना पुत्र झाला. तेव्हा त्यांनी नवस फेडावयाचे ठरविले. त्या वेळचा खंडोबाचा पुजारी राघोजी याच्यामार्फत देवाकडे नवस केला होता. तेव्हा तो नवसाचा हत्ती राघोजी पुजाऱ्याच्या हवाली केला. त्या पुजाऱ्याने तो हत्ती देवाच्या सेवेत रुजू न करता परस्पर विकून टाकला. हे वर्तमान समजल्यानंतर थोरले बाजीराव पेशवे यांनी या प्रकरणाची चौकशी केली व तो हत्ती देवस्थानला खंडोबाच्या सेवेत रुजू करण्याची देवस्थानला आज्ञा केली. (पत्र क्र.५३, ५४, ५५.)[२१]

## राजवाडे खंडातील 'जेजुरी-खंडोबा' विषयीचे पेशवेकालीन संदर्भ

**राजवाडे खंडातील जेजुरीच्या खंडोबा विषयीचे पेशवेकालीन स्फुट संदर्भ :**[२२]

१) शके १५३० (इ.स.१६०८) च्या सुमारास नरसोजी मोकदम (पाटील) हे जेजुरीचे पाटील होते. (राजवाडे खंड क्र.१८, पत्र क्र.३.)

२) शके १६०७ (इ.स.१६८५) च्या सुमारास त्यावेळच्या लष्करी हालचालीमुळे व लष्करी धामधुमीमुळे जेजुरीमध्ये किर्द (पिकांची लागवड) झालेली नाही. यवनांच्या आक्रमणामुळे या काळात जेजुरी गाव वैराण झाले होते, असे तेथील पाटलांनी लिहून दिलेल्या नोंदीवरून दिसून येते. (राजवाडे खंड क्र. ११, पत्र क्र. २६)

३) २७ जानेवारी १७३६ या दिवशी छत्रपती शाहूमहाराज सातारकर आणि पुण्याचे चिमाजीआप्पा पेशवे यांची जेजुरी मुक्कामी भेट झाली. ते दोघेही जेजुरी येथे खंडेरायाच्या दर्शनाला आले होते. (राजवाडे खंड क्र.२.)

४) ४ जानेवारी १७३७ रोजी चिमाजीआप्पा पेशवे पुन्हा खंडेरायाच्या दर्शनाला जेजुरीला आले होते. (राजवाडे खंड क्र.२.)

५) शके १६६१, कार्तिक वद्य २, इ.स.१७३९ ला थोरले बाजीराव पेशवे जेजुरीला खंडेरायाच्या दर्शनासाठी गेले होते. (राजवाडे खंड क्र.६., पत्र क्र.१)

६) २४ मे १७४७ च्या सुमारास नानासाहेब पेशवे आणि कर्नाटक मोहिमेवर पराक्रम गाजवून आलेले सदाशिवभाऊ पेशवे यांची जेजुरी मुक्कामी भेट झाली. दोघांनीही तेथे खंडेरायाचे दर्शन घेतले. (राजवाडे खंड क्र.२.)

७) **इ.स.१७४९ च्या सुमारास साताराचे छत्रपती शाहूमहाराज यांच्या धाकट्या पत्नी आजारी पडल्या. त्यांच्या अंतिम इच्छेप्रमाणे छत्रपती शाहूमहाराज त्यांना घेऊन 'जेजुरी खंडोबा'च्या दर्शनाला आले. तिथेच त्यांचा मृत्यू झाला. नंतर त्यांचे पार्थिव साताऱ्याजवळील माहुली संगमावर आणून त्यांच्यावर अंत्यसंस्कार करण्यात आले.** (राजवाडे खंड क्र.२.)

८) कार्तिक शुद्ध ९, शके १६७१ (इ.स.१७४९) या दिवशी नानासाहेब पेशवे यांनी सदाशिवराव पेशवे यांस पत्र पाठवून जेजुरीच्या खंडेरायाच्या यात्रेसाठी काही सामान (डेरे, राहुट्या व कमानी) पाठविण्याची विनंती केली. (राजवाडे खंड क्र.६, पत्र क्र. १९६.)

९) नानासाहेब पेशव्यांचे कारभारी सासवडचे महादजी आबाजी पुरंदरे हे शके १६७३, इ. स. १७५१ श्रावण वद्य ३ या दिवशी सहकुटुंब जेजुरीला खंडेरायाच्या दर्शनाला गेले होते. (राजवाडे खंड क्र.६., पत्र क्र.१)

१०) महाराष्ट्रातील अनेक भावबंदकीच्या तंट्याचे न्यायनिवाडे जेजुरीच्या मंदिरासमोरील कासवावर 'दिव्य' करून खंडेरायाच्या साक्षीने होत होते. (प्रथम होम पेटवून धार्मिक पूजा-अर्चा केली जाते. नंतर त्यावर कढई ठेवून त्यात गोडेतेल ओतले जाते. उकळलेल्या तेलामध्ये रुपयाच्या आकाराचे जुने नाणे टाकले जाते व ते नाणे उकळत्या तेलात हात घालून काढण्याच्या क्रियेला 'दिव्य' असे म्हटले जाते. आता हा प्रकार आढळत नाही.)

आमळे गावच्या दरेकर बंधूंमधील (भाऊबंदकीतील) तंट्याचा न्यायनिवाडा जेजुरी येथील मंदिरासमोरील कासवावर दिव्य करून खंडेरायाच्या साक्षीने इ.स.१७५४ मधील आश्विन शुद्ध १२, शनिवार या दिवशी झाला, अशी नोंद आढळते. (राजवाडे खंड क्र.६, पत्र क्र. १.)

११) पेशव्यांतर्फे पुण्यावरून दर मकर संक्रांतीच्या सणानिमित्त महाराष्ट्रातील अनेक देव-देवतांना तिळगूळ पाठविण्याची रीत होती. त्यामध्ये जेजुरीचा खंडोबा, कोल्हापूरची महालक्ष्मी, पन्हाळ्याचा ज्योतिबा, पंढरपूरचा विठोबा, तुळजापूरची तुळजाभवानी, औंधची यमाई, महाबळेश्वर-प्रतापगडावरील भवानी यांचा समावेश होता. इ. स. १७५६ साली आलेल्या मकर संक्रांतीनिमित्त वरील दैवतांना तिळगूळ पाठविल्याची नोंद आढळते. (राजवाडे खंड क्र.६, पत्र क्र.४१२.)

१२) आश्विन वद्य ९, शके १६७९ (इ.स.१७५७) शनिवार या दिवशी नानासाहेब पेशवे पुण्यावरून जेजुरी (खंडोबा), मोरगाव (गणपती), कुरकुम (यमाई) या तीन देवस्थानांच्या दर्शनयात्रेला गेले होते. (राजवाडे खंड क्र.२, पत्र क्र.१.)

१३) इ.स. १७६१ च्या सुमारास पुण्यावरून रघुनाथराव पेशवे, माधवराव पेशव्यांसह जेजुरीला खंडेरायाच्या दर्शनाला आले होते. (राजवाडे खंड क्र.१.)

१४) महादजी शिंदे यांच्या पत्नी बयाबाई शिंदे या भाद्रपद वद्य सप्तमी, बुधवार या दिवशी खंडेरायाच्या दर्शनार्थ जेजुरीला मुक्कामी होत्या. (शके १७२१ - इ.स. १७९९) (राजवाडे खंड क्र.७.)

१५) चैत्र वैद्य १४, शके १६९६ (इ. स. १७७४) च्या सुमारास जेजुरीमध्ये हरिभक्त परायण राजेश्री 'मार्तंडबाबा' म्हणून थोर सत्पुरुष राहत होते. साबाजी भोसले सेनासाहेब सुभा (नागपूरकर भोसले) हे त्यांना गुरुस्थानी मानत होते. १७७४ सालच्या सुमाराला जेजुरी परिसरात युद्धाची धामधूम चालू असल्याने साबाजी भोसल्यांनी नाना फडणवीसांना पत्र पाठवून 'आपले गुरू मार्तंडबाबा यांना पुरंदर किल्ल्यावर आश्रय द्यावा. ते व त्यांच्या कुटुंबीयांच्या वास्तव्यासाठी किल्ल्यावरील एक घर द्यावे,' अशी विनंती पत्राने केली. (राजवाडे खंड क्र.१०, पत्र क्र.१२७.)

१६) साबाजी भोसले सेनासाहेब सुभा यांचे कारभारी लक्ष्मणराव बल्लाळ हे नाना फडणवीसांना पाठविलेल्या पत्रात (वैशाख शुद्ध १, शके १६९६ - इ.स. १७७४) सांगतात, ''हरिभक्त परायण राजेश्री 'मार्तंडबाबा', वास्तव्य जेजुरी हे राजेश्री सेनासाहेब सुभा यांचे गुरू आहेत. किल्ले पुरंदर येथे त्यांच्यासाठी घराची सोय करून द्यावी... ते थोर तपस्वी आहेत... जेजुरलिंगही (खंडेराय) यांस प्रत्यक्ष प्रसन्न आहे... ते निःस्पृह आहेत... जे सांगतील त्याप्रमाणे घडते... आम्हावर त्यांची कृपा आहे... आपली भेट झाल्यावर आपल्यासही त्याचा प्रत्यय येईल.'' (राजवाडे खंड क्र.१०, पत्र क्र.१३२.)

१७) शिळीमकर देशमुख गुंजनमाळ यांच्या भाऊबंदकीच्या तंट्याचा न्यायनिवाडा जेजुरी मंदिरासमोरील कासवावर दिव्य करून खंडेरायाच्या साक्षीने झाला. (भाद्रपद शुद्ध २, शके १७१८ - इ. स. ३ सप्टेंबर १७९६) (राजवाडे खंड क्र.१७, पत्र क्र.२.)

१८) शके १७२२ (इ.स.१८००-१८०१) च्या मार्गशीर्ष महिन्यात दुसऱ्या बाजीराव पेशव्यांचा जेजुरीमध्ये मुक्काम होता. नंतर ते खंडेरायाचे दर्शन घेऊन पुढे मोरगावी गणपतीचे, नंतर भुलेश्वराचे व शेवटी पुरंदराच्या पायथ्याशी असलेल्या नारायणेश्वराचे दर्शन घेऊन पुण्यास आले. (राजवाडे खंड क्र.७.)

### खंडोबाच्या नावावरून ठेवलेली काही ऐतिहासिक मराठे वीरांची नावे

भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे-३० येथील ग्रंथालयातील शाहू आणि पेशवे दप्तरातून मिळालेली 'खंडोबा'च्या नावावरून ठेवलेली काही मराठे वीरांची नामावली. एखाद्या व्यक्तीनामाचा दोन्ही दप्तरामध्ये समावेश असेल तर त्याच्या नावापुढे * अशी खूण करण्यात आली आहे.

### अ) शाहू दप्तर

**''ख''**

| | | |
|---|---|---|
| १) खंड गोसावी | २) खंड प्रभू चिटणीस | ३) खंडभट अनंतभट |
| ४) खंडभट उपाध्ये | ५) खंडभट शाळिग्राम | ६) खंडसेट |
| ७) खंडागळे | ८) खंडेराव अनंत | ९) खंडेराव काशी न्यायाधीश |
| १०) खंडेराव गुजर | ११) खंडेराव चिटणीस* | १२) खंडेराव जाधव |
| १३) खंडेराव तानदेव | १४) खंडेराव त्रिंबक* | १५) खंडेराव दाभाडे* |
| १६) खंडेराव देव | १७) खंडेराव देवकस | १८) खंडेराव देशकुलकर्णी |
| १९) खंडेराव पानसंबळ | २०) खंडेराव पोळ* | २१) खंडेराव प्रभू |
| २२) खंडेराव फडणीस | २३) खंडेराव बंडगर | २४) खंडेराव भोसले |
| २५) खंडेराव यादव | २६) खंडेराव सुंदर | २७) खंडो अनंत |
| २८) खंडो कृष्ण | २९) खंडो गोविंद | ३०) खंडो जगन्नाथ |
| ३१) खंडो जगन्नाथ बोकील | ३२) खंडो देशपांडे | ३३) खंडो नरसिंह |
| ३४) खंडो पाठक | ३५) खंडो पानसे | ३६) खंडो बल्लाळ चिटणीस* |
| ३७) खंडो बहुधान्य | ३८) खंडो बाबाजी | ३९) खंडो बाळाजी |
| ४०) खंडो भगवंत | ४१) खंडो मल्हार | ४२) खंडो माणकेश्वर |
| ४३) खंडो मुकुंद होनप | ४४) खंडो मैराळ | ४५) खंडो शिंदे |
| ४६) खंडो शिवदेव पानसे | ४७) खंडोजी काकडे | ४८) खंडोजी काटे |
| ४९) खंडोजी कांबळा | ५०) खंडोजी कोकरकर | ५१) खंडोजी खंडागले (ळे) |
| ५२) खंडोजी खोपडा | ५३) खंडोजी गायकवाड | ५४) खंडोजी गुजर |
| ५५) खंडोजी गोगावले | ५६) खंडोजी गोरे | ५७) खंडोजी गोसावी |
| ५८) खंडोजी चव्हाण | ५९) खंडोजी जगताप | ६०) खंडोजी जगन्नाथ |
| ६१) खंडोजी जाधव | ६२) खंडोजी तावरे | ६३) खंडोजी दळवी |
| ६४) खंडोजी धनवडे | ६५) खंडोजी धावडसर | ६६) खंडोजी धुमाळ |
| ६७) खंडोजी नरसाले (ळे) | ६८) खंडोजी नाथ | ६९) खंडोजी निकम |
| ७०) खंडोजी पवार | ७१) खंडोजी पाटील | ७२) खंडोजी पातगुडे |
| ७३) खंडोजी फडकरी | ७४) खंडोजी बंडगर | ७५) खंडोजी महार्णवर |
| ७६) खंडोजी मुंगळे | ७७) खंडोजी वाईल | ७८) खंडोजी होळकर |
| ७९) खंडोजी मानकर | ८०) खंडोजी वणजरे | ८१) खंडोजी सालोखी |

**''म''**

| | | |
|---|---|---|
| १) मलोजी गाढवे | २) मलोजी निंबाळकर | ३) मलोजी पवार |

**''म''**

| | | |
|---|---|---|
| १) मल्हार अनंत | २) मल्हार अनंत फडणीस | ३) मल्हार कृष्ण* |
| ४) मल्हार खंडेराव* | ५) मल्हार खंडेराव चिटणीस | ६) मल्हार खंडेराव फडणीस |
| ७) मल्हार गोविंद* | ८) मल्हार गोसावी | ९) मल्हार जगजीवन |
| १०) मल्हार जोशी कुलकर्णी | ११) मल्हार जोशी केचळे | १२) मल्हार तुकदेव* |
| १३) मल्हार त्रिंबक | १४) मल्हार दादाजी | १५) मल्हार दादाजी प्रभू (चिटणीस) |
| १६) मल्हार सबनीस | १७) मल्हार नरसिंह | १८) मल्हार नाईक (ख्रिस्ते) |
| १९) मल्हार नाईक सरवदे | २०) मल्हार नाईक साखरे | २१) मल्हार नारायण |

२२) मल्हार पुरंदरे
२३) मल्हार प्रभू
२४) मल्हार बल्लाळ
२५) मल्हार बुचके
२६) मल्हार भास्कर कुलकर्णी
२७) मल्हार भिकाजी गोखले (रास्ते)
२८) मल्हार मिरसीकार
२९) मल्हार रंगनाथ
३०) मल्हार रामाजी
३१) मल्हार रायाजी
३२) मल्हार लिंगरस
३३) मल्हार शिवदेव
३४) मल्हारजी कराल
३५) मल्हारजी कानडा
३६) मल्हारजी कुसीकर
३७) मल्हारजी केदारजी नाईक
३८) मल्हारजी गरुड
३९) मल्हारजी गाडगे
४०) मल्हारजी गायकवाड*
४१) मल्हारजी जाधव
४२) मल्हारजी नाईक*
४३) मल्हारजी नाईक-निगडे
४४) मल्हारजी नागवडे
४५) मल्हारजी निकम
४६) मल्हारजी पवार
४७) मल्हारजी पोळ
४८) मल्हारजी भोईटे
४९) मल्हारजी भोसले
५०) मल्हारजी महार्णवर
५१) मल्हारजी वणजारे
५२) मल्हारजी सालोखे
५३) मल्हारजी सुतार
५४) मल्हारजी होळकर*
५५) मल्हारभट उपाध्ये
५६) मल्हारभट ज्योतिषी
५७) मल्हारी शिंपी

**''म''**

१) महिपत खंडेराव
२) महिपत धर्माजी
३) महिपत नारायण
४) महिपत सोनाजी
५) महिपत दत्ताजी
६) महिपतराव देशमुख
७) महिपतराव निंबाळकर
८) महिपतराव बापूजी जमेनिस
९) महिपतराव बापूजी प्रभू
१०) महिपतराव बासप्रभू
११) महिपतराव शिंदे
१२) महिपतराव सुमंत
१) मालसेटी
२) मालजी चव्हाण
३) मालजी नरसिंगराव (सितोळे)
४) मालजी पवार
५) मालजी पाटील
६) मालजी रखमाजी पाटील
७) मालजी बंडगर
८) मालजी भोसले
९) मालोजी घोरपडे*
१०) मालोजी निंबाळकर
११) मालोजी पवार
१२) मालोजी पिसाळ*
१३) मालोजी फिरंगोजी मिचाले
१४) मालोजी बंडगर
१५) मालोजी भोसल*
१६) मालोजी मोहिते [२३]

## ब) पेशवे दप्तर

**'खं'**

१) खंडगसिंग
२) खंडबा तरडे
३) खंडभट पुराणिक
४) खंडेराव काकडे
५) खंडेराव गणेश ओढेकरे
६) खंडेराव चिटणीस
७) खंडेराव त्रिंबक
८) खंडेराव दरेकर
९) खंडेराव दाभाडे
१०) खंडेराव नाईक-निंबाळकर
११) खंडेराव नीळकंठ
१२) खंडेराव परशराम रहातेकर
१३) खंडेराव पवार
१४) खंडेराव पोळ
१५) खंडेराव बर्गे
१६) खंडेराव बजाजी
१७) खंडेराव बनाजी
१८) खंडेराव बल्लाळ
१९) खंडेराव बाळाजी
२०) खंडेराव येसाजी दाभाडे
२१) खंडेराव राम
२२) खंडेराव रास्ते
२३) खंडेराव वाडेकर
२४) खंडेराव शिर्के
२५) खंडेराव होळकर
२६) खंडो आवजी
२७) खंडो गणेश
२८) खंडो चिमणाजी
२९) खंडो त्रिंबक
३०) खंडो त्रिंबक कुलकर्णी
३१) खंडो दौलत
३२) खंडो धोंडदेव
३३) खंडो नागनाथ
३४) खंडो नारायण
३५) खंडो पुरुषोत्तम
३६) खंडो बल्लाळ
३७) खंडो बल्लाळ चिटणीस
३८) खंडो बाबुराव
३९) खंडो मल्हार
४०) खंडो महादेव
४१) खंडो रघुनाथ खेडीकर
४२) खंडो रूपाजी कारखानीस
४३) खंडो शिवदेव
४४) खंडो सुंदर प्रभू
४५) खंडोजी गोगटे
४६) खंडोजी जगताप
४७) खंडोजी जठार
४८) खंडोजी जाधवराव
४९) खंडोजी नाईक
५०) खंडोजी भोसले
५१) खंडोजी मानकर
५२) खंडोजी शितोळे
५३) खंडोजी सुर्वे
५४) खंडोपंत वर्तक

**'म'**

१) मलजी पाटील रणनवरे
२) मल्हार अमृतेश्वर
३) मल्हार गंगाधर
४) मल्हार गोविंद
५) मल्हार तुकदेव
६) मल्हार बक्षी
७) मल्हार बाबुराव
८) मल्हार भिकाजी
९) मल्हार रामरावजी चिटणीस
१०) मल्हार रुद्र
११) मल्हार रेणुराव
१२) मल्हारजी कापसे
१३) मल्हारजी गाडे
१४) मल्हारजी ठुबे
१५) मल्हारजी ढमढेरे
१६) मल्हारजी नाईक
१७) मल्हारजी माहुरकर
१८) मल्हारजी मोझरे
१९) मल्हारराव कृष्ण
२०) मल्हारराव खंडेराव
२१) मल्हारराव खराडे
२२) मल्हारराव गायकवाड
२३) मल्हारराव टिपणीस
२४) मल्हारराव नरसी
२५) मल्हारराव पवार
२६) मल्हारराव प्रयाग
२७) मल्हारराव बाजी
२८) मल्हारराव भिकाजी
२९) मल्हारराव शिंदे
३०) मल्हारराव होळकर
१) महिपत चांदवडकर
२) महिपत माणकेश्वर
३) महिपत शंकर
४) महिपतराव आनंद
५) महिपतराव आवजी
६) महिपतराव कवडे
७) महिपतराव कर्वे
८) महिपतराव कृष्ण
९) महिपतराव कृष्ण साठे
१०) महिपतराव कोकरे
११) महिपतराव गोविंद
१२) महिपतराव गोसावी
१३) महिपतराव घाटगे
१४) महिपतराव चिटणीस
१५) महिपतराव जगन्नाथ
१६) महिपतराव त्रिंबक
१७) महिपतराव दादा
१८) महिपतराव प्रल्हाद
१९) महिपतराव बापूजी
२०) महिपतराव लक्ष्मण
२१) महिपतराव शिंदे
१) मालजी घुणे
२) मालजी धोंड
३) मालजी शिंदे
४) मालेराव होळकर
५) मालोजीराव घोरपडे
६) मालोजी नाईक-निंबाळकर
७) मालोजी नाईक-पिसाळ
८) मालोजी भोसले[२४]

## पाली येथील रवादिव्य

रवा म्हणजे कण, सोन्याचा किंवा चांदीचा छोटा तुकडा गरम तेलात टाकला जाई. हा गरम तेलात टाकलेला तुकडा बोटांनी बाहेर काढणे याला रवा दिव्य असे म्हणत.

सातारा जिल्ह्यातील खंडोबाचे महत्त्वाचे ठाणे असलेल्या पालीच्या देवळात इ.स. १६७५ मध्ये छत्रपती शिवाजीमहाराजांच्या उपस्थितीत काळभोर वं खराडे यांच्या पाटीलकीचा वादाचा निर्णय रवादिव्याने करण्यात आला होता. रवादिव्यात काळभोर पाटील जिंकले, खराडे हरले. या निवाड्यासाठी देवळात छत्रपतीच्या समवेत त्यांचे प्रधान, सेनापती, मुजुमदार, वाकेनिस असे राजमंडळ व २५० वतनदार हजर होते. या महजरातील रवादिव्याच्या केलेल्या वर्णनाप्रमाणेच या खंडोबाच्या देवळाची रचना आहे. देवळाच्या सभोवार तटबंदी असून तटावरही बसण्याची सोय आहे. मुख्य मंदिराच्या चारी बाजूस प्रशस्त ओवऱ्या आहेत. मुख्य सभामंडपही प्रशस्त आहे. खंडोबाच्या मुखवट्यामागे शंकराची पिंड आहे. समोर नंदीचे स्थान व बाहेर प्रशस्त बावडी आहे.

पालीच्या या निवाड्यामध्ये खोटे पडलेल्या खराडे पाटलाचा खोटेपणा पुढे सुपे पाटीलकी वादात शिवाजीमहाराजांनी उदाहरण म्हणून सांगितला.

शिवाजीमहाराजांनी करून दिलेल्या वरील निवाड्याच्या महजराची १ मोडी प्रत १९३० झाली इतिहास संशोधक शंकरराव देव यांना मिळाली होती. आजही काळभोर पाटलांच्याकडे सोन्या व चांदीचे शिक्के व मोहर आहेत. काळभोर येथील पाटीलपद व पाटीलपण ते मिरवतात. खंडोबाच्या यात्रेत मानाचे पान घेतात.

पालीच्या या देवळात छत्रपती शाहूमहाराजांच्या कारकिर्दित श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांच्या उपस्थितीत हिरोजी इंगुळकर व पिराजी नाईक कोंडेदेशमुख यांच्या पाटीलकीचा निवाडा रवादिव्याने लागला होता. इंगुळकर दिव्यास खरे उतरले आणि पाली येथील दिव्याचे जयपत्र पालीच्या वतनदारांच्या साक्षीनिशी हिरोजी इंगुळकरांना देण्यात आले[२६].

वीर प्रवृत्तीचे रक्त असणाऱ्या तत्कालीन शूर मराठे योद्धयांनी स्वराज्याची स्थापना होण्यापूर्वी आणि नंतरच्या काळात वेळोवेळी खंडोबा देवाचा कौल मागितला. दर्शन, देगण्या, मंदिरांचे जीर्णोद्धार, नवस-सायास, अग्निदिव्य ही त्यांची ठळक स्वरूप-माध्यमे होती. हे आपण अनुभवले. म्हणूनच खंडोबा ही वीरोपासक जनदेवता असल्याचे सदर प्रकरणांतील पाना-पानांमधून आणि ओळी-ओळींतून प्रत्ययास येते.



**संदर्भ - टिपा**


१. मेहंदळे खंडेराव चिंतामण (सं.), भा. इ. स. मं. पुणे वार्षिक इतिवृत्त शके १८३५, पृ. २६६ - २७१.

२. हा कागद ज्येष्ठ इतिहास संशोधक बलकवडे पांडुरंग तथा बाळासाहेब, पुणे यांनी पेशवे दप्तरातील हस्तलिखितांमधून शोधून दिला आहे.

३. (दै.) तरुण भारत, ६ डिसेंबर १९५९.

४. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, शिखर शिंगणापूरचा श्रीशंभू महादेव, पृ. १४३, ३४१.

५. काळे दि. वि., छत्रपती शिवाजी, पृ. २९२.

६. खंड १, शिवकालीन पत्रसार संग्रह, पृ. १३८.

७. टांकसाळे मधुकर, पाऊलखुणा, पृ. ३२-३३.

८. मैखिक आणि लिखित परंपरेतून चालत आलेली ही एक दंतकथा आहे. ही घटना घडल्याचा सबळ ऐतिहासिक पुरावा आढळत नाही.

९. पगडी सेतू माधवराव (सं.), मोगल आणि मराठे (तारीखे दिल्कुशा), पृ. १६२-१६३.

१०. मौखिक आणि लिखित परंपरेतून चालत आलेली ही एक दंतकथा आहे. ही घटना घडल्याचा सबळ ऐतिहासिक पुरावा आढळत नाही.

११. दाते यशवंत रामकृष्ण/ कर्वे चिंतामण गणेश (सं.), महाराष्ट्र शब्दकोश, विभाग पहिला (अ-ए), पृ. २१.

१२. Cambel James M. (Editor), Gazetteers of the Bombay Presidency, Poona District, Volume- 18, Part III, Pages 133-134.

१३. (रावबहादूर) पानसे केशव रंगनाथ, पानसे घराण्याचा इतिहास, पृ. १३०, १३८,१४८.

१४. ऐतिहासिक संकीर्ण, खंड - ९, पृ. ३६-३७.

१५. (डॉ.) भावे श्री. मा. (सं.), भा. इ. स. मं. पुणे, त्रैमासिक (जुलै १९९४ - एप्रिल १९९५), पृ. १८-१९.

१६. सरदेसाई सं. गो. (सं.), पुनर्मुद्रण : गर्गे स. मा. (सं.), मराठी रिसायत खंड -७, पृ. १५.

१७. जहागीरदार विजया, कर्मयोगिनी, पृ.२३२.

१८. (सा). पुण्यश्लोक ऑक्टोबर २००२.

१९. सरदेसाई सं. गो. (सं.), पुनर्मुद्रण : गर्गे स. मा. (सं.), मराठी रियासत खंड - ७, पृ. ४९९-५००.

२०. कुलकर्णी ज. बा., भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक (ऑक्टोबर १९६८), पृ. ४०-४१.

२१. ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड - ९, पृ. ३६-४०.

२२. अ. मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - १), पृ. ३७५.
ब. पेशव्यांची शकावली (राजवाडे खंड - २), पृ. ७३, १०३, १०६, १२६.
क. विजापूरकर विष्णू गोविंद (सं.) मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - ६), पृ. २८,११३, २९७.
ड. घारपुरे ज. र./ गद्रे ना. कृ. / जोशी वा. रा. / राजवाडे वि. का. (सं.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - ७) पृ. १७,३५.
इ. राजवाडे वि. का. (सं.), मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड -१०), पृ. ८१,८५.
ई. मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड -१७), पृ. ६.
उ. मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड -१८), पृ. ३.

२३. शाहू दप्तरातील कागदपत्रांची वर्णनात्मक सूची, विभाग - २, पृ. ९५७-९५९, ९८५-९८७, ९८९.

२४. संशोधनासाठी निवडलेले कागद वर्णनात्मक सूची खंड १, विभाग - २, पृ. ९४८-९४८, ९७१-९७३.

२५. मेहेंदळे खंडेराव चिंतामण (सं.), भा. इ. स. मं. वार्षिक इतिवृत शके १८३५, पृ. ४५०-४६३.

२६. (डॉ.) कुलकर्णी अनुराधा, 'न्यायनिवाड्याची दिव्य आणि त्यांची मंदिरे', भा. इ. स. मं. पुणे येथे वाचलेला निबंध (लिखित संदर्भ).

महाराष्ट्राचे लोकप्रिय कुलदैवत 'खंडोबा' हे अनेक नावांनी संबोधले जाणारे दैवत आहे. सुरुवातीला हे दैवत 'मार्तंडभैरव' या नावाने उदय पावले. नंतर मणि-मल्ल युद्धाच्या वेळेस मार्तंडभैरवाने आपल्या हातातील दिव्य खड्गाने मणिदैत्याचे शिर धडावेगळे केले म्हणून खड्गावरून 'खंडोबा' हे नाव पडले. पुन्हा मल्लासुराबरोबर युद्ध करून त्याला ठार केले तेव्हा देवाला 'मल्लारी' हे नामाभिदान मिळाले. 'मल्ल' म्हणजे मल्लदैत्य. अरि म्हणजे शत्रू. म्हणजेच मल्लदैत्याचा शत्रू तो मल्लारी. देवाला इतरही नावे मिळाली ती प्रसंगानुरूप किंवा तत्कालीन परिस्थितीनुसारच. मल्लासुराचा वध केल्यानंतर खऱ्या अर्थाने 'मार्तंडभैरव' अवताराचा हेतू सफल झाला. युद्धसमाप्तीनंतर मार्तंडभैरव प्रेमपुरी येथे शक्ती म्हाळसासह लिंगद्वयरूपाने प्रगटले. प्रामुख्याने हाच तपशील महर्षी वेदव्यासांनी आपल्या मूळ संस्कृत 'मल्लारिमाहात्म्यम्' या ग्रंथात वर्णिला आहे. पुढे या ग्रंथाची अध्यायसंख्या तेवढीच ठेवून आणि ओवीसंख्या वाढवून मराठी अनुवाद सिद्धपाळ केसरी नामक प्राकृत कवीने केला. नंतरच्या काळात या दोन कवींच्या ग्रंथांवरूनच महाराष्ट्र आणि कर्नाटकात अशा प्रकारची 'मल्हारीमाहात्म्य' विपुल प्रमाणात लिहिली गेली. त्याचबरोबर खंडोबाच्या महत्त्वाच्या तीर्थक्षेत्रांमध्ये 'क्षेत्रमाहात्म्य'ही निर्माण झाली (उदा. जेजुरी येथील जयाद्रिमाहात्म्य). अनेक कवींनी 'मल्हारीमाहात्म्य' लिहिली असली तरी खंडोबाभक्तांच्या देव्हाऱ्यात, खंडोबाच्या टाकाशेजारी मोजक्याच ग्रंथांना मानाचे स्थान मिळाले. चंपाषष्ठी नवरात्रोत्सवाच्या काळात या ग्रंथांची पवित्र भावनेने नित्यनियमित पारायणे होऊ लागली. ते भाग्यवान ग्रंथ असे : सिद्धपाळ केसरी विरचित 'मल्हारीमाहात्म्य', जेजुरीचे कवी गंगाधर ऊर्फ कमळाकर विरचित 'मार्तंडविजय', श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित 'मल्हारीमाहात्म्य', दत्तावतार माणिकप्रभू विरचित 'मल्हारीमाहात्म्य', मिलिंद माधव विरचित 'मल्हारीमाहात्म्य'.

याशिवाय, माधवस्वामी तिरूवेळंदूरकर, अकोल्याचे दत्तवरद विठ्ठल कवी, अनंत बडवे, गोपाळकवी नेवासकर, रुक्मनंदन गंगाधर, भीमकवी कळमकर, दाजिबा जोशीराव, कवी विनायक, योगेशकवी, पंडित कवी मोरोपंत, शिवदीन केसरीनाथ, गोमंतकातील शुभानंद (सुब्बानंत पिकळे) इत्यादी 'मल्हारीमाहात्म्य'कारांच्या नोंदी काही जुन्या ग्रंथांत आढळतात. परंतु यातील थोडीच 'मल्हारीमाहात्म्य' सध्या उपलब्ध आहेत.

## महर्षी वेदव्यास विरचित 'मल्लारिमाहात्म्यम्'

वेद, पुराणे, ब्रह्मसूत्रे इत्यादी स्वरूपांत विखुरलेल्या पुराण वाङ्मयाकडे दृष्टी टाकली असता आपणास महर्षी वेदव्यासांच्या दिव्य प्रतिभाविष्काराचे दर्शन घडते. आषाढ शुक्ल पौर्णिमा हा व्यासांचा जन्मदिन असल्यामुळे ही पौर्णिमा 'व्यास पौर्णिमा' (गुरुपौर्णिमा) म्हणून ओळखली जाते.

पुराण वाङ्मयाचे अनुशीलन केल्यानंतर एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात येते ती म्हणजे, 'व्यास' हे नाव नसून पदवी होती. द्वारपारयुगात भारतीय संस्कृती परंपरेत एका विशिष्ट पदावर आरूढ होणाऱ्या व्यक्तीस 'व्यास' या नावाने संबोधिले जात असे. थोडक्यात, वेदांचा विन्यास करणाऱ्याला 'व्यास' ही पदवी दिली जात असे. ही महान, दिव्य प्रतिभाशाली व्यक्ती द्वापारयुगात वेद, पुराणातील विखुरलेल्या ज्ञानशाखा-उपशाखांना एकत्रित करून त्यावर संशोधन करून, त्याकाळच्या परिस्थितीला अनुसरून, त्या सर्व ज्ञानाची व्यवस्थित मांडणी व विभागणी करून अमोल अशी ग्रंथसंपदा निर्माण करीत असे.

व्यास परंपरेचा उल्लेख स्कंदपुराण, पद्मपुराण, देवीपुराण इत्यादी पुराण वाङ्मयात आढळतो. देवीभागवत या पुराणग्रंथात एकूण २८ व्यासांची परंपरा असल्याचे पुढील श्लोकातून सांगितले आहे.

**द्वापरे प्रथमे व्यस्ता:**
**स्वयं वेदा: स्वयंभुवा।**
**प्रजापर्तिद्वितीयं तु**
**द्वापरे व्यासकार्यकृत्।**
**तृतीये शोचना व्यास**
**श्चतुर्थेतु बृहस्पति: ।**
**पंचमे सविता व्यास:**
**षष्ठे मृत्यूस्तदाऽपरे ॥**
**मघमा सप्तमे प्राप्ते**
**वशिष्ठस्त्वमे स्मृता: ॥**

**सारस्वतस्तु नवमे**
**त्रिधामा दशमे तथा ।।**
**एकादशोऽथ त्रिवृषो**
**भारद्वाजस्तता परम् ।**
**त्रयोदशे चाऽन्तरिक्षो**
**धर्मश्चापि चतुर्दशे ।।**
**त्रय्यारुणि: पञ्चदर्शे**
**षोडशे तु धनंजया ।**
**मेधातिथि: सप्तदशे**
**व्रती दृष्टादशे तथा**
**अत्रिरेकोनविंशेऽथ**
**गौतमस्तु तत: परम् ।**
**उत्तमस्वैकविशेऽथ**
**हर्यात्मा परकिर्तित: ।।**
**वेनो वाजश्रवाश्चैव**
**सोमोऽमुष्यायणस्तता**
**तृणबिन्दुस्तथा व्यासो**
**भार्गवस्तु तत: परम् ।।**
**तत: शक्तिर्जातुकर्ण्य:**
**कृष्णद्वैपायनस्तत: ।**
**अष्टविशति संख्येते**
**कथिता या मया श्रुता**[१]

''मल्हारी मार्तंडभैरवाची मूळ कथा व्यास विरचित 'मल्लारिमाहात्म्यम्' या संस्कृत ग्रंथात वर्णिली असून, या ग्रंथाचे २२ अध्याय आहेत. त्यातील एकूण श्लोकसंख्या ९३० एवढी आहे. सदर ग्रंथ ब्रह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडात समाविष्ट झाला आहे. पहिल्या अठरा अध्यायांत ऋषींच्या छळापासून ते मणि मल्ल दैत्यांच्या वधापर्यंत कथा वर्णिली आहे. तर पुढील चार अध्यायांत अनुक्रमे अष्टतीर्थे व साठ तीर्थांचे वर्णन तसेच पूजाविधी व प्रसादवाक्य हे विषय गुंफण्यात आले आहेत.''[२]

प्राकृत मराठी कवी सिद्धपाळ केसरीने इ. स. १५०७ मध्ये केलेले या ग्रंथाचा मराठी अनुवाद सध्या उपलब्ध असल्यामुळे मुद्दामच सदर ग्रंथातील अधली-मधली अवतरणे दिली नाहीत.

## सिद्धपाळ केसरी विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

सिद्धपाळ केसरी नामक प्राकृत मराठी कवीने 'महर्षी वेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम्' या संस्कृत ग्रंथाचा इ. स. १५०७ मध्ये 'श्री मल्हारीमाहात्म्य' या नावाने मराठी अनुवाद केला. अध्यायसंख्या मूळ ग्रंथाएवढीच म्हणजे २२ ठेवून श्लोकसंख्या ९३० ऐवजी १०४५ केली आहे. म्हणजेच मूळ 'मल्लारिमाहात्म्यम्'च्या श्लोकसंख्येपेक्षा प्रस्तुत ग्रंथात ११५ ने वाढ झाली आहे.[३]

ब्रह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडात जे मल्हारीमाहात्म्य महर्षी वेदव्यासांनी संस्कृतमध्ये सांगितले, त्याचीच ही प्राकृत टीका आहे, असे शेवटच्या २२ व्या अध्यायातील ३९ व्या ओवीत सांगताना सिद्धपाळ केसरी लिहितो :

**ऐसा ब्रह्मांडपुराणीचा इतिहास ।**
**श्रीमल्हारीमाहात्म्य बोलिला व्यास ।।**
**त्याचा प्राकृतभाषे सौरस ।**
**बोलिला आत्मज कोबराजाचा ।।**

सदर ग्रंथाच्या पहिल्याच अध्यायाच्या शेवटी सिद्धपाळ केसरीने पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे :

**हे मल्हारीमाहात्मींचें चरित्र । ब्रह्मांडपुराणीं असे विचित्र**
**तो कोबराजसुत पवित्र । कथन करी**
**तो सिद्धपाळ केसरी । त्यासी प्रसन्न झाला श्रीमल्हारी**
**कथा प्रकट केली परोपरी । श्री मल्हारीमाहात्मींची**

यानंतर व प्रत्येक अध्यायाच्या शेवटी **'इतिश्री ब्रह्मांडपुराणे क्षेत्रखंडे मल्हारीमाहात्म्य'** अशी समाप्तिमुद्रा उमटविलेली आहे. परंतु हा सिद्धपाळ केसरी कोण? कुठला? त्याच्या आणखी काही रचना आहेत का? याचे आज तरी पुरावे सापडत नाहीत. मात्र, त्याचे आजोबा, आई, वडील, गुरू, भाऊ यांचे उल्लेख ग्रंथात आढळतात. कोबराज हे त्याच्या वडिलांचे नाव वरील दोन्ही कडव्यांमध्ये येऊन गेलेच आहे. परंतु काही ठिकाणी कोबराजाचेच 'कुबेर' किंवा 'कुबेरराज' असेही उल्लेख येतात :

**ऐसा तो माझा गुरु**
**कुबेरनामे धरिला अवतारु**
**तो पाववील पैलपारु**
**संसारसागरीचा**

वरील ओवीत उल्लेख केल्याप्रमाणे सिद्धपाळ केसरीचे वडील हेच त्याचे आध्यात्मिक गुरू आहेत. तेच आपणास संसारसागराच्या पैलथडीला नेऊन पोहोचवतील म्हणजेच भवसागर तरून नेण्यास तेच समर्थ आहेत, अशी त्याची आपल्या गुरुपित्याबद्दलची श्रद्धा आहे.

कोबराज हा निस्सीम शंकरभक्त असून तो 'विश्वासराज' यांचा पुत्र आहे. दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी याचा पुढीलप्रमाणे उल्लेख येतो :

**विश्वासराज राजसुत**
**कोबराज येणे नामें विख्यात**
**तो शंकराचा निजभक्त**
**अवतरला कुबेर भूमंडळी**

वरील ओवीतील 'राजसुत' आणि 'कुबेर' या नावांवरून सिद्धपाळ केसरीचे राजघराणे असून ते धनवान असावे, असे वाटते.

सिद्धपाळ केसरीच्या आईचे नाव 'अंबिका'. तिच्या नावाचा उल्लेख सहाव्या अध्यायाच्या शेवटी येतो, तो असा :

**पिता कुबेरराज वंदुनी**
**नमिली बरवी अंबिकाजननी**
**कथा सांगेन प्रकट करोनी**
**मल्लारीमाहात्म्यीची**

सिद्धपाळ केसरी पुढील आठव्या अध्यायात शेवटी सांगत आहे, मी कुबेराचा पुत्र आहे, सूरसेनचा बंधू आणि मार्तंडभैरवाचा 'दास' आहे :

**जो आत्मज कुबेर जयाचा**
**सूरसेन बंधु जयाचा**
**दास मार्तंडभैरवाचा**
**तो कथा सांगे सिद्धपाळ केसरी**

याशिवाय, व्यासांनी आपल्या 'मल्लारिमाहात्म्यम्' या ग्रंथात सांगितलेली मार्तंडभैरवाची कथा आणि प्रेमपुरी येथील तीर्थांचे वर्णन सदर ग्रंथात सिद्धपाळ केसरीने घेतले आहे.

### श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

पूर्ण नाव : श्रीधर ब्रह्माजीपंत नाझरेकर. जन्म : इ.स. १६४८, समाधी : इ.स. १७२९. श्रीधर हे महाराष्ट्रातील

प्राचीन मराठीतील लोकप्रिय आख्यान कवी होत.

श्रीधरांचे आराध्य दैवत पंढरपूरचा पांडुरंग तर कुलदैवत वाटंबरचा खंडोबा. श्रीधरांचे वडील ब्रह्माजीपंत विठ्ठलाचे निस्सीम भक्त असले तरी तेवढ्याच प्रेमाने ते आपल्या कुलदैवताची भक्ती करत होते. हरीहरात ते भेद मानत नव्हते. अर्थातच् नाझरेकर-देशपांडे कुटुंबातला प्रत्येक जण खंडोबाचा भक्त होता. विशेष म्हणजे श्रीधरांचे मूळ नाव 'खंड्या.' आई-वडिलांनी आपल्या लाडक्या कुलदैवतावरून, वाटंबरच्या खंडोबावरून हे नाव ठेवले होते. परंतु एका प्रसंगी रंगनाथस्वामी निगडीकर तथा ज्ञानानंदांनी 'खंड्या'च्या जिभेवर 'श्रीधर' असे नाव लिहिले आणि तेव्हापासून श्रीधर हे नाव रूढ झाले, असे सांगितले जाते. तात्पर्य: कुलदैवताच्या ठायी असणारी निष्ठा, प्रेम, जिव्हाळा आणि आंतरिक उमाळ्यामुळेच श्रीधरांच्या हातून 'मल्हारीमाहात्म्य'सारखा रसाळ ग्रंथ निर्माण होऊ शकला.

श्रीधरस्वामींचे 'मल्हारीमाहात्म्य' दोन अध्यायांचे आणि ३५५ ओव्यांचे असे लघुत्तम असले तरी अत्यंत हृदयंगम आहे. महर्षी व्यासांनी लिहिलेल्या संस्कृत 'मल्लारिमाहात्म्यम्'चा हा मराठी अवतार असला तरी मूळ संस्कृत ग्रंथात एकूण ९३० ओव्या गुंफल्या आहेत. मात्र, श्रीधरांनी मूळ कथेचा एक तृतीयांश भागच आपल्या ग्रंथात घेतला आहे. म्हणजेच एवढा मोठा विषय अगदी मोजक्या शब्दांत आणि रसाळ व ओघवत्या शैलीत सांगितला आहे.[४]

आपल्या ग्रंथीय कलाकृतीचा मूलस्रोत सांगताना श्रीधर लिहितात :

**संस्कृत बावीस अध्याय उत्तम । ग्रंथ जाणिजे मल्हारीमाहात्म्य ।**
**त्याची प्राकृत टीका सप्रेम । दोन अध्यायांत कथियेली।।**

मराठीत 'मल्हारीमाहात्म्य' वर्णन करताना श्रीधरांनी ब्रह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडातील समाविष्ट संस्कृत मल्हारीमाहात्म्याचाच आधार घेतला आहे. याचा प्रामाणिकपणे उल्लेख करताना श्रीधर लिहितात :

**ब्रह्मांडपुराणीं निस्सीम । सत्यवतीहृदयरत्नें उत्तम ।**
**कथिलें मणिमल्लमर्दनमाहात्म्य । तें सप्रेम परिसिजे ।।**

किंवा

**ब्रह्मांडपुराणीं क्षेत्रखंड । तेथींचें हे माहात्म्य अति गोड ।**

मूळ कथेतील आकर्षकतेची जराही उणीव भासू न देता उलट त्यांनी आपल्या वाग्विलासाने आणि भाषामाधुर्याने सदर मल्हारीमाहात्म्य अधिकच फुलवले आहे. त्यामुळेच वाचकप्रिय झाले आहे.

खंडोबा हे श्रीधरस्वामींच्या घराण्याचे कुलदैवत. वडिलांच्या अभेद्य भक्तीमुळेच 'प्रेमपुरीचा राव' म्हणजेच खंडोबा नाझऱ्याजवळच्या वाटंबरगावी प्रगटल्याचे ते अभिमानाने सांगतात :

**पंढरीहून पश्चिमेस देख । नाझरे नाम पुण्यकारक ।**
**ह्याखालें ग्राम सुरेख । वाटंबर नाम त्याचें ।**
**वडिलांची भक्ती अभिनव । देखोनि प्रेमपुरीचा राव ।**
**मायागंगातीरीं निजभाव । पाहोनिया प्रकटलासे ।**

विठोबाभक्त असलेले श्रीधरस्वामी खंडोबाची ज्ञानमय भक्ती करताना खंडोबा आणि आपले सद्गुरू परब्रह्मस्वरूप श्री ब्रह्मानंद महाराज यांच्यात द्वैतभाव मानत नाहीत. त्यांच्यातला अभेदभाव किंवा अद्वैतभाव प्रकट करताना ते मल्हारीमाहात्म्याच्या पहिल्याच नमनाच्या ओवीत लिहितात :

**मणिमल्लमर्दन जगदीश्वर । चिच्छक्तिमहालसाप्रियकर ।**
**ब्रह्मानंद जगदाधार । निर्विकार जगद्गुरु ।।**

किंवा दुसऱ्या अध्यायात एका ठिकाणी ते म्हणतात :

**ब्रह्मानंदा श्रीधरवरा । म्हाळसाहृदयारविंदभ्रमरा ।**
**भक्तवत्सला करुणासमुद्रा । अतिउदारा अभंगा ।।**

अशा या मणिमल्लमर्दन, जगदीश्वर, भक्तवत्सल, करुणेचा समुद्र आणि चिच्छक्तिरूपी म्हाळसेचा प्रियकर असलेल्या आपल्या कुलदेवाचा महिमा वर्णन करताना श्रीधरस्वामींची मधुर वाणी अधिक मधुर बनते. त्यांच्या वाग्विलासाला अधिक बहर येतो. मणिचूल पर्वतावरील वृक्षराजींचे मनोहारी वर्णन करताना श्रीधरस्वामींनी जे दृष्टांतवैभव वापरले आहे, ते कोणत्याही रसिक श्रोत्याला भुरळ पाडेल असेच आहे :

**मलयागर कृष्णगर चंदन । सुवासें भरलें सर्व वन ।**

**जैसे सत्पुरुषाचे गुण । न सांगतां प्रकट होती ।।**
**आम्रवृक्ष पाडा आले । टपटपा टाकिती पक्वफळें ।**
**जैसे उदार, मनींचे कोवळे । धनदानें वर्षती ।।**

ज्याप्रमाणे, चंदनवृक्षात अगोदरच सत्पुरुषाचे सर्व गुण असल्यामुळे त्याचा सुवास सुखसमृद्धीच्या रूपाने सर्वत्र दरवळत आहे, त्याप्रमाणे पक्व फळे टपाटपा गाळणाऱ्या आम्रवृक्षात उदारपणे दान करत सुटलेल्या दात्याचेच दर्शन घडते.

अशा प्रकारे मल्हारीमाहात्म्यातील एकूणच काव्यात भक्ती, तत्त्वज्ञान आणि निसर्गवर्णनाचा वाग्‌विलास इत्यादींचे समर्थपणे दर्शन घडते. त्यामुळेच जेजुरीच्या गंगाधर कवींच्या 'श्रीमार्तंडविजय' नंतर श्रीधरस्वामींचे 'मल्हारीमाहात्म्य' खंडोबाभक्तांत अधिक प्रिय झाले असून, उपासना क्षेत्रात त्याला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे.

## पंडित कवी मोरोपंत विरचित 'मल्हारीविजय'

पंतांचे पूर्ण नाव : मोरोपंत रामचंद्र पराडकर. जन्म : इ.स. १७२९, मृत्यू : इ.स. १७९४

पंत हे मराठी पंडित कवींतील अखेरचे लोकप्रिय पंडित कवी होत. संस्कृतप्रचुर भाषा, प्रौढरचना, यमक, अनुप्रासादिक शब्दालंकार आणि उपमा-रूपक-दृष्टांत, त्यांचे कसब इत्यादी पांडित्याचे विशेष गुण त्यांच्या काव्यात आढळतात. पांडित्यपूर्ण व्यासंगामुळे त्यांच्या भक्तीला ज्ञानाची जोड मिळाली आहे आणि त्यामुळेच त्यांचे सारेच काव्य रसालंकारयुक्त गोड व रचनाप्रौढ झाले आहे.

वरील काही गुणांनी युक्त असे **'मल्हारीविजय'** नावाचे मल्हारीमाहात्म्य मोरोपंतांनी लिहिले असून, त्यात एकूण ७५ आर्यांचा समावेश करण्यात आला आहे.[५] व्यासऋषींच्या संस्कृत 'मल्लारिमाहात्म्यम्' मधील कथासाराचा भाग घेऊन 'सरळसोट कथाभाग' आर्यावृत्तात गुंफण्याचा पंतांनी प्रयत्न केला आहे. त्याला एखाद्या छोट्या खंडकाव्याचे स्वरूप आले आहे. (खंडकाव्य म्हणजे एखादे विषयसूत्र घेऊन काव्यात गुंफत जाणे.) अत्यंत क्लिष्ट, गुंतागुंतीची, समजण्यास अवघड अशी शब्दरचना यामुळे 'मल्हारीविजय' सर्वसामान्य वाचकांच्या डोक्यावरून जाते. इतकेच नाही, तर खास मोरोपंतांच्या साहित्याचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांच्या बुद्धीचाही त्यांच्या काव्यांची शब्दफोड करताना कस लागतो. शब्दचमत्कृतीशिवाय 'मल्हारीविजय'मध्ये इतर काही प्रसिद्ध मल्हारीमाहात्म्यकारांच्या मल्हारीमाहात्म्यासारखी मनोहारी निसर्गवर्णने, दृष्टांत वैभव, युद्धवर्णने असा सविस्तर भाग येत नाही. युद्धांचा उल्लेख आहे, परंतु अगदी मोजक्या शब्दांत आणि खास मोरोपंती थाटाच्या रचनाशैलीत. परंतु कुलदैवत खंडोबावर असलेल्या अपार श्रद्धेमुळेच पंतांनी झपाटल्यासारखे, अत्यंत प्रेमभावनेतून आणि प्रस्तुत विषयाशी एकचित्त पावून 'मल्हारीविजय'ची रचना केली आहे, हे वाचताना ठायी ठायी जाणवते. ग्रंथाच्या सुरुवातीसच पंतांनी आपल्या कुलदैवताचे गुणगान गायले आहे. पंत लिहितात :

**श्रीकंठा जगदीशा देवा-मार्तंड भैरवा गावे ।**
**ज्याचे आज्ञेत सदा, रिपूंनीं सोडूनि वैर, वागावे ।।**
(ज्याचे आज्ञेत रिपुंनी वैर सोडूनि सदा वर्तावे)

श्रीकंठ, जगदीश अशा शिवशंकराचे म्हणजेच मार्तंडभैरवाचे अनन्यभावे गुणगान गावे, कारण वाघ-शेळी अथवा साप-मुंगुस असे निसर्गतःच परस्परांचे शत्रू असलेले प्राणीदेखील ज्याच्या आज्ञेत वैर सोडून सरळ वागतात, असा तो मार्तंडभैरव आहे.

**मणिचूड नगी होते धर्मात्मज सप्त भुसूर महर्षी ।**
**जे स्वप्नींही चित्ती धरिती स्वर्गादिका परम हर्षी ।।**

(अर्थ : मणिचूड(ल) पर्वतावर यमराजाचे पुत्र सात ब्राह्मण महर्षी जे होते ते (असे होते की) स्वप्नातही मोठ्या आनंदाने स्वर्गादिक लोकच मनात ठेवीत असत. अर्थात, स्वर्गादिक लोकच सदैव त्यांच्या मनी वसत असत. 'स्वर्गादिकामना हर्षी' असा एक पाठभेद असल्याचे प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी नमूद केले आहे. या दुसऱ्या आर्या-श्लोकापासून म्हणजे मणिचूल पर्वतावरील सप्तऋषींच्या आनंदमयी वास्तव्यापासून ते थेट -

**सित् पक्ष मार्गशीर्षी षष्ठी, शततारकाही, रविवार,**

**या योगी प्रेमपुरी प्रकटे प्रभु, जो नतीं सद्य फार**

(अर्थ : जो नतांच्या म्हणजे भक्तांच्या ठिकाणी फार दयाळू आहे (नत = नम्र, शरण आलेले अर्थात् भक्त) असा मार्तंडभैरव मार्गशीर्ष शुक्लपक्षी, षष्ठी, शततारका नक्षत्र, रविवार या दिवशी प्रेमपुरी येथे शक्ती म्हाळसासह लिंगद्वयरूपाने प्रगटला.

या ७१ व्या आर्या-श्लोकापर्यंत पंतांचा लेखनप्रवास अतिशय जलद गतीने होताना दिसतो. या वळणावळणांच्या प्रवासात मग मणिदैत्य सेनेकडून सप्तर्षींचा आश्रम उद्ध्वस्त, ऋषींचे इंद्र, विष्णू, शंकराकडे जाणे, शंकराच्या जटेतून महामारी किंवा धृतमारी राक्षसी शक्ती निर्माण होणे, शंकराचा मार्तंडभैरव अवतार, देवसेना-दैत्यसेनेचे वर्णन, युद्ध, शेवटी मार्तंडभैरवाकडून गतप्राण झालेल्या मणि-मल्ल दैत्यांनी देवाची केलेली स्तुती, प्रसन्न होऊन मार्तंडभैरवाने दैत्यांना दिलेले वरदान आणि काही अधले मधले छोटे प्रसंग येतात.

परंतु, ग्रंथ समाप्तीला शेवटचा एक आर्या श्लोक बाकी असताना खंडेरायाची आळवणी करताना, त्याचे गुणगान गाताना मयूरपंतांच्या चित्ताची अवस्था अत्यंत करुणामय झाली आहे, हे पुढील गीतीवरून लक्षात येते.

**भक्तमयूरदयाघन भगवच्चरितें जगद्धितीं करितो**
**हरितो तो हर हरिहर कलिमल, निजपुण्यकीर्तिला वरितो ॥७२॥**

(अर्थ : भक्त मयूरावर दया करणारा तो भगवान मार्तंड जगताच्या हितार्थ नाना लीला करतो आणि त्यायोगे तो हरिहर (हरि = घोडा, याने वाहून नेला जाणारा अर्थात् अश्वारूढ असा), हर (शंकर), कलिमल (कलियुगात घडणारी पापे), हरितो (नाहीशी करतो) आणि त्यायोगे तो आपल्या पुण्यकारक कीर्तीला वरितो अर्थात् प्राप्त करतो.

'भक्तमयूर' म्हणजे परमेश्वरभक्त कविवर्य मोरोपंत आणि मेघांचा भक्त म्हणजे मोर पक्षी. 'दयाघन' म्हणजे परमेश्वर. ज्या वेळेस मेघांनी भरलेल्या आकाशाकडे पाहून मोर टाहो फोडतो म्हणजेच तो धरणीवर कोसळावा म्हणून प्रार्थना करतो, त्याचप्रमाणे मोरोपंतही आपल्या आर्यारूपी श्लोकातून आर्ततेने आणि करुणामय भावनेतून खंडेरायाचा महिमा आळवताना दिसतात.

श्रीखंडेरायावर मेघाचे रूपक करून येथे भक्त हाच मोर असे म्हटले आहे. जसा जसा तो मेघ अनुकूलतेने, प्रसन्नतेने कृपारूपी अमृत (जल) वर्षतो, तस तसा हा मोर आनंदित होऊन आर्यारूपी श्लोकांनी हर्ष व्यक्त करीत आहे. म्हणून मयूरपंतांनी स्वत:ला 'भक्तमयूर' असे रूपक लावले आहे. वरील श्लोक म्हणजे आर्त भक्ताने भक्तवत्सल भगवंताशी केलेले संभाषण आहे. स्वउद्धारासाठी आर्ततेने मारलेली हाक हे त्याचे स्थायीस्वरूप आहे. पंत हे भगवद्भक्त असले तरी शिवावतार मार्तंडभैरवावर त्यांची तेवढीच गाढ श्रद्धा आहे. ते हरि-हरात भेद मानत नाहीत. त्यांची खंडोबाभक्ती अभेद्य अशीच आहे.

शेवटच्या ७३ व्या श्लोकात ग्रंथाची समाप्तीमुद्रा उमटवताना पंत लिहितात :

**हा ग्रंथ पंचसप्तीत आर्या 'मल्हारीविजय' या नावे ।**
**वानावें भगवद्यश, भक्तांनी भवभाग्य मानावे ॥**

सारांश : 'मल्हारीविजय' या नावाचा हा पंचाहत्तर आर्यांचा ग्रंथ असून त्यायोगे भगवंताचे यश वर्णन करावे आणि भक्तांनी हे संसारातील भाग्यच मानावे.

या ग्रंथात प्रत्यक्षात ७३ आर्या आहेत. दोन आर्या गहाळ झाल्या असाव्यात. त्या गीती क्रमांक ६ व ७ मध्ये असाव्यात, असे प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी अनुमानिले आहे, ते योग्य वाटते.

## शिवदिनकेसरीनाथ विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

पूर्ण नांव : सदाशिव हरिकृष्ण यादव-जोशी. जन्म : १७ व्या शतकाचा पूर्वार्ध, मृत्यू : इ.स.१८७४. महादेवाच्या नवसामुळे झाल्यामुळे शिवदिनांचे मूळ नाव सदाशिव. सदाशिवचेच पंथीय नाव शिवदिननाथ. गुरूंचे सान्निध्य कायम राहावे म्हणून आपल्या नावातच गुरुनाम त्यांनी मिळविले. म्हणजेच शिवदिननाथ ऐवजी शिवदिनकेसरीनाथ.

खंडोबावर प्रकाशित झालेल्या काही जुन्या ग्रंथांत, शिवदिनकवीच्या नावावर 'मल्हारीमाहात्म्य' उपलब्ध असल्याचे नमूद केलेले आढळते. परंतु अनेक ठिकाणी शोधाशोध करूनही ते उपलब्ध होऊ शकले नाही. शिवदिनकेसरीनाथांनी मल्हारीमार्तंडाविषयी लिहिलेल्या एकूण पाच पदांपैकी एक पद 'मल्हारीमाहात्म्य' या शीर्षकाखाली लिहिलेले आढळते. या व्यतिरिक्त वेगळे असे मोठे माहात्म्य नाही. पुढील पदही संततोडीचे असून

'जेजुरी आणि मल्हारी' यांचे प्रत्येकी दोन दोन ओळींच्या पाच कडव्यांमध्ये महिमान गाण्यात आले आहे.[६] हे माहात्म्यपद पुढीलप्रमाणे आहे :

**जागृत धन्य जेजुरी मल्हारी तू कलियुगी प्रत्यक्ष पाहता जगी ।।धृ.।।**
**निगुर्ण निर्विकार कळा तुझी मार्तंडा मैराळा ।**
**भक्त पाहुनिया डोळा पूर्ण घालो सर्वांगी ।।१।।**
**अनुहत वाजंत्रे घाई तुझी वाजे सर्वांठायी ।**
**कीर्तिभंडार दिशा दाही अखंड उधळे निजरंगी ।अ२।।**
**दिवट्या कोटि असंख्यात मुक्तद्वारी लखलखती ।**
**यात्रा बहुजन दाटती होत तुझीया दर्शनालागी ।।३।।**
**कोटीनवसाचे पुरती येळकोट, येळकोट अवघे पुरती**
**मुरळ्या वाघे नृत्य करिती नाना संगीत संयोगे ।।४।।**
**लक्ष पायरी चढावी नेणे तुझी मूर्ती पाहावी ।**
**केसरी सद्गुरु शिवदिन निवी तुवादशी मद्वांगी ।।५।।**

(धुंडिनाथ महाराजवाडा, पैठण येथील पदसंग्रहातून)

## दत्तवरद विठ्ठल कवी विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

कार्यकाल - अठरावे शतक.

'प्रसाद' मासिकाच्या १९७८ च्या 'श्रीखंडोबा विशेषांक' मध्ये दत्तवरद विठ्ठल कवी यांच्या मल्हारीमाहात्म्याचा थोडक्यात परिचय देण्यात आला आहे. सौ. शांता येरवडेकर यांनी जयकर ग्रंथालय, पुणे विद्यापीठ येथून दत्तवरद विठ्ठल कवींच्या हस्तलिखित मल्हारीमाहात्म्याच्या प्रतींमधून सदर माहिती घेतल्याचे नमूद केले आहे. परंतु सद्य:स्थितीत जयकर ग्रंथालयामध्ये हस्तलिखिते उपलब्ध होत नाही. विठ्ठल कवीचा 'मल्हारीमाहात्म्य'सारखा अत्यंत दुर्मिळ आणि महत्त्वाचा ग्रंथ मिळू न शकल्यामुळे माझ्या मनी खंत आहे. त्यामुळे 'प्रसाद'च्या मल्हारीमाहात्म्याचा भाग 'जसा आहे तसा' येथे देत आहे.[७]

''मणिचूर (ल) पर्वतावर ऋषीजनांच्या तपस्येत विघ्न आणल्याबद्दल 'मणि' व 'मल्ल' या दोन दैत्यांचा वध शंकरांनी 'मार्तंडभैरव' हा अवतार घेऊन केला, अशी मूळ कथा आहे. दत्तवरद विठ्ठलकवींनी स्वत:च्या भाषेत ती कथा फुलवून मराठीत मांडली आहे. हे काव्य इतर काव्यांप्रमाणे अप्रकाशित असून, जयकर ग्रंथालयात त्याची दोन वेगवेगळी त्रुटित हस्तलिखिते उपलब्ध आहेत.

पहिले हस्तलिखित हे अपूर्ण असून १ ते १४ अध्यायात 'मणी' या असुराच्या वधापर्यंतची कथा आहे. 'मल्ल' या त्याच्या भावाच्या वधाची कथा पुढील अध्यायात असावी, परंतु ते अध्याय उपलब्ध नाहीत. या हस्तलिखिताचा आकार ९।।'' x ५'' असा आहे. एका पृष्ठावर बारा ते तेरा ओळी असून, प्रत्येक ओळीत चोवीस ते पंचवीस अक्षरे आहेत. प्रत्येक अध्यायाची ओवीसंख्या भिन्न आहे. अध्याय ११ पासून आकार बदलला असून तो ८।।'' x ५'' असा आहे. कागद हस्तलिखिताच्या कडा जीर्ण झाल्या आहेत. परंतु अक्षर सुवाच्य आहे. पहिले पाच श्लोक संस्कृत असून, मल्हारीवंदनरूप आहेत. सुरुवात अशी आहे :

**वंदे श्री म्हाळसाकांत गौरांगं मेरुसदृशं ।**
**अनंतवरसंकाशं अनंगाराति विगहं ।।१।।**

नंतर १ ते ८ ओव्यांमध्ये मराठीतून वंदन आहे. त्याची सुरुवात **ॐ नमो श्रीमल्लारिदेवा कैलासवासा परमशिवा । अगाध कीर्ति दानव गर्वा नाशि त्या तुज नमियले ।।** अशी आहे. पोथीचा शेवट असा आहे :

**ऐकता हे देवासुर युद्ध सिद्धि सर्वदा पाविजे शुद्ध**
**श्री दत्तात्रेय गुरु प्रति वंदुनि विठ्ठल कवि वदे ।।६५।।**
**इति श्री ब्रह्मांड पु. पंच क्षेत्र मल्हारी.**
**मणिकासुखधोनाम चतुर्दशोध्याय: ।।१४।।**

'मार्तंडभैरव' हा अवतार कशासाठी घेतला असा प्रश्न पार्वतीने शंकरांना विचारल्यावरून त्यांनी कथा सांगितली. ब्रह्मदेवाला सनत्कुमारांनी विचारल्यावरून ब्रह्म्याने आत्मवचनी कथा सांगितली :

**जे करावे सज्जनी श्रवण । श्रीमार्तंडभैरवावतरण ।**
**पार्वतीने केला प्रश्न । शशिशेखरा निजवाणी ।।९।।**
**जय अनादि निधनहरा । परात्पर घोरतरा ।**
**श्री वामदेव भयस्करा । अनंत लीला अवतार ।।१०।।**
**तव जाले पै त्रिजगती । त्यामाजि मार्तंडभैरव मूर्ती ।**
**कैसा जाला कवणाप्रति । वधिले ते पोसांगिजे ।।१।।**

दुसरे हस्तलिखित : याचा आकार ६।।'' ह्न ३।।'' असा आहे. एकूण १४३ पृष्ठे असून, प्रत्येक पृष्ठावर सहा ओळी व प्रत्येक ओळीत सतरा ते अठरा अक्षरे आहेत. कडा जीर्ण झाल्या आहेत. दोन्ही बाजूंनी तांबड्या दुहेरी रेषा असून हस्ताक्षर चांगले आहे. पृ. ११९ पासून कडेला रेषा नाहीत व लेखक बदललेला वाटतो. येथून पुढे अक्षर सुवाच्य नसून अशुद्ध लेखन आहे.

दुसऱ्या हस्तलिखितात एकूण बावीस अध्याय आहेत, परंतु पहिल्या अध्यायाच्या पहिल्या सात ओव्या नसून आठव्या ओवीपासून पृष्ठ ३ पासून सुरुवात पुढीलप्रमाणे आहे :

**जे हिमालय सुता ।।**
**पुसे शर्वाते तत्त्वता ।**
**सनकादिकी जे कीर्तिजे ।।८।।**
**कैलासचळ शीखरीं ।।**
**परम सुंदर मणी मंदिरी ।**
**रहस्य पुसती जाली गौरी ।**
**सम्यक सदाशिवाते ।।९।।**
**या लोकी दुर्लभतर ।**
**आणि परमार्थकर मोक्षदाते क्षेत्र ।**
**आणि तीर्थ कवणा मार्गिचा ।।१०।।**
**आणि सर्वांलागि तुं सुलभा ।।**
**कवण्या अवतारे पुरुषर्भा ।।**
**कवण्याव्रते अराध्य वल्लभा ।**
**ते स्वामि सांगे मज वेगी ।।११।।**

शेवट असा आहे :

**इतिश्री ब्रह्मांडपुराणे क्षेत्रखंडे मल्हारीमाहात्म्ये**
**दत्तवरद विरचिते माहात्म्यवर्णनोनाम द्वाविंशोध्याय: ।।२।।**
**श्रीमार्तंडार्पणमस्तु । शुभं भवतु ।।श्रीरस्तु।।**

या दोन्ही रचना भिन्न असाव्यात. निदान वेगवेगळ्या वेळी लिहिल्या गेल्या असाव्यात. दुसऱ्या हस्तलिखितात एकूण वर्णनाचा वगैरे तपशील जास्त आहे. दोन्हींमध्ये शाब्दिक फरक आढळतो. कदाचित यातली एक प्रत दुसऱ्या प्रतीची सुधारलेली पुनर्लिखित आवृत्ती असावी.

दोन्ही हस्तलिखितांमध्ये ब्रह्मसभा, विष्णुसभा व कैलाससभा यांची वर्णने विस्तृत आहेत, सगळीकडे रत्नेच रत्ने, गंधर्व, अप्सरा यांची गाणी व नाच, कैलासावरसुद्धा फळाफुलांनी डवरलेले वृक्ष, तिलोत्तमादी अप्सरांचे नाच असे तपशील आहेत ! उदा. कैलावणवर्णन :

**मुष्टीमाजी रत्नखडे ।**
**घेऊनी खेळती चहुकडे ... सिद्ध कन्या खेळती ।।३१।। अ.४**
**जो सर्वगत सर्वदा पवन ।**
**तो तत्कांतासुरतशीण ।**
**वारावया मंदक्षीण ।**
**सुगंधेसी निववि‍ता ।।२६।। अ. ७**
**करिती सिंहनाद दारुण ।**

**तेणे बहिरे झाले आकाश ।।३।। अ.९**
**सरस्वती ते वनगव्हरी ।**
**कोकिळा होऊनि श्रीहरी ।**
**गुणकीर्तन करितसे ।।१०७।। (वैकुंठवर्णन)**

अशा कल्पना मधून-मधून आढळतात,

**जया देवाचा वामांगी । आर्या गिरिजा चार्वांगी ।।**
**जैसी दिव्यरत्नाचा आंगी । प्रभा झळके त्यापरी ।।१४।। अ.**

अशी एखादी उपमा दिसते,

**नाशभाव नैर्ऋत्यें त्यजिला । वरुण जैसा वारुणी फाला ।**

असे अनुप्रासही आहेत.

मल्हारीमाहात्म्याच्या या मराठी 'अवतारा'त मोठा प्रतिभाविलास आहे, असे नाही. मूळ संस्कृत कथा जशीच्या तशी मराठीत आणली आहे. ती भाविकतेने वर्णन केली असून, सुबोध झालेली आहे.

दत्तसंप्रदायी विठ्ठलकवीला 'मल्हारीमाहात्म्या'सारख्या शिवावतार खंडोबाची उपासना वर्णन करणाऱ्या ग्रंथाचा मराठीत अनुवाद करण्याची स्फूर्ती होते, यावरून खंडोबा दैवत महाराष्ट्रात किती लोकप्रिय होते, याची जशी प्रचिती येते तशी अनेक देवतांची उपासना करणाऱ्या या भक्तांच्या अंतरी एकत्वाची भावना कशी सतत जागृत होती, याचेही प्रत्यंतर येते.''

## कवी गंगाधर विरचित 'मार्तंडविजय'

कवी गंगाधर यांचा 'मार्तंडविजय' हा ग्रंथ सत्तावीस अध्यायांचा असून, त्याची ओवीसंख्या ४५५६ एवढी आहे. ग्रंथकर्ता गंगाधर हे जेजुरीचे राहणारे होते व खंडोबाचे निस्सीम भक्त होते. त्यांचे 'गुरू'ही जेजुरीचेच होते. गंगाधरांनी ग्रंथाच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी आपली नाममुद्रा उमटविताना त्यामध्ये आपल्या दुसऱ्या (ऊर्फ) नावाचा, आई-वडिलांच्या नावाचा तसेच आपल्या गुरूच्या नावाचा उल्लेख केला आहे[८].

**श्रीमद्‌बाजीगुरुचरणारविंदी भ्रमर । लक्ष्मीनारायणाचा कुमर ।**
**अभिधान असे गंगाधर । उपनाम कमळाकर जाणिजे ।।**
**स्वस्ति श्रीमार्तंडविजय ग्रंथ । समंत मल्हारीमाहात्म्य ।**
**सदा परिसोत प्रेमळ भक्त । निस्सीम मार्तंड-उपासक जे ।।**

यावरून गंगाधर कवींचे 'ऊर्फ' किंवा 'उपनाम' कमळाकर आहे. आई-वडिलांचे नाव लक्ष्मी-नारायण आहे तर 'बाजी' हे त्यांच्या गुरूचे नाव आहे.

गंगाधरांनी 'बाजी' या आपल्या गुरूबद्दल अत्यंत प्रेम, जिव्हाळा, भक्तिभाव आणि अभिमान वाटत असल्यामुळे ग्रंथाच्या मंगलचरणातच त्यांच्याबद्दल थोडी अधिक माहिती व्यक्त केलेली आहे :

**जेणें भारतावर केली टीका । तयाचे वंशीं जन्मला ऐका ।**
**तपस्वियांमाजी श्रेष्ठ जो कां । महादेव नामें विख्यात असे ।।**
**जयाद्रिपर्वतासमीप । जेजुरी नाम ग्राम विख्यात ।**
**तेथील राहणार दयावंत । गुरुराज समर्थ जो ।।**
**त्याचा वरदहस्त मस्तकीं लाधला । ग्रंथ लिहावयास सुचवी मतीला ।।**
**तेणें हर्षसागर उचंबळला । ग्रंथ सिद्धीस जाईल म्हणुनी ।।**

वरील ओवीवरून ग्रंथकर्त्याला असे सांगायचे आहे की, जेजुरी येथे एक 'महादेव' नावाचे श्रेष्ठ तपस्वी राहत होते. त्यांनी महाभारतावर टीकात्मक ग्रंथ रचला होता. त्यांच्या वंशात जन्मलेले साधु-पुरुष 'बाजी' हे गंगाधर कवीचे गुरू आहेत.

मार्तंडविजय हा वेदव्यास विरचित मल्हारीमाहात्म्याचाच मराठी अवतार आहे. कवी गंगाधर यांनी प्रत्येक अध्यायाच्या शेवटी या ग्रंथाचा नामोल्लेख केला आहे.

मूळ संस्कृत मल्हारीमाहाम्यम्‌चाच त्यांनी केदारकल्प, लिंगपुराण, पद्मपुराण या ग्रंथांचीही आवश्यक तेथे मदत घेतली आहे. मूळ 'संस्कृत मल्लारिमाहात्म्य'च मार्तंडविजयच्या जडणघडणीत महत्त्वाचे ठरले आहे, हेही

गंगाधरांनी आवर्जून सांगितले आहे.

**मल्हारीमाहात्म्याचा इतिहास घेऊन । केदारकल्पींची कथा जाण ।**
**तैसें लिंगपुराण पद्मपुराणींचा पूर्ण । कार्याकारण घेतला असे ।।**
**महाराष्ट्रभाषा वोवीबद्ध । मार्तंडविजय ग्रंथ सिद्ध ।**
**मूळ संस्कृत प्रसिद्ध । निश्चयेसी जाणिजे ।।**

जेजुरीचा खंडेराय हे कवीचे कुलदैवत असल्यामुळे त्यांनी खंडेरायाबद्दल वाटणाऱ्या अनन्य भक्तिभावापोटीच वरील पुराणाबरोबरच खंडोबाच्या उपासनेशी आणि चरित्राशी निगडित असणाऱ्या इतर ग्रंथांचाही आधार घेऊन 'मार्तंडविजय' हा 'ग्रंथराज' सजविला आहे. याबद्दल सविस्तर माहिती देताना गंगाधर लिहितात :

**या ग्रंथी मल्हारीमाहात्म्यींचा आधार । दुसरा जयाद्रिमाहात्म्य साचार ।**
**तिसरा केदारकल्पींचा सुंदर । कौतुकार्थ घेतला असे ।।**
**चवथा पद्मपुराणींचा इतिहास । पांचवा लिंगपुराण निर्दोष ।**
**सहावा पाताळखंडींचा इतिहास । कौतुकार्थ घेतला असे ।।**
**सातवा भविष्योत्तरपुराण । जेथें निकुंभासुर असे शिवगण ।**
**मल्लासुराचा पौत्र जाणून । कथा विस्तारें लिहिली असे ।।**

खंडोबा हा शिवावतार असल्यामुळे रुद्रसुक्तासारखी शिवउपासनापर कृती, लिंगपुराणासारखे शैवपुराण तसेच खंडोबाच्या उपासनेशी निगडित असलेली स्तोत्रे, मंत्र, तंत्र, सहस्रनाम इत्यादी ग्रंथांतील संदर्भ, ग्रंथात अनेक ठिकाणी आवश्यकतेनुसार कवीने वापरले आहेत. त्या काळात 'मैराळतंत्र' (मैलारतंत्र) आणि भैरवतंत्र हे दोन तंत्रग्रंथ उपासनाक्षेत्रात रूढ झालेले असावेत, असे गंगाधरांच्या रचनेवरून वाटते. ते छत्तीसाव्या अध्यायातील ५६-५७ व्या ओवीमध्ये म्हणतात :

**म्हाळसा सांगे विधीसी। तो विधी भैरवतंत्री असे निश्चयेसी।**
**शिवगीतेत सोळावे अध्यायासी। रामचंद्रास सांगे उमापती ।।**
**तो विधी भैरवतंत्री असे निश्चयेंसी ।**
**शिवगीतेत सोळावे अध्यायासी ।।**

अशासारखे अनेक ग्रंथांतील संदर्भ मार्तंडविजय ग्रंथात येतात. ज्ञानेश्वरादी संतांच्या ग्रंथवाङ्मयाचाही त्यांचा विशेष अभ्यास होता, हे पुढील ओवीवरून स्पष्ट होते :

**भगवद्गीतेंत तेरावे अध्यायीं । अर्जुनास सांगे उदधिंजावाई ।**
**गुरुपासनामार्ग सर्वही । विस्तार श्रीज्ञानदेवें केला असे ।।**

अशा प्रकारे वरील ओवीत ज्ञानेश्वरीतील अचार्योपासनेचा महिमा वर्णिला आहे.

**ऐसे पंचवीस अध्याय सुरस । मल्हारीमाहात्मींचा गर्भांश ।**
**उपनार्थ घेऊनि ग्रंथ निर्दोष । केला असे प्रभुवर्ये ।।**
**पृच्छकाचे प्रश्नांचें उत्तर । अकरा अध्याय असती साचार ।**
**ते यथाक्रमें सांगेन परिसोत नर । श्रीमार्तंड-उपासक जे ।।**

सदर 'मार्तंडविजय' ग्रंथाचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग पडतात. पूर्वार्ध १ ते २५ अध्यायांचा आहे, तर उत्तरार्ध २६ ते ३७ अध्यायांचा आहे. पूर्वार्धात खंडोबाचे चरित्रकथन करण्यात आले आहे, तर २६ ते ३६ हे अध्याय उपासनापर आहेत. यात प्रश्नकर्ता खंडोबा उपासनेबद्दल निरनिराळे प्रश्न विचारत आहे आणि त्याची उत्तरे ग्रंथकर्ता देत आहे, अशी या दहा अध्यायांची बैठक आहे. एकूण ८० प्रश्नांच्या या योजनेमध्ये एकूणच खंडोबा उपासनेबाबतीत बारीक-सारीक तपशिलांचा उलगडा होत जातो. शेवटच्या ३७ व्या अध्यायात विषयानुक्रमणिका सांगितली आहे. म्हणजे सुरुवातीपासून शेवटपर्यंत प्रत्येक अध्यायाचे थोडक्यात विवेचन केले आहे.

गंगाधर कवीने ३६ व्या अध्यायाच्या शेवटी 'मार्तंडविजय' ग्रंथाच्या समाप्तीची स्थल-कालविषयक नोंद पुढीलप्रमाणे केली आहे :

**ग्रंथाची लेखकतासमाप्ती । शके १७४५ निश्चितीं ।**
**माघ मास त्रयोदशी निगुती । भानुवासर जाणिजे ।।**
**श्री जेजोरी स्थान उत्तम जाण । पठारलिंग निरंजन ।**
**तेथें लेखनसमाप्ती करून । पारायण श्रीसन्निध केलेंसे ।।**

म्हणजेच गंगाधरकवीने शके १७४५ (इ.स.२७ फेब्रुवारी १८२४) मधील माघ महिन्यातील कृष्ण त्रयोदशीला शुक्रवारी श्रीक्षेत्र जेजुरी येथील लिंग कऱ्हेपठारावर म्हणजेच खंडोबाच्या मूळ ठाणी पठारलिंगासमोर बसून 'मार्तंडविजय' ग्रंथाची रचना पूर्ण करून समाप्ती केली आणि तिथेच या ग्रंथाचे पारायणसुद्धा केले. त्यामुळे श्रीमल्हारीमार्तंड गंगाधरावर संतुष्ट झाले, अशी ग्रंथकर्त्याची भावना झाली आहे. ग्रंथाचे पारायण पुढीलप्रमाणे करावे, असा प्रेमळ उपदेशही त्यांनी खंडोबाभक्तांना केला आहे :

**लेखकाचे हृदिस्थ होऊन । ग्रंथ लिहविला अति उत्तम ।**
**पारायण करील त्याचे काम । पुरविणार श्रीमल्हारी ।।**
**मऱ्हाष्टभाषा सुरस । ग्रंथकर्ता म्हाळसाविलास ।**
**श्रवण करील त्याचे मनोरथांस । सफळ कर्ता म्हाळसापती ।।**
**पारायण करावयाचा नेम । अग्रभागीं घालावें उत्तमासन ।।**
**वर भंडार वाहावा परम । भक्तीकरून जाणिजे ।।**
**धूप लाववा यत्नेंकरून । पुष्पें वाहावीं भाव धरून ।**
**नमस्कार करूनि म्हाळसारमण । परमभक्तीनें तोषविजे ।।**
**त्या आसनावरी प्रत्यक्ष । म्हाळसाकांत येऊनि बैसे सत्य ।**
**याचा संदेह किमपि मनांत । येऊं न द्यावा निश्चयेंसी ।।**
**या माहात्म्यश्रवणाचा संतोष । बहुत असे म्हाळसाकांतास ।**
**भक्तभाविकें निर्दोष येथींचा रस । प्रीतीकरूनि स्वीकारावा ।।**

वरीलप्रमाणे, गंगाधरांनी सांगितल्याप्रमाणे खंडोबाभक्तांनी मार्गशीर्ष शुक्ल प्रतिपदेपासून ते चंपाषष्ठी या सहा दिवसांत मनोभावे 'श्रीमार्तंडविजय' ग्रंथाचे पारायण करावे. कारण हे सहा दिवस मार्तंडाचे मणि-मल्ल दैत्यांशी मणिचूल पर्वतावर घनघोर युद्ध चालू होते. याची आठवण म्हणून या काळात सदर ग्रंथाचे केलेले पारायण शास्त्रोक्त मानले जाते. त्यामुळे खंडोबाभक्त पुढील तक्त्यात दाखविल्याप्रमाणे 'श्रीमार्तंडविजय'चा पारायणक्रम आचरताना दिसतात.

| क्र. | दिवस | अध्याय | ओव्या |
|---|---|---|---|
| १. | प्रतिपदा | १ ते ८ | ७४९ |
| २. | द्वितीया | ९ ते १३ | ७५० |
| ३. | तृतीया | १४ ते १७ | ८२६ |
| ४. | चतुर्थी | १८ ते २१ | ६९७ |
| ५. | पंचमी | २२ ते २८ | ७५७ |
| ६. | षष्ठी | २९ ते ३७ | ७७७ |

या कालावधीशिवायही खंडोबाचे लाखो भक्त बाराही महिने या ग्रंथाचे पारायण करतात. या पवित्र ग्रंथाला घरातील देव्हाऱ्यात खंडोबाच्या टाकाइतकेच स्थान असल्यामुळे खंडोबा उपासनेत याला अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे. कारण या ग्रंथाचे कर्ते 'गंगाधर' आहेत. ते खंडोबाशी पूर्ण एकरूप झाले आहेत. प्रपंचाचे ओझे श्रीमल्हारीवर सोपवून त्याच्याच कृपाशीर्वादाने सर्व काही चालते, अशी त्यांच्या मनाची श्रद्धा झाली आहे. म्हणूनच अत्यंत भारावलेल्या मनस्थितीत, पवित्र भावनेने त्यांनी 'मार्तंडविजय'ची रचना केली आहे, हे त्यांच्या पुढील काव्यावरून समजते :

**जेहीं जीवेंभावेंकरून । प्रपंच अर्पिला मल्हारीलागून ।**
**त्यांचें संसारओझें संपूर्ण । स्वामीकटाक्षें चालतसे ।।**

## श्री माणिकप्रभू विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

जन्म : २२ डिसेंबर १८१७, समाधी : २९ नोव्हेंबर १८३५.

माणिकप्रभूंचे पणजोबा केशव नाईक हे सात्त्विक वृत्तीचे होते. परंतु तेवढेच ते बाणेदारही होते. न्यायाला

अनुसरून वडिलोपार्जित संपत्तीचा हिस्सा आपणास मिळत नाही, हे पाहून त्यांनी आपल्या वाट्यास येणारा हिस्साही आपल्या भावास देऊन टाकला. त्याच वेळेस ते खंडोबादेवाची मूर्ती बरोबर घेऊन 'हरकुड' गावाहून कल्याणला आले व तिथेच स्थायिक झाले, असा उल्लेख माणिकप्रभूंच्या चरित्रात आढळतो. यावरून प्रभूंच्या पणजोबांच्याही आधीपासून त्यांच्या घराण्यात खंडोबाची उपासना चालू होती. त्यामुळेच त्यांना 'मल्हारीमाहात्म्य' लिहिण्याची इच्छा झाली असावी.

माणिकप्रभूंचे मल्हारीमाहात्म्य २२ अध्यायांचे असून, त्याची ओवीसंख्या २९१ एवढी आहे. महर्षी व्यासांनी लिहिलेल्या 'मल्लारिमाहात्म्यम्'चे हे प्राकृत भाषांतर असून, ब्रह्मांडपुराणाच्या क्षेत्रखंडातील सारांश प्रस्तुत ओवीबद्ध ग्रंथात घेतला आहे.[१] याचा दाखला देताना -

**इतिश्री क्षेत्रखंड ब्रह्मांडपुराण**
**मल्हारीमाहात्म्य व्यास कथन**
**त्यातील सारांश प्राकृत भाषण**
**माणिकदास बोलिला असे**

अशी 'समाप्तिमुद्रा' माणिकप्रभूंनी ग्रंथातील प्रत्येक अध्यायाच्या शेवटी उमटवलेली आहे.

मार्तंडभैरव अवताराची कालनिश्चिती सांगताना माणिकप्रभू लिहितात की, दोन पापी दैत्यांचा नि:पात करण्यासाठी सुमारे ८८ सहस्र युगांपूर्वी शंकर 'मार्तंडभैरव' अवतार धारण करून पृथ्वीवर अवतरले. म्हणजेच -

**अंठ्याशी सहस्र युगपूर्वी**
**अवतार मार्तंडभैरवी**
**द्विजपक्षपातास्तव उर्वीवरी**
**सांब आले असे**

माणिकप्रभू मल्हारीमार्तंडाचा महिमा वर्णन करताना लिहितात की :

**कलियुगी तया सारिखा**
**दुजा देव नाही देखा**
**सनत्कुमार ऋषी लोका**
**पार्वतीशी सांब सांगे**

कलियुगात या देवासारखा दुसरा देव नाही, हे सनत्कुमार ऋषींना सांगताहेत आणि सनत्कुमारांनी ऋषींजवळ जे सांगितले तीच कथा सांब सदाशिव, आदिमाया पार्वतीजवळ कथन करीत आहेत.

माणिकप्रभूंची भाषा अत्यंत ओघवती असून रसाळ आणि मधुर आहे, हे त्यांच्या मल्हारीमाहात्म्यातील ठिकठिकाणच्या वर्णनावरून जाणवते. ऋषींच्या आश्रमाभोवतीचे निसर्गवर्णन करताना, तिथले चित्र वाचकांसमोर उभे करताना प्रभू लिहितात :

**आंबे आणि केळे**
**अनेक सदा फळती फळे**
**मयुर कुकती वेळोवेळे**
**वृक्ष छाये बैसोनिया**

मल्ल राक्षसाने ऋषींचा आश्रम उद्ध्वस्त करण्याच्या अगोदर तिथला परिसर फुला-फळांनी बहरलेला होता. पक्ष्यांच्या गजबजाटाने तिथले वातावरण चैतन्यमय झाले होते. भूलोकीचे दुसरे नंदनवनच होते ते.

अशा वातावरणात सर्व पशू-पक्षी आपापसातील वैर विसरून एकत्रितपणे आनंदाने राहत होते. आश्चर्य म्हणजे वाघ आणि हरीण, साप आणि मुंगुससुद्धा एकत्रितपणे संचार करीत होते, इतके ऋषी-आश्रमातील वातावरण शुद्ध आणि पवित्र होते.

**निर्वैरपणे पाही ।**
**मृग व्याघ्र एक्याठायी ।**
**नकुळ आणि अहि ।**
**स्वच्छंदे वर्तती ॥**

यावरून माणिकप्रभूंचे मल्हारीमाहात्म्य आणि त्यातील भाषा यांचा अंदाज वाचकांना येईल. स्वत:च ते भगवान दत्तात्रेयाचा अवतार असल्यामुळे त्यांचे काव्य म्हणजे 'देववाणी' आहे.

शेवटी, एकविसाव्या अध्यायात 'मल्हारीमाहात्म्य' ग्रंथाचे माहात्म्य सांगताना खंडोबामुखाने प्रभू भक्तांना प्रेमळ व भावनिक उपदेश करतात :

**माझे माहात्म्य पुस्तक**
**मनी धरोनि भावनिक**
**पूजा करितांचि देख**
**प्राप्ती ब्रह्मपदवीची**

माझ्या माहात्म्य पुस्तकाचे शुद्ध भावनेने आणि प्रेमळ अंत:करणाने पूजा-पठण केल्यास भक्तांचे मनोरथ तत्काल पूर्ण होतील आणि शेवटी ते मोक्षास जाऊन त्यांना ब्रह्मपदवी प्राप्त होईल.

## कवी मिलिंद माधव विरचित 'मल्हारीमाहात्म्य'

**असे जेजुरी राजधानी जयाची । सती म्हाळसा पट्टराणी साची ।**
**असा थोर मार्तंड राणा मल्हारी । सदा वंदितो देव तो खड्गधारी ।।१।।**
**सदानंदाचा येळकोट येळकोट येळकोट**

सुरुवातीलाच 'नमन श्लोक' देऊन कवी मिलिंद माधव यांनी लिहिलेले 'मल्हारी मार्तंडविजय' अर्थात् 'खंडोबा माहात्म्य' हे एकाध्यायी १०४ श्लोकी असे अत्यंत लघुत्तम असून, साधी भाषा आणि माधुर्य यांनी परिपूर्ण आहे. सदर ग्रंथ हा व्यासकृत संस्कृत 'मल्लारिमाहात्म्यम्'चाच मराठी अवतार असला तरी या मूळ ग्रंथासहित कवीने खंडोबावर लिहिलेल्या इतर कवींच्या ग्रंथांचाही आधार घेतला आहे. इतरांच्या ग्रंथांमुळेच हा ग्रंथ लिहिण्यास प्रेरणा मिळाली, असे ते प्रांजळपणे नमूद करतात[१०].

**सिद्धहस्त कवि थोरथोर ।**
**त्यांनी मल्हारीच्या चरित्रावर ।।**
**ग्रंथरचना केली असे सुंदर ।**
**त्यानेच प्रेरणा जाहली ।।**

किंवा

**अनेकांनी लिहले अनेक ग्रंथ ।**
**त्यातील मुख्य मुख्य मथितार्थ ।।**
**खंडोबा भक्ताप्रीत्यर्थ ।**
**सारांशरूपें दिला इथे ।।**

खंडोबावर लिहिलेल्या अनेक कवींच्या ग्रंथातील मुख्य मुख्य मथितार्थ घेऊन खंडोबाच्या भक्तीपोटी सदर ग्रंथात सारांशरूपाने देऊन ग्रंथ सजविला आहे, असे कवीचे मत आहे. ग्रंथाच्या सुरुवातीस शिव, सरस्वती, भगवती, ऋषीमुनी, संत, बुधगण आणि सज्जन यांना नमन केल्यानंतर कवीने जेजुरी आणि मल्हारी मार्तंडाचे महिमान गाताना लिहिले आहे :

**धन्य धन्य जेजुरीचा डोंगर ।**
**मार्तंड मल्हारीचे एक क्षेत्र थोर ।।**
**घ्यावयासी भक्तांचा कैवार ।**
**खंडोबा तेथे उभा असे ।।**

'जेजुरीचा खंडोबा' कवीचे कुलदैवत असावे किंवा त्यांची फक्त जेजुरीच्या खंडोबालाच 'भजणूक' असावी, म्हणून त्यांनी सुरुवातीलाच जेजुरीचा महिमा वर्णन केला आहे.

वरील ओवीच्या पुढच्या ओवीत 'मल्हारीमाहात्म्य' लिहिण्यामागचा आपला उद्देश सांगून सदर ग्रंथाचा कवी या नात्याने मिलिंद माधव आपली नाममुद्रा उमटवताना दिसताहेत. ते लिहितात :

**हे दैवत जागृत भारी ।**

**नाव का पडले मल्हारी ।।**
**तीच गोड कथा सारी ।**
**मिलिन्द माधव वर्णितो ।।**

सदर ग्रंथ लिहून पूर्ण होताना ग्रंथ लिहिण्याठी ज्या ज्या ग्रंथांचा उपयोग झाला, त्यांच्या कर्त्यांचे आभार मानायला कवी विसरत नाहीत. ते अतिशय नम्रपणे पुढील शब्दांत कृतज्ञता व्यक्त करतात :

**ज्यांच्या ग्रंथांचा घेऊनी आधार।**
**गुंफिला हा शब्दसुमनहार ।।**
**त्यांचे ऋण मान्य साभार ।**
**कृतज्ञतेने सर्वथा ।।**

हा ग्रंथ केव्हा पूर्ण झाला, त्याचा कालमुहूर्तही कवीनी सांगितला आहे.

**शक अठराशे सत्याण्णवासी ।**
**अश्विन मासी शुक्लपक्षी ।।**
**गुरुवारी ललितपंचमीसी ।**
**ग्रंथ पूर्ण झाला हा ।।**

म्हणजेच, शके १८९७ (इ. स. १९७५) च्या अश्विन महिन्यामध्ये कृष्ण पक्षातील ललितपंचमी दिवशी गुरुवारी हा ग्रंथ पूर्ण झाला आहे.

इतर मल्हारीमाहात्म्य रचनाकारांप्रमाणेच प्रस्तुत कवीनेही आपल्या स्वरचित 'मल्हारीमाहात्म्या'च्या पठणाचे महत्त्व व फलश्रुती विषद केली आहे. ती अशी :

**नित्य करितां या ग्रंथाचे पठण ।**
**अडुसष्ट तीर्थांचें लाभेल पुण्य ।**
**सकल मनोरथ होतील पूर्ण ।**
**मल्हारीच्या कृपेनें ।।**

या ग्रंथाचे नियमितपणे पठण केल्याने ६८ तीर्थांचे पुण्य लाभून मल्हारीच्या कृपाशीर्वादाने भक्तांचे मनोरथ पूर्ण होतील, अशी कवीची श्रद्धा आहे.

याशिवाय, ग्रंथ समाप्तीनंतर **'ॐ नमो: मार्तंडाभैरवाय'** असा खंडोबाचा दशाक्षरी मंत्र दिला असून, खंडोबाभक्तांनी हा मंत्र कमीत कमी १०८ वेळा जपावा, असा प्रेमळ भावनिक उपदेशही कवीने केला आहे. ग्रंथातही या मंत्राचे पुढीलप्रमाणे माहात्म्य सांगितले आहे :

**खंडोबाचा दशाक्षरी मंत्रजप ।**
**जाळील सप्तजन्मीचे पाप ।।**
**अशुभ टळेल आपोआप ।**
**म्हणे मिलिन्द माधव ।।**

खंडोबाच्या दशाक्षरी मंत्रजपाने सात जन्मांचे पाप धुवून निघेल आणि आपोआपच भक्तांवरील संकटे दूर होतील, अशी कवीची आपल्या ग्रंथाबद्दलची श्रद्धा झाली आहे.

ग्रंथाच्या समाप्तीनंतर शेवटी पुढीलप्रमाणे मिलिंद माधवकृत 'मार्तंडभैरवाष्टक' देण्यात आले आहे :

**नमो चंड मार्तंड तो खड्गधारी ।।१।। उभा जेजुरीला असे सौख्यकारी ।।२।।**
**करी शूल शोभे तुझी थोर सत्ता ।।३।। नमो भैरवा शंकरा विश्वनाथा ।।४।।**
**अगा म्हाळसेच्या वरा देवराया ।। ५।। असावी शिरी ती कृपाछत्र छाया ।।६।।**
**तुझ्याविण आता कोण त्राता ।।७।। नमो भैरवा शंकरा विश्वनाथा ।।८।।**

महर्षी वेदव्यास लिखित 'मल्लारिमाहात्म्यम्' चे विविध कवींनी केलेले प्राकृत मराठी अनुवाद, त्यांच्या लेखनाचा बाज, त्यांनी मल्हारीमाहात्म्यात वेगवेगळ्या प्रसंगाची केलेली बहारदार वर्णने हे पाहिले. तसेच, प्रत्येक कवीच्या हातून झपाटलेपणातून निर्माण झालेल्या काव्यरचना पाहिल्या की, खंडेरायाशी तादाम्यता पावलेले त्यांचे

भावविश्व कसे साकारत जाते हे ही पाहिले. आता पुढील प्रकरणात मराठी संतांच्या खंडोबावरील काव्यरचनांची ओळख करून घेऊ.

[]

**संदर्भ - टिपा**


१. देवी भागवत, १/३/२५-३३.
२. महर्षी वेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम् (संस्कृत पोथी).
३. केसरी सिद्धपाळ विरचित मल्हारीमाहात्म्य, अध्याय-१,ओवी ६९,२२-३९,१-७,२-३१,६-४८,८-५५.
४. श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित मल्हारीमाहात्म्य, २-५५, १-८, २-१३३, २-१४४, २-१५३, १-१, २-१५६, २-१५.
५. प्रियोळकर अ. का. (सं), श्री मोरोपंतांचे समग्र ग्रंथ-१२, स्फूट काव्य (भाग तिसरा), पृ. १५-१६.
६. (डॉ.) वैष्णव मंगला, संतकवी शिवदिन केसरी : व्यक्ती आणि वाङ्मय, पृ. ५७७.
७. प्रसाद (खंडोबा विशेषांक-१९७८), पृ. ३३-३४.
८. पडवळ विलासराव बबनराव (हस्तलिखितकार), कवी गंगाधर विरचित मार्तंडविजय (हस्तलिखित पोथी), १-२८.३०,२५-२७.२८,३६-८४.८६,३६-११,३६-८,३७-२५-२६,३६-११२.११३,१-१२८-१३२.
९. श्री माणिकप्रभू विरचित, मल्हारीमाहात्म्य, २२-११, २२-१२, १-७, १-६, २१-९.
१०.मिलिंद माधव विरचित मल्हारीमाहात्म्य १-९६, ९७, ५, ६, ९८, १०४, १००, १०३.

जेजुरीचा खंडोबा, पंढरपूरचा विठोबा, तुळजापूरची तुळजाभवानी आणि कोल्हापूरची अंबाबाई ही महाराष्ट्राची चार लोकप्रिय लोकदैवते अवघ्या मराठी मनावर अधिराज्य गाजवीत आहेत आणि आपल्या दर्शनाने भक्तांना वर्षानुवर्षे सुखवित आहेत. म्हणूनच मराठी माणसांनी आपला श्रद्धाभाव या दैवतांच्या ठायी समर्पित केला आहे.

जेजुरीचा खंडोबा महाराष्ट्राचे उपास्य कुलदैवत, तर पंढरपूरचा विठोबा हे आराध्य दैवत. मूळ वारकरी पंथासह अनेक संप्रदायांच्या चौकटीत राहून विठुरायाने त्यांची भक्ती गोड मानून घेतली, तर अवघ्या बहुजन समाजाने आपली भक्तिसुमने खंडेरायाचरणी अर्पण केली.

कपाळावर गोपीचंदनाचा टिळा, खांद्यावर भागवत पताका, हातात टाळ किंवा चिपळ्या, गळ्यात अडकवलेली वीणा किंवा मृंदग. मुखी 'विठोबा-रखुमाई' आणि 'ग्यानबा-तुकाराम'चा नामघोष करीत पंढरपूरला जाणारा वैष्णव वारकरी जसा विठोबाचा खास भक्त म्हणून ओळखला जातो, तसेच नऊवारी पिवळे पातळ नेसून कपाळी भंडारा लावून व हाती घोळ वाजवत बेभानपणे नाचणारी मुरळी आणि हातात खंजीर, तुणतुणे घेऊन वाजविणारा आणि तोंडाने हब् हब् करीत खंडोबाच्या नावाने भंडाऱ्याची उधळण करणाऱ्या वाघ्याला पाहिल्यानंतर 'हे खंडोबाचे खास आवडते भक्त आहेत,' हे सांगण्याची गरज भासत नाही.

या दोन्हीही लोकदैवतांचे साम्यवैशिष्ट्य असे की, 'येळकोट येळकोट जय मल्हार' म्हणणारा खंडोबाभक्त तितक्याच श्रद्धेने पंढरपूरला जाऊन विठोबाचे दर्शन घेतो, तर 'ग्यानबा-तुकाराम' म्हणणारा वारकरी सश्रद्ध भावनेने जेजुरीला जातो आणि भंडाऱ्याची उधळण करून खंडोबाचरणी नतमस्तक होतो. खरे तर खंडोबा आणि विठोबा ही एकाच परमात्म्याची दोन भिन्न रूपे. म्हणूनच एका कल्पक संत कवयित्रीने (की लोककवयित्रीने ?) एक आध्यात्मिक रूपक लिहून या दोन्ही लोकदेवांच्या ऐक्याचे भावरम्य दर्शन घडविले आहे. ही कवयित्री म्हणते :

**या बाई जेजुरी नगरात । कोऱ्या चांदणी महालात ।।**
**पंढरीत आहे रखमाई । येथें म्हाळसा-बाणाई ।।**
**तेथें विटेवर उभा । येथें घोड्यावर शोभा ।।**
**तेथें पुंडलिक निधान । येथें हेगडे प्रधान ।।**
**तेथें बुक्क्याचे रे लेणे । येथें भंडार भूषणें ।।**
**तेथें वाहे चंद्रभागा । येथें जटीं वाहे गंगा ।।**
**तेथें मृदंग, वीणा, टाळ । येथें वाघ्या-मुरळींचा घोळ ।।**

विश्वरूप परमात्मा जरी विविध रूपांनी नटला असला तरी त्याचे आत्मस्वरूप एकच आहे, हेच वरील रूपकातून या कवयित्रीला सांगायचे आहे.

(अनेक मराठी संतांनी विठोबाला आपले परमदैवत मानून त्याच्याच कृपाशीर्वादाने आपल्या प्रासादिक वाणीतून रसाळ अभंगरचना निर्माण केल्या. भक्तिरसाने ओथंबलेली व भक्तांच्या अंत:करणात खंडोबा देवाबद्दल अनन्यभाव निर्माण करणारी भक्तिरचनाही त्यांनी केली. नरहरी सोनार, जनाबाई, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादींसारख्या मूळ भिन्न भिन्न संतप्रवृत्तीच्या व वेगवेगळ्या संप्रदायांतील अनेक संतमाहात्म्यांनी आपल्या अद्वैत भक्तीतून खंडोबाचे ज्ञानस्वरूप उभे केले आणि बहुजन समाजात शुद्ध भक्तीचे तत्त्वज्ञान रुजविले.

खंडेरायाचे लीलास्वरूप, जेजुरी, वाघ्या, मुरळी, जागरण यांच्यावर आध्यात्मिक रूपके रचून आणि 'आरती'रूपाने देवाचे महिमान गाऊन संतांनी लौकिकार्थाने खंडोबाभक्तांना परमार्थ मार्गदर्शन केले आहे. अद्वैत भक्तीतून आलेल्या आत्मानुभूतीतून 'आत्मस्वरूप परमात्मा' अशी खंडेरायाची वेगळी ओळख सामान्य जनांना करून दिली आहे. खंडोबावर विपुल भक्तिमय रचना करून 'खंडोबा भक्तिवाङ्मय' सुदृढ आणि समृद्ध केले आहे.)

## संत नरहरी सोनार

नरहरी महाराजांच्या नावावर एकूण ३४ अभंगच सध्या उपलब्ध आहेत. जेजुरीच्या खंडोबाच्या **'जेजुरीगड पर्वत शिवलिंगकार - मृत्यूलोकी दुसरे कैलास शिखर'** या आरतीच्या शेवटी 'दास नरहरी' अशी नाममुद्रा आलेली आहे. परंतु यातील 'नरहरी' हे संत नरहरी सोनार की, या नावाचा दुसरा कोणी भक्त आहे, याचा सध्या तरी उलगडा होत नाही. परंतु माझ्या मते, ही आरती नरहरी सोनारांनीच लिहिली असावी. यासाठी पुढील काही संदर्भ नोंदविता येतील :

(१) नरहरी महाराजांच्या समकालीन संतांच्या नावावर विपुल काव्यरचना असतील आणि नरहरी महाराजांना काव्यलेखनाचे अंग, बुद्धिमत्ता असेल तर त्यांच्या ९२ वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यामध्ये त्यांनी फक्त ३४ च रचना लिहिल्या असाव्यात, यात तथ्य वाटत नाही. ते स्वत: अद्वैत भक्ती मानणारे असल्यामुळे इतर देवदेवतांबद्दलच्या स्फुट रचनांचाही त्यात समावेश असावा. परंतु योग्य जतनाअभावी त्या कालौघात नामशेष झाल्या असाव्यात.
(२) नरहरींचे समकालीन संत ज्ञानदेव, जनाबाई यांच्या काव्यसंभारात खंडोबा-म्हाळसाबद्दलचे काही काव्य आढळते. नरहरी महाराजांचे खुद्द विठ्ठलाशी आंतरिक नात्याचे दृढ संबंध होते. ते स्वत: आत्मज्ञानी होते. हरी-हर ऐक्य मानणारे होते. प्रथम शिवभक्त असल्यामुळे शिवावतार असलेल्या खंडोबाबद्दल त्यांच्या मनात प्रेम उत्पन्न होणे साहजिकच आहे. त्यामुळे आंतरिक उमाळ्यातून त्यांना आरती सुचली असावी.
(३) त्यांच्या एकूण काव्यामध्ये काही ठिकाणी 'दास नरहरी' अशा प्रकारच्या नाममुद्रा आढळतात. उदा. 'देवा तुझा मी सोनार' या अभंगाच्या शेवटी ते म्हणतात :

**नरहरी सोनार हरीचा 'दास' । भजन करीतो रात्रंदिवस ।।**

दुसऱ्या एका अभंगात एके ठिकाणी ते म्हणतात :

**आलो पतित शरण । पावन करी नारायण ।।**
**पापी अमंगळ थोर । कृपा करी 'दासावर' ।।**

विशेष म्हणजे, खंडोबाची आरती आणि नरहरी महाराजांचे इतर काव्य यांमध्ये एक साम्य आढळते, ते म्हणजे दोन्ही ठिकाणी साधी-सोपी, सुटसुटीत व गोड भाषा असून लेखनशैलीची जातकुळी एकच वाटते.
(४) ही आरती लिहिणारा 'नरहरी' नावाचा जर दुसरा कोणी भक्त असेल, तर त्याची लेखनशैली इतकी व्यवस्थित असणे शक्य नाही. आणि शक्य असल्यास त्याच्या इतर विषयांवरील काही रचना उपलब्ध असणे अपरिहार्य आहे परंतु असे काही आढळत नाही.

वरील सर्व बाबींच्या तपशिलावरून खंडोबाची खालील आरती नरहरी महाराजांनीच लिहिली असावी, असे ठामपणे सांगण्यास वाव आहे. संपूर्ण आरती पुढीलप्रमाणे :

**जेजुरीगड पर्वत शिवलिंगाकार ।**
**मृत्यूलोकी दुसरे कैलास शिखर ।।**
**नानापरिंची रचना रचिली अपार ।**
**तये स्थळी नांदे स्वामी शंकर ।।१।।**
**जय देव जय देव जय शिवमार्तंडा ।**
**अरिमर्दन मल्हारी तूंची प्रचंडा ।।धृ.।।**
**मणि-मल्ल दैत्य प्रबळ तो झाला ।**
**त्रिभुवनी त्यानें प्रळय मांडीला ।।**
**नाटोपे कोणास वरें मातला ।**
**देवगण गंधर्व कांपती त्याला ।।२।।**
**चंपाषष्ठी दिवशी अवतार धरिसी ।**
**मणि-मल्ल दैत्यांचा संहार करिसी ।।**
**चरणी पृष्ठीं खड्गे वर्मी स्थापिसी ।**
**अंती वर देऊनि त्या मुक्तीते देसी ।।३।।**
**मणि-मल्ल दैत्य मर्दुनि मल्लारी ।**
**देवा संकट पडतां राहे जेजुरी ।।**
**अर्धांगी म्हाळसा शोभे सुंदरी ।**
**देवा ठाव मागे 'दास नरहरी' ।।४।।** [२]

**संत ज्ञानेश्वर**

ज्ञानदेवांच्या नावावर असलेल्या 'योगवासिष्ठ' या ग्रंथात 'मल्हारीमाहात्म्य' कथेतील मल्हारीरूपाचे वर्णन आढळते. ते असे :

**सप्तपुत्रांसहितु । युधिष्ठिरु तपोवना आतु ।**
**मळमणि दैत्यें निभ्रांतु । पराभविला ॥**
**तो योगिया देखौनि स्वभावें । शंकर काढावेयासी धावे ।**
**तो मल्लमणि वधावे । बहिरवरुपें ॥**[३]

मणिचूल पर्वतावर कठोर तपश्चर्या आणि यज्ञयागादी कर्मे करणाऱ्या धर्मपुत्र सप्तर्षींचा मल्लासुराने अतोनात छळ करून आश्रम आणि यज्ञकुंड उद्ध्वस्त केले. तेव्हा चिंताक्रांत झालेल्या ऋषींनी शंकराकडे जाऊन ही गोष्ट कथन केली व मणि मल्ल नाशाची विनंती केली. शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण केला आणि मणिचूल पर्वतावर युद्धात मणि-मल्ल दैत्यांचा संहार केला. नंतर ऋषींच्या विनंतीवरून ते प्रेमपुरी येथे शक्ती म्हाळसासह लिंगद्वयरूपात प्रकट झाले. अशा प्रकारे शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण करून आपले पूर्वनियोजित कार्य सिद्धीस नेले. असाच अर्थ वरील श्लोकामध्ये अभिप्रेत आहे.

### संत नामदेव

चंपाषष्ठी दिवशी खंडोबाला नैवेद्य अर्पण करण्यापूर्वीच बाळ श्रीकृष्णाने तो भक्षण केला. माता नको म्हणत असतानाही बाळकृष्णाने नैवद्य भक्षण केल्यामूळे खंडेरायाने तत्काळ त्यास चाणक्षा दाखविली, हेच नामदेवांना पुढील काव्यातून सांगायचे आहे :

**नंदाचिये घरीं चंपाषष्ठी नेम। कुळीं कुलधर्म मार्तंडाचा ॥१॥**
**पक्वान्नेंहीं नाना रोटिया भरीत। केली अपरमित यशोदेनें ॥२॥**
**वाघिया मुरळी सांगितली दोन्ही। आला चक्रपाणि खेळतची ॥३॥**
**मातेलागी म्हणे लागतीसे क्षुधा। थांब रे गोविंदा म्हणे माता ॥४॥**
**घेतलीसे आळी करी लगबग। विस्तारिले सांग नैवेद्यासी ॥५॥**
**नवोनियां पुढे देवाच्या ठेविलें। बोलवा वहिले आमंत्रिक ॥६॥**
**तोंवरी मागें तो भक्षी नारायण। यशोदा आपण रागावली ॥७॥**
**दुरळ हा देव होय आतां कैसें । मार्तंडाचे पिसे लागे तुज ॥८॥**
**करी क्षणामाजीं वाकडेंचि मुख। हरी खात विख कालवलें ॥९॥**
**जाणीतला भाव मायेंचे अंतर। करूनिया खरें दावी देव ॥१०॥**
**वांकडिया हातें ग्रास घाले मुखें। मुख तेंहि सुखें तैसें दावी ॥११॥**
**पिसाळल्या परि करी वेडेचार। भय वाटे फार मायेलागी ॥१२॥**
**पूर्वी म्या सांगता नायकसी कैसा। पुढें हा वोळसा ओढवला ॥१३॥**
**पाचारिले देवऋषी हालविती सुपें। त्याचिया न बापें देव निघे ॥१४॥**
**वासोनिंया डोळे तयाकडे पाही। कांपे तया भयें थरथरा ॥१५॥**
**मंत्रूनिया पाणी आणिला अंगारा । तयाचा मातेरा केला देवें ॥१६॥**
**नवसा न पावती गोकुळींच्या देवता । उपाय मागुता राहिलासे ॥१७॥**
**चिंतावली माय मूर्च्छा आली तिसी । जाली पोरपिसी मोहजाळें ॥१८॥**
**जाणोनी अंतर म्हणे कृष्णार्पण । तेंव्हा आले विघ्न दूर होय ॥१९॥**
**नामा म्हणे देव पाहे कृपादृष्टी। जाणवलें पोटी हाचि देव ॥२०॥**[४]

### संत जनाबाई

जनाबाईने कानड्या विठ्ठलावर भक्तीअभंग लिहिता लिहिता कानड्या मैलारावरही एक आध्यात्मिक रूपक रचले आहे. खंडोबा हा नवसाला पावणारा देव असल्यामुळे जनाबाईंच्या काळातही लोक खंडोबाला नवस बोलत होते. असाच जनाबाईंनीही खंडोबाचरणी एक नवस केला आहे. परंतु धन-दौलत, ऐश्वर्य, संतान याविषयीचा नसून तो 'शुद्ध आध्यात्मिक रूपकात्मक' नवस आहे. जनाबाई खंडेरायाला 'मागणे' मागते आहे :

**खंडेराया तुज करिते नवसू ।**
**मरू देरे सासू खंडेराया ।।**
**सासरा मेल्यावरी तुटेल आसरा ।**
**मरू दे सासरा खंडेराया ।।**
**सासरा मेलिया होईल आनंद ।**
**मरू दे नणंद खंडेराया ।।**
**नणंद मरता होईल मोकळी ।**
**गळा घालीन झोळी भंडाराची ।।**
**जनी म्हणे खंडी अवघे मरू दे ।**
**एकटी राहू दे पायापाशी ।।**[५]

वरील भारुडात परमेश्वराशी तादात्म्यता पावून खऱ्या आत्मस्वरूपाचा आनंद मिळविण्यासाठी खंडेरायाला जनाबाईने बोललेला नवस हे खंडोबाच्या भक्तीतील एक प्रासादिक रूपक आहे. वैराग्याच्या पैलथडीला पोहोचलेली जनाबाई म्हणतेय, 'देवा खंडेराया, माझी विकल्परूपी सासू मरू दे. एकदा हा विकल्प नाहीसा झाला की अहंकारी सासऱ्याचा आसरा आपोआप तुटेल. म्हणून अहंकाररूपी सासऱ्यालाही मारून टाक म्हणजे मी निरहंकाराचा आनंद भोगेन. सासरा मेल्यावरही माझ्या तृष्णा, आशा, ममतारूपी नणंदा तशाच जिवंत राहतील आणि मला रात्रं-दिवस छळतील. म्हणून त्यांचाही नायनाट करून टाक. असे हे सर्व विकार नाहीसे झाले की, मला खऱ्या अर्थाने आत्मरूपी खंडेरायप्राप्तीची अनुभूती होईल, आणि मग भक्तिभावरूपी भंडाऱ्याची उधळण करण्यासाठी मी भंडाऱ्याची झोळी गळ्यात घालीन आणि तुझ्या चरणांशी एकरूप होईन.'

### संत एकनाथ

नाथमहाराजांनी खंडोबा, वाघ्या [६], मुरळी यांच्यावर रूपकाच्या माध्यमातून परमार्थिक रचना करून खंडोबा भक्तिवाङ्मयात मोलाची भर घातली आहे.

**वारी वो वारी । देई कां गा मल्हारी ।**
**त्रिपुरारी हरि । तुझे वारीचा मी भिकारी ।।१।।**
**वाहन तुझें घोड्यावरी । वरी बैसली म्हाळसा सुंदरी ।**
**वाघ्या मुरळी नाचती परोपरी । आवडी ऐसी पाहीन जेजुरी ।।२।।**

म्हाळसा सुंदरीसह घोड्यावर बसलेल्या त्रिपुरारी हरी खंडेराया, मी तुझ्या वारीचा भिकारी आहे. वाघ्या-मुरळी नाचत असलेल्या तुझ्या जेजुरीची वारी मला घडावी, यासाठी माझे मन आतुर झाले आहे. तुझ्या दर्शनाची आस मला लागून राहिली आहे. माझे सारे लक्ष जेजुरीच्या वाटेकडे लागलेले आहे.

**ज्ञान कोटंबा घेउनी आले द्वारीं । बोध भंडार लाविन परोपरीं ।।**
**एका जनार्दनी विनवी श्रीहरि । वारी देऊनी प्रसन्न मल्हारी ।।**

असा हा एकनाथरूपी भक्त ज्ञानाचा कोटंबा हातात घेऊन आणि बोधाचा भंडारा कपाळी लावून अद्वैताच्या महाद्वारात उभा आहे आणि जेजुरीची वारी घडावी म्हणून खंडेरायाला विनंती करीत आहे. या भक्ताचा भक्तिभाव पाहून मल्हारी देवही प्रसन्न झाला आहे.

**अहं वाघ्या सोहं वाघ्या । प्रेमनगारा वारी ।।**
**सावध होउनि भजनीं लागा । देव करा कैवारी ।।**
**मल्हारीची वारी माझ्या । मल्हारीची वारी ।।**
**इच्छामुरळीस भुलू नका । पडाल नरकाद्वारीं ।।**
**बोधबुधली ज्ञानदिवटी । उजळा महाद्वारीं ।।**
**आत्मनिवेदन भरीत-रोडगा । निवतील हारोहारीं ।।**
**एका जनार्दनी धन्य खंडेराव । त्यावरि कुंचा वारी ।।**

अद्वैताच्या महाद्वारात उभा असलेला वरील रूपकातील नाथांचा वाघ्या सांगतोय, मीच सोहंवाघ्या आहे. म्हणजे मीच आत्मरूपी परमात्मा आहे. त्या पारमार्थिक अनुभूतीतूनच तो खंडोबाभक्तांना सल्ला देतो की, **'इच्छा**

**मुरळीस भुलू नका पडाल नरकाद्वारी.'**

विषयवासना, भोग, विकाराच्या भावनेतून न पाहता शुद्ध सात्त्विक प्रेमानेच मुरळीकडे पाहा, नाही तर तुम्ही नरकाच्या पापसागरात बुडाल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा अज्ञानाचा पडदा बाजूला सारून, षड्रिपुंचा त्याग करून खंडेरायाच्या जागरणात सावधानतेचे भजन करा. अन्नरूपी भरीत-रोडग्यापेक्षा आत्मनिवेदनाचा नैवेद्य खंडेरायचरणी अर्पण करून आत्मस्वरूपाच्या बुधलीने ज्ञानमय दिवटीत तेल टाका म्हणजे ज्ञानाच्या ज्योतीने आयुष्याचे महाद्वार उजळून निघेल. शुद्ध आचरणातून भक्ती केल्यास ती श्रेष्ठ दर्जाची ठरते. त्यामुळेच परमेश्वर प्राप्ती होते. हेच नाथांच्या वाघ्याला सांगायचे आहे.

नाथमहाराजांनी वाघ्याप्रमाणेच मुरळीवरही एक सुंदर भारूड रचले आहे. त्यातील आध्यात्मिक रूपक बाजूला काढले, तर त्यांनी या मुरळीला एका उच्च अशा पारमार्थिक भूमिकेत नेऊन कसे ठेवले आहे, हे ध्यानात येते.

**नि:संग मुरळी झालें । या मालूचें घर रिघालें ॥**
**गळा भक्तीची भांडारी । भावाचा कोटंबा करीं ॥**
**विवेकाची मागतें मी वारी । या संतांच्या चौंधा आलें ॥**

नाथांची आध्यात्मिक मुरळी नि:संग होऊन म्हणजेच सर्व विषयविकारांचा त्याग करून खंडेरायाचरणी लीन झाली आहे. तिच्यातल्या विषयवासना, विकार संपून तिने शुद्ध सात्त्विक असे नवे रूप धारण केले आहे. गळ्यात भक्तीची भांडारी आणि हातात भावाचा कोटंबा घेऊन ती मल्हारीची वारी मागतेय. 'विवेकाशिवाय परमार्थाची वाट बिकट आहे, सर्व असंगाचा त्याग करून परमेश्वराचे चिंतन केले पाहिजे,' अशी विशाल दृष्टी तिला प्राप्त झाली आहे.

**चौहात घांट वाजती । सोहं शब्द घोळ गर्जती ।**
**वाघ्या मुरळ्या या नाचती । गुरुकृपेचें अंजन ल्यालें ॥**
**वाजे वैराग्य-तुणतुणं । तें कदा नव्हे बा सुनं ।**
**मग-घुंगरू वाजे छुनछुनं । नाचत जेजुरी गेलें ॥**
**गड देखिला जेजुरी । आत्मा नांदतो मल्हारी ।**
**जाऊन बसलें मी मांडीवरी । एका जनार्दन बोले ॥**[७]

गुरुकृपा व्हावी म्हणून तिने गुरुकृपेचे अंजन डोळ्यांमध्ये घातले आहे. मल्हारीरायाच तिचा गुरू आहे. विवेकाच्या मार्गावरून वैराग्याचे तुणतुणे वाजवीत ती जेजुरीला आली आहे. जेजुरीगडाचे दर्शन होताच खऱ्या अर्थाने तिच्यातील भोगी आणि विकारी दृष्टी नाहीशी होऊन तिला आत्मानंदाची आणि आत्मस्वरूपाची जाणीव झाली आहे. मल्हारीच्या दर्शनाने ती भक्तिरसात न्हाऊन निघाली आहे. तन-मन-धन विसरून ती मल्हारीच्या अंगणात बेभान होऊन नाचते आहे. कारण मल्हारीप्राप्तीचा तिला इतका आनंद झाला आहे की, आत्मानंदात ती पार बुडून गेली आहे.

## संत तुकाराम

संत नरहरी सोनार, संत ज्ञानेश्वर, संत जनाबाई, संत एकनाथ यांच्याप्रमाणेच तुकोबांनीही खंडेरायाची अल्पशी का होईना, वाङ्मयीन भक्ती करून आपल्या भारुडातून खंडोबाभक्तीचे शुद्ध तत्त्वज्ञान सांगितले आहे. खंडेरायाच्या भक्तीत आत्मरंगी रंगलेल्या तुकारामांचा वाघ्या सांगतोय :

**अनंत युगाचा देव्हारा । निज बोधाचा धुमारा ॥**
**अवचित भरला वारा । या मल्हारी देवाचा ॥**
**शुद्ध सत्वाचा कवडा मोठा । बोध बिरडे बांधला गाठा ॥**
**गळा वैराग्याचा पट्टा ॥ वाटा दावू या भक्तीच्या ॥**

निजबोधाचा प्रपंच असलेल्या या अनंतयुगाच्या देव्हाऱ्यामध्ये मल्हारीदेवाचा चैतन्यभाव भरून राहिला आहे. अशा या मल्हारीदेवाचा चेला असलेल्या वाघ्याजवळ शुद्ध सत्त्वाच्या कवड्यांची बोधाच्या गाठींनी गुंफलेली माळ आहे. तर गळ्यात वैराग्याचा पट्टा (गोफ) आहे आणि हा वाघ्या भक्तीच्या मार्गावर उभा राहून खंडोबाभक्तांना पारमार्थिक मार्गदर्शन करीत आहे.

**हृदय कोटंबा सांगते । घोळ वाजवू अनुहाते ।।**
**ज्ञान भंडाराचे पोते । रिते नव्हे कल्पांती ।।**

खंडेरायाचा घोळ वाजवत, आपल्या हृदयरूपी कोटंब्यातून कधीही न संपणारा भक्ति-भंडारा हा वाघ्या उधळीत आहे.

**लक्ष चौऱ्यांशी धरे चारी । या जन्माची केली वारी ।।**
**प्रसन्न झाला देव मल्हारी । सोहं भावी राहिलो ।।**

मनुष्यदेह दुर्मिळ आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनींतून फिरून आल्यानंतर मनुष्यदेह प्राप्त होतो. मनुष्याने जन्माला आल्यानंतर एकदा तरी खंडेरायाची वारी करावी, असे सांगत असतानाच वारीचे भाग्य या वाघ्याला लाभले आहे. त्यामुळे तो धन्य झाला आहे. एवढेच नव्हे तर खंडेरायाशी (आत्मरूप परमात्म्याशी) एकरूप झाल्यामुळे देवही या वाघ्यावर प्रसन्न झाला आहे. हा वाघ्या दुसरा तिसरा कोणी नसून मीच आहे, अशी तुकोबारायांची भावना झाली आहे.

भक्तीचे प्रतीक म्हणून वाघे खंडोबाच्या यात्रांमध्ये तसेच जागरणात दोन्ही हात जमिनीवर टेकत चालण्याचा आणि तोंडाने 'गुर्रगुर्र' करण्याचा (भुंकण्याचा) अभिनय करतात. याचा दाखला देत संत तुकाराम महाराज स्वत:ला श्वान (खंडोबाचा भक्त वाघ्या) समजून लिहितात :

**या देवाचे भरता वारे । अंगी प्रेमाचे फेपरे ।।**
**गुरगुर करी वेडे चारे । पाहा तुके भुंकविले ।।**[८]

याशिवाय, विठोबा आणि खंडोबा यांच्यातील साम्य दर्शविणारी तुकारामांची आणखी एक अभंगरचना आढळते :

**पंढरीशी अबीराचे लेणे । जेजुरीत भंडार भूषणे ।।**
**तेथे मृदंग-वीणा-टाळ । येथे वाघ्या-मुरळ्यांचा घोळ ।।**
**तुका म्हणे एकचि पायी । विठू खंडू दुजा नाही ।।**[९]

पंढरपुरात विठोबाचे लेणे अबीर-बुक्का आहे तर जेजुरीत खंडोबाचे लेणे भंडारा आहे. मृदंग, वीणा, टाळ वाजवून वारकरी विठुरायाचे गुणगान गातात, तर हातातील घोळ वाजवत वाघ्या-मुरळी खंडोबाचा जयजयकार करतात. हे जरी खरे असले तरी, चराचर विश्वाला व्यापून राहिलेल्या परमात्म्याचीच ही दोन भिन्न रूपे आहेत. आणि म्हणूनच विठ्ठल आणि खंडेराय यांच्यातील अभेद्यपण स्पष्ट करताना तुकोबाराया म्हणतात - **'विठू खंडू दुजा नाही.'**

## संत रामदास

शिवकाळात खंडोबाभक्तीचा प्रसार आणि लोकप्रियतेने उत्कर्ष गाठला होता. त्यामुळे वीरवृत्तीच्या या लोकदेवाकडचा बहुजनांचा ओढा पाहून देशभर पायी भ्रमंती करणारे वीर आणि बलोपासक समर्थ रामदास जेजुरी आणि पालीकडे आकृष्ट झाले नाहीत, तरच नवल. स्वत: जेजुरी आणि पाली येथे जाऊन खंडेरायाचरणी लीन होऊन त्यांनी या वीरदेवाचे गुणगान गायिले. आरती, पदे, अभंग, भारूड, जेजुरी यात्रेचे वर्णन, जेजुरीगडावरील तुरूकांचे आक्रमण, पाली यात्रेत शाहिरांच्या कलगी-तुऱ्यांच्या स्पर्धेत टाकलेली कूटे इत्यादी समर्थांचे खंडोबाविषयक लिहिलेले अजरामर अक्षरसाहित्य आहे.

**'पंचानन हयवाहन'** ही समर्थांनी लिहिलेली आणि सध्या महाराष्ट्रभर प्रचारात असलेली सुप्रसिद्ध आरती, समर्थांनी कशी लिहिली, याविषयी एक मनोरंजक कथा सांगितली जाते :

''एकदा समर्थ चिंचवडच्या (पुणे) मोरया गोसावींची भेट घेऊन परत आपल्या मुक्कामी चाफळला चालले होते. जाता जाता थोडा वेळ ते जेजुरीत विश्रांतीसाठी थांबले. परंतु चाफळला जाण्याची घाई असल्याने डोंगर चढून खंडोबादर्शन न घेता पायथ्यापासूनच त्यांनी खंडोबाला हात जोडले आणि काही वेळाने पुढची वाट चालू लागले. काही अंतर पुढे गेल्यानंतर पाठीमागून घोड्यांच्या टापांचा आवाज आला. समर्थ पाठीमागे वळून पाहतात, तर साक्षात छत्रपती शिवाजीमहाराज निळ्या घोड्यावर आपल्या काही निवडक मावळ्यांसह येताना त्यांना दिसले. शिवाजीमहाराजांना अचानक इथे आलेले पाहून समर्थ काहीसे आश्चर्यचकित झाले. तेवढ्यात महाराज घोड्यावरून

खाली उतरून समर्थांजवळ आले आणि म्हणाले, ''स्वामीजी, खंडोबाच्या दर्शनाला येणार ना ?''

त्यावर समर्थ म्हणाले, ''महाराज, मला लवकर चाफळला जाणे महत्त्वाचे आहे. येईल पुन्हा योग. मग आम्ही गडावर जाऊन खंडोबाचे दर्शन घेऊ.'' परंतु महाराजांनी समर्थांना खंडोबादर्शनाचा फारच आग्रह केला आणि म्हणाले, ''आम्ही काही कामगिरीनिमित्त पुरंदरला आलो होतो. आता परत पुण्याला चाललो आहोत. आपण खंडोबा दर्शन घेऊनच पुढे जावे. माझा हा कोतवाल तुम्हाला घोड्यावर घेऊन जाईल. आपण माघारी परतेपर्यंत आम्ही महाद्वाराजवळ थांबू.'' मग कोतवालाने समर्थांना घोड्यावर बसवून महाद्वारापर्यंत नेले. तिथे समर्थ घोड्यावरून खाली उतरले आणि खंडोबा दर्शनासाठी मंदिरात गेले. कोतवाल महाद्वारातच घोड्याजवळ थांबला.

समर्थ देवदर्शन करून परत येतात तर काय चमत्कार ! ना तिथे कोतवाल, ना घोडा, ना शिवाजीमहाराज. सारेच गायब झालेले. समर्थांनी क्षणभर डोळे मिटून खंडेरायाचे ध्यान केले, तेव्हा झालेल्या चमत्काराचा त्यांना बोध झाला. साक्षात खंडेरायानेच शिवाजीमहाराजांच्या रूपात समर्थांना दर्शन दिले होते. समर्थांचे अंत:करण उचंबळून आले आणि त्यांच्या मुखातून उद्‌गार बाहेर पडले, 'खंडेराया, तुमची लीला अगाध आहे. आम्ही जसे रघुपतीचे दास आहोत तसे आपलेही आहोत, पण आम्हाला दर्शनास का मुकविले ?' समर्थांच्या अंत:करणातून निघालेले ते बोल ऐकून खंडेराय प्रसन्न झाले व समर्थांसमोर साक्षात प्रकट होऊन त्यांनी दर्शन दिले. प्रत्यक्ष खंडेरायाला समोर पाहून भक्तिरसात न्हाऊन निघालेले समर्थ देवाचा महिमा आळवू लागले. तेच अमृतबोल म्हणजे सध्या जेजुरी गडावरील आणि कऱ्हेपठारावरील मंदिरात त्रिकाळ पूजेच्या वेळी म्हटली जाणारी आणि महाराष्ट्रात सर्वत्र प्रचारात असलेली सुप्रसिद्ध आरती **'पंचानन हयवाहन सुरभूषित निळा'** ही होय.[१०] आरती पुढीलप्रमाणे :

**पंचानन हयवाहन सुरभूषितनीळा ।**
**खंडमंडित दंडितदानव अवलीळा ।**
**मणिमल्ला मर्दूनिया जो धूसर पिवळा ।**
**करि कंकण बाशिंगे सुमनाच्या माळा ।।१।।**
**जयदेव जयदेव जय शिव मल्हारी ।**
**वारी दुर्जन असुरा भव दुस्तर तारी ।।धृ.।।**
**सुरवर सत्वर वर दे मजलागी देवा ।**
**नाना नामे गाईन ही तुमची सेवा ।**
**अघटित गुण गावया वाटतसे हेवा ।**
**फणिवर शिणला किती नर पापर केवा ।।२।।**
**रघुवरस्मरणी शंकर हृदयी नीवाला ।**
**तो हा मल्लांतक अवतार झाला ।**
**यालागी आवडी भावे वर्णिला ।**
**रामी रामदासा जिवलग भेटला ।।३।।**

खंडेरायाचे झालेले साक्षात विराट दर्शन आणि त्यांच्याशी थेट साधलेला सुसंवाद यामुळे समर्थांच्या मनामध्ये या देवतेबद्दल आणि तीर्थक्षेत्र जेजुरीबद्दल अनन्यभाव निर्माण होणे तसे साहजिकच आहे.[११-१२]

**नाम जेजुरी गड सुंदर । तेथे नांदे म्हाळसावर ।**
**संगे भैरवगण अपार । पूर्ण अवतार शिवाचा ।।१।।**
**पीत अश्वावरी स्वार । हाती घेऊनि तलवार ।**
**करी मणि-मल्ल संहार । करी उद्धार जगाचा ।।२।।**
**चंपाषष्ठी उत्सव थोर । यात्री मिळती अपार ।**
**यळकोट नामाचा गजर । भक्त आनंदे करिताती ।।३।।**
**दास म्हणे रामराव । राम तोचि खंडेराव ।**
**जेथे भाव तेथे देव । लक्ष पायी जडलिया ।।४।।**

शिव आणि मार्तंड या दोहोंत अद्वैत पाहणारे समर्थ एका अभंगात खंडोबा स्वरूपाचे वर्णन करतात :

**देव शिवाचा अवतार । जाउनि बसला गडावर ।।**

**एक निळ्या घोड्यावर । एक ढवळ्या नंदीवर ।।**
**एका विभूतीचें लेणें । एका भंडार-भूषणे ।।**
**रामदासीं एक जाला । भेदभाव तो उडाला ।।**

'मार्तंडभैरव अवतारात विष्णूने आपले मोहिनीरूप पार्वतीला बहाल केले होते. ती मोहिनीरूप पार्वती म्हणजेच म्हाळसा होय. प्रेमपुरी येथे ऋषींनी व देवांनी मातीच्या मूर्तीमध्ये शंकराला आणि विष्णूला स्थित करून पूजा केली होती,' हेही समर्थांनी वाचले असावे. अशा प्रकारे शंकर आणि विष्णूचे सख्य अनुभवलेले समर्थ अनेक पुराणांत सांगितल्याप्रमाणे 'शंकर सतत रामनामाचा जप करतो' या उक्तीचा दृष्टांत देतात :

**रामनाम जपतो महादेव । त्याचा अवतारी हा खंडेराव ।।**
**हळदीची भंडारें उधळिती । तेणें सोन्यारूप्याचीं भांडारें भरतीं ।।**
**मणिमल्लमर्दन देव । एका भावें भजतां मार्तंडभैरव ।।**
**म्हाळसा बाणाई सुंदरी । मध्यें शोभे भूषणमंडित मल्हारी ।।**
**अखंड रणनवरा त्यासी भंडारें प्रीती । रोकडी प्रचीति**
**जनांमध्यें दाखवी ।।**
**तयास भजतां भक्त होताती खवी ।।**
**भक्त कुतरे वाघे अंदु तोडिती । दुर्जनाची तत्काळ होतसे शांति ।।**

समर्थ खंडोबाभक्तांना सल्ला देतात, 'हळदरूपी भंडारा उधळा म्हणजे तुमच्या घरी सोन्या-रूप्याने भंडारे भरतील. सोन्या-रूप्याची भंडारे भरून देणारी ही समृद्धीची देवता आहे. या देवतेचे अखंड नामस्मरण केले तर हा देव लगेच चांगली प्रचिती देतो आणि दुर्जनांनाही तत्काळ शिक्षा करतो'', असे ते आत्मानुभूतीतून ठामपणे सांगतात. आणि म्हणूनच जीवनात, प्रपंचात कोणत्याही प्रकारचे यश संपादन करण्यासाठी खंडेरायाचे भजन करणे अपरिहार्य आहे, असे ते स्वानुभवातून आवर्जून नमूद करतात.

**अखंड रणनवरा । यश पावा त्याचे भजन करा ।।**
**अखंड प्रचिती जनी । दास म्हणे ओळखा मनीचे मनी ।।**

खंडेराय हा वीरउपासक देव. मानवाच्या जीवनात सुखसमृद्धी, स्वातंत्र्य आणि आत्मोन्नती साधायची असेल, तर दुष्ट वृत्ती, विकार आणि दुर्जनांचा संहार होणे आवश्यक आहे. त्यासाठीच दुर्जनांचे प्रतीक असलेल्या मणि-मल्ल दैत्यांचा खंडेरायाने संहार केला.

जेजुरी गडावर जेव्हा तुर्कांचे आक्रमण झाले (औरंगजेब आणि सव्वा लाख सोन्याच्या भुंग्यांची गोष्ट), तेव्हा या वीर देवाने अगणित भुंगे पाठवून तुर्की सैन्याला पिटाळून लावले आणि औरंगजेबास आपल्या वीरवृत्तीचा प्रत्यय देऊन धडा शिकविला. खंडोबा भक्तीत रममाण झालेले आणि खंडोबा व राम यांच्यात भेदभाव न मानणारे समर्थ या प्रसंगाचे वर्णन करताना म्हणतात :

**महीपति कळेना गति । पाहों जातां सामर्थ्य किती ।**
**करामती दावी आजिमती ।।**
**तुरूक मातले, फोडाया गेले । भोंगे उठिले, तेही पिटिले ।**
**कोणें नेणों मार्गीं कुटिले ।।**
**श्वानासारिखीं एक भुंकतीं । तोंडें वाकडीं, कंप सूटती ।**
**पिसाळले, विष्ठा भक्षिती ।।**
**हत्ती, घोडे बहु मारिले । थोर लोक भूमीं काढिले ।**
**तांति वाहणा बाजीद जाले ।।**
**ऐसी हे लीळा कळे ना कळा । कळा विकळा धाक सकळां ।**
**थोर थोर म्हणती पळा ।।**
**मल्लुखान देव मल्हारी । रात्रिभागीं चाबुक मारी ।**
**तोंडें सुजतीं पैजारांवरी ।**
**गर्व जातां ते बराबरी । संतोषतां न्याहाल करी ।**
**दास म्हणे करा चाकरी ।।**

लाखो भुंगे तुर्की सैन्यावर तुटून पडले आणि त्यांनी सैन्याची दाणादाण उडवून दिली. तेव्हा औरंगजेबाने 'मल्लुखान' म्हणून देवाची करुणा भाकली. शिवकाळातील या ऐतिहासिक घटनेच्या पुराव्यावरून समर्थांनीही वरील पदात खंडोबादेवाला **'मल्लुखान देव मल्हारी'** म्हणून गौरविले आहे.

खंडोबा देव शिवकाळात चांगलाच लोकाभिमुख झाला होता. बहुजन समाजातील असंख्य भक्तांचे लोंढे जेजुरीची वाट चोखाळत होते आणि खंडोबाच्या दर्शनाने भक्तिसुखाचा अनुभव घेत होते. जीवनात सुख-समृद्धी, आनंद लाभावा म्हणून 'येळकोट येळकोट जयमल्हार'ची गर्जना करून भंडारा-खोबरे उधळत होते, तर काही श्रद्धावंत खंडोबासमोर बेलभंडाऱ्याची आण घेऊन नवस बोलत होते आणि नवसपूर्ती झाली की, सहकुटुंब, नातलगांसह जेजुरीला येऊन नवस फेडीत होते. समर्थ रामदास हे स्वत: लोकसंग्राहक असल्यामुळे आणि खंडोबाभक्तीचाही त्यांना चांगलाच लळा असल्यामुळे अधूनमधून ते जेजुरी, पालीच्या यात्रेत सामील होत होते. एकदा सोमवती यात्रेला आलेले समर्थ यात्रेला आलेला प्रचंड जनसमुदाय आणि त्यांची खंडेरायावर असलेली उत्कट भक्ती यांचा 'याचि देही याचि डोळा' अनुभव घेतात. खंडोबा मंदिरात चाललेला नवसपूर्तीचा सोहळा पाहताना त्यांचा अनुभव शब्दरूप होतो आणि त्यांच्या मुखातून शब्द बाहेर पडतात :

**देशोदेशींचा जन उदंड येतो । नाना प्रकारें नवस फेडितो ।।**
**देव त्याचे लळे पाळितो ।।**
**मार्गीं लागतां बेड्या तुटती । कुलुपें तोंडींचीं तुटोनि जातीं ।**
**नाना खोडे खिळीं निघतीं ।।**
**जिव्हा कापितां मागुता बोले । शिरें वाहतां उठोनि चाले ।**
**उदंड ठायीं प्रसंग जाले ।।**
**वांझे लेकुरें, निधन्या धन । भक्तां पाळितो मनापासून ।**
**दास म्हणे आनंदघन ।।**

खंडोबा यात्रेला आलेल्या काव्यप्रेमी समर्थांची विशाल दृष्टी साऱ्या यात्रेवर भिरभिरू लागली आणि यात्रेतील प्रत्येक गोष्टीचे सूक्ष्म अवलोकन करता करता त्यांच्या संवेदनशील मनात काव्य घर करू लागले. अवघे खंडोबामय झालेले आणि आत्मानंदात न्हाऊन निघालेले समर्थ खंडोबाचे आणि जेजुरीतील भव्य सोमवती यात्रेचे गुणगान गाऊ लागले आहेत :

**खंडेराव देखिला देव । जन यात्रा मिळाले सर्व ।**
**काय सांगूं नाना वैभव ।।**
**लोकांची दाटी, स्वारांची दाटी । यात्रेची दाटी, दिवट्यांची दाटी ।**
**दिंड्यांची दाटी, वाद्यांची दाटी ।।**
**ढोल दमामे टाळ माधळ । बुरुग वाके नाना कल्लोळ ।**
**कर्णे काहाळ मिळवती मेळ ।।**
**हत्ती किंकाटती, उंट भडकती । घोडे हिंसती, बैल डुरती ।**
**नामघोषें गर्जताती ।।**
**कोण कोठें काहीं कळेना । यात्रेमध्यें ते आकळेना ।**
**गर्द जाला आश्चर्य मना ।।**
**पुढें दाटी माघुन दाटी । दोहोंकडे दुकानदाटी ।**
**अंतराळीं छत्र्यांची दाटी ।।**
**नंदकोले नाना निशाणें । तळपतातीं माहिनिशाणें ।**
**छत्रचामरें तीं सूर्यापानें ।।**
**नाना ब्रीदांचें ते डफगाणें । नाना भेदांचे दांड भेजणें ।**
**दाटी होतां होतीं भांडणें ।।**
**बाजारीं जावें चकित व्हावें । काय घ्यावें, काय न घ्यावें ।**
**सीमा नाहीं, धन्य वैभव ।।**
**येकेकडे निवांत माळी । तेथें जावें ते बाळीं भोळीं ।**

**देवा जाणें निवांत काळीं ।।**
**रात्रभागीं निवांत वेळा । ठाईं-ठाईं गायनकळा ।**
**वाटे नेणों गाती कोकिळा ।।**
**दास म्हणे विवेकबळें । सकळांमध्यें परी निराळें ।**
**तेंचि सुख सर्वां आगळें ।।**

अशी ही भक्तसमुदायाला सुखानंदाची प्राप्ती करून देणारी जेजुरीतील भव्य यात्रा पाहून समर्थ भारावून जातात. कपाळी भंडारा लावून, हातात दिमडी घेऊन स्वत: 'वाघ्या' झालेले समर्थ खंडोबाचे जागरण मांडतात आणि जागरणातून खंडोबाशी सुसंवाद साधतात :

**सद्‌गुरू मार्तंडा ।**
**घेऊनि विवेक खंडा ।।धृ.।।**
**चिन्मय पूर्ण स्वयंभा ।**
**घेऊनि औट हात कोटंबा ।।१।।**
**भाजुनिया द्वैताला ।**
**निश्चय भरित रोडगा केला ।।२।।**
**येळकोट घे संसारा ।**
**बोलुनि उधळ देहभंडारा ।।३।।**
**साखळदंड मोहाचा ।**
**सोडून दिधला श्वान जीवाचा ।।४।।**

'हे सद्‌गुरू मार्तंडा, मी तुझा भक्त असल्यामुळे तुझ्या हातात जसा खंडा (तलवार) आहे, तसा माझ्याही हातात आहे. परंतु तो विवेकरूपी खंडा आहे. मी द्वैताला भाजून निश्चयाचा रोडगा तुला अर्पण करीत आहे. माझ्या औटहात कोटंब्यात (नरदेहाच्या पात्रात) चिद्रस भरला असून, मी संसाराला येळकोट बोलून देहभंडारा उधळीत आहे. मोहाचा साखळदंड तोडून यातून माझी (अहंकाररूपी श्वानाची) सुटका करून घेत आहे.

अद्वैत भक्तीचे आणि शुद्ध तत्त्वाचे जागरण मांडलेला हा समर्थांचा वाघ्याही 'सोहम्' भावना (मीच आत्मरूपी परमात्मा) धारण करणारा आहे.

**रामदास हा वाघ्या ।**
**सोहं भुंकी स्वरूपी जागा ।।५।।**

श्रीसमर्थ रामदासस्वामींनी दासबोधामध्ये चौथ्या दशकात नवविधा भक्ती सांगितली आहे. त्यात पाचवी अर्चनभक्ती वर्णन करताना देवाचे पूजन शास्त्रोक्त विधीने करावे, असे सांगितले आहे :

**भैरव भगवती मल्लारि । मुंज्या नृसिंह बनशंकरी ।**
**नाम नाणी नानापरी । पंचायेतन पूजा ।।**

निरनिराळ्या देवांची नावे सांगून त्यांचे मनोभावे पूजन करावे, हे सांगताना वरील ओवीत ते म्हणतात की, बटुक, भैरव, देवी भगवती तसेच मल्हारीमार्तंड यांचे पूजन करावे. मुंजोबा, नृसिंह, बनशंकरीदेवी (बदामी) यांचे नाग, शिक्के व रामादी पंचायतनांची पूजा करावी. खंडोबाबद्दल समर्थांना असणारा आदर त्यांनी येथे व्यक्त केला आहे. तसेच बहुदेवस्थान या अठराव्या दशकातील पहिल्या समासात निरनिराळ्या देवतांचे वर्णन करताना श्री समर्थांनी खंडोबाचे वर्णन केले आहे :

**धन्य तूं गा खंडेराया । भंडारे होय पिवळी काया।।**
**कांदे भरीत रोटगे खाया । सिद्ध होती ।।**

हे खंडेराया, तू धन्य आहेस. तुझ्या भंडाऱ्याने भक्तांचे कपडे व शरीरे पिवळी होतात. रोटगे व कांद्याचे भरीत हा तुझा प्रसाद खाण्यास ते उत्सुक होतात. खंडोबाच्या भक्तीचा रंगच जणू भंडाऱ्याच्या रूपाने त्यांच्या अंगाला लागतो, असे खंडोबाचे महत्त्व समर्थांनी वर्णन केले आहे.

पाचव्या दशकाच्या चौथ्या समासात अनेक मंत्र सांगताना श्री समर्थांनी 'मल्लारी' मंत्राचा उल्लेख केला आहे :

**येक विश्वनाथ म्हणविती । येक मल्लारी सांगती ।**
**येक ते जप करविती । तुकाई तुकाई म्हणौनी ।।**

याशिवाय, दासबोध, दशक १३, समास ८ मध्ये समर्थांनी गुरु-शिष्य संवाद चित्रित केला असून, त्यामध्ये श्रोता वक्त्याला प्रश्न विचारतो, 'या ब्रह्मांडाचा खरोखरी कर्ता कोण आहे?' त्यावर सभेत जमलेले एकाहून एक चतुर श्रोते म्हणाले, आमच्या बोलण्याचे कौतुक श्रोत्यांनी ऐकावे :

**येक म्हणती कर्ता भैरव । येक म्हणती खंडेराव**
**येक म्हणती बिरदेव । येक म्हणती भगवती**[१३]

एक म्हणतात की, कर्ता भैरव आहे. एकाचे मत तो खंडेराव असे आहे. एक म्हणू लागले की, बिरदेव कर्ता. एक म्हणाले भगवतीने हे सर्व केले.

## केशवस्वामी भागानगरकर

दास-पंचायतनातील संतकवी केशवस्वामींनी खंडोबाविषयी लिहिलेले पुढील पद उल्लेखनीय आहे :

**उधळित भव-भंडारासी । नाचत आलों तुजपाशीं ।।**
**मल्हारी भवभ्रम वारी । पडलों तुझिया दरबारीं ।।**
**देऊनि केवळ पदथारा । बरवें रक्षी दातारा ।।**
**सेवुनि वारी प्रेमाची । आवडि धरिली नामाची ।।**
**अनुभव-जेजुरिराया रे । करि केशवकविवरि छाया रे ।।**[१३]

खंडेरायाचा भक्त केशवस्वामी भवभंडाराची उधळण करीत मल्हारीच्या चरणी लोटांगण घालण्यासाठी जेजुरीला आला आहे. मनातला भवभ्रम त्याला नाहीसा करावयाचा आहे. म्हणून हा भक्त अतिशय नम्रपणे दोन्ही हात जोडून देवाला विनंती करतोय की, 'जेजुरीराया (खंडेराया), तुझ्या नामाचा जप करीत प्रेमाने मी जेजुरीची वारी केली आहे. देवा, या भक्त पामरावर, केशव कवीवर कृपेची सावली धर.' या पदातील केशवस्वामींची भूमिका शुद्ध परमार्थाची असून, परमार्थप्राप्तीसाठीच त्यांचे मन आतुरलेले आहे.

## रंगनाथस्वामी निगडीकर

हेही दास-पंचायतनातील एक महत्त्वाचे कवी असून, त्यांची परमार्थदीक्षा आनंद परंपरेतील होती. त्यांनी बरेच भक्तिमय स्फुटकाव्य लिहिले आहे. रंगनाथस्वामींचे खंडोबावर लिहिलेले 'मार्तंडाष्टक' प्रसिद्ध आहे. ते पुढीलप्रमाणेः

**त्रैलोकी मणि-मल्ल दैत्य सकला अजिंक्य झाले मही ।**
**त्याही ब्राह्मण यज्ञयाग हवने विध्वंसिली सर्वही ।।**
**आला ते समयी सदाशिव स्वयें सांडोनी ब्रह्मांड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।१।।**
**संगे घेऊनि सप्तकोटी गण हे आला असे भूतला ।**
**खंडेराव म्हणूनिया प्रकटला शूरत्वतेची लीला ।।**
**सक्रोधे मणि-मल्ल मर्दुनि तया केला पाहा दंड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।२।।**
**आनंदे गण सर्वदा उधळती भंडार देवावरी ।**
**झालासे विजयी म्हणोनि दिवट्या लावोनिया पेमरी ।।**
**केला वास शिवे तळ्या उचलिल्या निर्दाळिले लंड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।३।।**
**घेता हा अवतार दुष्ट दमुनी सद्भक्त संरक्षिले ।**
**गाई ब्राह्मण यज्ञयाग हवने हे धर्म संस्थापिले ।।**

**गाती भक्त ऋषी मुनी गण सदा सत्कीर्ति उदंड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।४।।**
**प्रारंभी स्थळ पेपरी तदुपरी पालीस आला असे ।**
**नळदुर्गी तिसरे विशेष चवथे हे जेजुरीसी वसे ।।**
**ऐसी योजुनि स्थानके विचरतो नवखंड पृथ्वीत हो ।**
**तो हा पाहूं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।५।।**
**शोभे दिव्य कळा सुरंग पिवळा अपादपर्यंत हो ।**
**धाले लोचन पाहता शशिमुखी तो म्हाळसाकांत हो ।।**
**अश्वारूढ कटी सलंब झळके ते शस्त्र आखडे हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।६।।**
**ऐशा या कुलदैवतास नमुनी जो नित्य भावे भजे ।**
**त्यासी काय उणे ? न मागत तरी अप्राप्त तेही दिजे ।।**
**दासां देईल भुक्ति मुक्ती समुळी वारूनि पाखांड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।७।।**
**मार्तंडाष्टक जो पठेल अथवा ऐकेल अत्यादरे ।**
**त्याचे हा कलिकाळ दास्य करुनि राहील हो हे खरे ।।**
**तेथे शाश्वत रंगला निजसुखे नासूनिया बंड हो ।**
**तो हा पाहुं चला कृपाजलनिधी मल्हारी मार्तंड हो ।।८।।**[४]

वरील सांगितलेल्या मार्तंडभैरवाच्या अवतारकथेत त्याच्या क्षेत्रांचा उल्लेख करताना पहिले पाली, दुसरे पेंबर, तिसरे नळदुर्ग व चौथे जेजुरी असा क्रम दिला आहे. या देवाची मनापासून, नि:स्वार्थपणे भक्ती केल्यास अशक्यप्राय गोष्टीही सहजप्राप्त होतात, असे रंगनाथस्वामी स्वानुभवातून सांगतात.

### दिनकरस्वामी तिसगावकर

खंडोबा हे दिनकरस्वामींचे कुलदैवत, तर प्रभू रामचंद्र हे उपास्य दैवत. 'स्वानुभवदिनकर'[१५] च्या प्रारंभी कुलदैवताला वंदन करताना त्यांनी कुलदैवत खंडोबाचे वर्णन केले आहे :

**आतां परमप्रीतीचिया योगें । कुळदैवत वंदूं सर्वांगें ।**
**तरों तयाचिया संगें । भवसमुद्र हा ।।**
**जो सदैव देह-जेजुरीनिवासिया । माया-म्हाळसाविलासिया ।**
**तया आत्मराज खंडेराया । नमन सद्भावें ।।**
**सज्ज करूनि विवेकपर घोडा । हातीं घेऊनि सतेज ज्ञानखंडा ।।**
**कामक्रोधादि मणिमल्ल होडा । वधिले ससैन्य ।।**
**उधळले प्रेमभंडार । उभे सप्तकोटी गणपरिवार ।।**
**जे दैवी संपदेचे नर । बळकटपणें ।।**
**ऐसें आद्यन्त घवघवीत ध्यान । देखोनि दिनकर सुखसंपन्न ।।**
**लाहोनि निजकृपावरदान । स्वानुभवदिनकरीं संतृप्त ।।**

देहजेजुरीत राहणारा हा दिनकरस्वामींचा 'आत्मराज खंडेराय' विवेकाच्या घोड्यावर बसून ज्ञानखड्गाने कामक्रोधरूपी मणि-मल्ल दैत्यांना ठार मारणारा आहे. या ग्रंथात पुढे दिनकरस्वामींनी मार्तंडभैरवाची 'एकादश रुद्रात' गणना केली आहे. खंडेरायाला त्यांनी 'बहुरूपी' म्हणून संबोधले आहे. ग्रंथाच्या सुरुवातीच्या रूपकाप्रमाणेच त्यांच्या या एकादश रुद्र स्वरूपावर त्यांनी आध्यात्मिक रूपक रचले आहे. 'स्वानुभवदिनकर'मध्येच पुढे दिनकरस्वामी वर्णन करतात :

**जो कैवल्यजेजुरीनिवासिया । मायाम्हाळसाविलासिया ।**
**निजप्रकृतिबाणाइचिया । सुंदरपणा भाळला ।।**
**भुलोनि तिला निजांगी धरिलें । मायाम्हाळसेसी रुसविलें ।**

**मग तिजलागीं पाठीसी घातलें । निजवक्रगतीं ॥**

या रूपकात दिनकरस्वामींनी खंडोबा-बाणाईच्या प्रीतिकथेला एका उच्च कोटीत नेऊन ठेवलेले आहे. बाणाईला परमात्म्याची निजप्रकृती मानून ते म्हणतात, 'खंडोबा बाणाईच्या रूपाला भुलले. त्यामुळे प्रथमपत्नी म्हाळसा रुसली.' खंडोबाच्या स्वरूपावरील पंधरा ओव्यांत विस्तारलेल्या या रूपकात देव ज्या गडावर राहतात, त्याला 'अष्टांगगढ' असे यौगिक नाव दिले गेले आहे. याच वर्णनाचा उपसंहार करताना दिनकरस्वामी लिहितात :

**ऐसा कैवल्यजेजुरीनिवासिया । त्याची उपासना परिच्छिन्न विचारूनियां ।**
**स्वानुभवदिनकरीं जाला सुखिया। दिनकर रामदास ॥**

ग्रंथारंभी 'कुलदैवत' म्हणून वंदन केलेल्या दिनकरस्वामींनी जागोजागी खंडेरायाला 'दहावा रुद्र' असे म्हटले आहे.

**आता बहुरूपी तो मार्तंड । उकार रूपे दाहवा रुद्र स्वयंमेव**

किंवा

**एक दहावा रुद्र उकारस्वरूपी । सद्गुरु मार्तंड भैरवरूपी ॥**

असे उल्लेख तर बऱ्याच ठिकाणी येतात.

खंडोबा हा नवसाला पावणारा देव असल्यामुळे संत जनाबाईप्रमाणेच परंतु जराशा वेगळ्या अर्थाने दिनकरस्वामी खंडोबाचरणी नवस बोलतात की, 'देवा खंडेराया, मला सतत रामाची जोड दे. माझे मन सतत रामनामात रंगू दे. तरच तू खरा खंडोबा देव.' असेही ते आपल्या कुलदैवताला बोलण्यास घाबरत नाहीत. कारण त्यांची खंडोबावर शुद्ध भक्ती आहे :

**विनवितों देवा तुज खंडेराया । मनोरथां माझिया पूर्ण करी ।**
**पूर्ण करी माझे मनोरथ आतां । राघवी तत्त्वतां मन रंगों ॥**
**मन रंगो रामीं काया वाचा जीवें । आणीक न भावें तयावीण ।**
**तयावीण दुजें नावडे आणीक । देई तेंचि एक महीपति ॥**
**महीपति इच्छा करिशील पूर्ण । देव्हारा मांडीन तरी तुज ।**
**तुज कुळदेव कुळींचा करीन । माझी इच्छा पूर्ण जरी होय ॥**
**जरी होय मन राघवीं निमग्न । तरी तूं सर्वज्ञ खंडेराया ।**
**खंडेराया फार आहेसी सत्त्वांचा । तरी हा इच्छेचा पांग फेडी ॥**
**पांग फेडी माझा रामारायाच्या भजनें । जरी असें घेणें नवसासी ॥**

शेवटी दिनकरस्वामी म्हणतात, देवा, माझा नवस जर पूर्ण केला, तर तुमची कीर्ती त्रिजगतात वाढेल किंबहुना हे त्रिजगत्सुद्धा कमी पडेल.

**नवस घेऊनि वासना पुरविसी । ठेंगणे कीर्तीसी भुवनत्रय ॥**
**भुवनत्रयीं कीर्ती वाढेल अपार । म्हणे दिनकर रामदास ॥**[१६]

## मध्वमुनीश्वर

मध्वमुनीश्वराच्या कवितासंग्रहात खंडोबाविषयीची एकूण सात पदे संकलित झाली आहेत.[१७] एका पदात स्वत: मल्हारी बनलेले मध्वमुनीश्वर म्हणतात :

**मनाच्या तुरुंगावरी स्वार झालों ।**
**अहंकारमल्लासि मारूनि आलों ॥**

क्षणाक्षणाला स्वप्न आणि अपेक्षांच्या कक्षा वाढविणाऱ्या चंचल मनाला आवरून व अहंकाररूपी मल्ल दैत्यास मारून हा भक्त आत्मविजय उद्घोषित करून अत्यंत नम्रपणे खंडेरायाचरणी आत्मनिवेदन करीत आहे :

**पायऱ्यांपुढे लोटांगण घालीन । हयपति तुझा तेजी प्रक्षाळीन ।**
**उजळुनि दिवटी अज्ञान जाळीन । आज्ञा श्रीमध्वनाथाची पाळीन ॥**

वरील पदात अज्ञान जाळून ज्ञानमय दिवटी उजळीन, असे खंडेरायाचरणी मध्वमुनीश्वर निवेदन करीत आहेत. त्यांनी लिहिलेले खंडोबाविषयीचे हिंदी पदही प्रसिद्ध आहे :

**जय जय भैरव मल्लूखान ।**
**खंडेराय महाबलि महीपति । शंकरजी भगवान ॥**

**जेर किया मणिमल्ल महासुर । मारा है बैमान ।।**
**जेजुरीमें महाराज बिराजत । होत महा घमशान ।।**
**सुरनरकिन्नर महलके आगे । ठाडे है दरवान ।।**
**अनहत निरंतर बाजे बजंतर । धमकत भेरि निशान ।।**
**मध्वनाथ का सीस चरनपर । लागा है दिलध्यान ।।**

वरीलप्रमाणे त्यांच्या सातही पदांत खंडोबाची नावे : मार्तंड, महीपती, मैराळ, हयपती, महीपाळ, मालोजी, खंडेराय, मल्लुखान अशी आलेली आहेत. वरील पदात उल्लेखलेले 'मल्लुखान' हे मुसलमानी नाव मध्वमुनीश्वरांनी 'औरंगजेब आणि सव्वा लाखाचा भुंगा' या दंतकथेवरून घेतले असावे. **'कानडे रुपडे चोखडे साबडे नाम मल्हारी'** अशीही त्यांनी एके ठिकाणी मल्हारीच्या कानडी रूपाची ओळख करून दिली आहे.

मध्वमुनीश्वरांनी खंडोबावर आरतीही लिहिलेली आहे. त्यातून त्यांच्या उत्कट खंडोबाभक्तीचे दर्शन होते :

**मस्तकिं मुगुट अंगीं सोन्याचा शेला ।**
**हस्तकिं खड्गा घेऊनि मारिसि मणि-मल्ला ।।**
**कैलासाची प्रतिमा जेजुरचा किल्ला ।**
**बैसोनिया रक्षिसि दक्षिणचा जिल्हा ।।१।।**
**जय देव जय देव जय खंडेराया ।**
**अखंड भंडारानें डवडवली काया ।।**
**चंपाषष्ठीचा जे करिती कुळधर्म ।**
**त्यांचे होत आहे परिपूर्ण धर्म ।।**
**ज्यांना न कळे तुझ्या भक्तिचे वर्म ।**
**त्यांचें तोडित आहे कळिकाळ चर्म ।।२।।**
**तुझे भक्तीविन्मुख जे ते कौरव ।**
**जिकडे तूझा धर्म तिकडे गौरव ।।**
**मध्वनाथ जपतो येळकोट भैरव ।**
**निंदा करिती त्यांना होती रौरव ।।**

## अमृतराय

अमृतराय यांनी खंडोबाविषयी लिहिलेले पुढील पद प्रसिद्ध आहे :

**जय जय मल्हारी । तूं आमुचा कैवारी ।।धृ.।।**
**विधी हर सुर नर तुजला ध्याती । आदि करुनि शैलारी ।।**
**चंपाषष्ठी कुळधर्मीं जन । अर्चितात कल्हारीं ।।**
**देव्हाऱ्यावरि बसवुनि पूजितो । नंदाचा खिल्लारि ।।**
**अमृतेश्वर निजदरिद्र शत्रू । ठोकितसे कैलारी ।।**[१८]

याशिवाय, 'जय महादेव जय महादेव जय महादेव बोला' अशा धृपदाने सुरू होणाऱ्या एका शिवपर पदातही त्यांनी **'मल्हारीचे रूप धरी, म्हाळसेसि विश्राम'** असे वर्णन केले आहे.

## निरंजन माधव

निरंजन माधव यांनी शके १६७५ ते १६९० (इ. स १७५३ ते १७६८) या काळात विपुल आणि विविध स्तोत्रसंभार असणारा कवितासंग्रह लिहिला. त्यात खंडोबाविषयी लिहिलेले ४४ कडव्यांचे 'श्री मल्लारिस्तोत्रराज' नावाचे प्रदीर्घ स्तोत्र आहे.[१९] निरंजन माधव मल्हारीच्या स्वरूपात आत्मरूपी परमात्म्याची अनुभूती घेतात. तेव्हा मल्हारीला उद्देशून ते लिहितात :

**तू विश्वंभर, तू परात्परगुरु, तू आद्य सर्वां जनां ।**
**कल्पांतीं तुझिया स्वरूपसरिते ये विश्व हें मज्जना ।।**

अशी मल्हारीदेवाची महती गाणारे निरंजनस्वामी आत्मशुद्धीसाठी मल्लारीदेवाच्या चरणाशी प्रार्थना करतात :

**मोठासा मणिमल्ल दुष्ट वधिला त्वां ज्या प्रतापें तरी ।**
**तो होता विबुधां बुधासि वळसा देणार त्या अंतरीं ।।**
**तैसा पातकदैत्य हा विकसतो मद्देहवासी वधीं ।**
**तेव्हां त्वत्पुरुषार्थ मानिन खरा, दु:खासि तूं आवधी ।।**

शिवाचा अवतार असलेल्या मल्हारीचे वर्णन करताना शिव आणि भूपती मल्हारी यांचा रूपभेद निरंजन माधवांनी वर्णिला आहे. ते लिहितात :

**कोठें तो तव वृद्ध बैल ? हय हा कैंचा तुंवा आणिला ?**
**कोठे मूठवळी ? सुवर्णमणिचा हा जीन पालाणिला !**
**कै खट्वांग जुनें घुणें लिबडिलें ? हे खड्ग कैंचें करीं ?**
**भिक्षापात्र त्यजोनि, भूपति कसा झालासि बा ! लौकरीं ?**

वरील रूपभेद मांडताना चर्म-दिव्य वस्त्रे, मुंडमाळा-मौक्तिक माळा, शवभस्म-भंडारा, सर्पवलये-ग्रैवेयके कुंडले, जटामुकुट-सुवर्णमुकुट अशी दोघांच्या अलंकार, आयुधे आणि वस्त्रांची त्यांनी तुलना केली आहे.

शेवटी निरंजन माधव मल्हारीरायाला उद्देशून म्हणतात :

**तूझी भाज महालसा घरधणी तूं नागवा जोगडा ।**
**मी झालों अतिदीन याचक तुझा-मीहूनि तूं उघडा ।।**
**मागावें तुज काय तें ? म्हणुनियां मौनासि म्यां वाहिलें ।**
**तूंहि देसिल काय सांग मजला ? तुझें तुपें राहिलें ।।**

असे परखडपणे बोलणारे निरंजन माधव मल्हारीरायाला विनम्रपणे विनंती करतात :

**तू आपुले म्हणोनि जनका पायातळी ठेविजे ।**
**तुझे जे निजरूप सुंदर असे ने या दिठी दाविजे ।।**
**माझे निष्ठुर बोलणे सकलही, मायेश्वरा साहिजे ।**
**माझ्या हत्कमळी परात्पर गुरु तां सर्वदा राहीजे ।।**

## मोरोपंत

'मल्हारीविजय' या मल्हारीमाहात्म्याव्यतिरिक्त पंतांनी बारा आर्यांचे एक खंडोबास्तवन रचले आहे. ते पुढीलप्रमाणे :

**श्रीकंठा ! जगदिशा ! सकरुण तू देवदेव मैराळा !**
**त्वा प्रणत पाप पर्वत केला लीले करोनी कै राळा**
**प्रभुवर तू परमपुरुष वरदेश्वर दीन बंधु खंडोबा**
**तुझिया कृपाकटाक्षे हा दु:खद मोहपाश खंडोबा**
**रुचली गंगागौरी तशी तुज भक्तप्रिया धनगरीण**
**'मालुखान' ही म्हणता लावीतसे तुजकडे भणग रीण**
**'उधळोन भंडार' म्हणे तुज 'भाकर भरत' जो निवेदीन**
**होऊन सफळ मनोरथ करुणा सागर निवेदीन**
**जळपात्र मात्र वाहो तुज भोळा भक्त फार आवडतो**
**ऐसा न अभाविक जो गंगेची वाहणार कावड तो**
**तोही तुज प्रभुसि रुचे जड, वारिती रिती जो कुतरियाची**
**भक्त तव प्रिती-सुतरी मागे नच तदीतरा कुतरी याची**
**'मालो-मालो' म्हणती भाविक मागुनि भीक जो खातो**
**सद्गती पावचि होतो, भक्तांसि उतरतो जोखा जो**
**जो मुरळी स्त्री-पुरुषही जो भजनाचा धरूनी पथ वाघ्या**
**शंभो म्हणसि तया घ्या वैभव कैलासवास अथवा घ्या**

**कांचन पुष्पांजुळीने जे देसि उधळीता हरीद्राते**
**परमोदार सद्य तू धन्य करीसी सेवका हरीद्राते**
**'मार्तंडभैरव' असे 'मल्हारी' असे जया मुखी नाम**
**शंभो दंभोलीधर प्रार्थुनि दे तया आपुले धाम**
**सधन अभक्त न बरवे, खंडेराया बरे अधन वाघे**
**नामे तव भक्त तरे पर नित्य विकत बळे वध नवा घे**
**घेती पित्तरप्रेमे रंक करी म्हाळ साव राजाया**
**तेवी मयूरकृत स्तव योग्य मनी म्हाळसावरा जाया** [२०]

## निरंजन रघुनाथ

संत निरंजन रघुनाथांच्या स्फुट काव्यसंभारात खंडोबाविषयक काही पदे व एक आरती आहे.[२१] संत निरंजन रघुनाथ वाघ्याच्या भूमिकेतून सांगतात :

**शिव जाला मार्तंड । मोडावया दैत्य बंड ।**
**करि दुष्टालागी दंड । भक्ता अखंड रक्षिता ।।**
**मागू प्रेमाची हे वारी । नरदेह-रविवारीं ।**
**आलिया संसारी । चुकवूं फेरे सर्वस्वें ।।**
**स्मरोनिया त्याचे गुण । येळकोट गाऊं गान ।**
**भुंकूं होऊनियां श्वान । त्याचे द्वारीं सर्वदा ।।**

दुर्मिळ अशा या मनुष्यजन्माला आल्यानंतर जर जन्म-मरणाचे फेरे चुकवायचे असतील, तर रविवारच्या दिवशी प्रेमाने खंडोबाची वारी मागितली पाहिजे. देवाचे नामस्मरण करून मनामध्ये त्याची मानसपूजा बांधली पाहिजे. त्याच्या नावाचा सतत जयजयकार (येळकोट) केला पाहिजे. म्हणजेच **'भुंकू होऊनिया श्वान । त्याचे द्वारी सर्वदा ।।'**

असा हा निरंजनस्वामींचा वाघ्या खंडेरायाचरणी थोडी जागा मागतोय. 'हे खंडेराया, तुझे अखंड नामस्मरण माझ्या मुखातून घडू दे, एवढेच तुझ्या चरणाजवळ माझे मागणे आहे,' असेच जणू या वाघ्याला सांगायचे आहे. हा भक्तीचा भुकेला वाघ्या भक्तिरसात न्हाऊन निघाला आहे. त्याला खंडोबादर्शनाची आस लागून राहिली आहे. म्हणूनच तो म्हणतोय :

**निरंजन आला वाघ्या । जाऊनि मल्हारीला सांगा ।।**
**चरणीं थोडी जागा । द्यावी भागा येईल ती ।।**

अशाच प्रकारची रचना डॉ. सरोजिनी बाबर यांनी संपादित केलेल्या 'कुलदैवत' या ग्रंथात दिली आहे. रचनाकाराचे नाव दिले नाही. स्वत: संपादकच या गीताच्या संग्राहक आहेत.[२२]

**देवाचा वाघ्या झाला**
**हाती घोळ कोंटबा दिला**
**भुकत गर्जत वाघ्या भक्तादारी आला**
**आदरमान सन्मान देवाचा बहू आदर केला.**
**उत्तर पूर्व पश्चिम दक्षिण चारी कोन कोटंब्याला**
**सोडून सर्व गळ्यामध्ये लगर घातला**
**देवाचा सत्वर थोर लंगर आपोआप उत्तरला**
**विडा पाकड वाघ्या हस्तकी धरला**
**जरी भक्तावर दया ऐसा वाघूबा बोलला**

## श्री मौनीनाथ महाराज

मौनिनाथ महाराजांनी लिहिलेली खंडेरायाची आरती हे अंध्यात्मावरचे एक सुंदर रूपक आहे. जेजुरी, म्हाळसा, बाणाई, मल्लासुरदैत्य या सर्वांचा उल्लेख करून लिहिलेले अत्यंत रसाळ असे हे भक्तिगीत आहे :

**जय देवा खंडेराया । निज शिवरूप सखया ।**
**आरती ओवाळीतों । भावभंडारसुप्रिया ।।धृ.।।**
**देहत्रय गड थोर । हेचि दुर्घट जेजुर ।**
**येथे तू नांदतोसी । आत्मा साक्षित्वें निर्धार ।।**
**उन्मनि म्हाळसा हे । शांति बाणाई सुकुमार ।**
**भुक्ति मुक्ती दया क्षमा । मुरळ्या नाचती सुंदर ।।१।।**
**स्वानंद-अश्व धीर । यावरि बैसूनि सत्वर ।**
**अद्वैतबोध-धार । हातीं घेऊनि तलवार ।।**
**अहंकार-मल्लासुर । यातें मारिसी साचार ।**
**मर्दूनि दैत्यभार । विजयी होशी तूं मल्हार ।।२।।**
**निरसोनि द्वैतभाव । करिसी ठाणें तू अपूर्व ।**
**अद्वैतचि भक्त देव । भेदबुद्धि मिथ्या वाव ।।**
**तुजविण न दिसे कोणी । जगीं या एकचि तूं धणी ।**
**मौनी म्हणे तूंचि सर्व । असिस व्यापक खंडेराव ।।३।।**[२३]

## शिवदीन केसरीनाथ

मल्हारीमाहात्म्याशिवाय शिवदीनकेसरीनाथांची खंडोबावर लिहिलेली आणखी चार स्फुट पदेही आढळतात. या पदांचे लेखन वेगवेगळ्या बाडांत उपलब्ध झाले आहे. पदे पुढीलप्रमाणे आहेत[२४] :

**(१) सद्‌गुरू मार्तंडा मार्तंडा । विवेक झळके खंडा ।**
**औट हात जेजुरी । आत्मा नांदतो मल्हारी ।**
**ज्ञानकोटंबा करि देई । निज नामाची वारी ।।१।।**
**निजबोधाची लाऊनी दिवटी । तेणे चिन्मय आसे सृष्टी ।**
**केशरी सद्‌गुरु अवघा । शिवदीन म्हणे मी झालो वाघा ।।२।।**
(धुंडिनाथमहाराजवाडा, पैठण येथील पदसंग्रह)

**(२) वारी तुझी मल्हारी मजतारी ।**
**दुस्तर भवपुरी पाय उतारी ।।धृ.।।**
**आदिनाथ गुरु जागृत पुरता ।**
**सांब सदाशिव तु अवतारी ।।**
**सगुणनिर्गुण जडित गुणांचा ।**
**भूषणे वागविसी जरतारी ।।१।।**
**भर भंडारी प्रतापकेसरी ।।**
**द्वैत विकल्प कुळासह ।**
**शिवदीन वाघ्या सोहम्‌शब्दी ।**
**भुंकुन फुंकित कीर्ति तुतारी ।।२।।**
**साक्षी व्यापक सर्व चराचर ।**
**दृष्टीत सृष्टीत तूचि तु तारी ।।३।।**
(श्री. काका जोशी, पैठण यांच्याकडील पदसंग्रह)

**(३) पूर्ण कृपेची वारी देई । जन्ममरण भयवारी**
**स्वामी मार्तंडा, मार्तंडा । प्रताप रुद्र प्रचंडा**
**अवतारी गुणवर्या । सगुण निर्गुण तुझी चर्चा ।।१।।**
**जागृत दैवशक्तीचा नवरा । तुजवरि उन्मनि टाळिती जवरा ।।२।।**

**नवस मनाचा पुरवी । माझे मी तुपण नुरवी ।।३।।**
**वाहिन तव भंडारी । कर तु मज मुक्तीस भांडारी ।।४।।**
**शिवदिन सुवर्णवर्णी । केसरिनाथ गुरू संपूर्णा ।।५।।**
(श्री. काका जोशी, पैठण यांच्याकडील पदसंग्रह)

**(४) मागा मल्हारीची वारी । आदिअंती वोतप्रोत ।**
**आज आइतवारी ।।**
**अहं वाघ्या सोहं भुंके प्रेमनगर आवारी ।**
**सावध होऊनि भजनी लागा देव खरा कैवारी ।।१।।**
**इच्छामुरळीस पाहुनि कारे पडा नर्क अनिवारी ।**
**भावभंडारीस नागवा निर्मल हृदय जिव्हारी ।।२।।**
**अंतकर्ण तळीस भरारे जिवीत नका करू उधारी ।**
**बुद्धी बोधली बोधदिवटी उजळा महाद्वारी ।।३।।**
**आत्मनिवेदन भरीतरोटी नैवेद्य हा अरूवारी ।**
**केशरि सद्गुरु खंडेराया शिवदिन कुंचावारी ।।४।।**
(समर्थ वाग्देवता मंदिर, धुळे बाड क्र. ९९७)

## वासुदेवानंद सरस्वती तथा टेंबेस्वामी

टेंबेस्वामींच्या स्फुट काव्यसंभारात संस्कृत रचनेतील खंडोबावरील एक स्तोत्र व एक अभंग आढळतो.[२५] त्याचा उपलब्ध मराठी अनुवाद पुढीलप्रमाणे :

**स्तोत्र :** **श्री शंकर अवतार खंडेराया महाबुद्धिवंता ।**
**मणिशत्रू म्हाळसापति मी नमितो आता ।।१।।**
**जाहले तपसिद्ध त्या ऋषीश्वरांचे अवतार घ्याया ।**
**आसूरमर्दना मणिसंहारका मी नमितो तुला ।।२।।**
**तू वेदमय स्वरूप तुझे विश्वख्यात् ।**
**मारिले दैत्य मणिमल्लार तुज मी पुजितो निजअंतरात ।।३।।**
**सुवर्ण वस्त्रप्रावरणा सुवर्णाचीच भूषणे ।**
**त्रैलोक वंदति तुला मणिमल्लारा स्वीकारणे पूजने ।।४।।**
**देवमास मार्गशीर्ष येता होतो तुझा उत्सव ।**
**अभिषेके तुझ्या विभुतिला दावी दयार्णव ।।५।।**
**मार्तंड प्रतापी देवा तू शत्रूचा कृतांत काळ ।**
**हरिसी सर्व विघ्ने मणिमल्लारा, तुज मी नमितो सोज्वळ ।।६।।**
**सर्वविघ्ननाशका खंडराजा प्रसिद्धा जणी ।**
**तारी माते निजकृपे त्वरी, साहेनही जांचणी ।।७।।**
**मन, शरीर शुद्ध न माझे केले जरी पापही ।**
**हे मणिमल्लारा क्षमा करी मला पायीच ठायही ।।८।।**
**खंडराजाची ही स्तुति सतत जपणाराची सर्व**
**कार्ये उत्तम तर होतीलच व त्यांना शिवलोकही प्राप्त होईल ।।९।।**
**आश्वासती वासुदेव सरस्वती स्तोत्र जपा निरंतर ।**
**कृपा होईल अक्षय तयाची धावे संकटी सत्वर ।।१०।।**

**अभंग :**
**कैवारी प्रार्थितो जो त्रिपुरारी सुरवरी । अवतार जो प्रसिद्ध मल्लारी क्षितिवरी ।।धृ.।।**
**सरदारी घेई बाणा शाहाणा जो सुरवरी श्रुतिमय हो अश्व ज्याचा**

प्रभू बैसे त्यावरी । उपनिषद्वाक्यरूपा तलवारी घे करी । मारी
क्रोध हेचि मणिमल्लादिक अरी ।।१।।
जो दैवा सुरसंपदामिध सेना आसुरसंद्रिपुशी रण करी जो
दारूण । औपनिषद्वाक्यशस्त्रे मारूनिया अरिगण । लिंगाख्या
सुरपुरीचे चूर्ण करी निजकरी ।।२।।
मारूनिया सर्व शत्रू, वश करूनि सुरगण । श्वानभूति म्हाळसे जो
निज अंकी घेऊन । साम्राज्य करूनि राहे निजछंदे अनुदिन ।
वंदु तया खंडेराया जो भजका उद्धरी कैवारी ।।३।।
देव खंडेराव महालसाधव । जेजोरीचा देव भावलभ्य ।।१।।
लभ्य नसे योगा तो हा भक्ती योगा । गम्य घे अभंगा अंगादेव ।।२।।
देव दु:खहारी मणि मल्लारी । निजभक्ता तारी वारी क्लेश ।।३।।
महालसाकांत हर मूर्तिमंत । खंडोबा मर्हत ख्यात दैवी ।।४।।

## विष्णुपंत भावे महाराज

भावे महाराजांनी श्रीखंडेरायाला लिहिलेले 'साहित्यरूपी पत्र' याशिवाय वाघ्या-मुरळी आणि इतर विषयांवर लिहिलेल्या पदांची संख्या दोनशेच्या आसपास आहे. त्यातील काही पदे उपदेशपर, वर्णनपर, देहपर व वैराग्यपर असून, रागदारीत गाण्यासारखी आहेत. काही संतांच्या अभंगांमध्ये आपल्या उपास्य देवतेला अंतर्भूत करून त्याप्रमाणे बदल केले आहेत. उदा. 'पंढरीची वारी' ऐवजी 'जेजुरीची वारी'. त्यांच्या काही पदांवर संत तुकाराम महाराजांच्या अभंगरचनेचा, तर काही पदांवर पंडितकवी मोरोपंतांच्या आर्यारचना कौशल्याचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. महाराजांची काही निवडक पदे खालीलप्रमाणे आहेत[२६] :

**श्री खंडेराय ध्यान :**

सुंदर ते ध्यान आहे अश्वावरी । (सिंहासनी)
दंड-खंडा करी घेवोनिया ।।१।।
बिल्वदल हार रेखिला भंडार ।
कस्तुरी-तिलक शोभतसे ।।२।।
मकर-कुंडले मोतीयाचा हार ।
साजतसे वीर मार्तंड (हा) ।।३।।
विष्णु म्हणे माझा सखा मार्तंड ।
व्यापिला भूगोल सर्व येणे ।।४।।

**श्री खंडेराय पूजन :**

जेजुरीची वारी आहे माझे घरी ।
आणिक न करी तीर्थ-व्रत ।।१।।
व्रत रविवार करीन उपवास ।
गाईन अहर्निश मुखी नाम ।।२।।
नाम मल्हारीचे घेईन मी वाचे ।
बीज कल्पांताचे विष्णु म्हणे ।।३।।

**उपदेशपर :**

(१) प्रात:काळी नाम मल्लारीचे घ्यावे ।
तेणे विसरावे जन्म-मृत्यू ।।१।।
तेहतीस कोटी देव स्मरणे मुक्त केले ।
मणि-मल्ल मर्दुनी, कडे-पठारी राहिले ।।२।।
न करा आळस नाम घेता वाचे ।
नाही भय साचे प्राणियासी ।।३।।

विष्णु म्हणे वाचे गाईला मल्लार ।
होय परमानंदु हरि हरा ॥४॥

(२) द्रव्य संपादितोसी कोटी । बरोबर ये ना लंगोटी ॥१॥
तांबुल बक्षिसी उदंड । भक्तिस चुकता नरककुंड ॥२॥
आनंदे पहुडे पलंगावरी । शेवटी गोवऱ्या सांगाती ॥३॥
विष्णु म्हणे मैलार । ऐकता होईल उद्धार ॥४॥

साकी :

मार्गशीर्ष शीत पक्ष षष्टी तिथी रविवारी ।
मल्हारी त्या पुरी प्रगटला भक्तांचा कैवारी ।
पाहूनी सकल मुनी गर्जती येळकोट म्हणूनिया ।

भूपाळी :

धाव बा मल्हारा । पाव करुणा करा ॥१॥
ठेविया किंकरा । सतत पाई ॥२॥
दुरिते भारे अति । पीडिलो मी जगत्पती ॥३॥
देई मज सन्मती । दीनानाथा ॥४॥
प्रेमपाशी मला । बद्ध करी वत्सला ॥५॥
म्हणती मज आपुला । मायबाप ॥६॥
तुजवीण दुसरा । मज नसे आसरा ॥७॥
उद्धरी या पामरा । कृपासिंधो ॥८॥

श्री खंडेरायास पत्र :

तुझा दासानुदास,
तुझे पाय ध्यानी आणून भेटीची खंत करीत आहे.
साठी सगुण असे राजदंडयुक्त अलंकारासहित दर्शन देऊन ।
पतिताचा उद्धार करावा.
ये तन बदन तुजकू दे चुका हूँ
मालिक परवरदिगार दुनियाके अखत्यारिवाले
मेहेर करो मुझे । देव एक दफे दर्शन ।
बड़ी प्यास लगी है तेरे कदमोंकी ।
तुजबिना ये निकल जा रहे प्राण ।
बचायें तो बी आप और मारो तो बी मालिक ।
आस कितने दफा करते है इम्तहान ।
मुझे नही ताकद । तुझे है अलम दुनियेकी ताकद ।
और सब दुनियादारी है तुझे पेट मे ये मै जानता हूँ ।
इसलिये मेरा मारूजा इतना ही है ।
एक बार करो दया । देवदर्शन क्यों लंबे फेक दिया ।
क्या हुआ गुनाह मुझे नही मालूम ।
कितना रोज यहा रहना नही मालुम ।
ये भेस की बड़ी तकलिफ हो रही है ।
करो मेरा दिल आराम ।
और कुछ बिनती नही है ।

- सदानंदाचा येळकोट

### खंडोबा संदर्भात इतर संतांचे भक्तिपरिचय

### पुण्याचे श्रीचिंतामणी मोरया गोसावी

चिंतामणीमहाराजांना जेजुरीच्या खंडेरायाने प्रत्यक्ष दर्शन दिले होते, अशी एक कथा आहे. त्याची सविस्तर माहिती पुढील काव्यात आली आहे.[२७]

**ऐसे एकदां वरदेस । चिंतामणी होते मोरगावास ।**
**पारणे करूनी पंचमीस । षष्ठीस ठेविती प्रस्थान ।।१।।**
**स्वानंद क्षेत्र सोडिता । पदास येई जडता ।**
**मंगलमूर्ती सवे असता । उल्हास मानसी ।।२।।**
**मावडी कडेपठारा नजिक । मंगलमूर्ती पालखी येत ।**
**तंव कोणी अश्वारूढ । येत आडवा पालखीसी ।।३।।**
**कोणी सुकुमार गौर । रूप जैसे कंदर्प ।**
**मंद हास्ये कपोल । होती वर्ण आरक्त ।।४।।**
**पुसतसे चिंतामणीस । अव्हेरून मम स्थानास ।**
**परस्पर जाता चिंचवडास । उपेक्षून मज ।।५।।**
**चिंतामणी करद्वय जोडून । म्हणे जाणिले आपणा ।**
**पावण्या मूळ दर्शना । स्तुती करीतसे ।।६।।**

**मल्हारी ध्यानश्लोक**

**ॐ ध्यायेत् देव मल्हारी कनकगिरीनिभं म्हाळसा भूषिंतागम् ।**
**हरिद्राऊटी ललाटं उर्ध्व रक्तपुंड प्रेमपूर निवासिनम् ।।**
**पितांबरं स्वर्णवसनं, स्वर्णकीरीटं चंपकमाला धारणम् ।**
**शांभवरूपं, तमारीतेजं, तं खंडपाणीं नमोस्तुऽते ।।७।।**
**आनंदुनी स्तुती श्रवत । प्रकटे भैरव मार्तंड ।।**
**करी शोभे खंड । समवेत शक्ती म्हाळसा ।।८।।**
**दैदिप्यमानसुंदर । काया जैसी कर्दळीगर्म ।।**
**अष्टनायिका आसक्त । सौंदर्याक पाहतां ।।९।।**
**चंपकाचा गंध । परिमले आसमंतात ।।**
**चिंतामणी नमित । साष्टांगे तयासी ।।१०।।**
**वंदुनी चिंतामणी वदत । आपुले वचन सत्य ।।**
**आपणा अव्हेरूनी जाता । मनी खंत होतसे ।।११।।**
**आपुला वीर अवतार । उग्र होती उपचार ।।**
**आपुले अघटित प्रकार । असती अर्चनाचे ।।१२।।**
**अशास्त्रीय नृत्य । सदा आपुल्या मंदिरात ।।**
**उधळण चूर्ण हरिद्रा । कैसे होणे आम्हांसी ।।१३।।**
**सात्विक माझे उपासन । दुर्वा सिंदुराविण ।।**
**उपचार अन्य । नसती मजपासी ।।१४।।**
**जे अर्पिणे आपणासी । अशक्य असे आम्हांसी ।।**
**अव्हेरूनी द्वादश जोतिर्लिंगासी । जाण्या खंत होतसे ।।१५।।**
**मल्हारी तया निवेदित । उपचाराहूनी भाव विशेष ।**
**आपण जे अर्पाल मज । मान्य ते मजलागी ।।१६।।**
**प्रथा तेव्हापासूनि । पालखी जेजुरीत थांबूनि ।।**
**मल्हारीस नैवेद्य करूनि । मग प्रस्थान करीतसे ।।१७।।**

## अक्कलकोटचे श्री स्वामी समर्थ

मोहोळ या गावी एक शिल्पकार राहत होता. तो खंडोबाभक्त होता. स्वामी समर्थ महाराजांचे दर्शन घेतल्याशिवाय भोजन करावयाचे नाही, हा त्याचा दिनक्रम होता. असा क्रम सतत चार महिने चालला होता. एके दिवशी तो श्रीस्वामींच्या दर्शनास जात असताना त्याच्या मनात असा विचार आला की, आपले कुलदैवत 'श्रीमल्हारीमार्तंडांचे दर्शन व्हावे'. असा विचार करीतच तो स्वामींच्या दर्शनास आला. स्वामींचे दर्शन घेऊन तो उभा राहिला. अंत:साक्षित्वाने त्याचा हेतू जाणून महाराज त्यास म्हणाले, ''अरे, तुझ्या मनात जे आहे ते आता प्रत्यक्ष पाहा.'' आणि काय चमत्कार ! शिल्पकाराला स्वामी महाराजांच्या ठिकाणी प्रभू शिवमल्हारी दिसू लागले. पुन्हा क्षणार्धात स्वामी आपले शिवमल्हारीचे रूप पालटून मूळ स्वरूपात आधी होते तसेच उभे राहिले. हा दैवी चमत्कार पाहून शिल्पकाराला गहिवरून आले. नेत्रांतून आनंदाश्रू झरत असतानाच त्याने पुन्हा स्वामींस साष्टांग नमस्कार घातला आणि म्हणाला, ''हे शिवभगवान, आज माझ्या बेचाळीस कुळांचा उद्धार झाला. हे गंगाधरा, हे पिनाकपाणी, हे शिवमल्हारी, हे सद्‌गुरूस्वामी, आता माझा अनाथाचा उद्धार करा,'' असे म्हणून तो स्वामींसमोर हात जोडून उभा राहिला. स्वामी महाराज म्हणाले, ''जा आता, आमचे भजन-पूजन कर. सर्वांभूती भगवद्‌भाव ठेव म्हणजे तुझा उद्धार होईल.'' आशीर्वाद देऊन स्वामी समर्थ निघून गेले आणि त्या भोळ्या भाबड्या मोहोळच्या शिल्पकाराला हे समजले की, वेगवेगळ्या अनेक रूपांत वावरणाऱ्या परमेश्वराचे अंत:स्वरूप एकच आहे. तेव्हापासून तो खंडेरायाला स्वामी समर्थांच्या रूपात पाहू लागला आणि मनोभावे स्वामीभक्ती करू लागला.[२८]

अक्कलकोट स्वामी समर्थां चे प्रसिद्ध शिष्य कोल्हापूरचे श्रीकृष्ण सरस्वती (जन्म शके १७५७- इ. स. १८३५, स्वर्गवास १८२२- इ. स. १९००) यांचे खंडोबा कुलदैवत होते.[२९]

पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील चांदखेड गावचे, उत्तर पेशवाईत होऊन गेलेले संत रामजीबाबा यांचेही कुलदैवत खंडोबा होते. रामजीबाबांच्या भक्तीमुळेच चांदखेडमध्ये खंडोबाचे ठाणे निर्माण झाले अशी प्रचलित जनश्रद्धा आहे. नंतरच्या काळात चांदखेडमध्ये खंडोबाचे भव्य मंदिर बांधले गेले असून त्या परिसरामध्ये ते श्रद्धास्थान म्हणून प्रसिद्ध पावले आहे.[३०]

श्री दासोपंत दिगंबर याचे कुलदैवत 'खंडोबा' असल्याचे त्यांच्या चरित्रग्रंथामध्ये नमूद केले आहे. सुरुवातीलाच त्यांनी आपल्या कुलदैवताला पुढीलप्रमाणे वंदन केले आहे.

**''आतां वंदूं कुलस्वामी,। ऐसें म्हणतां सप्रेमी। स्वयें प्रकटून हृदयपद्मीं। प्रेम देतसे बाह्यांतर ॥४॥**
**प्रेमपूरनायका ऐसे वाखाणिती व्यासादिक, । ब्रह्मादिंकाचे ध्येय देख,। मार्तंड माझा कुलदैवत ॥५॥**
**त्यास ध्यातां हत्मकळीं। वृत्ती रंगली तत्पदकमळीं,। तेणे योगें पृष्टि चढली। निज वासेसि निश्चये ॥६॥**[३१]

हैद्राबाद राज्याच्या औरंगाबाद जिल्ह्यातील (सध्या महाराष्ट्र) धूप या गावातील वऱ्हाडाबरोबर एक सोळा वर्षाचा फकीर शिर्डीस आला. गावच्या वेशीजवळ आल्यानंतर अंधार पडू लागल्याने तिथेच मुक्काम करण्याचे ठरले, तेव्हा तेथील खंडोबा मंदिरात जाऊन सर्व वऱ्हाडीमंडळींनी खंडोबाचे दर्शन घेतले. परंतु, अंगात पांढरीशुभ्र कफनी व डोक्यास पांढरा रुमाल गुंडाळलेला पाहून हा कुणीतरी यवन मुसलमान आहे असे समजून तेथील पुजाऱ्याने त्या तरुण फकिराला दर्शनास मज्जाव केला. तेवढ्यात मंदिराचे मालक म्हाळसापती तिथे दर्शनासाठी आले असता त्यांची नजर त्या फकिराकडे गेली. आपोआप ते त्या तरुणाच्या दिशेने आकर्षिले गेले. अंत:स्फूर्ती झाल्यामुळे त्या तरुणाची 'दैवी ओळख' त्यांना मनोमन पटली. प्रेमाने गहिवरून आलेल्या म्हाळसापतींच्या मुखातून सहजोद्‌गार बाहेर पडले. ''आवो साई, आवो साई, आवो सा...ई...'' (साई = 'सा' म्हणजे साक्षात आणि 'ई' म्हणजे ईश्वर. म्हणजेच साक्षात ईश्वर) असे म्हणतच त्यांनी त्या तरुणाला प्रेमाने मिठी मारली. पुढे लोक त्यांना 'शिर्डीचे साईबाबा' म्हणून ओळखू लागले. म्हाळसापतींनी दिलेले नाव अजरामर झाले.[३२]

## पौराणिक ग्रंथांतील खंडोबा-श्रीकृष्ण संबंध

खंडोबा श्रीकृष्ण यांच्यामधील प्रसंगावर चित्रित झालेली पौराणिक कथा, खंडोबावर लिहिलेल्या अनेक उपासनापर साहित्यात तसेच छोट्या गोष्टीरूप पुस्तकांमध्ये आढळते. त्यातील प्रातिनिधिक स्वरूपाची ही कथा :

एकदा नंद राजाच्या घरी चंपाषष्ठी - षड्रात्रौत्सव साजरा होत असताना, खंडोबाला भरीत रोडग्याचा नैवेद्य

दाखविण्याच्या अगोदर बाळकृष्णाने तो मुद्दामच हट्टाने खाल्ला. तेव्हा खंडोबाने चाणक्षा म्हणून बाळकृष्णास कुत्र्याचे रूप दिले. हे कुत्रे घरातील माणसांच्या पायामध्ये लुडबुड करू लागले. बाळकृष्ण घरात नाही हे पाहून चिंताक्रांत झालेले कुटुंबीय इकडे-तिकडे शोध घेत असतानाच अचानक तिथे नारदमुनी प्रकट झाले. अंतर्ज्ञानाने झालेला सर्व प्रकार त्यांनी नंद कुटुंबीयास सांगितला. नारदमुनींच्याच सांगण्यावरून श्वानरूपी बाळकृष्णाला घेऊन नंद कुटुंबीय जेजुरीस आले. तिथे त्याच्यावर भंडारा टाकताच बाळकृष्णाचे मूळरूप त्यास पुन्हा मिळाले. खंडोबाने साक्षात प्रकट होऊन सर्वांना दर्शन दिले.[३३]

अशाच प्रकारची कथा **श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित 'हरिविजय'** या ग्रंथात दिली आहे,[३४] ती अशी :

**एके दिवशीं कमलासनपिता। प्रात:काळी जाहला असतां।**
**मातेसी म्हणे आजि मित्रवार। दुग्ध अनसूट असे समग्र।**
**खंडेराव दैवत तीव्र। पुसे रमावर कोठें आहे।।२।।**
**माता म्हणे देव्हारां। पाहें जाय सुकुमारा।**
**डोळस मदनताता सुंदरा। सर्वेश्वरा गाविंदा।।३।।**
**देव्हारां येऊनि गोपाळ। पाहे देवाधिदेव निर्मळ।**
**तंव ते टांक देवांचे सकळ। दोरिंयेने गोंविले ।।४।।**
**मातेसी म्हणे श्रीराब्धिजाकांत। येवढे देवांचे सांगसी सत्त्व।**
**तरी ह्या दोरीनें निश्चित। का आकळूनि रक्षिले ।।५।।**
**काय तुझा देव करील। म्हणोनिया वैकुंठ पाळ।**
**बळेंचि दुग्ध सकळ। तमालनीळ पीतसे ।।६।।**
**त्या उपरी ते रात्र क्रमिली। प्रात:काळीं उठोनि वनमाळी।**
**मातेसी म्हणे ते वेळी। कडेवरी घेई मज ।।७।।**
**माझी वाकडी झाली मान। दोन्ही दुखताती नयन।**
**माता म्हणे मल्हारी पूर्ण। हरि तुजवरी क्षोभला ।।८।।**
**खंडेराव दैवत दुरळ। प्रचीत दाविली तत्काळ।**
**मातेचे नेत्रीं वाहे जळ। म्हणे आतां काय करूं मी ।।९।।**
**कडेवरी घेतला कृष्ण। मायेचे खांदा टाकिली मान।**
**जैसा भ्रमर बैसे संकोचून। कमलकोषीं प्रीतीनें ।।१०।।**
**देव्हरां येऊनि माया। म्हणे मार्तंडा खंडेराया।**
**हरिवरी कृपा करीं लवलाह्या। म्हणोनी लावी आंगारा ।।११।।**
**तो अकस्मात म्हाळसामती। देदप्यमान दिव्यमूर्ती।**
**तडिंदबरप्रभा फाकती। कैलासपति साक्षात ।।१२।।**
**खंडा झळके दक्षिणकरीं। हरिद्राचूर्ण उधळे वरी।**
**तुरंगवहन त्रिपुरारी। उमानार्थ प्रकटला ।।१३।।**
**दिव्य तेजें भरलें गगन। जो मणिमल्लप्राणहरण।**
**तो साक्षात शिव हयवाहन। यशोदेसी बोलत ।।१४।।**
**तुझें पूर्वपुण्य अद्‌भुत। उदरा आला त्रैलोक्यनाथ।**
**त्याच्या अंगी दैवते समस्त। देव आम्ही यशोदे ।।१५।।**
**बह्मानंद हा साक्षात। यासी भज धरीं भावार्थ।**
**यासी पुजिंता देव समस्त। तृप्त होती निर्धारें ।।१६।।**
**ऐसे बोलोनि तये वेळां। खंडेराव गुप्त जाहला।**
**मातेसी हृदयी कळला। हरिप्रताप अद्‌भुत ।।१७।।**

### नामा पाठककृत कृष्णाची आळ

कवी नामा पाठककृत 'कृष्णाची आळ' हे एक्केचाळीस ओव्यांचे भावस्पर्शी काव्य आहे.[३६] यात नामा

पाठकांनी यशोदामाता आणि बाळकृष्ण यांच्यामधील खंडोबाभक्तीसंदर्भात संवाद चित्रित केले आहेत :

**।। कृष्णाची आळ ।।**

**।। श्रीकृष्णाय नम: ।।**

**यशोदा प्रात:काळीं । हाती घेऊनी तूपपोळी**
**पाचारी वनमाळी । 'जेवी बा कृष्णा' ।।१।।**
**तंव बोले अनंतु । 'आई, जेऊं घाली दुधभातु'**
**आइकोनि माता म्हणतु । 'शनवार बापा'।।२।।**
**'आई, शनवार तो काये । दूध कां जेऊं नये ।**
**सत्य सांग आमये' म्हणे कृष्ण ।।३।।**
**येका करें हनुवटी । दुजा करें घाली मिठी ।**
**मुखा मुख दृष्टी । मेळउनी बोले ।।४।।**
**बाळ बोले बाळवाचा । 'आई, सणवारू तो कैचा'**
**'बा, आमचे कुळींचा । कुळधर्म ।।५।।**
**दोहो नेंदीत गाई । मग तुं जेविसील रे काई '।**
**येरु म्हणे 'आई । याची प्रचीत पाहो' ।।६।।**
**'दुरळ' आमुचा देवो । म्हाळसा आणि खंडेरावो ।**
**नको रे प्रचीत पाहों । तान्हुलया ।।७।।**
**आजिचा क्षणभरी । कृष्ण, 'तुं रे धीरू धरीं' ।**
**मग बोलिले श्रीहरी । 'आई, देव कोठें ।।८।।**
**तांबियाची प्रतिमा । दाखविली पुरुषोत्तमा ।**
**देखोनि मेघश्यामा । हास्य आलें ।।९।।**
**'आई, तांबे मुसीं आटिलें । ते सोनारें पै घडिलें ।**
**त्याचे दैवत कैसें जाले । सांग मातें ।।१०।।**
**यासि दोरा कां वोविला । या गळां कां बांधला ।**
**येणे अपराध काय केला । सांग मातें ।।११।।**
**देव, आई, असे वेगळा । न कळे पै ज्याची लीळा**
**ब्रह्मांडाचा गोळा । उदरीं ज्याचे ।।१२।।**
**मग कृष्णें काय केलें । अग्नीस पै चेतविलें ।**
**दुध उतेनि गेलें । वन्हीमाजी ।।१३।।**
**अग्नीमुखीं समर्पिलें । तें खंडेराया पावलें ।**
**मग प्रसन्न करू आदरिलें । प्रयादिकी ।।१४।।**
**मांजरें लोणीं खातीं । हाणों धावे दशवंती**
**तों येरीकडे श्रीपती । काय केलें ।।१५।।**
**दुधें गुळन्या टाकितु । मणगटें चाटितु ।**
**पुढें असे पळतु । मागें माया ।।१६।।**
**'आई, तुं कां गे धावसी । देव आहे तुजपासीं ।**
**पाठवीं तयासी । देईल धरूनी' ।।१७।।**
**'ऐसे डोळे फुटत । कां गाई दोहों नेंदित ।**
**पाहासील प्रबळ प्रचित । दाखवीन आतां ।।१८।।**
**'हें गे मी दुध खातोंही । हें गे माझे डोळे पाहीं ।**
**सांजच्या येतील गाई । देईल दोहोनी' ।।१९।।**
**'ऐसें कैसें हें लेकरूं । यासि मी आतां काय करूं ।**
**येणें बहु अनाचारू । मांडीयेला ।।२०।।**
**नाइके सीकविलें । न करी म्हणीतलें ।**
**शब्दा परत वेडें । मजचि लावी ।।२१।।**

ऐसी धांवतां हिंपुटी जाली । परतोनि घरा आली ।
सखियांसी बोलिली । चिंताग्रस्त ॥२२॥
‘आई, घडलें वो अनुचित । मोडलें आमुचें व्रत ।
कुळीचें कुळदेवत । दारूण माये ॥२३॥
आमच्या सासुरयाची रिती । अती बहु निगुती
बाळका थानप्रती । तेंही नाहीं ॥२४॥
दहीं नाहीं भक्षणें । दुध नाहीं उष्टनें ।
अनसूट ठेवणें । दोहीं सांजांचें ॥२५॥
सांज सांजवणी । अनसूट ठेऊनि ।
रक्षण देऊनी । मल्हारीचें ॥२६॥
प्रात:काळीं रवीवारीं । देव्हारां पुजा करी
दुध सेवया क्षिरी । नैवेद्यासी ॥२७॥
दहीं दूध प्रकार । वरी घालुनी भंडार ।
मग घर समग्र । जेवीत असे ॥२८॥
यासि कांही चुकतों । तरी अवज्ञा पावतों ।
यासिक बाळकृष्णें तों । काय केलें’॥२९॥
ऐसी चिंताक्रांत जाली । दशवंती कोमाइली
कृष्ण म्हणे ’माऊली’ । बुझाऊ आतां ॥३०॥
आई, म्यां दुध नाहीं उष्टिलें । कृष्णें मुख पसरिलें।
येरी माता देखिलें । विश्वरूप ॥३१॥
लोक लोकपाळ । सप्तही पाताळ
येक भूमंडळ । चौदा भुवणें ॥३२॥
सायंकाळी भानु । दिसे नेत्रवानु
देखोनियां जनू । विस्मीत जाले ॥३३॥
तवं बोले जननी । ’हे तरी देवाची करणी ।
प्रत्यक्ष ततक्षणीं । दाखविलें तुज ॥३४॥
बा, मी सांगत होतें तुज । दुरळ बहु देवत ।
चाल जाउं जेथ । विनउं त्यांसी’॥३५॥
तवं बोले अनंतु । आई, नवल गे तुझी मातु
देव कांहीं नाहीं म्हणतु । आम्हांलागी’॥३६॥
दो पाहारांभीतरी । आई आणिल्या झडकरी ।
आणीक साजुक निर्धारी । करूनी दोहे ॥३७॥
‘येणे भरिला वो क्षीरसागरू । लेकरूं नव्हे, मी काय करूं’ ।
जननी म्हणे स्थिरू । होई बापा ॥३८॥
तुझा कळला आहे रे अंतु । जै केला पूतनेचा शोकु
उदरीं तिन्ही लोकु । दाखविले कळों आलें आम्हां’ ॥३९॥
कृष्णातें धरूनी करीं । घेतलें पै कडियेवरी
चुंबन देउनी श्रीहरी । आळंगिलें ॥४०॥
पाठक नामा म्हणतु । आळीकर हा अनंतु
ब्रह्मादिंका मातु । न कळे याची ॥४१॥
॥ इति श्रीकृष्णआळ नामा पाठककृत् संपूर्ण ॥
॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

खंडोबा हे सर्वसामान्यांचे जिव्हाळ्याचे लोकदैवत असल्यामुळे मराठी संतही अपवाद नाहीत. त्यांनीही या लोकदेवाची वाङ्मयीन उपासना करताना शिव-शक्तीला एकत्र गुंफून खंडोबा हे अव्दैततत्त्वज्ञानाचे प्रतीक कसे आहे, हे

आपल्या रसाळ काव्यातून लोकापर्यंत पोहचविले, हे आपण अनेक संतांच्या खंडोबावरील आध्यात्मिक रूपकांमधून पाहिले.

पुढील प्रकरणात वाघ्या-मुरळी तसेच लोकसंस्कृतीच्या इतर उपासकांचा खंडोबा संदर्भात परिचय करून घेऊ.

[]

## संदर्भ - टीपा


१. (डॉ.) बाबर सरोजिनी , कुलदैवत, पृ. ४२२-४२३.
२. मौखिक परंपरेतून चालत आलेली व जेजुरी गडावरील खंडोबा मंदिरात नित्य म्हटली जाणारी आरती.
३. चांदोरकर मो. का. (सं.) श्री ज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठ्य, अध्याय १ : ओवी १९३-१९४.
४. श्री नामदेव विरचित, नामदेवगाथा, पृ. ३३-३४.
५. (डॉ.) देखणे रामचंद्र , महाराष्ट्राचा लोकदेव खंडोबा, डॉ. रामचंद्र देखणे, पृ. १००.
६. आपटे द. अ. / किंजवडेकर (शास्त्री) रामचंद्र (सं.), श्री संत एकनाथ महाराज यांची अभंगाची गाथा, पृ. ७५९-७६०.
७. पांगारकर ल. रा. (सं.), महाराष्ट्र वाङ्मयाचा इतिहास, खंड दुसरा, पृ. ४४६-४४७.
८. शास्त्री (पंडित) विष्णु परशुराम (सं.) श्री तुकारामबाबांच्या अभंगाची गाथा (भाग पहिला),पृ. १७७.
९. हा अभंग येथे ऐकीव स्वरूपात घेतला आहे. गाथेत तो आढळत नाही.
१०. (ह.भ.प.) पांगारकर लक्ष्मण रामचंद्र (संग्राहक), श्री समर्थ ग्रंथ भांडार, पृ. ६२०.
११. अनंतदास रामदासी (सं.), श्री समर्थांची गाथा, पृ., ३२, २५२-२५३, २९५, ३५२-३५४.
१२. सटीप दासबोध, वरदा बुक्स, दशक ४, ओवी ७, ५-२०, १३-६, १८-११.
१३. खरशीकर नरहरशास्त्री (सं.), केशवस्वामींची कविता, पृ. १८२.
१४. भावे विनायक लक्ष्मण (सं.), श्री रंगनाथस्वामी निगडीकरकृत कवितासंग्रह, पृ. ६२-६३.
१५. देव शंकर श्रीकृष्ण (सं.), स्वानुभव दिनकर, पृ. ३९, १६३, १६६.
१६. देव शंकर श्रीकृष्ण (सं.), श्री दिनकरांची स्फुट कविता, पृ. ११५-११६.
१७. गुब्बी प्रल्हाद व्यंकटेश (सं.), मध्वमुनीश्वरांची कविता, पृ. ९०, १९५.
१८. ओक वामन दाजी (सं.), महाराष्ट्रकवी अमृतराय कवितासंग्रह, पृ. ११६, ११८.
१९. पांगारकर लक्ष्मण रामचंद्र (सं.) निरंजन माधवांचा कवितासंग्रह (भाग पहिला), पृ. ६५-६९.
२०. प्रियोळकर अनंत काकबा (सं.) श्री कविवर्य मोरोपंतांचे समग्र ग्रंथ-१०, स्फुट काव्य (भाग पहिला), पृ. ६५-६६.
२१. कोल्हटकर स. व्य. (सं.) निरंजन रघुनाथांचे ग्रंथ (पदपदांतरे), पृ. १२, ४०, ५९, ११०,१३९.
२२. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), कुलदैवत, पृ. ४२०.
२३. देशपांडे रा. कृ. (सं.), श्रीमौनी चरितामृत, पृ. ३१५.
२४. (डॉ.) वैष्णव मंगला , संतकवी शिवदिन केसरी : व्यक्ती आणि वाङ्मय, पृ. ५०१-५०२.
२५. भावे च. र. (संग्राहक), श्री खंडेरायाचा यळकोट, पृ. २६-२७.
२६. मराठे रा. शि., श्री भावे महाराज, पृ. ३, ८५-८८.
२७. काकतकर ना. वि. (सं.), संतकृपा (मासिक) फेब्रुवारी २००३, पृ. ११.
२८. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण (सं.), श्री स्वामी समर्थ, पृ. २६०.
२९. काकतकर ना. वि. (सं.), संतकृपा, ऑगस्ट २००५, पृ. ११.
३०. चांदखेड येथे रामजीबाबांच्या मंदिरात समक्ष जाऊन संकलित केलेली माहिती.
३१. दासोपंत दिंगबर (दासोपंत चरित्र), महाराष्ट्र कवीसंतमाला क्र. ४, अ. १ - ओ. ४-६.
३२. श्रीसाईलिलामृत, श्री साईबाबा संस्थान, शिर्डी, पृ. २-५.
३३. अनेक लेखकांच्या खंडोबावरील छोट्या गोष्टीरूप पुस्तकातून ही कथा आढळते.
३४. श्रीधरस्वामी नाझरेकर, हरिविजय, पृ. १३३-१३५.
३५. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, लोकदैवतांचे विश्व, पृ. २११-२१७.

विशिष्ट प्रकारची वेशभूषा परिधान करून यात्रा-उत्सव, जागरण तसेच इतर कुलधर्म-कुलाचारासारख्या माध्यमातून भक्तीचा प्रचार व प्रसार करणाऱ्या वाघ्या-मुरळींना खंडोबाचे उपासक म्हणून सर्वत्र ओळखले जाते.

'खंडोबा' म्हटले म्हणजे वाघ्या-मुरळीचा उल्लेख अपरिहार्य ठरतो. कितीतरी लोककथा, लोकरिवाज 'वाघ्या-मुरळी' संकल्पनेशी निगडित आहेत. वाघ्या-मुरळी म्हणजे स्त्री-पुरुष संबंधाचे एक वेगळेच स्वरूप - शरीर संबंधाबाबतचा खुलेपणा आणि मुक्तपणा किवा त्या संबंधामधील देवालयाशी निगडित असणारी धारणा आजच्याही युगात पाहायला मिळते. 'मुरळी' ही नृत्यगायन कलेत निपुण असणारी हवी असा लोकनियम अनेक लोककथांमधूनही आपल्याला आढळतो. पार्वतीचे पिढ्यानुपिढ्यानंतर चालत आलेले अवशेषित रूप म्हणजे या मुरळ्या आहेत. तर शिवभक्त शिवगणांचे रूप म्हणजे वाघे आहेत. शिव-पार्वती हे शैव संप्रदायात आदियुगुल, आदिदांपत्य समजले जाते.

वाघ्या-मुरळी या संकल्पनेचे मूळ पवित्र व मंगल असावे असे वाटते. परंतु कालांतराने या संकल्पनेच्या संदर्भातील पाळेमुळे अनेक कल्पना - विषयांशी जोडली गेल्यामुळे वाघ्या-मुरळीवर आपोआपच 'अवैधप्रथा' म्हणून शिक्कामोर्तब झाले आणि त्याचे रूपांतर रूढी, प्रथा, परंपरामध्ये झाले. पुढे लोकसाहित्य व दैवतविषयक अनेक छोट्या - मोठ्या ग्रंथामधून याचे उल्लेख येऊ लागले. परंतु दांपत्यभावाने देवाशी संबंध असणाऱ्या वाघ्या-मुरळीच्या संदर्भातील लोककथा, लोकगीतांचा विचार केल्यास '' वाघ्या-मुरळी संकल्पनेचे मूळ पवित्र व मंगल असावे'' याची सत्यता पटते. सदर प्रकरणात याच अंगाने आपण विचार करणार आहोत.

एन्थोवेनने मुंबई इलाख्यातील जातीच्या सर्वेक्षणात वाघ्या-मुरळ्यांविषयी दिलेली माहिती अशी : 'एखाद्या मनुष्यास मुले होत नसली अथवा त्याची मुले जगत नसली म्हणजे तो 'मूल जगल्यास तुला अर्पण करीन' असा नवस खंडोबास करतो. अशा तऱ्हेनं खंडोबास अर्पण केलेल्या मुलीस मुरळ्या म्हणतात व मुलांस वाघे म्हणतात. कधी कधी विवाहित स्त्रियाही नवसाने अथवा आपणास खंडोबाची स्त्री होण्याविषयी स्वप्न पडले आहे असे सांगून आपणास खंडोबास अर्पण करितात. खंडोबास मुलगे व मुली वाघे व मुरळ्या म्हणून वाहण्याची चाल मुख्यत्वेकरून कुणब्यांत व त्याच्याच दर्जाच्या इतर जातीत आढळते. महारातही ही चाल प्रचलित आहे.''[१] मातंग समाजात मुरळ्यांचे प्रमाण जास्त आढळते.

## वाघ्या

नवसप्राप्तीतून झालेल्या मुलाला लहानपणीच खंडोबाचा वाघ्या म्हणून सोडला असला तरी त्याचे योग्य वय झाल्यानंतरच 'वाघ्या' बनण्याचा विधी केला जातो. चैत्र महिन्यात घरातल्या ज्येष्ठ व्यक्तींनी आपला संकल्प अगोदरच खंडोबाच्या गुरवाला (पुजाऱ्याला) कळवावा लागतो. मग एखाद्या रविवारी ('रविवार' हा खंडोबाचा वार असल्यामुळे) मुलाला वाजत-गाजत 'वाघ्या'च्या वेशात मिरवणुकीने खंडोबा मंदिरात नेतात. गुरव त्या मुलाला भंडारा लावून, भंडाऱ्याने भरलेली वाघाच्या कातडीची पिशवी मुलाच्या गळ्यात बांधतो. मग त्या मुलाला देवाच्या चरणी लोटांगण घालण्यास सांगून गुरव देवावर भंडारा उधळतो व देवाला त्या मुलाचा 'वाघ्या' म्हणून स्वीकार करण्याची विनंती करतो. अशा प्रकारे त्या मुलास वाघ्याची दीक्षा दिली जाते. (चैत्र शुद्ध पौर्णिमा हा खंडोबा अवताराचा पवित्र दिवस असल्यामुळे मुद्दाम त्या दिवशी वाघ्या बनण्याचा विधी केला जातो. परंतु ते मुलाच्या पालकांवर अवलंबून असते.) मुलाला वाघ्याची दीक्षा मिळाल्यानंतर भक्तांचे कुलधर्म-कुळाचाराचे विधी करण्याचे अधिकार त्याला प्राप्त होतात. महाराष्ट्रीय वाघ्याला दर तीन वर्षांनंतर जेजुरीला जाऊन खंडोबाचे दर्शन घ्यावे लागते.

वाघे दोन प्रकारचे असतात- घरवाघे आणि दारवाघे. घरवाघे म्हणजे नवस फेडण्यासाठी काही वेळ वाघ्याचा वेश परिधान करून 'खंडोबाची वारी' (भिक्षा) मागणारे आणि दारवाघे म्हणजे वाघ्याची दीक्षा घेऊन खंडोबाच्या नावाने आयुष्यभर 'वारी' मागून आपला उदरनिर्वाह करणारे. हेच वाघे खंडोबाभक्तांचे जागरण, लंगर तोडणे (लोखंडी साखळी) इत्यादी धार्मिक विधी पार पाडतात.

खांद्यावर घोंगडी टाकलेला, गळ्यात व्याघ्रचर्माची भंडाऱ्याने भरलेली पिशवी अडकवलेला आणि हातात घोळ (लहान घाट्यांचा जोड) घेतलेला वाघ्या खंडोबाची गाणी म्हणत मल्हारीची वारी मागत गावोगावी खंडोबा यात्रेतून फिरताना दिसतो. प्रसिद्ध खंडोबा क्षेत्रांच्या यात्रातून तर जागोजागी वाघ्या-मुरळ्यांचे नृत्य-गायनाचे कार्यक्रम पाहावयास मिळतात.

महाराष्ट्र आणि कर्नाटकातल्या वाघ्यांच्या वेशभूषेमध्ये बराच फरक आढळतो. कर्नाटकात वाघ्या घोंगडीची

कफनी वापरतो. भंडाऱ्याने भरलेली पिशवी गळ्यात अडकविलेली असते. ती पिशवी वाघाच्या कातडीची असते. हातात कोटंबा (धातूचे किंवा लाकडाचे भिक्षापात्र), गाठा (रुप्याचा गोफ), कातड्याची किंवा वाखाची कवड्या गुंफलेली दोरी, दिवटी, बुधली, ध्वज, पोवेतो (गळ्यात बांधावयाची भंडाऱ्याने रंगवलेली सुताची दोरी), घोळ, शंख किंवा डमरू, शूल-त्रिशूल इत्यादी वस्तू त्याच्याजवळ असतात. खंडोबा यात्रेच्या वेळेस किंवा मुख्य उत्सवाच्या वेळेसच वाघ्याच्या अंगावर हा 'सराजम' (वस्तू) दिसतो. एरवी तो महाराष्ट्रीय वाघ्याच्या वेषातच फिरताना दिसतो.

घरवाघे बहुधा आपल्या जातीतील किंवा नात्यातील मुलीशी लग्न करतात, तर दारवाघे आपल्या वडिलांच्या जातीतील मुलीशी लग्न करतात. वाघ्यांच्या मुला-मुलीतही लग्न होण्यास काही अडचण नसते. मात्र, दोन्हीही वाघ्यांची कुटुंबे खंडोबा उपासक असली तरी तिथेही जात पाहिली जाते. काही वाघे दुसऱ्या जातीच्या मुरळीशीही लग्न करतात. वाघ्या-मुरळीपासून झालेल्या मुला-मुलीवर वाघ्या-मुरळी बनणे बंधनकारक नसले तरी काही जण परंपरागत व्यवसाय करणेच पसंत करतात.

खंडोबाच्या परिवारात कुत्र्याला फारच महत्त्व असल्यामुळे वाघे वारी मागताना स्वत:ला खंडोबाचे कुत्रे समजून 'गुर्रगुर्र' असा आवाज काढतात. (आजही खेडेगावात खंडोबाभक्तांच्या घरी जेवण चालू असताना जर समोर एखादे बाहेरचे कुत्रे येऊन उभे राहिले तर त्याच्यासमोर एखादा का होईना, अन्नाचा घास टाकतात. नाही टाकल्यास तो खंडोबा देवाचा अपमान समजतात.)

पाशुपत मतात भक्त स्वत:ला पशू आणि शिवास पशुपती (भक्तांचा तारणहार) मानतात. खंडोबाबद्दल वाघ्या आणि भक्तांच्या भावनाही अशाच असतात.

आनंदगिरींनी लिहिलेल्या 'शंङ्करविजय' या ग्रंथात खंडोबा उपासकांच्या श्वानभाषेचा उल्लेख आढळतो. बऱ्याच वेळा वाघे दोन हात जमिनीवर टेकून कुत्र्याप्रमाणे चालण्याचा व भुंकण्याचा अभिनय श्रद्धेने करत असतात. म्हणूनच संत निरंजन म्हणतात :

**स्मरोणिया त्याचे गुण । येळकोट गाऊ गाण ।**
**भुंकू होऊनिया श्वान । त्याचे घरी सर्वदा ।।**

## वाघ्याची लोककथा

वाघ्याच्या उत्पत्तीची लोककथा साधारण पुढीलप्रमाणे सांगितली जाते :

नळदुर्ग गावात अजामिळ नावाचा मेंढपाळ धनगर राहत होता. तो रोज रानात मेंढरे चारण्यासाठी घेऊन जात असे. मेंढरे चरायला सोडून द्यायची आणि एका ठराविक ठिकाणी चंदन वृक्षाच्या सावलीत बसून खंडेरायाचे चिंतन करायचे, असा त्याचा नित्यक्रम होता. परंतु अधून-मधून त्याला जंगली श्वापदे (वाघ, लांडगा इत्यादी) मेंढरांना खातील म्हणून काळजी वाटायची. आपल्याकडून खंडोबादेवाची भक्ती झाली पाहिजे आणि मेंढरांचेही संरक्षण झाले पाहिजे, असे त्याला नेहमीच वाटे. एकदा अशीच त्याच्या मनात जंगली श्वापदाबाबतची भीती निर्माण होताच त्याने खंडेरायाला प्रार्थना केली, 'देवा मल्हारीमार्तंडा, माझ्या मेंढरांचे सावजापासून (जंगली श्वापदांपासून) तूच रक्षण केले पाहिजे. तूच आमचा त्राता आहेस.'

त्या धनगराच्या भोळ्या भक्तीने मल्हारी त्याच्यावर प्रसन्न झाले. त्यांनी आपल्या दैवी शक्तीपासून एक दांडगा कुत्रा निर्माण केला आणि मेंढरांच्या रक्षणासाठी अजामिळ धनगराला देऊन टाकला. त्या कुत्र्याला वाघसुद्धा घाबरत असत. हे समजल्यानंतर अनेक मेंढपाळ धनगरांनी आपली मेंढरे अजामिळाकडे सांभाळण्यास दिली.

एकदा शिकारीच्या हेतूने, मेंढरांना मारून खाण्यासाठी वाघ रानोमाळ वणवण भटकत होते. परंतु त्यांना कुठेच मेंढरे सापडली नाहीत. तेव्हा रिकाम्या हातानेच ते सर्व माघारी परतले. त्यांनी आपल्या राजासमोर मेंढरे न मिळाल्याचे तसेच मार्तंडभक्त अजामिळ धनगर व त्याचा शक्तिशाली दांडगा कुत्रा याचे सविस्तर वृत्त कथन केले. ते ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. कुतूहल म्हणून तो स्वत: त्या चंदन वृक्षाजवळ चरत असलेल्या मेंढरांच्या कळपात गेला. व्याघ्रराजाला पाहून अजामिळ धनगराने आदरपूर्वक नमस्कार केला. परंतु व्याघ्रराजाचा उलटाच गैरसमज झाला. त्यास वाटले की, हा धनगर आपणास घाबरला आहे. म्हणून त्याने एका मेंढीवर झडप घातली. जवळच असलेल्या कुत्र्याने वाघावर झेप घेऊन त्याच्या सर्वांगाचा कडकडून चावा घेतला. तेव्हा वाघ मेंढी तिथेच टाकून भीतीने जंगलात पळून गेला. परंतु थोड्याच वेळाने जंगलातील सर्व वाघ चंदनवृक्षाजवळ आले आणि धनगराच्या मेंढरांवर हल्ला करणार तोच त्या कुत्र्याने एकाच वेळी सर्व वाघांचा समाचार घेतला आणि सर्वांना कैद

करून नळदुर्गमध्ये मार्तंडभैरवाकडे घेऊन आला. मार्तंडभैरवाने कुत्र्याला काय घडले असे विचारले असता, वाघांनी अजामिळाच्या मेंढरांवर केलेल्या हल्ल्यासंदर्भात सारा वृत्तान्त कथन केला. तेव्हा मार्तंडभैरवाने रागाने वाघांना विचारले, 'वनात वावरणाऱ्या निरपराध प्राण्यांचा तुम्ही वध का करिता?'

मार्तंडभैरवाची अमृतवाणी ऐकताच वाघांची दुर्बुद्धी नष्ट होऊन सुबुद्धी जागृत झाली. व्याघ्रराजाला आपल्या पूर्वजन्मीचे स्मरण झाले. तो मार्तंडभैरवास सांगू लागला, 'मागील जन्मी मी चंपूनगरीचा राजा होतो व बाकीचे वाघ माझे सहकारी होते. आम्ही दीनदुबळ्या लोकांवर अत्याचार, अन्याय करून त्यांची संपत्ती लुबाडत असू व त्यांनाच तुरुंगात डांबत असू. अशा वाईट कृत्यांमुळे लवकरच आमच्या पापाचा घडा भरला आणि युद्धात दुसऱ्या राजाकडून आमचा पराभव झाला. पूर्वीच्या पापांमुळे आम्हाला वाघाचा जन्म प्राप्त झाला. परंतु आपल्या दर्शनाने आमची दुष्ट बुद्धी नष्ट झाली आहे. आमची या योनीतून मुक्तता व्हावी व आम्हाला दुर्मिळ असा मनुष्यदेह प्राप्त व्हावा, अशी आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे. तरी आम्हाला सन्मार्ग दाखविण्याची कृपा करावी.'

त्यावर मल्हारीमार्तंड म्हणाले, 'हा कुत्रा माझाच अंश आहे. त्यामुळे त्याच्यापासून यापुढे तुम्हाला त्रास होणार नाही. तुम्हाला सन्मार्गाला लावण्यासाठीच मी त्याला हे कृत्य करायला सांगितले आहे'. एवढे बोलून मल्हारीमार्तंडाने सर्व वाघ्यावर भंडारा उधळला. सर्वांनी मल्हारीमार्तंडाला अनन्यभावे साष्टांग नमस्कार केला. तेव्हा मल्हारीमार्तंड भविष्यवाणी सांगू लागले, 'तुम्हाला आपल्या व्याघ्ररूपाची आठवण राहावी म्हणून वाघाच्या कातड्याच्या पिशवीत भंडारा ठेवून ती सदैव गळ्यात अडकावीत जा. कुत्र्याच्या योगानेच तुम्हाला बोध झाला आहे, म्हणून माझी प्रार्थना करण्याआधी कुत्र्यासारखा (गुर्रगुर्र) आवाज करीत जा. जो तुमच्या उद्धारास कारणीभूत झाला, त्या अजामिळ धनगर मेंढपाळाची आठवण म्हणून घोंगडीची कफनी वापरत जा आणि माझ्याशी सतत संबंध राहावा म्हणून लंगर गळ्यात अडकवीत जा. म्हणजे साखळीरूपी ऋणानुबंधाने आपण एकमेकांशी जोडले जाऊ. तुम्हाला माझ्याशी एकरूप होता येईल. कपाळावर सदैव भंडारा लावीत जा. तुम्हाला पृथ्वीतलावर माझे भक्त 'वाघे' या नावाने ओळखतील.' एवढे सांगून मल्हारीमार्तंड अदृश्य झाले.

## मुरळी

वाघ्याप्रमाणेच मुरळीला बालपणीच खंडोबाला अर्पण केली असली तरी उपवर झाल्यानंतरच तिचे खंडोबाशी लग्न लावले जाते. वाघ्याप्रमाणेच परंतु थोड्या वेगळ्या फरकाने मुरळी बनण्याचा विधी केला जातो. मुरळीच्या देवाशी होणाऱ्या विवाहाचा संकल्पही अगोदरच गुरवाकडे कळवावा लागतो. एखाद्या रविवारी मुलीला तिचे पालक मुरळीच्या वेषात पुजाऱ्याने दिलेल्या लग्नमुहूर्ताच्या वेळेनुसार खंडोबा मंदिरात आणतात. (असे विवाह खंडोबाच्या प्रमुख तीर्थक्षेत्रीच होतात.) मग पुजारी खंडोबादेवाच्या वतीने तिच्या कपाळावर भंडारा लावून गळ्यात कवड्याची माळ घालतो. त्या वेळेस ती देवाच्या गळ्यात फुलांचा हार घालते. पुजाऱ्यासहित उपस्थित असलेले लोक अक्षता म्हणून देवावर आणि मुरळीवर एकाच वेळी भंडारा उधळतात. या विधीला 'गाठा फोडणे' असे म्हणतात. अशा प्रकारे मुलीला मुरळीची दीक्षा दिली जाते.

पौषी पौर्णिमेस पाली येथे खंडोबा-म्हाळसा विवाह आणि श्रावणी पौर्णिमेस चंदनपुरी येथे खंडोबा-बाणाई विवाह झाल्यामुळे आणि लोकगीतात या दोघींचा उल्लेख 'खंडोबाच्या मुरळ्या' म्हणून आल्यामुळे पौषी आणि श्रावणी पौर्णिमा हे दोन दिवस मुरळीला दीक्षा देण्यासाठी महत्त्वाचे मानले जातात. कारण म्हाळसा-बाणाईसारखीच मुरळीही विवाह झाल्यानंतर खंडोबाची राणी (धर्मपत्नी) होत असते.

विवाहानंतर मुरळी खंडोबादेवाला पती मानून, भावी आयुष्यात देवदासीच्या स्वरूपात वाघ्याबरोबर राहून खंडोबाभक्ती करते. मुरळ्या वाघ्याबरोबर फिरून यात्रांतून, गावोगावी जागरणाचे कार्यक्रम करून आपली उपजीविका करतात, तर काही मुरळ्या (वयाने मध्यम आणि वृद्ध) तीन-चार जणींच्या समूहाने गावोगाव फिरून खंडोबाची गाणी म्हणत वारी मागतात.

काही मुरळ्या कोणत्याही जातीच्या वाघ्याशी लग्न करतात. काही मुरळ्या परपुरुषाबरोबर विवाह न करता 'रखेल' म्हणून आयुष्यभर आपले जीवन व्यतीत करतात, तर काही जणींना चरितार्थाचे साधन उपलब्ध नसल्यामुळे नाइलाजाने वेश्यावृत्तीने जीवन जगावे लागते.

आपल्याकडे महर्षी विठ्ठल रामजी शिंदे आणि त्या काळातील अनेक समाजसुधारकांनी मुरळीच्या प्रथेवर कडाडून टीका केली होती. लोकमत तयार करून ही प्रथा बंद करण्याची सरकारकडे मागणी केली होती. शेवटी

लोकभावना लक्षात घेऊन ‘दि बॉम्बे देवदासी ॲक्ट’ नावाचा कायदा १९३४ साली केला गेला व १९५० साली त्यामध्ये दुरुस्ती करून तो कायम करण्यात आला. त्यामुळे खंडोबाला मुरळी सोडण्याची प्रथा महाराष्ट्रात कायमची बंद करण्यात आली; परंतु आजही चोरून असे तुरळक प्रकार घडताना दिसतात.

### मरळी (मुरळी) तथा पहिली देवदासी-लोककथा

द्रविड प्रदेशात ‘मुरळी’ला ‘मरळी’ म्हणतात. तामिळनाडूमध्ये या मरळीविषयी एक लोककथा सांगितली जाते. ती अशी :

कोप्पम प्रदेशातील एका घनदाट जंगलात एक वृद्ध तापसी आपल्या सुसंस्कृत पत्नीसमवेत राहत होता. रोज पहाटे उठून नदीवर स्नानाला जायचे, पूजा-अर्चा उरकल्यानंतर दिवसभर आपल्या तपात गढून जायचे, असा त्याचा नित्यक्रम वर्षानुवर्षे चालू होता. त्याच्या पोटी संतान नव्हते. एके दिवशी साधू नेहमीप्रमाणे पहाटे उठून नदीवर स्नानासाठी गेला असता नदीकाठावर कपड्यात गुंडाळलेली एक तान्ही बालिका त्याला दिसली. आपली स्नानादी कर्मे उरकल्यानंतर त्या बालिकेला घेऊन साधू आपल्या पर्णकुटीत आला. प्रभातकाळी सापडल्यामुळे त्या मुलीचे नाव ‘प्रभाती’ ठेवले. पोटच्या मुलाप्रमाणे साधू पती-पत्नी प्रभातीचा सांभाळ करू लागले.

दिवसांमागून दिवस जात होते. प्रभाती वयात आली. ती नुसतीच स्वरूपसुंदर नव्हती, तर सर्वगुणसंपन्नही होती. साधू पती-पत्नीने तिच्यावर उत्तम संस्कार केले होते. त्यामुळे ती गुणी आणि सदाचरणी बनली होती. आपल्या आई-वडिलांवर ती जीवापाड प्रेम करत होती. त्यांना तपाचरणात, पूजे-अर्चेत मदत करीत होती. आश्रमातील पशू-पक्षी यांचा प्रेमाने सांभाळ करणे, वृक्षवेलींना पाणी घालणे, आश्रमात आलेल्या अतिथींचे सुहास्य वदनाने व मधुर वाणीने स्वागत करणे या साऱ्या गोष्टी ती आवडीने आणि मनापासून करत होती. त्यामुळे सर्वांना तिचे आचरण एखाद्या देवीसारखे वाटत होते.

हळूहळू तिच्या या गुणांची महती आसपासच्या गावांतील लोकांनाही माहीत झाली. गावा-गावांतून लोक तिच्या दर्शनासाठी येऊ लागले. श्रद्धेपोटी धान्य, फळे इत्यादी वस्तू दक्षिणा म्हणून देऊ लागले. परंतु प्रभातीला हे आवडत नसे. तिला या लोकांच्या अज्ञानाची जाणीव होऊ लागली. म्हणून तिने आपल्या तपस्वी वडिलांची अनुज्ञा घेऊन आश्रमातच शाळा सुरू केली. आसपासच्या गावांतील अनेक मुले-मुली आश्रमात शिकायला येऊ लागली. प्रभाती मुलांना अत्यंत वात्सल्यपूर्ण भावनेने शिकवत असे. एवढेच नाही, तर मुलांच्या पालकांनाही धार्मिक गोष्टी सांगून उपदेश करीत असे. त्यांच्या अडी-अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करीत असे.

प्रभातीच्या या लोककल्याणकारी कामाची दूरवर कीर्ती पसरू लागली. त्या काळी कोप्पम प्रदेशावर मरळी नावाची एक सुंदर तरुण स्त्री राज्य करीत होती. परंतु ती अतिशय अहंकारी, अधार्मिक व विलासी होती. जेवढे जेवढे वाईट गुण आहेत, ते सर्व तिच्या ठायी सामावलेले होते. तिने आपल्या राज्यातील देव-देवतांची सर्व मंदिरे उद्ध्वस्त करून आपल्या अधार्मिक वृत्तीचा कळसच गाठला होता. आपल्या राजवाड्यात सेवेत असणाऱ्या राजपुरोहितांचा अनन्वित छळ करून त्यांना पदावरून दूर केले होते. अनेक मादक पदार्थांच्या आहारी जाऊन तिने निरपराध प्रजाजनांवर घोर अन्याय-अत्याचार चालविले होते.

मरळी राणीच्या जुलूम आणि अत्याचारांनी त्रस्त झालेल्या वृद्ध राजपुरोहिताला प्रभातीच्या गुणांची वार्ता समजली. राणीच्या भीतीमुळे तो भिकाऱ्याचा वेश परिधान करून प्रभातीच्या दर्शनासाठी आश्रमात आला. तेवढ्यात आश्रमात आलेला भिकारी पाहून कर्तव्य म्हणून आपल्याकडील काही फळे तिने त्या भिकाऱ्याला दान केली. त्या भिकारी वेषातील राजपुरोहिताने पुन्हा एके दिवशी आश्रमात येऊन प्रभातीची परीक्षा घेतली. परंतु प्रभातीने आश्रमाला साजेसे असेच सदाचरण केले. त्यामुळे प्रभातीच्या देवपणाची त्याला खात्री पटली. तो आल्या वाटेने परत आपल्या घरी गेला.

मरळीराणीच्या अन्याय-अत्याचारांनी कोप्पमनगरी त्रस्त झाली होती. त्यातच त्या नगरीत भयंकर दुष्काळ पडला होता. पावसाअभावी शेतात धान्य पिकले नव्हते. राणीने अशाही परिस्थितीत करवसुली चालविली होती. दारिद्र्यामुळे कर देण्यासाठी असमर्थ असलेल्या जनतेचा राणीचे सैनिक अतोनात छळ करीत होते. सारी प्रजा दु:खी आणि हवालदिल झाली होती. तेव्हा जनतेचे हाल पाहणे त्या वृद्ध राजपुरोहिताला असह्य होऊ लागले. एकदा निश्चय करून धाडसाने त्याने राजधानीतील अनेक पीडितांना घेऊन प्रभातीचा आश्रम गाठला. कोप्पमनगरीच्या

प्रजाजनांची करुण कहाणी त्याने प्रभातीसमोर कथन केली. ती ऐकून प्रभातीचे कोमल हृदय द्रवले. आपल्या वडिलांची अनुज्ञा घेऊन ती तडक मरळी राणीच्या राजधानीत आली. तिने प्रजेच्या हितरक्षणासाठी राणीला नम्र स्वरात विनंती केली. परंतु मद्यपान करून धुंद झालेल्या या विलासी आणि भोगी राणीला प्रजेच्या या व्यथा कशा समजणार? तिने अत्यंत निर्दयपणे या देवतुल्य प्रभातीला सैन्याकरवी हाकलून दिले.

प्रभातीची देवावर अपार श्रद्धा होती. ती स्वत:च देवस्वरूप होती. तिने सर्व पीडित प्रजाजनांना एकत्र बोलावून देवाची प्रार्थना केली. मेघराजाची करुणा भाकली. मेघराजा तिच्यावर प्रसन्न झाला. प्रार्थना चालू असतानाच आकाशात काळेकुट्ट ढग जमू लागले आणि काही क्षणांतच मुसळधार पाऊस सुरू झाला. शेताशेतांत हिरवीगार पिके डोलू लागली. दु:खाने पिडलेल्या प्रजेमध्ये पुन्हा नवचैतन्य संचारले. सगळीकडे सुख-समृद्धी, शांती आणि आनंद नांदू लागला. प्रभातीच्या इच्छेनुसार प्रजेने कोप्पमनगरीत देवीचे भव्य मंदिर उभारले. प्रभाती त्या मंदिरात रोज येऊन पूजा-अर्चा करू लागली. लोकांना अध्यात्माच्या चार गोष्टी सांगू लागली. उपदेश करू लागली. लोकांची सन्मार्गाकडे वाटचाल सुरू झाली.

मात्र, राजधानीतील सर्व प्रजा प्रभातीच्या भजनी लागलेली पाहून मरळी राणीचा जळफळाट होऊ लागला. तिने सैनिकांना आदेश दिले, 'देवीचे मंदिर उद्‌ध्वस्त करून प्रभातीला माझ्यासमोर हजर करा.' सैनिकांनी मंदिर उद्‌ध्वस्त केले. परंतु प्रभातीला राजधानीत न्यायच्या उद्देशाने काही सैनिकांनी तिला स्पर्श करताच ते सर्व सैनिक जागीच क्षणात जळून भस्मसात झाले. ही वार्ता मरळी राणीला समजताच ती भयंकर संतापली. तिने गारुड्यामार्फत एक भयंकर विषारी नाग प्रभातीच्या अंगावर सोडला. परंतु झाले उलटेच! तो नागही प्रभातीसमोर फणा वाकवून निघून गेला. मग दुसऱ्या दिवशी राणीने शिकारी सैनिकांकडून दोन हिंस्र जंगली वाघ प्रभातीच्या अंगावर सोडले आणि दुरूनच काय होतेय, हे ती पाहू लागली. परंतु ती वेळ सकाळची असल्यामुळे प्रभाती पूजेत मग्न होती. डोळे मिटून ती शांत चित्ताने देवीचे ध्यान करत बसली होती. आणि काय चमत्कार ! ते दोन्हीही वाघ प्रभातीजवळ गेले आणि आपले मस्तक प्रभातीच्या चरणावर टेकवून तसेच मागे फिरले. हे दृश्य पाहताच राणीची अवस्था केविलवाणी झाली. काय करावे तिला सुचेना. ती घाईघाईने आपल्या रथात बसून वेगाने राजवाड्याकडे निघाली. मागे फिरलेले वाघ राणी मरळीचा पाठलाग करू लागले. राणी घाबरून राजवाड्यात सैन्याच्या संरक्षणात एका महालात लपून बसली.

तोपर्यंत वाघांनी राजवाड्यात घुसून चांगलाच धुमाकूळ घालायला सुरुवात केली होती. प्रभातीला हा प्रकार समजताच ती राजवाड्यात आली आणि आश्चर्य म्हणजे तिला पाहताच बेभान झालेले दोन्ही वाघ एकदम शांत झाले. प्रभातीने आज्ञा करताच वाघ जंगलाकडे निघून गेले. नंतर प्रभातीने राणीला अभय देऊन महालाबाहेर येण्यास सांगितले. राणी महालाबाहेर येताच तिने प्रभातीच्या चरणावर अक्षरश: लोटांगण घातले. ती प्रभातीची क्षमायाचना करू लागली. प्रभातीच्या सामर्थ्याची आणि क्षमाशील वृत्तीची प्रचिती आल्यामुळे राणी पार विरघळून गेली. तिने राजवैभवाचा त्याग करण्याचे ठरविले.

त्यानंतर थोड्याच दिवसांत राणी मरळीने कोप्पमनगरीत देवीचे वैभवशाली भव्य, प्रशस्त असे मंदिर उभारले आणि आपले उरलेले सारे आयुष्य देवीच्या सेवेत वाहण्याचे ठरविले. पूर्वी राणी जरी निष्ठुर असली तरी नृत्य-गायन कलेत ती निपुण होती. आता ती नित्यनियमाने देवीसमोर नृत्य-गायन करून देवीला भक्तिभोग देऊ लागली. देवीसमोर नृत्य-गायन करता करतानाच एके दिवशी तिने प्राण सोडला. म्हणूनच राणी मरळीला 'पहिली देवदासी' समजली जाते. तेव्हापासून दक्षिणेत देवदासी बनण्याची प्रथा सुरू झाली. तिलाच लोकप्रतिभेने 'खंडोबाची मुरळी' बनविण्याचा प्रयत्न केला.

महाराष्ट्रात सध्या प्रचलित असलेली 'मुरळी' हीदेखील देवदासीच्या वर्गातील खंडोबाची उपासिका आहे. म्हणूनच महाराष्ट्रीय मुरळीच्या व्युत्पत्तीविषयीचे समर्थन देण्यास ही लोककथा उपयुक्त ठरते.

## महाराष्ट्रीय मुरळीची लोककथा

मुरळीबद्दल आणखी एक रंजक कथा सांगितली जाते. ती पुढीलप्रमाणे :

शंकराच्या आज्ञेवरून बाणाईने हातात बाणाची खूण घेऊन बाणासुर पत्नीच्या उदरी जन्म घेतला. ती वयात येताच तिच्या पित्याने तिचे स्वयंवर मांडले. स्वयंवरासाठी आलेल्या सर्व राजे लोकांत अत्यंत देखण्या अशा मुर दैत्याच्या गळ्यात तिने वरमाला घातली. परंतु, हे इतर राजे लोकांना समजले तर ते क्रोधायमान होऊन मुर दैत्याशी

युद्ध करतील आणि स्वयंवरास गालबोट लागेल, म्हणून ही वार्ता गुप्त ठेवण्यात आली. एके दिवशी भगवान श्रीकृष्ण बाणाईच्या भेटीसाठी श्रोणीतापुरास आले, तेव्हा बाणाईने त्यांचा आदरसत्कार करून त्यांना त्रयोदशगुणी विडा खायला दिला. तेव्हा श्रीकृष्णांनी भेट म्हणून बाणाईला 'मुरली' दिली. श्रीकृष्ण तिथून गेल्यानंतर बाणाईने मुरलीला विचारल्यानंतर ती आपला पूर्ववृत्तान्त सांगू लागली -

'मी स्वर्गातील अप्सरा तिलोत्तमा. मी मूळची इंद्राची दासी असून, त्याच्यासमोर नृत्य-गायन करून त्याची सेवा करीत असे. मी नृत्य-गायन कलेत इतकी प्रवीण होते की, विश्वात मला तोड नव्हती. त्यामुळे सर्वश्रेष्ठपणाचा मला फार गर्व झाला. एके दिवशी मी मुद्दामच इंद्रदरबारात गेले नाही. त्यामुळे इंद्राने रागाने मला शाप दिला की, 'तू मृत्युलोकी जाऊन नृत्य-गायन करशील.' मी इंद्राची प्रार्थना करून खूप विनवणी केली आणि उ:शाप मागितला. तेव्हा इंद्र म्हणाला, द्वापारयुगात तू श्रीकृष्णाची प्रिय सखी होशील. नंतर बाणासुराच्या कन्येचा बाणेचा आणि तुझा सहवास घडेल. मग शंकर मार्तंडभैरव अवतार धारण करतील, त्या वेळी तू शापमुक्त होशील.'

इंद्राने दिलेल्या उ:शापाप्रमाणे मुरलीने बाणाईला सांगितले की, ज्या मुर दैत्याच्या गळ्यात तू वरमाला घालून त्याचा स्वीकार केला आहेस, त्या मुर दैत्याचा वध श्रीकृष्णाच्या हातून होणार आहे. हे ऐकून बाणाईने अत्यंत क्रोधायमान होऊन मुरलीला शाप दिला की, तू मार्तंडभैरवाच्या अंगणात स्त्री होऊन नर्तन करशील.

तत्क्षणी, मुरलीने स्त्रीरूप धारण केले. बाणाईच्या आज्ञेप्रमाणे ती मैलारास येऊन मार्तंडभैरवाच्या अंगणात 'मुरळी' होऊन नृत्य-गायन करू लागली.

## लोकगीतातील मुरळी

आई-वडिलांनी 'पहिली मुलगी झाल्यास तुला मुरळी म्हणून सोडेन' असा खंडेरायाचरणी नवस केलेला असतो. होतेही अगदी तसेच! पहिली मुलगीच होते. ती हळूहळू मोठी होऊ लागते. लहानपणापासून 'खंडोबाची मुरळी' म्हणून तिच्या मनावर बिंबवले जाते. तसे संस्कार तिच्यावर केले जातात. जवळचा ओळखीचा वाघ्या-मुरळीचा ताफा असेल, तर तिला जागरणाच्या कार्यक्रमामध्ये नृत्य-गायन शिकविले जाते. आता ती पंधरा-सोळा वर्षांची होते. वयात येते.

**वय सोळा कोवळी काया, हुडपणात घुंगरू पाया**
**लागे नाचाया, लागे नाचाया, लागे नाचाया**
**पोर बावरी झाली पहा जेजुरीला जाया ।।**
**नव्या-नव्या वाऱ्याने हिचे भारावले अंग**
**या अशा वयातच बदलू पाहे ढंग**
**उतावीळ मल्हारीसंगे लगीन लावाया ।।**
**तुणतुण्याला टाक द्यावा, तशी हिची हालचाल**
**कमरेला पदर खोऊनी, उडवी रूमाल**
**भारीच झाली बेताल, हिला आवराया ।।**
**भंडाराचा मळवट भरूनी या गोऱ्या लल्हाटी**
**तशी कवळ्या-कवळ्या हाती घेऊन घाटी**
**चहू दिशेला भंडारवाटी लागे उधळाया ।।**

अशी ही मुरळी आता वयात आल्यामुळे विचारानेही काहीशी परिपक्व झालेली असते. लग्न करण्याचे हेच तिचे योग्य वय. तिला स्वत:लाही तसे जाणवू लागते. आता तिला खरा ध्यास लागतो मल्हारीप्राप्तीचा. मल्हारीरायाबरोबरच्या सुखी संसाराची गोड स्वप्न ती रंगवते आणि स्वप्न रंगवता रंगवता एके दिवशी खरोखरच तिला स्वप्न पडते. साक्षात मल्हारीदेव स्वप्नात येऊन तिला दर्शन देतात :

**म्या पाहिला पिवळा झेंडा ।**
**या देवाचा बाई ।**
**रात्री मजला स्वप्न पडले।**
**मलुरायाचे दर्शन घडले ।**
**मी गं दचकुन जागी झाले**

**या देवाला बाई ।। १ ।। म्या...**
**बानू-म्हाळसा या दोन्ही नारी ।**
**मधी शोभे देव मल्हारी ।**
**निळ्या घोड्यावरती स्वार गं**
**देव पालेचा बाई ।।२।। म्या...**
**भक्तिभावानं पूजा केली ।**
**मनीची इच्छा पुरी झाली ।**
**धन्य देवानं जागी मला केली ।**
**या गं जन्मात बाई ।।३।। म्या...**

काही झाले तरी लेक म्हणजे परक्या घरचे धन. मुलीचे कितीही लाड पुरविले, कितीही कोडकौतुकाने सांभाळ केला तरी ती दुसऱ्याच्या (सासरच्या) घरी जाणारच. त्यात पोरीची जात म्हणजे काचेच्या भांड्यासारखी. कितीही जपले तरी कधी ना कधी तरी तडा जाणारच... आणि या सोळा वर्षांच्या मुलीचा काय भरवसा? म्हणून आई-वडिलांना तिच्या लग्नाची काळजी वाटू लागलेली असते. तरी पण त्यांना एका गोष्टीचा आधार असतो, तो म्हणजे या मुलीचे जन्मताच खंडेरायाशी लग्न ठरलेले असते. आता आई-वडिलांना तिच्या लग्नाची घाई झालेली असते. मग ते पुजाऱ्याकडे जाऊन लग्नाचा शुभमुहूर्त काढतात आणि रविवारच्या दिवशी या सोळा वर्षांच्या कोवळ्या मुलीचा थाटामाटात खंडेरायाशी विधिपूर्वक शुभविवाह लावला जातो. नवसपूर्ती केली जाते. आता खऱ्या अर्थाने ती खंडेरायाची मुरळी (पत्नी) झालेली असते. खंडेरायाशी एकरूप झालेली असते. आपले सर्वस्व असलेल्या खंडेरायाच्या चरणी लीन होऊन ती गाऊ लागते :

**हळदीकुकानी वटी माझी भरली**
**खंडेरायाची झाले मी मुरळी**
**आईबापानं नवस हा केला**
**कन्या वाहिली मल्हारीला**
**त्याच्या नामाची गोडी आगळी**
**खंडेरायाची झाले मी मुरळी**
**सारी नाती मी देवाशी जोडली**
**त्यानं हुकुमानं मला इथं धाडली**
**सदा मल्हार माझ्याजवळी**
**खंडेरायाची झाली मी मुरळी**

शिवशंकर तिन्ही जगांचा स्वामी. त्याचा अवतार खंडेराय. अशा या खंडेरायाची राणी (मुरळी) होण्याचे भाग्य तिला लाभलेले आहे. मग या राणीचा थाट काय वर्णावा :

**मुरळी करून शिणगार भंडाराचा जी**
**तिनं झोक लाविला पिवळ्या पाताळाचा जी**
**हाती धरून चालती घोळ निऱ्याचा जी**
**पुढे पाऊल टाका ठोका घाटीचा जी**
**गळ्यात भंडार सिक्का हाय देवाचा जी**
**येळकोट बोलती गजर नामाचा जी**
**पुढे कुत्रा भुंकतो बानुबाईचा जी**
**मुरळी करून शिणगार भंडाराचा जी**

लग्नाच्या अगोदर ती खंडेरायाच्या जागरणाच्या कार्यक्रमात नृत्य-गायन करीत होती, परंतु छंद आणि आवड म्हणूनच. तिला त्या वेळी समाजमान्यता नव्हती. आता मात्र समाजमान्यतेची तिला पर्वा नाही. कारण अनेक लोकांसमोर खंडोबाबरोबर केलेल्या विधिवत लग्नामुळे जागरणासारखे विधी करण्याचे सर्व धार्मिक अधिकार तिला प्राप्त झाले आहेत. आता ती गावोगाव वाघ्याबरोबर फिरून रीतसर जागरणाचे कार्यक्रम करू लागली आहे. खंडोबाचे

गुणगान गात, भक्तांचे मनोरंजन करीत स्वार्थातून परमार्थ साधू लागली आहे.

## चैतन्य महाप्रंभूची जेजुरीस भेट

साधारण इसवीसन १५१०-१० या काळातील ही घटना आहे. श्री चैतन्यमहाप्रभू यात्रेनिमित्त दक्षिणेत आले असता त्यांनी जेजुरीस भेट दिली होती. त्यावेळी खंडोबास वाहिलेल्या मुरळ्यांच्या जीवनाची चित्तरकथा ऐकून त्यांचे संतप्रवृत्तीचे कोमल मन अक्षरश: हेलावून गेले. उत्पन्नाचे साधन नसल्यामुळे मुरळ्या व्यभिचारी जीवन जगतात, हे त्यांना समजल्यानंतर जेजुरीतील काही मुरळ्यांना महाप्रभूंनी व्यभिचारी जीवनापासून परावृत करण्याचा प्रयत्न केला. महाप्रभूंच्या उपदेशाचा इंदिरा नावाच्या मुरळीवर इतका प्रभाव पडला की, तिने लगेच जेजुरी सोडली आणि कष्टात व खंडोबा चिंतनात आपले उर्वरित आयुष्य घालविले.

त्यावेळी चैतन्यमहाप्रभूंबरोबर त्यांचा गोविंददास नावाचा शिष्यही होता. तो प्रत्येक यात्रेतील अनुभवांची टिपणे लिहित होता. या टिपनावारूनच जेजुरी येथील घडलेल्या घटनेचे वर्णन रायसाहेब दिनेशचंद्र सेन आपल्या 'चैतन्य ॲण्ड् हिज् कंपॅनियन्स' या पुस्तकात पुढीलप्रमाणे करतात :

" Khandava (Khandoba) was the God of the temple there and parents used to offer their dauqhters to that deity. These daughters called themselves 'wives of Khandava' and led unholy lives and the pilgrims were often enticed by these wretched women, known in the locality as the 'Muralis'. Chaitanya, when he saw them, felt a deep compassion for them and said to Govinda, "How cruel are the parents of these girls, Govinda? How have they the heart to after their owh children to Khandava to lead vicious lives ?" He went to the Muralis himself, though Govinda did not like his going there. The most conspicuous among the Muralis was Indira Devi and as chaitanya held a sweet discourse full of spiritual fervour with the unfortunate women, they felt a thrill of repentance and an ardent desire to reform themselves. Indira Devi particularly was greatly moved. She eventually left the City as an anchoress "[३]

## मुरळीसंबंधी ऐतिहासिक माहिती

औरंगजेब इ. स. १६५२ ते १६५८ या काळामध्ये दख्खनचा सुभेदार म्हणून आला होता. तो सातारे (औरंगाबाद) येथे शिकारीला आला असता त्याने खंडोबाचे मंदिर पाडले होते व मुरळी प्रथेला बंदी घातली होती. यासंबधी इतिहासकार सर जदुनाथ सरकार यांनी 'हिस्ट्री ऑफ औरंगजेब' ग्रंथात या गोष्टीची नोंद पुढीलप्रमाणे केली आहे.

"The village of Satara, hear Aurangabad was my hunting ground, Here, on the top of hill, strod a temple with an image of khanderai By God's grance, I demolished it and forbade the temple dancers (muralis) to ply their shameful profession"[४]

## खंडोबाचे अध्यात्मप्रधान प्राकृतिक विधिनाट्य : जागरण

जागरण-गोंधळ म्हणजे रात्रभर जागून कुलदैवत/उपास्यदैवत यांच्या चरित्राचे लोकगीते, लोकभूमिका, सवांद, निरूपण अशा मौखिक परंपरेतून वाद्यांच्या साथीने, नृत्यासह परंतु श्रद्धात्मक भाविकतेतून उपासकांकरवी सादर होणारे आणि तेवढ्याच तन्मयतेने श्रोतृवृंदाकडून अस्वाद घेतला जाणारे अध्यात्मप्रधान प्राकृतिक विधिनाट्य अथवा लोकनाट्य होय.

'नाट्याचा उगम विधिनाट्यातून झाला' या मताविषयी विवेचन करताना डॉ. प्रभाकर मांडे लिहितात: ''विधी जेव्हा चारचौघांसमोर किंवा समूहामध्ये करण्यात येऊ लागले तेव्हा त्यांचे स्वरूप नाटकी (Dramatic) झाले. याजकाच्या (विधी पार पाडणाऱ्या) वागण्यात, हालचालींत प्रेक्षकांच्या जाणिवेमुळे स्वाभाविकता कमी होऊन ज्याला नाटकी म्हणता येईल असा भाग येऊ लागला. विविध धर्मांचे दीक्षाविधी, उपनयनाचा विधी, पाचवी बारशाचे विधी असे विधी नाटकी होत. मात्र पंचमी, आखाडी, बोहडा ही सोंगनृत्ये, **जागरण**, गोंधळ, भराड आदी कुळधर्म-कुळाचार ही विधिनाट्ये होत.''[५]

जागरणात घाटी, दिमडी, तुणतुणे, टाळ, खंजिरी, मंजिरी अथवा झांज इत्यादी वाद्यांच्या साहाय्याने चढत्या सुरात गाणी म्हटली जातात, तो एक प्रकारचा गोंधळच असतो. तर, गोंधळात संबळ, तुणतुणे, टाळ व झांज या वाद्यांच्या साथीने गीते व निरूपणातून देवीची रात्रभर सेवा केली जाते, ते ही एक प्रकारचे जागरणच असते. जागरण आणि गोंधळ ही परस्परांची भिन्न अंगे आहेत, हे यावरून सिद्ध होते.

जागरण हा शब्द मूळ 'जागर' या शब्दापासून तयार झाला आहे. 'जागर' या शब्दांमधून अनेक अर्थछटा प्रतिध्वनित होतान दिसतात. 'महाराष्ट्र शब्दकोशा'त जागरणासंबधीचे विवेचन पुढीलप्रमाणे येते :[६]

१. जागेपणा, जागृतावस्था; पोरांचे गडबडीमुळें रात्रीस चारी प्रहर जागर पडला.

२. निद्रा - संयमन, देखरेख, पाहरा.

३. पोवती (पारळी श्रावण शुद्ध पौर्णिमा)

४. देवतेच्या उद्देशाने विवक्षित कालापर्यंत जागण्याचा प्रकार. नवरात्रात देवाजवळ कथा करून मध्यरात्रीपर्यंत प्रतिदिनी जागर करितो !

५. (गो) पुरातन कालचे नाटक.

६. पुनरावृत्ती, उजळणी करणे, नवें, ताजें करणें, वेदघोषाने मंत्र, मंत्रजागर (स.जागृ) घालणे (माण) खंडोबाच्या नांवानें वाघ्या-मुरळ्या आणून त्यांची पूजा करून त्यांना जेवावयाला घालून नाचविणें.

जागरण म्हटले की, वाघ्या-मुरळींच्या नृत्य-गायनाचा कार्यक्रम आपल्या नजरेसमोर चटकन उभा राहतो. ज्यांनी ज्यांनी खंडोबा हे आपले कुलदैवत मानून आपली भक्ती खंडेरायाचरणी अर्पण केली आहे, त्या प्रत्येक माणसांच्या कुटुंबात नवविवाहितांना जोडीने प्रथम जेजुरी अथवा त्यासारख्या प्रख्यात तीर्थक्षेत्री जाऊन खंडेरायाचे दर्शन घ्यावे लागते. तसेच तिथे तळीभंडार, अभिषेक यासारखे उपासना विधी करवून घ्यावे लागतात. मुंजीसारख्या संस्कारानंतर बटूला (लहान मुलाला) खंडोबाच्या दर्शनाला न्यावे लागते. या दोन्ही धार्मिक संस्कारानंतर घरी अथवा संबधित खंडोबाक्षेत्री 'जागरण' घालावे लागते.

याशिवाय विवाहापूर्वी, घराच्या वास्तुशांतीनिमित्त, वाढदिवसानिमित्त आणि हिंदू-धर्मपद्धतीनुसार सालाबादप्रमाणे वर्षातून एकदा धार्मिक विधी म्हणूनही जागरणाचा कार्यक्रम केला जातो.

विवाहापूर्वी 'जागरण' घालण्याची प्रथा प्रामुख्याने खानदेशात आढळते 'आदि हळद देवाला मग नवरदेवाला' अशी रीत या भागात आहे. विवाहापूर्वी नवरदेव स्वगृही किंवा लग्न उचलून दुसऱ्या गावी गेले तर 'जाणवस' घरी जागरणाचा स्वतंत्र विधी करून मगच नवरीसमवेत हळदीला उभा राहतो. जागरणातील पूजेच्या वेळेस तो एकटच असतो. म्हणजेच 'पत्नी' म्हणून त्याच्या कंबरेच्या करगोट्याला साधी सुपारीही बांधलेली नसते.

वर्षातील फक्त 'पितृपंधरवडा' वगळता जागरण केव्हाही घातले जाते. मार्गशीर्ष, पौष, माघ, अश्विन, चैत्र, वैशाख, अधिक, ज्येष्ठ, आषाढ, श्रावण हे महिने खंडोबाच्या कुलधर्म-कुलाचाराच्या दृष्टीने महत्त्वाचे मानले जातात. या काळात अनेक कुंटुंबांत जागरणाचा कुलाचार पार पाडला जातो. जीवनात सुख, समृद्धी, आनंद, सुआरोग्य लाभावे हाच उद्देश या कुलाचारामागे असतो. म्हणून तर जागरण विधीला 'प्रापंचिक यज्ञ' म्हंटले जाते. या यज्ञाच्या रूपाने दिवटी प्रज्वलित करणे म्हणजे दिवटीरूपी होमामध्ये मानवी षड्रिपूचे हवन करणे होय.

घरी घातल्या जाणाऱ्या जागरणाचा कार्यक्रम शक्यतो रात्री ठेवतात. परंतु सध्याच्या काळात ते दिवसाही ठेवले जाते. दिवसाचे जागरण सकाळी नऊ वाजता सुरू होते आणि दुपारी तीन वाजता संपते. नंतर अन्नदान केले जाते. लग्नानिमित्त दिवसा होणारे जागरण असल्यास सूर्य मावळण्यापूर्वी किंवा जागरण रात्रीचे असल्यास दिवस उगवण्यापूर्वी सर्व धार्मिक विधी उरकले जावेत असा संकेत आहे.

यात्रातून चालणाऱ्या जागरणांचा उद्देश जास्तीत जास्त पैशाच्या रूपात 'दान' मिळवणे हाच असतो. कारण, अशा दानावरच वाघ्या मुरळ्यांचा चरितार्थ अवलंबून असतो.

**जागरणाचे स्वरूप**

जागरणाची पूर्वतयारी म्हणून पंधरा दिवस अगोदरच 'ताफेकरी' वाघ्या मुरळींना कार्यक्रमाची 'सुपारी' (ठराविक आगाऊ रक्कम) दिली जाते. उरलेली रक्कम जागरण सुरू होण्यापूर्वी किंवा संपल्यानंतर चुकती केली जाते. कार्यक्रम ठरल्यानंतर शेजारी, गावकरी, स्नेही, सगेसोयरे यांना निमंत्रणपत्रिका छापून वाटल्या जातात. हल्ली दूरध्वनी/भ्रमणध्वनीवरही जागरणाला येण्याचे निमंत्रण दिले जाते. निमंत्रणपत्रिकेमध्ये सुरुवातीला 'जागरण म्हणजे प्रापंचिक यज्ञ' असे ठळक अक्षरात छापले जाते. नंतर जागरणाबद्दलचा स्फुट ललित परिचय, कार्यक्रमाचे स्थळ, दिवस, वेळ, आयोजक व त्याच्या कुटुंबीयांची नावे, जागरण ताफ्यातील वाघ्या-मुरळींची नावे व शेवटी 'जागरणाला येणे म्हणजे ते ऐकायला थांबणे होय !' अशा प्रकारचे वाक्य असे साधारण निमंत्रणपत्रिकेचे स्वरूप असते.

ज्या भक्ताच्या घरी जागरण विधीचा कार्यक्रम असतो, तो दिवसभर आपल्या पत्नीसह खंडोबाच्या नावाने उपवास करतो. रात्री जागरणापूर्वी प्रथम 'पाच पावली' चा विधी केला जातो. तो विधी साधारण असा असतो : ''प्रथम घराच्या देव्हाऱ्यातील देवाचे टाक एका ताम्हणाच्या ताटात घेऊन, सोबत पूजेचे साहित्य घेऊन घरापासून हाकेच्या अंतरावर किंवा गावाबाहेर नजीकच्या अंतरावर वाजत-गाजत जाऊन एखाद्या प्रख्यात खंडोबा क्षेत्राच्या दिशेने नैवेद्य दाखवून दर्शन घेणे या संपूर्ण विधीला 'पाच पावली करणे' असे म्हणतात.'' पाच पावली केल्याने प्रत्यक्ष खंडोबाक्षेत्री जाऊन आल्याचे समाधान व पुण्य मिळते ही या विधीमागची जनश्रद्धा आहे.

पाच पावली करून आल्यानंतर जागरणस्थळी खंडोबाचा झेंडा खाली ठेऊन उत्सवमूर्ती नाचविली जाते. किमान अकरा व्यक्तींनी तरी या विधीत सहभागी व्हावे अशी समजूत आहे. यानंतर कोटंबा पूजन केले जाते. मग 'खंडोबा-म्हाळसा-बाणाई' यांच्यासमोर पाच पाच नैवेद्य ठेवले जातात. याच वेळेस तळी भरणे किंवा उचलणेचा विधी केला जातो. नंतर जागरणाचे यजमान-यजमानीन उपवास सोडतात. त्याचबरोबर जमलेल्या लोकांना अन्नदान केले जाते. अर्थातच हे अन्न बकऱ्याचा किंवा बोकडाचा बळी देऊन बनविलेले असते. नंतर रात्री दहा ते अकराच्या दरम्यान जागरण उभे राहते.

**शंकर आमचा बरवा**
**खंडेराव नवरा मिरवा।।**
**शुद्ध चंदन अंबिर आदरं**
**देवाला उटणं लावा हो।।**
**तोतका तकिया नरम बिछाना**
**लोड लागद्या करवा हो।।**
**बारीक राळ सोलेव तांदूळ**
**देवाला नैवद्य दावा हो।।**
**हिरे कंकणं माणिक मोती**
**यांचा चौक भरवा हो।।**
**येळाग लवंगा चिकण सुपारी**
**पानाचे तबकं भरवा हो।।**
**पाच उस पाच पापडं**
**घटाला माळ घाला हो।।**
**जाईजुई चंपा मोगरा**
**फुलाची शेज करवा हो।।**
**हळद कुंकु पाच सवासणी**
**देवाचा मळवट भरावा हो।।**
**तुकवा म्हणे उरवा पुरवा**
**सिरी एक छतर धरवा हो।।**
**शंकर आमचा बरवा**
**मल्हार नवरा मिरवा।।** [७]

... अशा जोंधळ्याच्या किंवा उसाच्या मखरामध्ये चौरंग किंवा पाट ठेवला जातो. त्यावर पिवळ्या रंगाचे नवे वस्त्र

मांडले जाते. वस्त्राच्या चौघडीवर गहू, तांदूळ, भंडारा अशा वस्तूंचा रांगोळीच्या नक्षीसारखा चौक भरला जातो. त्यावर पाण्याने भरलेला व वर नारळ ठेवलेला कलश ठेवतात. शेजारी नागवेलीच्या पानावर खंडोबा व इतर देवतांचे टाक मांडून त्याच्यापुढे सुपारी (गणपतीचे प्रतीक म्हणून), हळकुंडे, खारीक, बदाम या वस्तू खोबऱ्याच्या वाटीत घालून ठेवतात. तिथेच दिवटी-बुधली ठेवली जाते. अशा पद्धतीने वाघ्या-मुरळी खंडोबाचे जागरण मांडतात. यालाच 'खंडोबाची गादी भरणे' म्हणतात.

यानंतर यजमान कुटुंबाकडून टाकाची पूजा करून दिवटी पेटविली जाते. पूजाविधीनंतर खंडोबाच्या नावाने भंडारा उधळून जागरणाला प्रारंभ केला जातो.

नऊवारी पिवळे पातळ नेसून, कपाळभर भंडारा-कुंकवाचा मळवट भरून पायात घुंगराचा चाळ बांधून, पदराच्या टोकाला बांधलेला घोळ वाजवत मुरळ्या नाचू लागतात, त्या वेळेस वाघेही तेवढ्याच उत्साहाने त्यांना साथ करीत असतात. कोणी खंजिरी, कोणी दिमडी वाजवून, तर कोणी तुणतुण्याच्या तारा छेडीत साथ देतात. एखादा वाघ्या टाळ किंवा मंजिरी वाजवत असतो, तर कोणी तोंडाने हब-हब आवाज काढीत भंडाऱ्याची उधळण करीत असतो. सुरुवातीला घटकाभर संगीताच्या तालावर मुरळ्यांचा नुसताच नाच चालतो आणि रीतिरिवाजानुसार जागरणाच्या पूर्वरंगाला सुरुवात होते. प्रथम गण म्हटला जातो.

**प्रथम घंटा घेतली हाती,**
**नमू गणरायाला, नमू गणरायाला**
**नमितो संग सारजा प्रार्थना करतो**
**पायी पैंजन रे पायी पैजंन घागऱ्या वाजती ।।**
**नमीले देव मल्हार म्हाळसापती।।१।।**
**गणराज आले तेव्हा धावून,**
**युद्ध मांडिले जी, युद्ध मांडिले महादारून,**
**दैत्य कापीले दुष्ट मर्दून।**
**धावा करीते रे**
**धावा करीती विघ्न हरती**
**नमी नमीले देव ।।२।।**[८]

अशा प्रकारे चढ्या आवाजात परंतु तालासुरात वाघ्या-मुरळी गण सादर करतात. जागरणाचा कार्यक्रम निर्विघ्नपणे पार पडावा, या उद्‌द्शाने हे गणाद्वारे गणपतीला केलेले आवाहन असते. गण संपताच वाघ्या-मुरळी इतर क्षेत्रीच्या खंडेरायाबरोबर इतर देव-देवतांना जागरणाला येण्यासाठी गीतातून 'आवतण' देतात:

**देवा जागरण मांडीले मल्हारी जागरणाला यावे**
**पाल पेंबरचे मल्हारी जागरणाला यावे**
**नळदुर्गाचे मल्हारी जागरणाला यावे**
**कडेपठारचे मल्हारी जागरणाला यावे**
**गड जेजुरीचे मल्हारी जागरणाला यावे**
**सकळीक देवानो जागरणाला यावे**
**आपल्या भक्तांना वारंवार तारावे** [९]

अशा प्रकारे गोंधळातील आवतणाप्रमाणे सर्व देवदेवतांना जागरणाला येण्यासाठी आवाहन केले जाते. याला 'देव आळवणी' म्हणतात. उपासना विधिनाट्य म्हणून सादर होणारे जागरण नंतर कलेच्या पातळीवर पोहचते आणि सवांदात्मक विनोदाला सुरुवात होते. दोन वाघ्यांमध्ये विनोदी संवाद रंगतो. हे विनोद ग्रामीण ढंगातील असतात. यातील बरेचशे विनोद समाजातील दांभिकपणावर कोरडे ओढणारे असल्याने ते लोकांच्या मनाची पकड लवकर घेतात.

**''हे काय मांडले ?''**
**''हे जागरण मांडले. ''**
**''अस असे जागरण कुठे कुठे झाले ?''**
**''प्रेमपुरी, पालपेंबरी, कऱ्हेपठारी ज्या ठिकाणी देवाचे भक्त निर्माण झाले त्या ठिकाणी जागरण झाले.''**

**''अरे भक्ता देवापाशी काय मागणे मागितले ?''**
**''धन दे ! कण दे ! अन् वाटिक से अंबिल दे ! (वाटीभर दारू दे !) हे मागणे मागितले ''**[१०]
किंवा
**''ह्या ठिकाणी काय मांडलय दादा ?''**
**''ह्या ठिकाणी खंडोबाचं जागरण मांडलय दादा. ''**
**''दिवट्या म्हणजे कोण दादा ?''**
**''दिवट्या म्हणजे महाबळी, जाता-येता शेंबूड तळी !''**[११]
(हा दिवट्या जागरणस्थळी रात्रभर बुधलीने दिवटीला तेल घालीत बसलेला असतो.)

अशा छापाचा पहिला विनोद संपल्यानंतर खंडोबाच्या लीला वर्णन करणाऱ्या लोकगीतांना सुरुवात होते. जागरणाच्या प्रत्येक कार्यक्रमात हमखास गायले जाणारे खंडोबाभक्तांच्या आवडीचे पुढील गाणे म्हटले जाते. अर्थात गाण्यांचा क्रम पुढे-मागेही होतो.

**जेजुरीच्या खंडेराया, जागरणाला या या**
**वाईच्या तू गणराया, जागरणाला या या**
**पसरणीच्या बहीरीदेवा जागरणाला या या**
**पुनं धरती पलिकडे**
**गड जेजुरी आलीकडे**
**रूप दाऊनी बानू गेली**
**स्वारी देवाची येडी झाली**
**अवो बानूबाईचे येड लागले**
**मल्हारी देव मल्हारी**
**आहो विसरून गेले कोण्या झाडाला**
**भंडारी देव भंडारी**
**आवो येळकोट येळकोट बोलती**
**नित काय भंडारा उधळती**
**नवलाख पायरी गडाला हो**
**चिरा जोडीला खडकला**
**आवो बोला हो तुम्ही बोला म्हाळसा नारीला**
**भंडारा वाहू देवाला हो मल्हारी रायाला**[१२]

याशिवाय, जागरणात पुढीलप्रमाणे आणखी एक गीत शक्यतो गायले जातेच !

**खंडेरायाला आहेत पाच बायका**
**पाची बायकांची नावं सांगतो तुम्ही ऐका**
**म्हाळसा वाण्याची आहे ती थोर पतिव्रता**
**बाणू ती धनगराची आहे ती धनिमाता**
**फुलाबाई माळ्याची आहे नंबर तिसरा**
**जेजुरीच्या देवाची वाट धरा।।**
**चवथीचं नाव आहे रंभाई शिंपीण**
**पाचवीचं नाव आहे चंदाबाई बागवाणीन।**
**पाचीजणीची नावं ऐकली तुम्ही कानानं**
**कशा निर्माण झाल्या सांगतो खूण**
**श्री शंकराची ही समदी कला**
**जेजुरीच्या देवाची वाट धरा** [१३]

अर्थात्, खंडोबाला म्हाळसा आणि बाणू या दोनच बायका असल्याचे जनमानसात रुजल्यामुळे वाघ्या-मुरळ्यांच्या कल्पनेतून निर्माण झालेल्या आणखी तीन बायका खंडोबाभक्तांच्या बुद्धीस पटणे कठीण आहे.

जागरणामध्ये वाघ्या-मुरळ्यांकडून गायल्या जाणाऱ्या लोकगींतामधून जसे उत्कट भक्तिरसाचे दर्शन घडते तसे श्रृंगाररसाचेही घडते. किंबहुना, भक्तिगीतांपेक्षा शाहिरी वाङ्मयातील लावणी थाटाच्या श्रृंगारप्रधान लोकगीतांचाच त्यामध्ये अधिक भरणा आढळतो. नमुनादाखल हे गीत :

**बाणूनं करूनिया ग थाट**
**शिरी ग दुधाने भरू माठ जी**
**जात होती बाजाराच्या वाटं**
**पडली देवाची गाठ जी।।**
**पदर धरला बळकट**
**बाणू म्हणे 'सोड माझी वाट जी '**
**धनगर आहेत आरबट**
**'तुशी ते करतील खटपट जी'**
**बाणू झिडकारी महाराज**
**बाणू, झिडकारी मल्हारी**
**'सोड पदर जाऊ दे घरी जी '**[१४]

या गीतातील प्रसंग पाहून तमाशातील गणानंतर सुरू होणाऱ्या गौळणींमध्ये मथुरेच्या बाजाराला दूध, दही, लोणी विकायला जाणाऱ्या गौळणींना, त्यातही विशेष करून राधेला वाट अडवून छेडणाऱ्या श्रीकृष्णाची येथे आठवण होते.

जर वाघ्या-मुरळ्यांचा ताफा नाशिक जिल्ह्यातील असेल तर चंदनपुरीच्या खंडोबाशी संबंधीत गीत हमखास गायले जाते. खंडोबाने 'खंड गावडा' या वृध्द धनगराचे रूप घेऊन बाणूच्या घरी बारा वर्ष चाकरी केली. व शेवटी आपल्या बहुरूपीपणाची प्रचिती बाणूसह अवघ्या चंदनपुरीला दिली. या प्रसंगाचे नाट्य विनोदी ढंगाने सादर होणाऱ्या पुढील गींतातून उभे राहते.

**धावां धावां बाणाई आता। पहाता पहाता, कसी गत झाली ग मलुदेवा।।**
**याला म्हणतात खंडगावडा। झाला कसा देव वेडा, बाणू नेली ग मलुदेवा।।**
**डोक्यानी झाला खवडा । पायी फेगडा, कंबर वाकली ग मलुदेवा ।।**
**दातांचा झाला खुळ खुळा । पाहे टुळटुळा**
**बोबडी बोली ग । मलुदेवा ।।**
**तोंडातून गळती लाळ । बेंबी उखळ**
**देवळीच झाली । मलुदेवा ।।**
**पोटाळो झाला ढेबरा। वाजे नगारा**
**ढमढम खाली। मलुदेवा।।**
**याचे डोळे चिपचिप करी। नाक पिर वाही,**
**थुंकून घान केली। मलुदेवा।।**
**दोन पाय होते चालायला। तिसरी कर्माला**
**काठी आली। मलुदेवा**
**खांद्यावरती घेतली घोंगडी। घालून पगडी**
**कानडी बोली। मलुदेवा** [१५]

तमाशातील नाची आणि मुरळी यांच्या नृत्य आणि अभिनय शैलीमध्ये बरेच साम्य आढळते. तमाशातील नाची जशी गोल गिरक्या घेणे, पायातील जोडवी चाळवणे, हातांच्या बोटांची चाळवाचाळव करणे, पुरुषाकडे कामुक अथवा आवाहक नजरेने पाहणे अशा प्रकारे चाळे करीत असते, अगदी तशीच हुबेहूब नक्कल मुरळी करते. तरीही, सर्वच मुरळ्या असा अभिनय करतात असे नाही. जुन्या जमान्यातील काही मुरळ्यांचा नाचताना डोक्यावरील पदर आजदेखील हलत नाही. अर्थात, 'जागरणा' ची मूळ संकल्पना ज्यावेळेस निर्माण झाली त्यावेळेस मुरळीचे स्वरूप उदात्त, पवित्र व आध्यात्मिक स्वरूपाचे असावे असे वाटते. मात्र, नंतरच्या काळात या लोककलेमध्ये हळूहळू बदल होत गेले असावेत. पेशवेकाळ हा सर्वच लोककलांच्या दृष्टीने अत्यंत बहारीचा काळ असल्यामुळे व त्याकाळचे

तमाशाचे समाजातील प्रस्थ पाहता नकळत तमाशाचा जागरणावर प्रभाव पडला असावा. ज्याप्रमाणे तमाशात गण, गौळण, रंगबाजी (चित्रपटातील अथवा इतर गीतांचे सादरीकरण) आणि वग हे कलाप्रकार टप्प्याटप्प्याने सादर केले जातात, त्याचप्रमाणे जागरणात गण, आवतण, लोकगीतांचे सादरीकरण, कथा संपादनी क्रमाकमाने सादर केली जाते. म्हणजेच तमाशा आणि जागरण यांच्या सादरीकरणाचा आकृतिबंध थोड्याफार फरकाने सारखाच असतो.

जागरणात सादर होणाऱ्या गीतांच्या निर्माणकर्त्यांची नावे त्याच गीतांच्या समाप्तीमुंद्रातून गोवलेली आढळतात. बापू वाघ्या, शंकर वाघ्या, धोंडू ग्यानू, बाबाजी गोकुळ, विठू वाघ्या, हैबती, मुकुंद गुरूचा चेला, मल्ल वाघ्या, बाळकृष्ण हैबती, गंगाराम वाघ्या, सुरदास, महीपतखान, शंकर धामणीकर, वडूजबुवा नागपूरकर, सहादू लाला पवार, शिवाजी वाघ्या इत्यादी वाघ्यांच्या नावावर ही पदे आढळतात.

... तर विषय जागरणातील सादरीकरणाचा चालला आहे ! जनसमुदयाच्या थेट काळजाला जाऊन भिडणाऱ्या, एकामागून एक सादर होणाऱ्या अशा गीतांमुळे वातावरणात चांगलाच रंग भरला जातो. समोर बसलेले श्रोते तेवढ्याच रसिकतेने कलावंतांना साथ देत राहतात. काही हौशी रसिक आवडीच्या गाण्यासाठी पैसे देतात. वाघे पैसे गोळा करून मोठ्या आवाजात सांगतात, 'या पैशाचं म्हणणं आहे... हे गाणं झालं पाहिजे'. आणि मग खंडोबाच्या लीला वर्णन करणारीच परंतु रसिकांच्या पसंतीची गाणी गायली जातात. त्यावेळी मुरळ्याही देहभान विसरून नृत्य-गायन करीत असतात. अधून-मधून विनोदी निवेदन आणि खंडोबाच्या लीलावर्णन करणाऱ्या लोकगीतांचे गद्य निरूपण असे करता करता मध्यरात्र उलटते. मग चहापानासाठी थोडा विसावा घेतला जातो. इथेच जागरणाचा 'पूर्वरंग' संपतो.

नंतर उत्तररंगाला सुरुवात होऊन खंडोबादेवाचे एखादे अख्यान मांडले जाते. ऋषींचे आश्रमपिडन, शंकराचा मार्तंडभैरव अवतार, मार्तंडभैरवाचे मणी-मल्लाशी युद्ध, देवाची दोन लग्ने, म्हाळसा बाणाईमधला सवतीकलह इत्यादी विषयांचा वाघ्या-मुरळी आपल्या आख्यानामध्ये परामर्श घेतात. खंडोबाच्या जीवनावरील कथांव्यतिरिक्त श्रीयाळ, चांगुणा, दशरथ राजा, श्रावण बाळ, द्रौपदी वस्त्रहरण, राजा हरिश्चंद्र, तारामती, रेणुका, प्रतिव्रता आख्यान, वेताळ-विक्रम अशा कथांचेही सादरीकरण जागरणातून केले जाते. या कथा रामायण, महाभारत, देवीमाहाम्य यांसारख्या अनेक पुराणग्रंथांतून घेतलेल्या असतात. त्यातील सवांद वाघ्याने गुंफलेले असतात. त्या सवांदात्मक कथा अतिशय कलात्मक आणि रंजक रीतीने सादर केल्या जातात.

'' कथा ऐका राजा इक्रमाची
आन् त्याच्या उजनी नगरीची
त्याच्या पराक्रमाची आन् त्याच्या प्रेमाची

अशा प्रकारे वगातील शिलकारीच्या लावणीप्रमाणे जागरणातील कथेची, लावणीने सुरुवात केली जाते आणि गद्य-पद्य स्वरूपात पुढील कथाभाग सादर केला जातो. मुख्य कथेबरोबरच अनेक उपकथा सांगून कथासूत्र विकसित केले जाते. तमाशात आढळणाऱ्या वगाप्रमाणे गंभीर वगाचे प्रबोधन करण्याचे तत्त्व प्रतिपादन करण्याचे वैशिष्ट्य या जागरणाच्या कथेत आढळते. तसेच मधूनमधून हास्यकारक प्रसंगांची मांडणी करून विनोदनिर्मिती केलेली दिसते. त्यातून प्रेक्षकांच्या मनावर आलेला ताण हलका होतो. तसेच तमाशातील विमुक्त स्वरूपाच्या वगात विक्षिप्त वाटावा असा विनोद निर्माण करून प्रेक्षकांच्या मनावरील धाक (ताण) नाहीसा केला जातो. उदा. मल्हारी म्हाळसाच्या कथेत दगड धोंड्यांच्या लाट्या (लाह्या) होणे, करंगळीतील अमृत मुखात घालताच जिवंत होणे, धुराच्या लाटेने वस्तीचा शोध लागणे, खंडोबा दहा मणाचे अन्न खातो अशा विक्षिप्त व अतिशयोक्त स्वरूपाच्या घटना कथेमध्ये असतात. त्यामुळे कथेला विमुक्त स्वरूप प्राप्त होते. तसेच तमाशातील वगामध्ये आढळणारी सारी वैशिष्ट्ये जागरणाच्या कथारचनेत आणि कथेच्या सादरीकरणात आपणास आढळतात.[१६]

कथेच्या सादरीकरणानंतर खंडोबाचा लग्नसोहळा विधिपूर्वक पार पाडला जातो. प्रथम यजमाननीच्या (मालकीण) हाताने खंडोबा-म्हाळसा-बाणाई मूर्तींचा मळवट भरला जातो. तसेच उपस्थित स्त्री-पुरुषांचाही मळवट भरला जातो (कपाळाला भंडारा लावला जातो). नंतर जागरणाच्या मंडपात 'जाते' ठेऊन मालकिणीसह इतर सवाष्णी त्यावर हळद दळण्याचा विधी करतात. त्यावेळी जमलेले इतर स्त्री-पुरुष हळद दळणाऱ्या सवाष्णींच्या हातावर चिमूटचिमूट हळद टाकतात याला 'घास टाकणे' असे म्हणतात. नंतर देवाला हळद लावली जाते. जमलेले स्त्री-पुरुषही आपसांत हळद खेळतात. त्यामुळे तेथील माणसे आणि भोवतालचा परिसर पिवळाधम्मक होतो. त्यानंतर अक्षता, फुले वाटली जातात आणि खंडोबाचे लग्न लावले जाते. (खंडोबाच्या लग्न साहेळ्याची ही परंपरा

प्रामुख्याने अहमदनगर जिल्हा आणि नजीकच्या परिसरामध्ये पाहावयास मिळते. अन्य ठिकाणी जागरणाच्या पारंपरिक सादरीकरणात शक्यतो 'आख्यान' संपल्यानंतर लंगर तोडून जागरणाची समाप्ती करण्याची पद्धत आहे.) यानंतर 'लंगर' म्हणजे लोखंडी साखळी तोडण्याचा विधी केला जातो. २१ कड्यांच्या या साखळीतील एक कडी वाघ्याकडून तोडणे या विधीलाच 'लंगर तोडणे'असे म्हणतात. तोपर्यंत पहाटेचे तांबडे फुटलेले असते. मग 'येळकोट येळकोट जयमल्हार', 'सदानंदाचा यळकोट यळकोट' असा जयघोष करून देवाच्या नावाने चारी बाजूला भंडारा-खोबरे उधळले जाते. जागरणाला उपस्थित असलेले भक्त मखरात पाटावर मांडलेल्या खंडोबाच्या टाकाचे दर्शन घेऊन वाघ्या-मुरळ्यांकडून कपाळावर भंडारा लावून घेतात आणि त्यांच्या चरणकमलांचे दर्शन घेतात.

... म्हणूनच खंडोबाचे उपासक आणि सांस्कृतिक लोककलेचे मानबिंदू म्हणून जागरणाच्या माध्यमातून वाघ्या-मुरळीने जनसामान्यांत आदराचे स्थान निर्माण केले आहे.

खेडेगावातून चालणाऱ्या जागरणाचे स्वरूप आजही याच प्रकारचे आहे. मात्र, वेळेच्या कमरतेमुळे बहुतांशी शहरी भक्त जागरणाचा कुलाचार जेजुरीसारख्या एखाद्या प्रख्यात खंडोबा क्षेत्री एक ते दीड तासातच उरकून घेतात.

पूर्वीच्या काळात जागरणाचा कार्यक्रम म्हणजे लोकांच्या दृष्टीने आनंददायी पर्वणीच असे. शेजारच्या गावात गाजलेला वाघ्या-मुरळीचा ताफा असेल तर बैलगाड्या जुंपून लोक हौसेने कार्यक्रम पाहण्यास येत. त्याकाळी विजेची सोय नसल्यामुळे रॉकेलचा टेंभा पेटवून त्याच्या उजेडात जागरण सादर होई.

## जागरणातील नृत्य-संगीत

लोककलांचे अभ्यासक कै. अशोकजी परांजपे यांनी 'सकाळ स्वरविहार' मध्ये जागरणातील वादन, गायन व मुरळीच्या नृत्याबद्दल अभ्यासपूर्ण विवेचन केले आहे. परांजपे लिहितात :

'' वाघ्या मुरळी जागरण हे खंडोबा या लोकदैवताचे उपासना विधिनाट्य आणि त्यातले आपसूक गोवले गेलेले संगीत हे लोकदैवतांचे संगीत. यात गायन, वादन आणि नर्तन यांचा एक सुंदर मिलाफ आढळतो. तुणतुणे सुरासाठी, मुरळीच्या हातात अतिशय मधुर आवाजाची 'घाटी' असते. घंटा नव्हे. मुरळीच्या पायात चांदीचे पैंजण असायचे. घुंगरू नव्हेत. तिच्या डोक्यावरचा पदर हलत नाही. एका हाताने पदर आणि घाटी एकत्र धरलेली. एका विशिष्ट लयीत गिरकी घेत हे मुरळी नृत्य चालत राहते. यात 'ढाई' ची म्हणजे विलंबित आणि 'घाई' ची म्हणजे 'द्रुत' अशा लयी असतात. दिमडीवर याला योग्य असा 'ताल' वा 'चाल' धरली जाते. तिला मंजिरीची साथ असते. यात मोठ्या व्यासाची दिमडी ढाल्या सुराची, तर छोट्या व्यासाची ती घोरपडीच्या कातड्यापासून बनविलेली खंजिरी खडे, कडक बोल काढते. साधारणत: तबल्याचे काम हे वाद्य करते. कधी कासवाच्या कातड्याची दिमडी पाहायला मिळते, तर बकऱ्याच्या वा शेळीच्या चामड्याने मढवलेली दिमडी दाया, चे म्हणजे डग्गा वा पखवाजाच्या धुमपुडीचे कार्य करते. पण दोन्हीचा मिलाफ अप्रतिम होतो. तुणतुणे असमंत भारून टाकते आणि त्यात मुरळी आणि साथी गायकाचा स्वर चारचांद लावतो. गुबकी चाल, दुडकी चाल, उघडे वा बंद बोल या दिमडीवर-चर्मवाद्यावर काढले जातात. कसबी वादक, दिमडीच्या आतल्या अंगाने बोटांचा स्पर्श करून वादनात गमत आणतात. आजसुद्धा जागरणातील प्रसिद्ध गाणे टीव्हीवरसुद्धा गाजते आहे.

**'मल्हारीऽऽ वारीऽऽ मोत्यांन द्यावी भरून**
**नाहीतर देवाऽ जातो मी जातो दुरूनऽ '**

यातले उंचावरून मथळ्याला ध्रुवपदाला सुरुवात करून ठाय लयीमधून मुरळीच्या नाचाबरोबर द्रुत लयीत अंतऱ्यात उतरणे हे मोठे रंजक ठरते. मुरळीचे नृत्य अत्यंत भारदस्त, मोजक्या हालचालीचे होते. त्यात उजव्या हाताने ती 'हंसास्य' आणि 'पताका' या मुद्रा करीत असते. कधी कधी वाघ्या आणि मुरळी समोरासमोर येऊन 'उलट पलट' लयीत करतात. पाच वेळा असे करताना 'समे' वर येणे आणि कमरेखालचा भाग वळवून दुसऱ्या पायावर गिरकी घेणे याला 'भ्रमरी' असे म्हटले जाते, पण वाघ्या-मुरळी अशा 'संज्ञा' वापरताना दिसत नाहीत. काही जुने वाघे अप्रतिम शृंगारिक नृत्य, अभिनय करताना मी पाहिले आहेत... शास्त्रीय नृत्यातील हंसास्य, भ्रमरी, पताका हे या जागरणात कसे आले हे अभ्यासणे नृत्यविशारद मंडळींना एक आव्हानच आहे. तर जागरणात गणापासून घट उतरणीपर्यंत बहुधा सारी पदे वरून खाली अशा पद्धतीने म्हटली जातात, त्याला दोन लयीतल्या नृत्याची साथ असते. काही वाघे अप्रतिम साफ गळ्याने गाताना कौशल्याची कमाल करतात.[१७]

## जागरणातील नृत्याचे प्रकार आणि हस्तमुद्रा

लोककलांचे अभ्यासक प्रा. डॉ. प्रकाश खांडगे यांनी त्यांच्या 'खंडोबाचे जागरण' या ग्रंथात मुरळीच्या नृत्यप्रकारांबद्दल आणि हस्तमुद्राबंद्दल पुढीलप्रमाणे माहिती दिली आहे :

**संवादी नृत्य :**

संवादी नृत्य म्हणजे उपास्य देवतेच्या लीलासंकीर्तन रूपाने व संकीर्तनातील काही संकेतांचे सूचन नृत्याद्वारे करून ते भाव भक्तांपर्यंत पोचविणे म्हणजे संकीर्तनाचा भाव भक्तांपर्यंत पोचविण्यासाठी नृत्य हे संवादी माध्यम म्हणून येते. नृत्याचे स्वतंत्र अस्तित्व न जाणवता गायन, वादन, अभिनयासोबत नृत्य, संकीर्तनाच्या मूलस्रोतात एकजीव झालेले असते.

**अंगभूत नृत्य :**

आधुनिक प्रसार, प्रचार आणि रंजन माध्यमाचा फारसा प्रभाव न पडलेल्या किंवा आपण उपासक आहोत, कलावंत नव्हे अशी मूळ भूमिका कायम ठेवणाऱ्या वाघ्या-मुरळी संचांकडून जे नृत्य सादर होते ते अंगभूत नृत्य असे आपण म्हणू शकतो.

**परिष्कृत नृत्य :**

परिष्कृत म्हणजे नागर संस्कृतीशी संपर्क आलेल्या व उपासकाबरोबरच लोककलावंत म्हणून स्वतंत्र जाणीव निर्माण झालेल्या वाघ्या-मुरळ्यांनी सादर केलेले नृत्य... नागर संस्कृती व नागर कलावंतांच्या संपर्क आलेल्या व उपासकासोबत कलावंत अशी वेगळी जाणीव निर्माण झालेल्या वाघ्या-मुरळ्यांचे नृत्यातील परिष्करण परंपरेला बाधा आणणारे नसते. कारण संकीर्तनयुक्त नृत्याचा मूळचा गुणधर्म या वाघ्या-मुरळ्यांनी सोडलेला नसतो.

***

...मुरळीच्या हस्तमुद्रा या पताक, हंसास्य आदी कथ्थकच्या हस्तमुद्रांशी मिळत्या-जुळत्या वाटतात... शास्त्रीय परिभाषेतील पताक, हंसास्य मुद्रांचे विवेचन असे.

**पताकमुद्रा :**

भरताने हस्तमुद्रांचे एकंदर २४ प्रकार असल्याचा उल्लेख ' नाट्यशास्त्रा'त केला आहे. त्यापैकी पहिली हस्तमुद्रा म्हणजे पताक. ही असयुंक्त हस्तमुद्रा आहे. असयुंक्त हस्तमुद्रा म्हणजे एकाच हाताने बनविली जाणारी मुद्रा... पताक हस्तमुद्रेचे मुरळीच्या हस्तमुद्रेशी जरी साम्य असले तरी शास्त्रीय नृत्यात पताक हस्तमुद्रा ही काही क्षण स्थिर असते. पण मुरळीच्या नृत्यात पताकसदृश हस्ताची डावा - उजवा, डावा - उजवा अशी सतत हालचाल होत असते.

**हंसास्य मुद्रा :**

शास्त्रीय नृत्यातील हंसास्य मुद्रा ही मुरळीच्या नृत्यातील एका मुद्रेशी साम्य दाखविणारी आहे.
... या दोन्ही मुद्रा मंगलसूचक मुद्रा असून उपदेशाशी संबंधित क्रियेत त्या वापरल्या जातात.

**शिखर मुद्रा :**

मुरळी हातात घाटी पकडते त्यावेळी तिची हस्तमुद्रा ही शिखर मुद्रेशी साम्य दाखविणारी असते. ही हस्तमुद्रा करताना मुरळीचा हात मागे-पुढे, मागे-पुढे असा सतत हलत असतो. घाटीतून नादनिर्मिती करण्यासाठी मुरळी घाटी पकडलेल्या हाताची सतत हालचाल करत असते. शिखरसदृश हस्तमुद्रा सुरू असतानाच डाव्या हाताची पताक

आणि हंसास्य सदृश मुद्रा मुरळीकरवी सुरू असतात... मुरळीच्या डाव्या हाताच्या हंसास्य, पताकसदृश हस्तमुद्रा या स्थिर नसतात, तर चल असतात. मुरळीच्या डाव्या हाताच्या खांद्यापासून बोटापर्यंत नृत्य करतानाचे हस्तचलाचे वर्णन करायचे झाल्यास हत्तीने सोंडेत उस धरल्यास त्याच्या सोंडेचा आकार जसा होईल तशा आकाराची हस्तमुद्रा त्यावेळी दिसते.

***

याशिवाय, डॉ. खांडगे यांनी मुरळी - नृत्यातील 'कटिविलास' व 'पदन्यास' या घटकांविषयी नोंदविलेली निरीक्षणे अशी -

**कटिविलास :**

मुरळीच्या नृत्यात कटीच्या विभ्रमांचेही विशिष्ट स्थान आहे. मुरळी गिरकी घेताना तिच्या कमरेला उजव्या बाजूला किंचित बाक येतो व उजव्या पायावर जोर देत ती गिरकी घेते. याचे कारण तिच्या उजव्या हातात घाटी असते. घाटीच्या नादाला उजवा पाय आपटून गिरकी घेतल्याने मुरळीला अधिक गती देता येणे शक्य होते. ही गती देण्यासाठी कमरेला उजव्या बाजूने दिलेला झोकही उपयोगी पडतो. संथ लयीतील गीतात मुरळी कंबर डाव्या-उजव्या बाजूला संथपणे हलवीत असते व द्रुत लयीत कंबर हलविण्याची गती वाढते. संथ व द्रुत लयीचा हा गतिविन्यास सुरू असताना त्यानुसार मुरळी कंबर हलवत बसते, पण कंबर हलविण्याचा अतिरेक नसल्याने मुरळीचा कटिविलास हा अति शृंगारिक व उद्दीपित वाटत नाही, तर तो संयत आणि संकीर्तनानुसारी वाटतो.

**पदन्यास :**

...मुरळी एका पायाने गिरकी अथवा दोन्ही पायांची गिरकी घेते तशीच अर्धगिरकीही घेते. वाघ्याही मुरळीसोबत गिरकी घेतो. मुरळीची गिरकी ही आविष्काराच्या दृष्टीने खुली गिरकी नसते. नऊवारी साडी चापून चोपून नेसलेली मुरळी गिरकी घेते तेव्हा तिच्या गिरकीमागे गिरकीचे अवकाश तयार करण्याची तिची भूमिका नसते. संकीर्तनमग्न नर्तनातील ती एक स्वाभाविक, क्रिया असते, जी क्रिया संकीर्तनाला एक स्वाभाविक गती देते. परंतु वाघ्याने घेतलेली गिरकी मात्र गिरकीचे एक अवकाश तयार करते, कारण तुलनेने ही गिरकी अधिक उर्जेची आणि अधिक खुली असते.[१८]

## गोंधळ-विधिनाट्याचे स्वरूप

महाराष्ट्राच्या लोकसंस्कृतीमध्ये आणि भारतीय लोककलाविश्वात जागरण-गोंधळ परंपरेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. जागरण-गोंधळ हे मराठी लोकसंस्कृतीचे दोन केंद्रीय मानबिंदू आहेत. श्रद्धेय मराठी माणसांच्या कुळधर्म-कुळाचाराचे एक अविभाज्य सांस्कृतिक संपन्नतेने नटलेले अविभाज्य अंग म्हणजे गोंधळ. लग्न, मुंजीसारख्या धार्मिक संस्कारानंतर आणि इतर मंगल कार्यानंतर असंख्य मराठी माणसांच्या घराघरामध्ये जागरणाप्रमाणेच गोंधळ घालण्याची समृद्ध परंपरा पिढ्यान् पिढ्या चालत आली आहे.

जागरण ही खंडोबाची स्वतंत्र ओळख आहे. खंडोबा आणि त्याच्या दोन बायका म्हाळसा व बाणाई यांच्या व्यतिरिक्त इतर देवदेवतांचे जागरण घातले जात नाही. खंडोबाचा गोंधळ घातला जात नसला तरी त्याच शिवावतार भैरवश्रेणीतील इतर देवांचे गोंधळ घातले जातात. उदा. ज्योतिबा, श्रीनाथ म्हस्कोबा, काळभैरव इत्यादी. यासह इतर शिवावतार भैरवमूर्तींचा आणि मार्तंडभैरव मूर्तींचा मूर्तिविज्ञानिक दृष्टिकोनातून तुलनात्मक अभ्यास केल्यास यांच्यामध्ये बरीच साम्यस्थळे आढळतात. मग मार्तंडभैरवाचे जागरण आणि इतर भैरवांचा गोंधळ असे का? हा मला पडलेला प्रश्न आहे. परंतु, चरित्रकथांच्या भिन्नतेमुळे हा फरक असावा असे वाटते.

गोंधळाची उपास्य कुलदेवता आदिशक्ती होय. तीच सर्वश्रेष्ठ देवता आदिमाया किंवा जगदंबा होय. भारतीय

संस्कृतीमध्ये आदिशक्तीची विविध रूपे आढळतात. खंडेरायाची प्रथम पत्नी म्हाळसा व द्वितीय पत्नी बाणाई ही सुद्धा आदिशक्तीचीच रूपे आहेत. यांचेही गोंधळ घातले जातात ते फक्त नवरात्रकाळात खंडोबास्थानी किंवा खंडोबाभक्तांच्या घरी. म्हाळसा आणि बाणाई यांचे सान्निध्य खंडोबाशेजारीच कायमस्वरूपी असल्याने अर्थातच गोंधळविधीत म्हाळसा-बाणाईबरोबर खंडोबालाही सामील करून घेतले जाते.

आदिशक्तीने म्हणजेच देवीने नऊ दिवस दैत्यांबरोबर युद्ध करून त्याचे निर्दालन केले, त्याच्या स्मृती जागविणारे व शक्तीची उपासना करणारे हे व्रत आहे. आश्विन महिन्यात येणारे हे नवरात्र 'शारदीय नवरात्र' म्हणून ओळखले जाते. असुरी शक्तीविरुद्ध दैवी शक्तीने ज्या काळात युद्ध केले त्याचे प्रतीक म्हणून दरवर्षी नवरात्र साजरे केले जाते. देवीच्या नवरात्राप्रमाणेच रामकृष्ण, पांडुरंग, दत्त, **खंडोबा** इत्यादी देवतांची नवरात्रेही साजरी करण्याची प्रथा भारताच्या काही भागांत पाहावयास मिळते. अपवाद फक्त खंडोबाचे नवरात्र आश्विन महिन्यात नाही, तर मार्गशीर्ष महिन्यात व तेही सहा दिवसांचे 'षड्रात्रौत्सव' म्हणून साजरे केले जाते. या काळात खंडोबाबरोबर म्हाळसा-बाणाईचेही जागरण घातले जाते. गोंधळ घातला जात नाही. शारदीय नवरात्रामध्ये गोंधळ आणि चंपाषष्ठी नवरात्रामध्ये जागरण घातल्या जाणाऱ्या अखिल देवता मंडळामध्ये एकमेव दोनच देवता आहेत, त्या म्हणजे म्हाळसा आणि बाणाई हे विशेष. म्हाळसा ही स्वतंत्र देवता म्हणूनही प्रसिद्ध पावली आहे. त्यामुळे तिला गोंधळाची स्वतंत्र उपास्य कुलदेवता म्हणूनही ओळखले जाते.

गोंधळ विधीचे स्वरूप साधारण पुढीलप्रमाणे असते. गोंधळाच्या जागेवर चौरंग किंवा पाट ठेवला जातो. गोंधळ्याकडून त्यावर 'चोखळण' अंथरूण गव्हा-तांदळाचा चौक भरला जातो. चौकाच्या चार कोपऱ्यावर चार व मध्ये एक याप्रमाणे खोबऱ्याच्या वाट्या, त्याच्या शेजारी सुपाऱ्या, खारका, लेकुरवाळी हळकुंडे, केळी इत्यादी वस्तू मांडल्या जातात. चौकाच्या मधोमध 'घट' स्थापना केली जाते. त्यामध्ये श्रीफळ ठेवून ते विड्याच्या किंवा आंब्याच्या पानांनी सुशोभित केले जाते. चौरंगापुढे पाच पात्या ठेवून प्रत्येकावर थोडा भात घालून वर कणकीचा दिवा ठेवला जातो. चौरंगाच्या भोवती शाळूच्या किंवा उसाच्या तीन (याला 'तिकाटणे' म्हणतात) किंवा पाच ताटांचे मखर उभे केले जाते. त्याला 'कडकण्या' टांगल्या जातात. मध्ये घटमाळ बांधून ती घट किंवा कलशावरील श्रीफळावर सोडली जाते. डोक्यावर कंगणीदार पिळाची पगडी, अंगात मलमलीचा अंगरखा (पूर्वी गोंधळी अंगात तेलकट वस्त्रे परिधान करीत. सध्या ही प्रथा क्वचितच पाहावयास मिळते), गळ्यात कवड्यांच्या माळा, कपाळी भंडारा-कुंकवाचा मळवट अशा वेशातले तीन-चार गोंधळी गोंधळासाठी सज्ज होतात. एकाच्या हातात संबळ, एकाच्या हातात तुणतुणे, एकाच्या हातात टाळ तर एखादा खास गायकाला साथ देण्यासाठी तिथे हजर असतो. घरातील नवदांपत्य किंवा प्रौढ दांपत्याकडून देवीची पूजा केली जाते. पूजेनंतर त्यांच्याकडून पोत आणि दिवटी पेटवली जाते. तुणतुण्याच्या ठेक्याबरोबर संबळ जोरात वाजविला जातो. मुख्य गोंधळी म्हणजे नाईक मध्ये उभा राहून गण गाऊ लागतो आणि लौकिकार्थाने गोंधळाला सुरुवात होते.

**मोऱ्या गणपती रे गणराजा**
**तेत्तीस कोटी देवदेवता**
**सर्वांआधी गणनायका**
**दैत्य मारूनी केलिस दशा**
**लावली पळवूनी धाही दिशा**
**चेडा झुटिंग वेताळ म्हैशा**
**दुष्टाला देशी तू सजा**
**किती विनवू तुला महाराजा ॥१॥** [१९]

संबळीच्या ठेक्यावर तोडा देत गण चांगलाच रंगतो. मग जगदंबेचे पूजन केले जाते आणि सर्व देवदेवतांना गोंधळासाठी 'आवतण' दिले जाते. तेव्हा खंडेरायालाही 'आवतण' देण्यास गोंधळी विसरत नाही. अनेक ठिकाणच्या खंडोबाक्षेत्रांचा [२०] त्यात आवर्जून उल्लेख केला जातो.

बोला एकदा सदानंदीचा उदे उदे
भैरवनाथाचा चांगभले
**शिव-मल्हारीचा येळकोट**
बोल माहुरगड रेणुकामाता की जय

श्री तुळजामाता भवानी की जय
आंबे लाला लो माय लागला लो
सदानंदे तुझा लाला लो
वाणीया लो माय ब्राह्मण्या लो
तेलीया लो माय तांबुळ्या लो
आकाश लो माय पाताळी लो
स्वर्ग लो माय मृत्यु लो
माहुरगड रेणुके गं गोंधळा यावे
तुळजापूर भवानी गं गोंधळा यावे
**पालपिंबर खंडोबा गोंधळा यावे**
**पालीच्या खंडोबा गोंधळा यावे**
**शेगुडसातार खंडोबा गोंधळा यावे**
**नळदुर्ग खंडोबा गोंधळा यावे**
**जेजुरी खंडोबा गोंधळा यावे**
**कडेपठार खंडोबा गोंधळा यावे**
**बानू-म्हाळसा गं गोंधळा यावे**
**हेगडे प्रधाना हो गोंधळा यावे**
**बाळ्याचे खंडोबा गोंधळा यावे**
**मंगसूळी खंडोबा गोंधळा यावे**
**येळपणे खंडोबा गोंधळा यावे**
**देलवडी खंडोबा गोंधळा यावे**
**देव दहीफळ खंडोबा गोंधळा यावे**
**चाकणच्या खंडोबा गोंधळा यावे**
**माळेगाव खंडोबा गोंधळा यावे**
**नेतवड खंडोबा गोंधळा यावे**
**निमगाव-दावडी खंडोबा गोंधळा यावे**
**लोणी-धामणीच्या खंडोबा हो गोंधळा यावे**
**आकुर्डी खंडोबा हो गोंधळा यावे**

याप्रमाणे शेकडो ग्रामदैवते, आराध्य दैवते, कुलदेवता/कुलदैवते, संत, साधू-महंतांना गोंधळाला येण्याचे आवाहन केले जाते. दैवतांची यादी फारच लांबते. गोंधळी एवढ्यावरच थांबत नाही तर जळी, स्थळी, अंतराळी नांदणाऱ्या देवतांनाही आवाहन करतो आणि राहिल्या-साहिल्या सर्वांना गोंधळ ऐकण्यास बोलावतो.

''साती समिंदरा गोंधळा यावे।
नवलाख तारांगणा गोंधळा यावे।
धरतरी माते गोंधळा यावे।
आकाशी पिता गोंधळा यावे।
भक्तांच्या गणा गोंधळा यावे।
राहिले-साहिले गोंधळा यावे।

'आवतण' ऐकून आत खरोखरच सर्व देव-देवता गोंधळ ऐकायला आवर्जून जमले आहेत या कल्पनेने गोंधळीही भारावून जातो आणि गोंधळाच्या निरुपणाला सुरुवात करतो :

गणाचार्य, मानाचार्य, सभाचार्य
चारवाणी, चारखाणी
मग नमावी शांभवाणी

असा हा जगदंबा देवीचा
गोंधळ मांडिला...

मग 'नाईक' आणि सोंगाड्या यांच्यामध्ये विनोदी संवाद रंगतो.

गोंधळी बाबा ... गोंधळ किती प्रकारचे असतात?

गोंधळ गोंधळ
घरात गोंधळ
दारात गोंधळ
गावात गोंधळ
सावळा गोंधळ
गडबड गोंधळ
थोरांचा गोंधळ
पोरांचा गोंधळ
गोंधळात गोंधळ ...

अवो हा तर गोंधळ रोजचाच हाये.

ह्या गोंधळात माणसं अडकत्यात. आमचा गोंधळ ऐकल्यावर माणसं गोंधळातून बाहिर येत्यात, मुक्त होत्यात.''[२१]

अशा प्रकारे दोघातील वेगवेगळे विनोदी संवाद उत्तरोत्तर वाढत जातात. त्यामुळे श्रोत्यांची चांगलीच करमणूक होते. देवीची निवेदनात्मक स्तुतीपर गीते आणि मध्ये चटपटीत विनोदाची फोडणी असे करत गोंधळाचा पूर्वरंग संपतो. चहापानाच्या छोट्याशा मध्यंतरानंतर उत्तररंगाला सुरुवात होते. उत्तररंगात पौराणिक व्यक्ती, घटनाप्रसंग यावर आधारित एखादे लोककथात्मक संगीत आख्यान रंगवून सांगितले जाते. यालाच 'संपादणी' म्हणतात. संपादणी आणि विनोदी बतावणी यांचा एकाच वेळी मेळ घालून कथानक खुलवले जाते. शेवटी देवीची आरती होते. गोंधळाच्या सुरुवातीला पेटवलेला पोत आणि दिवटी विझवली जाते व गोंधळाचा समारोप केला जातो.

देवीच्या गोंधळाप्रमाणेच इतर दैवतांच्या गोंधळाचे स्वरूप असते. फरक एवढाच की, देवतेच्या नावाने गोंधळ घातला जातो, त्या प्रत्येक देवतेचे चरित्र वेगळे असते. पूर्वीच्या काळी रात्री न्याहारीनंतर सुरू होणारा गोंधळ सकाळी तांबडे फुटेपर्यंत चालत असे. शेजारील खेड्यापाड्यातून लोक बैलगाडी जुंपून आवर्जून गोंधळ ऐकण्यास येत असत. सध्याच्या धावपळीच्या युगात 'गोंधळ' यजमानाच्या आणि गोंधळ्याच्याही उपलब्ध वेळेचा विचार करता तो तसा दीड-दोन तासांतच उरकला जातो. 'महाराष्ट्राचे आध्यात्मप्रधान प्राकृतिक लोकनाट्य' म्हणून ओळखली जाणारी व एके काळी आपल्या सादरीकरणातील परिणामकारक अदाकारीमुळे अवघ्या मराठी माणसावर गारुड केलेली ही धार्मिक लोकसंस्था अलीकडे काहीशी क्षीण झाली आहे.

## गोंधळ परंपरा

रेणुकामाहात्म्यात गोंधळाच्या उगमाबद्दल अशी कथा दिली आहे : परशुरामाने 'बेटासुर' नावाच्या दैत्याचा वध करून त्याचे शिर धडावेगळे केले. त्या शिराच्या ब्रह्मरंध्रात त्याच्याच शिरांचे तंतू ओवून ते खांद्यावर घेतले आणि 'तिंतृण-तिंतृण' असा ध्वनी काढत होत मातेजवळ (रेणुकेजवळ) आला. बेटासुराच्या धडाचे आणि शिराचे बनविलेले चौंडके वाजवून परशुरामाने जे हे पहिले मातृवंदन केले, त्यातूनच गोंधळाची प्रथा उगम पावली. [२२]

काही यादवकालीन प्राचीन ग्रंथांमध्ये गोंधळाचा संबंध 'भूतमाता' या देवतेशी असावा असे सांगितले आहे. वरंगळच्या गणपती काकतीयाचा गजसेना प्रमुख जायन याने इ. स. १२४० मध्ये आपल्या 'नृत्यरत्नावली' ग्रंथामध्ये सांगितले आहे की, कल्याणीचा चालुक्य राजा सोमेश्वर (तिसरा) याने आपल्या राजधानीत भूतमाता महोत्सवाच्या प्रसंगी गोंधळाचा कार्यक्रम केला होता.

## गोंधळ शब्दाची व्युत्पत्ती

गण आणि दल = गोंधळ. गणदल- गंदल-गोंदळ-गोंधळ. अशा प्रकारे 'गोंधळ' शब्द रूढ झाला असे

मत वि. कृ. जोशी यांनी 'लोकनाट्याची परंपरा' या ग्रंथात व्यक्त केले आहे.

## गोंधळी

मनोरंजनातून समाजप्रबोधन करणाऱ्या गोंधळ्यांना महाराष्ट्र लोकधर्माचे भाट व पुरोहित म्हटले जाते. गोंधळ्यांचे 'रेणुका राई' आणि 'कदमराई' असे दोन प्रकार आहेत. रेणुकेच्या उपासकांना 'रेणुराई' तर तुळजाभवानीच्या उपासकांना 'कदमराई' म्हणतात. याशिवाय महाराष्ट्रात मराठे, कुंभार, ब्राह्मण व अकरमासे अशा गोंधळ्यांच्या पोटजाती आहेत.

नामदेव, एकनाथ, तुकारामादी संतांनीही स्वत:ला प्रतीकात्मक गोंधळी समजून विठोबालाच 'जगदंबा' म्हटले आहे आणि रूपकात्मक भारुडातून शुद्ध तत्त्वांचा आध्यात्मिक गोंधळ उभा केला आहे. भारुडसम्राट म्हणून ख्यातकीर्त पावलेले नाथमहाराज एके ठिकाणी वर्णन करतात :

अनादि सिद्ध पंढरपूर। नांदे विठाई सुंदर
कर ठेवूनी कटावर । उभी राहासी निरंतर वो ॥१॥
गोंधळा येवो जगदंबे । विठाबाई तू मूळस्तंभे ।
शुक सनकादिक गोंधळी । दिवटा भावे पोत पाजळी ।
मध्ये पुंडलिक दिवटा बळी ॥२॥
ऐसा गोंधळ घाला निका । डाक वाजली तिही लोका ।
शरण जनार्दनी एका गोंधळ गाता उदो उदो देखा ॥३॥ [२३]

उत्तर पेशवाईत गाजलेला मूळ जेजुरीजवळील कोथळे गावचा रामा गोंधळी गोंधळ्यांच्या कार्याचा एक ऐतिहासिक पुरावा आहे. पेशवाई नष्ट झाल्यानंतर रामा गोंधळी बडोद्यास गायकवाडांच्या आश्रयास गेला. त्याच्याप्रमाणेच माधव गोंधळी, तुकाराम गोंधळी, आळेकर गोंधळी हे तमासगीर गोंधळी गायकवाडांच्या आश्रयास राहिल्याचे पुरावे आढळतात.

## गोंधळ-जागरणातील महत्त्वाची वाद्ये

गोंधळ-जागरण या विधीनाटयात प्रामुख्याने पुढील वाद्यांचा उपयोग केला जातो.

**दिमडी :**

दिमडी हे तालवाद्या कंपित पटल वाद्य होय... दिमडीच्या पुडीचा व्यास पंधरा से.मी. तर उंची तीन इंच इतकी असते. दिमडीचे पूड हे बकरीच्या किंवा घोरपडीच्या कातड्यापासून बनविले जाते. पूड ज्याच्यावर बसवतात ते लाकडी कडे आतल्या बाजूस निमुळते होत जाणारे असते. हे लाकूड बाभूळ, कडुलिंब, सिसम, साग, अशा झांडाचे असते. डिंकासारखा चिकट पदार्थ गोल लाकडावर लावून त्यावर बकरीचे किंवा घोरपडीचे चामडे ताणून बसविले जाते. पारंपरिक दिमडीला स्क्रू बसविले जात नसत. अलीकडे दिमडीला सहा ठिकाणी स्क्रू लावतात. त्यामुळे स्क्रू पिळून दिमडी सुरात आणता येते. दिमडी पूर्वी दिवटीवर हलकेच तापवून ती सुरात लावली जात असे. दिमडीच्या सुरांची तारता वाढली, म्हणजेच तिचा टणत्कार वाढला तर पाण्याचे बोल लावून तिचे सूर खाली आणले जातात. दिमडीच्या गोलाकार लाकडाला छिद्रे पाडून त्यास चकत्या बसविल्या तर त्या दिमडीला खंजिरी म्हटले जाते.

**तुणतुणे :**

पोवाडा, कलगी-तुरा, गोंधळ, भराड, तमाशा आदी लोककलाप्रकारांमध्ये तुणतुणे हे तंतुवाद्य वापरले जाते. हातात धरण्याइतकी जाड असलेली दोन-अडीच फूट लांबीची बांबूची काठी हातात घेऊन त्याच्या तळाशी

एक पोकळ लाकडी नळकांडे बसविले असते. याचा तळ बकऱ्याच्या कातड्याने मढवून काढतात. कातड्याच्या मध्यापासून ते बांबूच्या काठीच्या वरच्या टोकापर्यंत तार खेचून बसवितात आणि बांबूत खोचलेल्या छोट्याशा खुंटीस ही बांधतात. डाव्या हातात धरून उजव्या हातातील एका लाकडी तुकड्याने हे वाद्य वाजवितात. तुणतुण्यातून 'तृणतृण' असा ध्वनी निघतो, म्हणून तुणतुणे असे म्हणतात.

**घाटी :**

घाटी हे मुरळीच्या हातातले वाद्य... नादनिर्मितीसाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या घाटीला दोन घंटा असतात तिची उंची दोन इंच आणि लांबी दीड इंच असते. एकून वजण १०० ते २०० ग्रॅम असते. दोन्ही मिळून एक घाटी तयार होते. दोन घंटांना जोडण्यासाठी सात इंच लांबीची तार वापरतात. तिला हळदीच्या रंगाचे कापड गुंडाळलेले असते. या तारेनेच घाटी उजव्या हातात पकडली जाते.

**संबळ :**

गोंधळ विधिनाट्याच्या सादरीकरणात संबळ या वाद्याचा प्रामुख्याने वापर केला जातो. संबळ हे तबल्याप्रमाणे दोन वाद्यांची जोडी असून ती दोन्ही वाद्ये एकत्र जोडलेली असतात. संबळाची रचना ही वैशिष्ट्यपूर्ण असते हे दोन्ही भाग लाकूड कोरून पोकळ केलेले असतात. डाव्या हाताने वाजविण्याचा भाग कधीकधी तांब्याचा किंवा पितळेचाही केलेला असतो. त्याचा एक भाग लहान आणि एक भाग मोठा असतो. त्याला जोडसमेळ असेही म्हणतात. जोडसमेळातील दोन्हीही खोडे लाकडी आणि आस एक वीत असतो. समेळात नर आणि मादी अशा दोन निराळ्या खोडांपैकी नर समेळ डग्ग्याचे बोल आणि मादी समेळ तबल्याचे बोल पुरविते. दोन्ही समेळांचा आकार पंचपात्राप्रमाणे असतो. लहान वाद्याच्या तोंडाचा घेर मोठ्या वाद्याच्या घेरापेक्षा निम्मा असतो. दोहोंतही बकऱ्याच्या कातड्याची पुडी असते आणि ती सुताच्या दोरीने आवळलेली असते. संबळ तरवडाच्या किंवा वेताच्या बारीक काडीने वाजवतात. धुम्या असलेल्या भागावर छत्रीच्या दांड्याप्रमाणे आकडा केलेल्या छडीने नाद घुमविला जातो. तर तबल्याचा भाग सरळ छडीने वाजवितात. या छड्यांची लांबी एक ते सव्वा फूट असते. छड्या हातातून निसटू नये म्हणून त्यांच्या दुसऱ्या भागाला कापड गुंडाळलेले असते. नर समेळावर डग्ग्यासारखी शाई असते. या वाद्यातील खर्च स्वर निघणाऱ्या भागाला बंब किंवा धम असे म्हणतात आणि दुसऱ्याला झील म्हणतात.[२४]

**टाळ व झांज :**

जागरण-गोंधळामध्ये ताल धरण्यासाठी वाजविण्यात येणारे एक महत्त्वपूर्ण वाद्य म्हणजे टाळ किंवा झांज अथवा मंजिरी होय. कीर्तन, गोंधळ, जागरण, भारुड या कलाप्रकारात झांज किंवा टाळ वाजविले जातात. टाळ हे पुराणकाळापासून एक प्रमुख तालवाद्य म्हणून भारतीय संगीत परंपरेत प्रसिद्ध झाले आहे.[२५]

## लोकसंस्कृतीच्या इतर उपासकांचा खंडोबाशी 'शाब्दिक' संबंध

वासुदेव, भुत्या, भराडी, पांगूळ हे खंडोबाचे उपासक नसले तरी त्यांच्या भक्तिगीतांमधून खंडोबानामाचा उल्लेख येतो. म्हणून त्यांचा हा थोडक्यात परिचय.

**वासुदेव :**

सुरवार, अंगात घोळदार अंगरखा, गळ्यातून पुढे दोन्हीकडे सोडलेला तांबडा शेला, डोक्यावर मोरपिसांची शंकूच्या आकाराची टोपी, काखेत झोळी, पायात घुंगराचे चाळ आणि कमरेला बांधलेल्या शेल्यात खोचलेली बासरी अशा वेशातला वासुदेव पहाटेच्या रामप्रहरी जेव्हा :

गोविंदा रामा हो, गोपाळा रामा जी जी
केशवा रामा हो, माधवा रामा जी जी

असे म्हणत गावात भिक्षा मागतो आणि भिक्षा मिळाल्यानंतर याचे श्रेय तो असंख्य देव-देवतांना देतो. तेव्हा अर्थातच त्यात **'जेजुरीचा खंडोबा'** देवही असतो.[२६] 'दान पावलं' हे गीत नाचत-नाचत म्हणताना स्वत:बरोबरच हे दान किंवा भिक्षा पुढील देवतांनाही मिळाल्याचे तो आनंदाने सांगतो.

दान पावलं दान पावलं

पंढरपुरात इट्टोबारायाला
कोंढणपुरात तुक्काबाईला
**जेजुरीमंदी खंडोबादेवाला**
सासवडामंदी सोपानदेवाला
आळंदीमंदी ग्यानुबादेवाला
देहूमंदी तुकारामबाबाला
शिंगनांपूरच्या महादेवाला
अमळनेरच्या सखारामबाबाला
देऊळगावच्या बालाजीदेवाला
मुंगीपैठणात नाथमहाराजाला
कोपरगावात कच्चेऽस्वराला
पुण्यामंदी पारऽवतीला
भांबुर्ड्यामंदी रोकडोबाला

ही देवदेवतांची यादी लांबलचक असते. त्यात महाराष्ट्रातल्या प्रमुख देवदेवता आणि संतांची नावे गुंफली जातात; परंतु वासुदेवाचे दर्शन हल्ली दुर्मिळ झाले आहे.

**पांगूळ :**

पांगूळ हा अरुणाचा प्रतिनिधी आहे. सूर्याचा सारथी हा पांगळा असल्यामुळे 'पांगूळ' अरुणोदयापूर्वी भिक्षा मागत धर्म जागविण्याचे सत्कार्य करीत असतो.

लंगोटी नेसून, घोंगडी पांघरून, डोक्यावर गोधडीची शंक्वाकृती टोपी घालून काखेला झोळी अडकवून आणि हाती घुंगराची काठी घेऊन अरुणोदयाच्या आगमनाची सुवार्ता सांगत तो लोकांना जागवतो आणि लोकांच्या सत्प्रवृत्तीनांही आवाहन करून 'पाऊड' म्हणजे दान मागतो.

अरे ! कोणी आपल्या वडिलांच्या नावानं
रामप्रहरामध्ये धर्म करा
कोणी आपल्या देवधर्माच्या नावानं वस्त्रदान करा !
कोणी पुण्य जोडण्यासाठी पांगुळाला पै-पैसा दान करा !

अशा प्रकारे भिक्षा मिळण्यासाठी याचना करताना जर कोणी जुने-पुराणे वस्त्र अथवा पैसे दिले, तर तो चक्रासारखा फिरून उड्या मारतो आणि गाऊ लागतो.

पाऊड पावलं ! पाऊड पावलं !
जोगाईच्या अंबाबाईला पाऊड पावलं !
**जेजुरीच्या खंडोबाला पाऊड पावलं !**
पंढरीच्या विठोबाला पाऊड पावलं !

असे म्हणून 'पाऊड' सर्व देवतांना मिळाल्याचे संकेत देत असताना ते **जेजुरीच्या खंडोबालाही मिळाल्याचे पांगूळ न विसरता सांगतो** [२७] **हे विशेष.**

**भुत्या :**

भुत्या हा देवीचा उपासक. माहूरची रेणुका, तुळजापूरची तुळजाभवानी, कोल्हापूरची अंबाबाई, सौदंतीची यल्लम्मा या त्याच्या उपास्य कुलदेवता.

पायात पादत्राणे नाहीत, विजार नेसलेली, अंगात डौर (झगा) चढविलेला, डोक्याला शंकूच्या आकाराची कवड्या गुंफलेली टोपी, गळ्यात आणि कंबरेलाही कवड्यांचा पट्टा, डाव्या खांद्यावरून लोंबणारी बुधली, उजव्या काखेत झोळी, समोर गळ्यात लोंबणारी हळदी-कुंकवाची पिशवी, त्या पिशवीवरही कवड्यांची गुंफण, छातीवर लोंबत असलेला देवीचा पितळी टाक, एका हाती चिंध्यांचा मोठा पोत आणि दुसऱ्या हाती तुणतुणे असा भुत्याचा वेश असतो. **आठवड्यातील सातही वारांचे उपासनावैशिष्ट्य गीतातून सांगताना हा भुत्या ऐतवार (रविवार) चा मान खंडोबाचाच असल्याचे ठामपणे सांगतो.** [२८]

वारा ग मंदी वार - वार मंगळवार केला

आंबे, उंबरवटा सारविला ।
वारा ग मंदी वार - वार बुधवार केला
आंबे, कृष्णराजा जन्मला ।
वारा ग मंदी वार - वार बिस्तरवार केला
आंबे, अगरबत्ती दत्तात्रीला ।
वारा ग मंदी वार - सुक्किरवार केला
आंबे, सेंदूर लक्ष्मीला ।
वारा ग मंदी वार - वार शनिवार केला
आंबे, कापूर मारुतीला ।
**वारा ग मंदी वार - वार आईतवार केला**
**आंबे, भंडार मल्हारीला ।**
वारा ग मंदी वार - वार सोमवार केला
आंबे, दवना संभूजीला ।

अशाच प्रकारचे दुसरे गीत आहे. प्रत्येक वारी अंबा कुठे कुठे संचार करते याचे लीलावर्णन असलेल्या या गीतात **'खंडोबा आणि रविवार'**चाही प्रामुख्याने उल्लेख करण्यात आला आहे.[२१]

हिरव्या साडीला पिवळी किनार गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं
दर महिन्याच्या मंगळवारी अंबा निघाली तुळजापुरी
गळा घालूनी कवड्याची माळ गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥१॥
दर महिन्याच्या बुधवारी अंबा निघाली पंढरपुरी
गळा घालूनी तुळशीची माळ गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥२॥
दर महिन्याच्या गुरुवारी अंबा निघाली गाणगापुरी
गळा घालूनी रुद्राक्षाची माळ गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥३॥
दर महिन्याच्या शुक्रवारी अंबा निघाली कोल्हापुरी
गळा घालूनी फुलांचा हार गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥४॥
दर महिन्याच्या शनिवारी अंबा निघाली शिंगणापुरी
गळा घालूनी रुइची माळ गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥५॥
**दर महिन्याच्या आइतवारी अंबा निघाली गड जेजुरी**
**भंडार खोबऱ्याचा होतो भडिमार गं**
**माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥६॥**
दर महिन्याच्या सोमवारी अंबा निघाली कैलासपुरी
गळा घालूनी बेलाचा हार गं
माझ्या अंबेचा मंगळवार गं ॥७॥

**भराडी :**

डोक्याला रुमाल, अंगात सदरा, त्यावर जाकीट, धोतर नेसलेले, काखेत झोळी, कपाळावर विभूती, कानात मुद्रा आणि गळ्यात चांदीची श्रृंगी, डाव्या हाती डमरू धरून उजव्या हाताने तो वाजवीत भैरवाची नि शंकराची गाणी म्हणणाऱ्या भराड्यांना 'डवरे गोसावी' असेही म्हणतात. हे श्रीनाथ भैरवाचे उपासक असतात.

लग्नासारख्या कार्याच्या अगोदर सोनाराकडून देव उजळून आणल्यानंतर आणि कार्य उरकल्यानंतर भैरव

भक्तांमध्ये 'भराड' करविण्याची प्रथा आहे. तसेच नवरात्रामध्ये भैरवनाथाच्या मंदिरात रोज नऊ दिवस भराड होते. जागरण-गोंधळामध्ये ज्याप्रमाणे प्रथम गण, त्यानंतर देवदेवतांना आवाहन, पुढे उपास्य देवतेची स्तुतिपर गीते, नंतर कथा निरूपण आणि शेवटी आरती असते, तसाच क्रम भराडातही आढळतो. भराडी तुकाराम महाराजांच्या नावावरील गण प्रथम म्हणतो. नंतर गोंधळाप्रमाणेच नाना देवतांना भराडाला उपस्थित राहण्याचे आवाहन करतो. **त्या देवतांमध्ये अर्थात्‌च जेजुरीचा 'खंडोबा' असतो.**[३०]

रांजणगावी गणपती रे - रंगणा यावें
तुझा चौक भरविला रे - रंगणा यावें
चिंचवडी मोरयारे - रंगणा यावें
तुझा चौक भरविला रे - रंगणा यावें
देहूच्या तुकोबा - रंगणा यावें
आळंदीच्या ज्ञानोबा - रंगणा यावें
पंढरीच्या विठोबा - रंगणा यावें
**जेजुरीच्या खंडोबा - रंगणा यावें**

अशा प्रकारे महाराष्ट्रातील प्रमुख देवदेवता आणि संतांची नावे घेतली जातात.

लोककथा, लोकगीते, प्रथा, परंपरा, वेशभूषा, मुरळीसंबंधित तत्कालीन कायदा, प्रबोधन, ऐतिहासिक माहिती, जागरण-गोंधळ विधिनाट्य इत्यादी घटकांच्या माध्यमातून वाघ्या-मुरळीचा खंडोबा उपासनासंदर्भातील प्रवास उलगडत गेला हे अभ्यासले. तसेच वासुदेव-पांगूळ-भुत्या-भराडी या लोकसंस्कृतीच्या अन्य उपासकांनी गायलेल्या व गात असलेल्या बहुतांशी देव-देवतांचा समावेश असलेल्या अनेक लोकगीतांमधून 'खंडोबा' नावाची व त्याच्या 'रविवार' ची कशी गुंफण होत गेली, हे ही पाहिले.

## मुरळी संदर्भातील सामाजिक मत-मतांतरे

'मुलींना देवदासी सोडण्याच्या प्रथेवर आणि मंदिरांतून चालणाऱ्या त्यांच्या नाचगाण्यांवर सरकारनं कायद्यानं बंदी घालावी' अशी मागणी 'पेरियर' रामस्वामी नायकर यांनी १८९२ साली मद्रासचे गव्हर्नर व भारताचे व्हाईसरॉय यांच्याकडे केली होती. तशाच आशयाचा अर्ज समाजसुधारक डॉ. रामकृष्ण भांडारकर यांनी १९०५ साली इंग्रज सरकारकडे केलेला होता. त्याबद्दल मनुवादी प्रवृत्तीच्या काही ब्राह्मण मंडळींनी डॉ. भांडारकर यांच्यावर टीका करणारा व देवदासी, मुरळी प्रथेचा आणि वेश्या व्यवसायाचा पुरस्कार करणारा लेख वाई येथून प्रकाशित होणाऱ्या १९०६ च्या 'धर्म' या मासिकात प्रसिद्ध केला. त्यात म्हटलं आहे, ''देवाच्या नावावर देवदासी व मुरळ्या सोडल्या जाणाऱ्या मुली वेश्याव्यवसायासारख्या व्यभिचारी धंद्याकडे वळतात किंवा त्यांना त्या धंद्यात लोटले जाते, हे डॉ. भांडारकरांचे म्हणणे नाकबूल करता येणार नाही. परंतु समाजात नीतिमत्ता अबाधित राहण्यासाठी आणि प्रतिष्ठित घराण्यातील स्त्रियांच्या शीलाचे संरक्षण होण्यासाठी देवदासी व मुरळ्या सोडण्याची प्रथा आणि वेश्याव्यवसाय आवश्यक आहे. पुरुषांची लैंगिक भावना भागविण्याचे वेश्या एक साधन आहे. तो व्यवसाय जगातील प्रत्येक देशात आहे. मग हिंदुस्थान हाच देश त्यासाठी अपवाद का असावा? आपल्या देशात घरंदाज स्त्रियांच्या शीलरक्षणासाठी समाजात वेश्यांची गरज आहे.''

उच्चवर्णीय घरंदाज स्त्रियांच्या शीलाच्या ठेकेदारांचे आणि वेश्या व्यवसायाचा पुरस्कार करणाऱ्या मनुवाद्यांचे वरील विचार व म्हणणं सर्वसामान्यांना बरोबर वाटणं स्वाभाविक आहे. कारण त्यांनी त्या प्रश्नाची दुसरी बाजू विचारात घेतलेली नसते. प्रत्येक स्त्रीला शील असतं, मग ती कोणत्याही जाती-धर्माची असो ! उच्चवर्णीय स्त्रियांना तेवढं शील असतं आणि दलित समाजाच्या स्त्रियांना शील नसतं असं नीतिशास्त्र किंवा हिंदू धर्माचं तत्त्वज्ञान आहे काय? बरं, उच्चवर्णीय स्त्रियांच्या शीलरक्षणाची जबाबदारी दलित स्त्रियांवरच का? त्याकरिता दलितांनीच आपल्या मुली देवदासी व मुरळ्या का सोडाव्यात? उच्चवर्णीयांनी आपल्या मुलींना देवदासी व मुरळ्या का सोडू नये? उच्चवर्णीय स्त्रियांनी वेश्याव्यवसाय का करू नये? असा कोणी सवाल केला तर तो वावगा ठरू नये.

दलित समाज हिंदू धर्मातील देवदासी व मुरळ्या सोडण्याच्या परंपरागत अनिष्ट प्रथेत जखडून गेलेला होता. त्या रूढीमुळं दलितांची इज्जत आणि स्वाभिमान नष्ट झाला होता. तेव्हा दलित समाजाला त्या रूढीतून व मानसिक गुलामगिरीतून मुक्त करण्यासाठी महार समाजातील समाजसुधारक गोपाळबाबा वलंगकर आणि शिवराम जानबा

कांबळे यांनी प्रयत्न केले.

लोकजागृती व समाजप्रबोधन व्हावं म्हणून शिवराम जानबा कांबळे यांनी आपल्या 'सोमवंशीयमित्र' या वर्तमानपत्रात देवदासी व मुरळ्या प्रथेसंबंधी एक परखड लेख लिहिला. त्या लेखावर श्रीमती शिवूबाई जाधव या मुरळीनं आपली प्रतिक्रिया व्यक्त केली. तिनं शिवराम जानबा कांबळे यांना एक पत्र लिहिलं. ते पत्र श्री. शिवराम कांबळे यांनी १ डिसेंबर १९०८ च्या 'सोमवंशीमित्रच्या' अंकात प्रसिद्ध केलं.

श्रीमती शिवूबाई जाधव त्या पत्रात म्हणते, ''सोमवंशी जातीमध्ये मुरळ्या व देवदासी सोडण्याची जी घातक चाल पडली आहे त्यामुळे आई-वडील आपल्या पोटच्या मुलींना खंडोबास मुरळी आणि यल्लुबाईस देवदासी म्हणून अर्पण करतात. रूढी-परंपरेमुळे देवाला व देवीला मुरळ्या आणि देवदासी सोडण्याची अथवा होण्याची ही शिक्षा आई-वडीलच मुलींना देतात. यात मुलींची काय चूक? त्याबद्दल आई-वडीलच दोषी आहेत. पण त्यांना तरी दोष कसा द्यायचा? कारण ते धर्मातील रूढीपरंपरेचे पालन करतात. खरं तर याला आपला धर्मच जबाबदार आहे...

''मुरळ्या व देवदासी मुसलमान अगर ख्रिश्चन धर्मात गेल्या, तर त्यांना त्या धर्मात सामावून घेतले जाते. त्यांना व त्यांच्या मुलांना त्या धर्मात चांगली वागणूक मिळते. पण आपल्या हिंदू धर्मात त्यांना सामावून घेतले जात नाही किंवा त्यांना चांगली वागणूक मिळत नाही. इतकेच नव्हे तर, त्यांच्या मुला-मुलींना महार समाजातील कोणीही आपल्या मुली देत नाही व आमच्या मुली आपल्या मुलांना करीत नाहीत. तेव्हा मुरळ्या व देवदासींवर टीका करून हा प्रश्न सुटणार नाही, त्यासाठी वाट चुकलेल्या आणि दुष्ट रूढीच्या फेऱ्यात सापडलेल्या आम्हा मुरळ्या आणि देवदासींना त्यातून सोडवून चांगल्या मार्गाला लावा आणि ती प्रथा मोडा.''

त्या शिवूबाई जाधव सोनकांबळेच्या पत्रावर अनेकांनी आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या. त्यांपैकी श्रीपती रामजी थोरात म्हणतात, ''हिंदू धर्मात देवाधर्माच्या नावावर मुरळ्या व देवदासी सोडण्याची जी अनिष्ट रूढी महार, मांग या जातीत आहे, ती बंद झाली पाहिजे. खंडोबा व यल्लम्माच्या कृपाप्रसादाने मुले होतात, ही लोकांची वेडी समजूत आहे. मुलगी झाली तर ती त्या देवाचीच असते. तर मग तिचेही लग्न खंडोबा व यल्लम्माशीच कसे काय लावले जाते?'' असा परखड सवाल श्रीपती थोरातांनी समाजाला केला आहे.

त्यानंतर शिवराम जानबा कांबळेनी 'सोमवंशीमित्रा'च्या दि. १ मार्च १९०९ च्या अंकात एक विनंती पत्र प्रसिद्ध करून समाजाला जाहीररीत्या आवाहन केले. ते पत्र असे होते :

''मुरळ्या व देवदासी संबंधाने आमच्या वर्तमानपत्रांतून जी चर्चा झालेली आहे ती फक्त कागदावरच राहू नये, म्हणून आमच्या ज्ञातींनी आपल्या मुली मुरळ्या व देवदासी सोडण्याबाबत सारासार विचार करावा. त्यांनी मुलींना मुरळ्या व देवदासी सोडू नये. यापूर्वी ज्या सोडल्या गेल्या आहेत, त्यांच्या बरोबर लग्न करण्याची ज्या पुरुषांची तयारी आहे; त्यांना ज्ञातिपंचायतीकडून परवानगी असावी. या दोन गोष्टी मान्य असणाऱ्यांनी फॉर्म भरून त्यावर सही करावी आणि तो फॉर्म आमच्याकडे पाठवावा.''

आपले ज्ञातिबांधव
शिवराम जानबा कांबळे
श्रीपती रामजी थोरात
जोरदास रामजी भालेराव

१९०८ साली शिवराम जानबा कांबळे, श्रीपती थोरात, जोरदास भालेराव, नान्याबा सोमवंशी इ. कार्यकर्त्यांनी जेजुरी येथे सोमवंशी महार परिषद घेतली. त्या परिषदेत मुरळ्या व देवदासी समस्येवर विचार करण्यात आला आणि 'ज्ञातिबांधवांनी आपल्या मुली मुरळ्या व देवदासी सोडू नये' असा ठराव पास करण्यात आला. त्यानंतर कार्यकर्त्यांनी गावोगावी फिरून जनजागृती केली, समाजप्रबोधन व प्रचार केला आणि मुलींना मुरळ्या व देवदासी न सोडण्याबद्दल ज्ञातिपंचायतीकडून ठराव पास करून घेतले. शिवराम जानबा कांबळे आणि त्यांच्या सहकारी मित्रांनी चालविलेल्या चळवळीचा व प्रचाराचा दलित समाजावर चांगलाच परिणाम झाला. शिवराम कांबळेच्या प्रयत्नाला यश येऊन १९०९ साली पुणे-खडकी येथे गणपत हणमंत गायकवाड आणि मुरळी शिवूबाई जाधव यांचा विवाह झाला. तो या देशातील पहिलाच असा विवाह होय.

१९२० साली छत्रपती शाहू महाराजांच्या प्रयत्नाने कोल्हापूर संस्थानातील माणगाव येथे अस्पृश्यांची परिषद झाली. त्या परिषदेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मुरळी व देवदासी प्रथेबद्दलही आपले विचार मांडले. त्या भाषणाचा

परिणाम होऊन एस. एन. माने, देऊ इंगळे, बी. एच. वराळे, पी. आर. घटकांबळे, मारुती रावण, रत्नापा सूर्यवंशी, आप्पाणा माळगे इत्यादी कार्यकर्त्यांनी बेळगाव जिल्ह्यात मुरळी व देवदासी प्रथेविरुद्ध चळवळ केली. त्यांनी १९२२ साली ''जोगता जलसा'' काढून दलित समाजात जागृती केली. 'आपल्या दलित समाजानं मुलींना मुरळ्या व देवदासी सोडू नये, ती अनिष्ट प्रथा बंद करावी, आपल्या मुला-मुलींना शिक्षण द्यावे, मृत मांस खाऊ नये, स्वच्छ राहावं, गावात भीक मागू नये' असा प्रचार केला.

आपल्या ज्ञातीतील मुलींना मुरळ्या, देवदासी व वेश्या होण्याच्या मार्गापासून परावृत्त करणं, त्यांना चांगल्या मार्गाला लावणं, गावगुंडांपासून त्यांचं संरक्षण करणं, त्यांची लग्नं लावून देणं' या उद्देशानं दलित समाजातील सुशिक्षित व पुरोगामी विचारांच्या तरुणांनी १९२६ साली नागपूरला 'तरुण महार संघ' ही संघटना स्थापन केली. त्या संघटनेतर्फे काही मुलींचं संरक्षण केलं, तर काही वेश्यांची लग्नंही लावून दिली. तसंच काहींना नोकऱ्याही मिळवून दिल्या.

१९२० नंतर अस्पृश्यांच्या आणि मुरळी व देवदासी प्रथेविरुद्धच्या चळवळीला अधिक गती आली. त्यामुळं १९२७ साली नेरली, १९२९ साली गडहिंग्लज व बेळगाव येथे अस्पृश्यांच्या परिषदा झाल्या. त्या परिषदांना महाराष्ट्र व कर्नाटकातील अनेक नेते मंडळी उपस्थित होती. बेळगावच्या परिषदेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. माधवराव सोळंकी, अप्पासाहेब लट्ठे, सीताराम शिवतरकर हे नेते खास उपस्थित होते. त्या परिषदांमधून ''अस्पृश्यांनी आपल्या मुलींना मुरळ्या व देवदासी सोडू नये, ती प्रथा बंद करावी, सरकारनं मुरळ्या आणि देवदासी प्रथा प्रतिबंधक कायद्याची कडक अंमलबजावणी करावी,'' असे ठराव पास करण्यात आले.

स्वातंत्र्यपूर्व काळात समाजसुधारकांनी केलेल्या चळवळीमुळं देवदासीसारखी अनिष्ट चाल कायद्यानं बंद करण्याचा पहिला प्रयत्न म्हैसूर संस्थानचे राजे कृष्णराज वाडियार यांनी केला. त्यांनी आपल्या संस्थानात १८९३ साली मंदिरातील नृत्य व गायनावर बंदी घालणारा कायदा केला. त्यानंतर १९०९ साली देवदासी सोडण्यास बंदी घालणारा आणि १९१० साली 'गज्जपूजा' देवदासीचा शेषविधी यावर बंदी घालणारा कायदा पास केला. त्यात दुरुस्ती सुचविणारा १९२२ साली दुसरा कायदा केला. संयुक्त प्रांतात नाईक (दलित) जातीच्या मुलींना देवाधर्माच्या नावावर अनैतिक मार्गाला लावण्याची जी रूढी होती, ती इंग्रज सरकारनं कायद्यानं बंद केली. त्याचप्रमाणं मद्रास, त्रावणकोर, गोवा या राज्यांतही मुलींना देवदासी सोडण्यास बंदी करणारा कायदा १९३० साली पास करण्यात आला. त्यानंतर १९३४ साली मुंबई सरकारनं देवदासी व मुरळ्या सोडण्यास प्रतिबंध करणारा कायदा केला. परंतु त्या कायद्याची अंमलबजावणी केली गेली नाही. १९७५ सालापर्यंत देवदासींच्या प्रश्नांना कोणी वाचा फोडलेली नव्हती. स्वातंत्र्यपूर्व काळात देवदासींची आणि त्यासंबंधी केलेल्या कायद्यांची अशी अवस्था होती.

'आंबेडकर विचार' हा एक क्रांतिप्रवण आणि परिवर्तनवादी विचार आहे. त्या विचारानं दलितांना, स्त्रियांना, देवदासींना आणि परिवर्तनवादी कार्यकर्त्यांना प्रेरणा दिलेली आहे. त्यामुळं या देशात स्त्रीमुक्ती आणि देवदासी चळवळ स्वातंत्र्यानंतर पुन्हा सुरू झाली. १९७५ सालानंतर या चळवळीला गती मिळाली. काही सेवाभावी सामाजिक संस्थांनी व कार्यकर्त्यांनी महाराष्ट्रात आणि कर्नाटकात ती चळवळ सुरू केली. त्यामुळं देवदासी, मुरळ्या व परित्यक्ता संघटित झाल्या आणि काही कार्यकर्त्यांच्या पुढाकारानं त्यांनी आपल्या मुक्तीसाठी चळवळ सुरू केली [३१]

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचारप्रवर्तक भाषण

आंबेडकरी कार्यकर्त्यांनी देवदासी, मुरळ्या, जोगतिणी आदि स्त्रियांची एक परिषद १३ जून १९३६ रोजी परळ येथे दामोदर हॉलमध्ये घेतली होती. या परिषदेत बाबासाहेब आंबेडकरांनी जे भाषण दिले ते अतिशय महत्त्वाचे व उद्‌बोधक आहे. या भाषणात बाबासाहेबांनी त्यांना बजावले की, ''तुमच्यामुळे आमच्या समाजाला लांच्छन आहे. स्त्री जात समाजाचा अलंकार आहे. प्रत्येक समाज स्त्री-चारित्र्याला अधिक मान देतो.... म्हणून तुम्ही या मलिन आयुष्याचा त्याग करा. आपला आणि समाजाचा दर्जा व नावलौकिक वाढवा. मी तुम्हाला हे निंद्य जीवन सोडण्यास सांगतो याचा अर्थ उपजीविकेची साधने मी उपलब्ध करून देईन असे नाही. महाभारतातील द्रौपदीचे उदाहरण लक्षात घ्या. वनवासात द्रौपदीने नवऱ्याबरोबर ज्याप्रमाणे दारिद्र्य पत्करले, तसे तुम्हाला पत्कारावे लागेल.

संपत्तीपेक्षा चारित्र्य महत्त्वाचे आहे'' असा बाबासाहेबांनी त्यांना उपदेश केला.

या भाषणाचा परिणाम म्हणून अनेक स्त्रिया आपला वेश्या व्यवसाय सोडून बाबासाहेबांकडे गेल्या व '' आपण संसार करण्यास तयार आहोत'' असे त्यांना सांगितले. त्यानंतर बाबासाहेबांनी यापैकी अनेक वेश्यांची लग्ने लावून दिली.[३२]

तात्पर्य : मुरळ्या, देवदासी, वेश्या यांचे बहुतांशी प्रमाण दलित समाजातच आढळत असल्यामुळे कायद्याने या अनिष्ट प्रथा बंद व्हाव्यात, सरकारने मुरळ्या, देवदासी, वेश्या यांचे पुनर्वसन करावे, दलित समाजात जागृती होऊन तसेच समाजावर असलेल्या अतिदेवभोळेपणाचा पगडा दूर होऊन समाजाचे मानसिक परिवर्तन व्हावे, यासाठी विविध सामाजिक चळवळीतून प्रबोधनाच्या अंगाने केलेले विविध प्रयत्न आणि त्यामुळे दलित समाजात या संदर्भात झालेले अल्पसे स्थित्यंतर याचा लेखाजोखा म्हणजेच सदर उतारे होत.

आता विविध प्रकारच्या लोकगींतातून आविष्कृत होणाऱ्या खंडोबा-म्हाळसा-बाणाई यांच्या चरित्रात्मक जीवनप्रवासाबद्दल चर्चा करू.

[]

**संदर्भ - टिपा**


सदर प्रकरातील वाघ्या-मुरळीच्या सारांश कथालेखनासाठी पुढील गोष्टीरूप लघुग्रंथाचा उपयोग झाला.

अ. घोलप म. स., गोष्टीरूप श्रीमल्हारी मार्तंड, पृ. ५५-५८.
आ. जोशी र. म. (निर्मळ गुरुजी), श्रीखंडोबाच्या गोष्टी, पृ. २३-२६.
इ. खाडे बापूराव खंडेराव, श्रीक्षेत्र जेजुरीमहात्म्य, पृ. ५२-५३, ५७-५९.
ई. जोशी द. दा., श्रीमल्हारी महात्म्य, पृ. ११५-११९.
उ. (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर, महाराष्ट्राचे कुलदैवत श्रीमल्हारी मार्तंड कथासागर, पृ. १३७-१३९.

१. कालेकर गोविंद, मुंबई इलाख्यातील जाती, पृ. २१८.
२. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), एक होता राजा : भाग ३, पृ. २८-३१, ३५-३६.
३. Sen D. C., Chaitanya and His Companions, Pages - 256-257.
४. Sarkar M. C., History of Aurangzib, Volume - I, Page - 171.
५. (डॉ.) मांडे प्रभाकर, लोकरंगभूमी, पृ. १७६.
६. दाते यशवंत रामकृष्ण/ कर्वे चिंतामण गणेश, महाराष्ट्र शब्दकोश (विभाग तिसरा: ग-ठ), पृ. १२८६-१२८७.
७. वाळके मार्तंड, खंडोबाचं लग्न, पृ. ४८-४९.
८. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.) कुलदैवत, पृ. ४२५-४२६.
९. वाळके मार्तंड, खंडोबाचं लग्न, पृ. ३४.
१०. मराठी संशोधन पत्रिका, मुंबई (ऑक्टोबर, डिसेंबर २००८, जानेवारी २००९)पृ. ५९.
११. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), कुलदैवत, पृ. ४२५.
१२. वाळके मार्तंड, खंडोबाचं लग्न, पृ. १०-११.
१३. जेजुरी गडावर वाघ्या-मुरळींच्या जागरण कार्यक्रमातून समक्ष संकलित केलेले लोकगीत.
१४. गायकवाड मेघा सुखदेव, दक्षिण भारतातील खंडोबा एक जागृत दैवत, पृ. १३२.
१५. सकाळ, स्वरविहार (नोव्हेंबर, डिसेंबर २००८, जानेवारी २००९) पृ. ५९.
१६. (प्रा. डॉ.) खांडगे प्रकाश , खंडोबाचे जागरण, पृ. १९२-१९६.
१७. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), कुलदैवत, पृ. ३१३.
१८. (डॉ.) देखणे रामचंद्र , गोंधळ : परंपरा, स्वरूप आणि आविष्कार, पृ. ९९-१०१.

१९. गोंधळाच्या कार्यक्रमातून प्रत्यक्ष संकलित केलेली गीते.
२०. (डॉ.) देखणे रामचंद्र , गोंधळ : परंपरा, स्वरूप आणि आविष्कार, पृ. ९-१०.
२१. तत्रैव.
२२. रेणुकामाहात्म्य (मराठी ओवीबद्ध) पोथी, अध्याय १०, ओवी. ४४-४७.
२३. श्रीएकनाथ महाराज यांच्या अंभगाची गाथा, पृ. ८०२ (अ. ३९१९).
२४. (डॉ.) देखणे रामचंद्र, गोंधळ : परंपरा, स्वरूप आणि आविष्कार, पृ. ९-१०.
२५. (प्रा. डॉ.) खांडगे प्रकाश, खंडोबाचे जागरण, पृ. १८१,१८३-१८४.
२६. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), एक होता राजा (वासुदेवाची गाणी) पृ. ४०-४१.
२७. साधारण ऐंशीच्या दशकापर्यंत महाराष्ट्रात सर्वत्र वावरणारा हा लोककलावंत सध्या एखाद्या खेड्यात क्वचितच आढळतो. त्यावेळेस त्याचा हा गीताविष्कार आपल्या कानी पडतो.
२८. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), एक होता राजा, पृ. २०.
२९. (डॉ.) देखणे रामचंद्र , गोंधळ आणि आविष्कार, पृ. ११४.
३०. भैरवनाथाचे भराड सादर करतेवेळी गण गाऊन झाल्यानंतर भराडी नाना देवदेवतांना गोंधळ-जागरणाप्रमाणेच भराडासाठी ‘आवतन’ देतो. त्यामध्ये जेजुरीच्या खंडोबाचा प्रामुख्याने समावेश असतो.
३१. राजस वसंत, देवदासी शोध आणि बोध, पृ. ४७-५०,५३,५५-५७,८७
(या ग्रंथाप्रमाणेच डॉ. अवचट अनिल यांचे प्रबोधनाच्या अंगाने जाणारे आणि स्वत: वाघ्या-मुरळीसंबंधित केलेल्या सामाजिक कार्याची ओळख करून देणारे ‘स्वानुभव कथनात्मक’ पुस्तक ‘वाघ्या-मुरळी’ ची दुसरी आवृत्ती जून २००८ मध्ये प्रसिद्ध झाली आहे.).
३२. पवार उर्मिला/मून मीनाक्षी, आम्ही इतिहास घडविला, पृ. ४०.

लोकसंस्कृतीचा प्रवाह अनंत आणि अनादी काळापासून चालत आला असून, तो विविध अंगांनी आणि रंगांनी नटलेला आहे. समाजात नांदणाऱ्या विविध व्यक्तिसमूहांच्या अंतरंगातील श्रद्धांचे व भाव-भावनांचे त्यात तरंग उमटलेले असतात. समाजाची सुख-दु:खे, कौटुंबिक कलह, भाव-भावना अशा जीवनातील वेगवेगळ्या पैलूंचा त्यात मिलाफ झालेला असतो. लोकवाणीतून प्रकट होणाऱ्या लोकदैवतांच्या चरित्रकथांमध्येही अशा प्रकारे लोकमानसाच्या भावना प्रतिबिंबित झालेल्या असतात. दैवतगीते ही लोकमनाच्या सामूहिक नेणिवेच्या प्रातिनिधिक उद्‌गारासारखी असतात.

लोकदैवते ही समाजाची प्रकृती आहे. संस्कृतीच्या प्रारंभकाळातील अवशेषांच्या खुणा लोकदैवतांमध्ये आढळून येतात. म्हणून लोकदैवते ही संस्कृतीची प्रारंभकाळातील रूपे आहेत. संस्कृतीच्या उत्क्रांतीबरोबर लोकदैवतांचेही उन्नयन होत जाते. अतिभौतिक तत्त्वज्ञानापेक्षा लोकजीवनातील रूढ असलेले श्रद्धाविश्व हेच लोकदैवतांचे पायाभूत तत्त्वज्ञान असते.

भगवान शंकराच्या उपासनेतून उदयास आलेले अनेक पंथ-संप्रदाय आपण पाहिले आहेत. त्यांनी आत्तापर्यंत गाठलेला आध्यात्मिक व सांस्कृतिक पल्लाही अनुभवला आहे. परंतु 'क्षेत्रपाळ' म्हणून लोकसंस्कृतीशी एकरूप झालेला खंडोबा कोणत्याही पंथ-संप्रदायाच्या चौकटीत बंदिस्त न होता किंवा कोणत्याही एका विशिष्ट जाती-धर्माचा पाठीराखा न होता सामान्यातल्या सामान्यापासून ते उच्चवर्णीयांपर्यंत सर्व थरांतील लोकमानसाच्या मनाची पकड घेण्यात यशस्वी झाला आहे. म्हणूनच अठरापगड जाती धर्मांची माणसे आनंदाने खंडोबाच्या भक्तिसुखात रंगून गेली आहेत.

खंडोबा हे जरी महाराष्ट्राचे कुलदैवत असले तरी या लोकदेवाच्या भक्तीचा प्रसार आणि प्रचार सबंध भारतभर झाल्याचे आढळून येते. याचे कारण जसे भक्तजन आहेत, त्याचप्रमाणे खंडोबावर लिहिले गेलेले विपुल भक्तिवाङ्मय हेदेखील आहे. परंतु खंडोबावर लिहिलेल्या संत, पंत, वरदी कवी, शाहिरी वाङ्मयापेक्षा साध्या बोलीभाषेतील वाचकांच्या व ऐकणाऱ्यांच्या मनाचा ठाव घेणारे रसाळ लोकवाङ्मयच समाजामध्ये जास्त रुजले गेले आहे.

शंकराचा मार्तंडभैरव अवतार, अवताराचे प्रयोजन, मणि-मल्ल दैत्यांशी युद्ध, खंडोबाचे रूपवर्णन, खंडोबाची लग्ने, त्या वेळची वर्णने, खंडोबाच्या बायका म्हाळसा-बाणाई, त्यांचा सवतीमत्सर, जेजुरी आणि जेजुरीगडाची महती, भक्त वाघ्या-मुरळी याविषयीच्या अनेक लोककथा जेव्हा लोकगीतांतून गायल्या जातात, तेव्हा खंडोबा देवाचा मूर्तिमंत जीवनपट आपल्यासमोर उभा राहतो. डोळ्यांसमोरच सारे घडत आहे, असे वाटण्याइतपत ही लोकगीते ऐकणाऱ्यांच्या मनाचा कब्जा घेतात. शाहिरी काव्याचा रंग-ढंग लेऊन अवतरलेल्या या लोकगीतांतून खंडोबा आणि सामूहिक लोकमानस यांच्यातील आंतरिक नात्याचा उलगडा होत जातो. म्हणूनच पोथ्यापुराणे, स्तोत्रे, माहात्म्यकथा यांच्यापेक्षा लोकगीतातील खंडोबा अधिक सजीव वाटणे स्वाभाविक आहे.

खंडेरायाने मणि-मल्ल दैत्यांना ठार करून भक्तांचे संकट निवारण कसे केले? म्हणजेच देवाच्या अवतारकार्याची महती सुरुवातीलाच अशा प्रकारे गायिली आहे.[१-७]

**हर हर महादेव पार्वती भोळा शंकर ।**
**दैत्यासाठी खंडेरायानं धरला अवतार ।**
**दैत्य मारून जार केले धन्य मल्हार ।**
**आक सक्तीनं आसुद पिऊन केला धुळकार ।।** ***(गीत क्र. १)***

'मणिचूल' नावाच्या पर्वतावर सप्तर्षी तप आचरत, शांततेत आणि सुख-समाधानात कालक्रमणा करीत होते. परंतु एके दिवशी, उन्मत्त झालेल्या मल्लासुर दैत्याने आपल्या सैन्यासह येऊन ऋषीआश्रम उद्ध्वस्त केला. ऋषींसह त्यांच्या कुटुंबीयांना, शिष्यांना मारहाण करून घोर अत्याचार केले. तेव्हा, नारदमुनींच्या सांगण्यावरून दु:खी झालेले ते सप्तर्षी दैत्यांच्या नाशासाठी स्वर्गात इंद्राकडे गेले. परंतु दैत्यवधास इंद्र असमर्थ असल्यामुळे त्याच्याच सांगण्यावरून ऋषी वैकुंठपुरीत भगवान विष्णूकडे गेले. विष्णूलाही ही गोष्ट अशक्य असल्यामुळे ते सप्तर्षींसह कैलास पर्वतावर भगवान शंकराकडे गेले. ऋषींनी आपली करुण कहाणी शंकरासमोर कथन केली. तेव्हा अत्यंत क्रोधाविष्ट झालेल्या शंकराने 'मार्तंडभैरव' हा अत्यंत भव्य-दिव्य असा अवतार धारण केला आणि नंदीवर आरूढ होऊन आपल्या सप्तकोटी गणांसह ते भूतलावरील 'मणिचूल' पर्वतावर आले. युद्धात मणि-मल्ल या दैत्यबंधूंचा त्यांनी वध केला. ऋषींच्या विनंतीवरून पुढे ते शक्ती म्हाळसासह प्रेमपुरी येथे लिंगद्वयरूपाने प्रकट होऊन तिथेच गुप्तरूपात राहू लागले.

एके दिवशी म्हाळसाने देवास प्रश्न विचारला, ''स्वामी, आपण गुप्तावस्थेत इथे किती दिवस राहायचे?'' तेव्हा मार्तंडभैरव म्हणाले, ''म्हाळसा, तू नेवाशाच्या तिम्मशेट वाण्याच्या घरी जन्म घे. तो माझा परमभक्त आहे. योग्य वेळ येताच आपण मानवरूपात विवाहबद्ध होऊ.'' देवाने सांगितल्याप्रमाणे म्हाळसाने निपुत्रिक तिम्मशेट वाण्याच्या घरी जन्म घेतला. हळूहळू म्हाळसा मोठी झाली. वयात आली. एके दिवशी खंडोबा देवाने म्हाळसाच्या स्वप्नात येऊन दृष्टांत दिला. पाली येथे येण्यास सांगितले. म्हाळसाने सारी हकीकत आपल्या वडिलांना सांगितली. तिम्मशेट वाणी मोठ्या लवाजम्यासह म्हाळसाच्या लग्नाचे वऱ्हाड घेऊन नेवाशाहून पालीस आला. मल्हारीदेवही आपल्या सात कोटी देवगणांसह पालीस येऊन दाखल झाले. एका लोकगीतात या प्रसंगाचे बहारदार वर्णन आले आहे -

**नंद पालीमधी गं म्हाळसा**
**देव मल्हारी देव मल्हारी**
**चालले देव लग्नाला**
**निघाली स्वारी निघाली स्वारी**
**सटी लागलं ग तेल मार्तंडाला**
**जिजिबाई कुरवली आली**
**हळद लागली अंगाला**
**धाडिल्या लगीनपत्रिका भक्तजनांला**
**पुशिनीच्या पूर्णिमेला यावे लग्नाला**
**चहुकडे केली ताकीद गोरगरिबांला**
**शुद्ध मृगनक्षत्राच्या दिवशी हो**
**यावे लग्नाला, यावे लग्नाला...** ***(गीत क्र. २)***

पौषी पौर्णिमेला मोठ्या थाटामाटात खंडोबाचे म्हाळसाशी लग्न झाले. मल्हारीदेव सर्वांचा निरोप घेऊन म्हाळसासह पुन्हा प्रेमपुरी येथे आले आणि तिथेच वास्तव्य करू लागले.

एकदा दुपारी गुराखी मुले जेजुरी येथील कऱ्हेपठारावर खेळत असताना अचानक मल्हारी देव तिथे घोंगडीवर येऊन बसले. भाया गुरवाला पाहताच मल्हारी देव तिथेच गुप्त झाले. त्याच जागेवर काही दिवसांनंतर मंदिर उभे राहिले. भाया गुरवाच्या भक्तीपोटीच देव प्रेमपुरीहून कडेपठारावर वास्तव्यास आले.

**या कडेपठारी देवाचं ठाणं**
**संकट पडे भक्ताला उदेकारणं**
**देव उतरले तळवंटी जागा पाहून**
**ही गुपित काया साक्ष वादळं दोन**
**देवाचं लागलं ध्यान रात्रंदिन**
**दखनात खंडेराया नांदे हौसेनं** ***(गीत क्र. ३)***

सुपे गावच्या खैरे-पाटील घराण्यातील भाऊ नावाच्या निष्ठावंत भक्ताच्या प्रेमापोटी मल्हारीदेव कऱ्हेपठारावरून जेजुरीगडावर येऊन स्थिरावले. पण आले कसे ? तर असे :

**मल्हारी मल्हारी-घोड्यावर केली स्वारी**
**देव मल्हारी ।**
**श्री मार्तंडा हातात खंडा**
**नित्य विघ्न निवारी ।**
**त्रिसुळ डमरू हाती खड्ग विराजे**
**घोड्यावर केली स्वारी** ***(गीत क्र. ४)***

जेजुरीत राहायला आल्यानंतर मल्हारी-म्हाळसा सुखाने संसार करू लागले.

मात्र, काही दिवासांनंतर खंडेरायाला 'मार्तंडभैरव' अवताराच्या अगोदर चंदनपुरीत जाऊन बाणूला दिलेल्या लग्नाच्या वचनाची आठवण झाली आणि त्यांच्या मनाला हुरहुर लागून राहिली. रात्री खंडेराय बाणूच्या स्वप्नात गेले आणि तिला दृष्टांत दिला की 'माझ्या भेटीला जेजुरीला ये.' सकाळ होताच रात्री पडलेले स्वप्न बाणू आपल्या

सख्यांना सांगू लागली आहे. एका कल्पक लोककवयित्रीने पुढील काव्यपंक्ती बाणूच्या मुखी घालून गीताला चांगलीच रंगत आणली आहे. ती म्हणते :

**जेजुरीचा बाई वाणी आला माझ्या सपनी**
**सपन पडले प्रात:काळी**
**स्नान केले गंगाजळी**
**घोडा नाचतो माझ्या अंगणी**
**घालूनी पितांबराची कास**
**पडला प्रिथिमीवरी प्रकाश**
**शेला झळकतो जसा गं अंगणी**
**देव आला गं माझ्या सपनी** ***(गीत क्र. ५)***

अशी आनंदित झालेली बाणू शंकराने दिलेल्या अद्‌भुत खडावा पायात घालून थेट जेजुरीगडावर आली. खंडेरायाच्या राजबिंड्या रूपामुळे बाणू पाहताक्षणीच त्याच्यावर मोहित झाली. परंतु, खंडेरायाशी ती बोलू शकली नाही. कारण, खंडेराय आणि म्हाळसा यांच्यामध्ये कसला तरी संवाद चालू होता. म्हाळसासमोर खंडोबादेवाला भेटता येणार नाही, म्हणून दरवाजाजवळ उभे राहून बाणूने आपल्या डोळ्यांतील काजळाने खंडोबास एक प्रेमपत्र लिहिले, 'चंदनपुरीच्या जंगलात लवकरात लवकर भेटायला या.' देवाला डोळ्याने खूण करून पत्र तिथेच टाकले आणि बाणू पुन्हा आकाशमार्गे चंदनपुरीला निघून गेली. म्हाळसाचा डोळा चुकवून खंडोबाने ते प्रेमपत्र वाचले. बाणूचे रूप पाहून आधीच घायाळ झालेला खंडोबा पत्र वाचल्यानंतर जास्तच अस्वस्थ व चंचल झाला, कावरा-बावरा झाला. बाणूचे वेड त्याच्या मनात चांगलेच भरले. देवाची स्थिती अशी झाली :

**रूप दावूनी बाणू गेली**
**स्वारी देवाची येडी झाली**
**आवो बाणूबाईचं येड लागलं**
**मल्हारी देव मल्हारी**
**आहो विसरून गेले कोण्या झाडाला**
**भंडारी देव भंडारी** ***(गीत क्र. ६)***

बाणूचाच ध्यास लागून राहिल्याने खंडोबाने म्हाळसाबरोबर सारिपाट खेळण्याचे ठरविले. हरणाऱ्याने बारा वर्षे वनवास भोगायचा, या अटीवर खेळ सुरू झाला. खंडोबादेव मुद्दामच हरले. ठरल्याप्रमाणे बारा वर्षांच्या वनवासासाठी खंडेरायाने आपला राजवाडा सोडला. म्हाळसाला फार वाईट वाटले. देवाच्या सान्निध्यात राहायची सवय असल्याने त्या रात्री म्हाळसाला उदास उदास वाटू लागले. खंडोबाच्या विरहाने तिला गहिवरून आले आणि नकळत ती विरहगीत आळवू लागली आहे :

**करमेना चांदणी रात, देवाविना करमेना चांदणी रात ।**
**समई जळती मंदिरात, देवाविना करमेना चांदणी रात ।**
**शेज मी कुसुमाची केली, शेज मी कुसुमाची केली ।**
**रात्र मला वैऱ्याची गेली, रात्र मला वैऱ्याची गेली ।।** ***(गीत क्र. ७)***

कमरेला धोतर, अंगात बाराबंदी, डोक्याला लाल रंगाचे पागोटे, खांद्यावर घोंगडी, हातात काठी, कानात बाळी, भंडारा भाळी असा माणदेशी धनगराचा वेश करून खंडेराय थेट चंदनपुरीच्या जंगलात बाणाई जिथे मेंढरांचे खांड राखत होती, तिथे आले. परंतु देवाचे असले 'बावळट रूप' पाहून बाणूने त्यांना ओळखले नाही. 'मी माणदेशचा खंड्या धनगर' अशी ओळख देवाने बाणूला करून दिली आणि 'मेंढरं राखण्यासाठी कामाला ठेवाल का?' अशी विचारणाही तिच्याजवळ केली. त्याबद्दल बाणूने आपल्या वडिलांना विचारल्यानंतर 'खंड्या'ची नोकरी कायम झाली. आता मल्हारी देव रोज बाणूची मेंढरे चारावयास राना-वनात फिरू लागले, पण ते केवळ बाणूवर जडलेल्या प्रीतीमुळेच. बाणूही रोज देवाबरोबरच मेंढरांमागे फिरत होती. एका लोकगीतात देवाचे बाणाईवरील प्रेम व्यक्त करताना एका खानदेशी लोककवयित्रीने म्हटले आहे :

**काकला कोकरू, बाणू जाती मेंढवाड्या**
**देव मल्हारी गावड्या**

**बाणाई धनगरणीच्या ताकामंदी लेंड्या**
**मल्हारीदेव तिच्या राखीतो शेळ्या मेंड्या** ***(गीत क्र. ८)***

दिवसांमागून दिवस आणि महिन्यांमागून महिने सरले. बघता बघता 'खंड्या धनगराच्या' नोकरीला बारा वर्षे पूर्ण झाली. एके दिवशी त्याने बाणूची मेंढरे गिरणा नदीच्या डोहावर धुण्यासाठी म्हणून नेली. परंतु न धुताच सर्व मेंढरे खडकावर आपटून त्यांचे मांस, हाडे, कातडी वेगवेगळे करून ढीग रचले. काही वेळानंतर बाणूला ही बातमी समजताच ती धावतच तिथे आली. समोरचे दृश्य बघताच तिला रडू कोसळले. खंड्या धनगराला ती शिव्याशाप देऊ लागली. म्हणू लागली, ''आत्ताच्या आत्ता माझी सगळी मेंढरं जित्ती करून दे, नाही तर या धनगराम्होरं तुझी काही धडगत न्हाय.'' यावर खंड्या धनगर म्हणाला, ''आत्ताच्या आत्ता तुझी सगळी मेंढरं जित्ती करून देतो, पण माझ्याशी तुला लगीन करावं लागेल गडे बाणू!'' जेजुरीच्या खंडोबा देवावर प्रीती जडलेल्या बाणूने मेंढरांसाठी नाइलाजाने या बावळट दिसणाऱ्या खंड्या नोकराला होकार दिला. तेव्हा ताबडतोब त्याने सर्व मेंढरे जिवंत केली आणि जेजुरीच्या खंडोबाचे आपले मूळ स्वरूप प्रकट केले. हे पाहून बाणूला फार आनंद झाला. ती लाजून लाजून चूर झाली. तिच्या वडिलांनी आणि इतर धनगरांनी खंडोबा बाणूचे श्रावणी पौर्णिमेच्या शुभमुहूर्तावर थाटामाटात लग्न लावून दिले. खंडोबा देव बाणूसह घोड्यावर बसून थेट जेजुरीला आले. जेजुरीत आल्यानंतर या राजा-राणीचा थाट काय वर्णावा?

**काकला कोकरू बाणू जातीया नटईतु ।**
**मल्हारी देवानं झेंडा रवला पेटईतु ॥** ***(गीत क्र. ९)***

अशा थाटात मल्हारी देव बाणाईला घेऊन गडावर येतात. म्हाळसाला देवाच्या येण्याची चाहूल लागते. तिला अतिशय आनंद होतो. बारा वर्षांनंतर घरी आलेल्या पतिदेवांना ओवाळण्यासाठी ती महालाबाहेर येते. तेवढ्यात तिचे लक्ष देवाजवळ उभ्या असलेल्या अती रूपवान तरुणीकडे जाते आणि -

**काकला कोकरू बाणू बुथीची देखिली ।**
**म्हाळसाबाईनं आरती उभ्यानं टाकली ॥** ***(गीत क्र. १०)***

बाणूला पाहून रागाने लालबुंद झालेल्या म्हाळसाच्या हातून पंचारती खाली पडते. तणतण करीतच ती मल्हारी देवाला प्रश्न विचारते, ही 'टवळी' कोण? आणि इतके दिवस तुम्ही कुठे गेला होता? तेव्हा देव तिची समजूत काढतात :

**देव मल्लारी म्हणईतु, का गं म्हाळसा, रागं रागं?**
**गेलो व्हतो शिकारीला, बाणू लागुनि आली मागं !**
**देव मल्लारी म्हणईतु, का गं म्हाळसा रागामंदी ?**
**गेलो व्हतो शिकारीला, बाणू धावली बागमंदी** ***(गीत क्र. ११)***

अगोदरच रागाने लाल आणि दु:खी झालेली म्हाळसा देवाच्या या बाणाईधार्जिण्या उत्तराने जास्तच भडकली. अस्वस्थ होऊन काही वेळ धरणीवर शिळेसारखी पडून राहिली. पूर्ववत झाल्यानंतर देवाशी पुन्हा भांडू लागली. देवाला बोलबोल बोलू लागली. 'तुम्ही बाणूची मेंढरंच राखा, तुम्हाला तिची फार गोडी आहे. या बाणूपायीच तुम्ही चंदनपुरीला गेला होता.' अशा प्रकारे मनात साठलेला सर्व राग म्हाळसा खंडेरायाजवळ व्यक्त करू लागली आहे :

**हाकला देवा मेंढी बाणूची**
**काई हो गोडी**
**घेऊनी हातामधी काठी**
**लागे शेळ्या-मेंढ्या पाठी**
**खांद्यावर घोंगडी**
**या गं बाणूच्या पायी**
**गेले चंदनपुरी ठायी**
**हाकला देवा मेंढी बाणूची**
**काई लई गोडी** ***(गीत क्र. १२)***

एवढे बोलूनसुद्धा खंडोबा देव शांतच. आपल्या बोलण्याकडे देव लक्ष देत नाहीत, हे पाहून म्हाळसाने देवाशीच काही दिवस अबोला धरला. मग एके दिवशी देवाने गोड गोड बोलून तिची समजूत काढली. देवाशी ती पुन्हा पहिल्यासारखीच बोलू लागली. सवती-सवतीचे मात्र काही केल्या पटेना. त्यांच्यामध्ये रोज भांडणे होऊ लागली.

दोघींचे भांडण पाहून मल्हारीदेव हसण्यापलीकडे काहीच करत नव्हते!

**सवती सवतीचे भांडण ।**
**भोळ्या भक्तीचे कांडण ।**
**म्हाळसा-बाणाई भांडती ।**
**बघून मल्हारी हासती ॥** ***(गीत क्र. १३)***

आता मात्र दोघींचाही संयम सुटला. दोघीही एकमेकींचे उणे-दुणे काढू लागल्या. 'धनगराच्या एका अडाणी व गावरान पोरीने मल्हारीदेवाला आपले वेड लावले आणि माझी सवत झाली', म्हणून म्हाळसा बाणूला टोचून बोलू लागली. एकदा असेच एका कडाक्याच्या भांडणात रागाने लालबुंद झालेली म्हाळसा बाणूला निक्षून सांगते :

**आईक मी सांगते तुजला ।**
**चित्त दे माझ्या बोलाला ।**
**का गं तू भुललीस देवाला? ।**
**जा तू आपल्या देशाला ॥**
**झाकल्या पाठीनं जा म्हणते घे तू ऐकून ।**
**एका घडीमंदी तोंड बाणाई टाकीन उतरून ॥** ***(गीत क्र. १४)***

बाणाई धनगराची पोर असली म्हणून काय झाले? तिचाही म्हाळसाइतकाच देवावर हक्क आहे. खंडोबा तिचा लग्नाचा नवरा आहे. चार चौघांसमोर तिचे देवाबरोबर लग्न लागले आहे. बाणूही काही कमी नव्हती. तिनेही ठसक्यातच म्हाळसाला उत्तर दिले :

**रतिमातर तुमच्या घरी नाही इचार**
**तू वाण्याची हायेस म्हून करशिल पडिभार**
**आम्ही धनगरणी जशा नागिणी मोठ्या शिरजोर**
**तुझ्या देवानं आमच्या घरी वळीली मेंढरं**
**लेंड्या, लोकर कण्यात मिसळी तुझाच भर्तार!** ***(गीत क्र. १५)***

आता मात्र म्हाळसाच्या रागाला पारावर राहत नाही. 'देवाच्या पाठीमागे लागून आलेली कालची तू आणि मला शिकवतेस होय?' असे ती बाणाईला सुनावते. एवढ्यावरच थांबेल तर ती म्हाळसा कसली ? बाणाईच्या मनाला चटका लागेल, असे ती बोलतच राहते...

**असं झालं दोघींचं भांडण**
**बाणूचं करी उच्चाटन**
**बाई तू धनगरीण**
**मी आहे वाणीन**
**असं कसं तू वेड लाविलं भुलला मल्हारी**
**तुझ्या गं साठी स्वारी धनगर वाड्यावरी**
**म्हाळसाबाई बोले मी गं वाण्याची पोर**
**धनगराची बाणाई हिने बाटविले घर !** ***(गीत क्र. १६)***

अशा प्रकारे दोघीही एकमेकींच्या उत्तराला प्रत्युत्तर देऊ लागल्या. दिवसेंदिवस दोघींमधला कलह वाढतच चालला. भांडण हा नित्याचा नियम होऊन बसला. आता मात्र मल्हारीरायाचा नाइलाज झाला. दोन बायकांचा दादला, भोळ्या मल्हारीला सवती-सवतींची भांडणे सोडविता सोडविता नाकीनऊ झाले. नाइलाजाने देवाने दोघींचीही वेगवेगळी बिऱ्हाडे थाटण्याचा निर्णय घेतला. डोंगराचा वरचा अर्धा भाग (गडाचा) म्हाळसाला दिला आणि डोंगराचा खालचा अर्धा भाग बाणाईला दिला. प्रत्येक रविवारी बाणूकडे मुक्काम आणि राहिलेल्या वारी म्हाळसाकडे, अशी डोंगराच्या वाटणीसारखीच देवाचीही वाटणी झाली. परंतु बाणूच्या प्रीतीने 'येडा' झालेला भोळा मल्हारी तिला दररोजच 'चोरून चोरून' भेटू लागला. म्हाळसाच्या हे सारे लक्षात येत होते, पण मुद्दामच ती देवाला काही बोलत नव्हती. कारण तीही बाणूसारखीच देवावर जीवापाड प्रेम करीत होती. एके दिवशी संध्याकाळी खंडेराय 'बाहेर जाऊन येतो' म्हणून जे गेले ते सकाळीच महाली (घरी) आले. म्हाळसा बिच्चारी तोपर्यंत देवाची वाट पाहत अंगणात बसली होती. सारी रात जागून तिचे डोळे सुजले होते. देव घरी आल्या आल्याच चेहऱ्यावरचा राग मनात ठेवून

केविलवाणी ती त्यांना सांगू लागली आहे :

**सेज केली महाली जी ।**
**लाविल्या समया सात ।**
**अरे हो, वाट पाहिली साऱ्या रात्री जी ।।**
**देवा, माझी त्रासली नेत्रं ।**
**अरे हो, कोठे गेली होती स्वारी जी ।।**
**कोणाच्या मंदिरी जी ।**
**खरे सांगा मल्हारी जी ।**
**मला कळले अंतरी जी ।**
**लुब्ध तुम्ही झाला बाणूला ।**
**अरे हो, म्हाळसा म्हणे देवाला ।।** ***(गीत क्र. १७)***

म्हाळसा एवढे जीव तोडून सांगतेय पण देव बाणूच्याच विचारात मग्न झालेले. ते नुसतेच अबोलपणे म्हाळसाकडे शून्य नजरेने बघत राहतात. मग मात्र म्हाळसाचा संयम सुटतो. ती देवाला रागे रागेच बोलू लागते :

**अरे देवा, त्वा मसी बोलावं गोड**
**तुला बाणुचं भरलं वेड**
**मौजा केल्या रे बहू प्रीतीनं**
**कुठं नाही रे पडलं उणं**
**एकाएकी झालासी रे बैमान**
**फार मन केले रे कठीण**
**कसं रे बाणुनं लावलं वेड**
**देवा मल्हारी, सोडिला गळ** ***(गीत क्र. १८)***

काही वेळा रागाने बोलली तरी म्हाळसा खंडोबाची पत्नी होती. ती देवावर जीवापाड प्रेम करीत होती, परंतु बाणूवरील प्रेमामुळे खंडेराय पुरते वेडे झाले होते हे तिच्या लक्षात आले होते. देवाच्या मनात आपल्याबद्दल प्रेम निर्माण व्हावे म्हणून म्हाळसाने कितीही जीवाचे रान केले तरी काडीचा उपयोग होत नव्हता. असेच काही दिवस खंडेराय अस्वस्थ मनाने म्हाळसाबरोबर राहिले आणि एके दिवशी अचानक गायब झाले.

मग म्हाळसाने आपले दु:ख नारदांजवळ सांगितले. नारदांनी सांगितल्याप्रमाणे, म्हाळसाने खंडेरायाच्या प्राप्तीसाठी जयाद्री पर्वताच्या पायथ्याशी शिवलिंगाची प्रतिष्ठापना करून अकरा दिवस अनुष्ठान केले. परंतु त्याचाही काही उपयोग झाला नाही. पुन्हा, नारदांच्याच सांगण्यावरून तिने एकवीस दिवसांचे अनुष्ठान केले. परंतु, पहिल्यासारखेच याही वेळेस त्याचे फळ म्हाळसाला मिळाले नाही. चिंताक्रांत झालेले म्हाळसा, नारदमुनी, गजानन यांनी देवाच्या ठावठिकाणाबद्दल नंदीला विचारले. खंडेरायाकडून नंदीला बोलण्याची अनुमती नसल्यामुळे त्याने नुसती मान वळवून देव जिकडे लपून बसले होते, त्या दिशेने खूण केली. तेव्हा, ते तिघे जण मंदिराच्या गर्भगृहातील भुयारात आले आणि तिथेच मल्हारी देव आणि बाणाई सापडले. (हेच ते गुप्तमल्लेश्वर) मग त्या तिघांनी मल्हारीदेवाची समजूत काढून गडावरील म्हाळसाच्या महालात आणले. बाणाई गडाखाली आपल्या वास्तव्याच्या ठिकाणी निघून गेली. देव घरी आल्यामुळे म्हाळसाला फार आनंद झाला. परंतु 'बाणू' तिच्या मनात चांगलीच सलत होती. 'सहा महिन्यांपासून मला दर्शन दिले नाही देवा. एवढे कठोर का झालात?' असे प्रेमाने आणि लाडातच परंतु लटक्या रागाने ती देवाशी बोलते :

**आला भाणूला घेऊन पुरविला तिचा हेत ।**
**या सवतीला आणून ठेविली रंगमहालात ।।**
**सहा महिने मजला नाही तुमचं दर्शन ।**
**का कठोर झाला बाणुच्या नादानं ।।**
**काय पडलं होतं उणं सांगितलं नाही ।**
**पंचप्राण सगळा देवा तुमच्या ठायी ।।** ***(गीत क्र. १९)***

काहीही असो. परंतु सहा महिन्यांनंतर देवाची भेट होत आहे म्हणून म्हाळसाची धांदल उडालेली आहे.

देवाच्या अंघोळीसाठी तिने हंडाभर गरम पाणी तांब्याच्या घंगाळ्यात ओतून ठेवले आहे. देवाला खाण्यासाठी वेगवेगळे पदार्थ तयार केले आहेत. त्यात भात आहे, वेगवेगळ्या डाळी शिजवल्या आहेत. नुकत्याच शेवया येळून ठेवल्या आहेत आणि ती देवाला जेवण्याचा आग्रह करतेय, 'देवा खंडेराया, अन्नाचे पाच घास तरी खा. उगाच माझा राग राग करू नका.' तरीही खंडेराव मूक आणि नाराजच. तेव्हा म्हाळसा देवाची समजूत काढतेय...

**देवा लग्नाची अस्तुरी म्हाळसा राणी ।**
**आज काय झाला आनेव सांगा मजपुनी ।**
**तुम्ही उठा की आंघोळीला खंडेराया ।**
**हंड्यामधी पाणी ठिवलं तुम्हाला न्हाया ।**
**वेळील्या की साळी, डाळी आणिक शेवया ।**
**पाच घास जेवण जेवा खंडेराया ।।** ***(गीत क्र. २०)***

'देवा, या धरणीला जशी आभाळाची माया आहे, त्याचप्रमाणे मी तुमच्या छायेत सुखाने नांदतेय. तुमच्याशिवाय मला या जगात तरी दुसरे कोण आहे? तुम्ही दुसऱ्याचे ऐकून माझ्याशी दुरावा करताय आणि त्या धनगराच्या बाणूला जवळ करताय. मी तुमचा असा कोणता गुन्हा केला आहे की, एवढी कठोर शिक्षा मला देताय?' असे बोलत असतानाच देवाच्या अशा वागण्यामुळे तिला गहिवरून येते. ती देवाच्या चरणाजवळ मस्तक ठेवून अश्रू ढाळू लागली आहे. देवाला विनवणी करू लागली आहे :

**का धरला अबोला आढी आता सोडावी ।**
**मी शरण खंडेराया तुमच्या पायी ।।** ***(गीत क्र. २१)***

'देवा खंडेराया, मी तुम्हाला शरण आले आहे. तुमच्या मनातली आढी सोडून द्या. तुम्ही पहिल्यासारखेच माझ्याशी बोला. इथून पुढे कधीही मला अंतर देऊ नका. तुम्हीच माझा पंचप्राण आहात. माझे सर्वस्वच मी तुम्हाला अर्पण केले आहे. मला क्षमा करा, उगाच रागराग करू नका, अशी ही म्हाळसाची देवावरील अतुट भक्ती. बाणाईच्या प्रीतीबद्दल तर काय बोलावे? ज्याप्रमाणे श्रीकृष्णाच्या बायका रुक्मिणी व सत्यभामा यांच्यातील सवतीमत्सर पुराणकथा, लोककथा, लोकगीतांतून व्यक्त होतो, त्याचप्रमाणे लोकमानसात रुजल्या गेलेल्या खंडोबाच्या बायका म्हाळसा आणि बाणाई यांच्यातील सवतीमत्सर व्यक्त होताना दिसतो. म्हणूनच लौकिक जीवनातील भाव-भावना, त्यातील संघर्ष, उत्कटता पारमार्थिक पातळीवर नेऊन एकाच परमात्म्याच्या प्राप्तीसाठी चाललेला हा संघर्ष नुसताच मनोज्ञ वाटत नाही, तर मानवी मनाला उदात्ततेचा भव्य स्पर्शही करून जातो.

खंडोबाचे सारे जीवन-चरित्रच अलौकिकतेने आणि विविधतेने नटले आहे. त्यामुळेच खंडेराय, म्हाळसा, बाणाई आणि खंडोबाची राजधानी जेजुरीबद्दलचे महिमान लोकगीतांतून प्रकट होताना प्रकर्षाने जाणवते. खंडोबाबद्दल जेवढा भक्तिभाव भक्तांच्या मनात आहे, तेवढाच त्याच्या राजधानी जेजुरीबद्दल आहे. म्हणूनच लोकवाणीतून या जेजुरीगडाची महती वर्णिताना म्हटले आहे :

**देवा तुझी सोन्याची जेजुरी**
**गडाला नवलाख पायरी** ***(गीत क्र. २२)***

एवढेच नाही तर,

**सुवर्णाचा गड जेजुरी दक्षिणेत कोठं**
**नवखंडाचे माणूस येऊन बोलती येळकोट**
**नवलाखाचे तारांगण नवलाखाची जेजुरी**
**सुवर्णाचा कोट राजा करितो मल्हारी**
**भाव पाहूनि देव पावला जेजुरीचा राजा** ***(गीत क्र. २३)***

श्रीकृष्णाची द्वारका जशी कृष्णभक्तांना सोन्याची वाटते, तशी भंडाऱ्याने पिवळीधमक झालेली जेजुरीही खंडोबाभक्तांना सोन्याने मढविलेली वाटते. ती सोन्याची राजधानी जेजुरी आणि तिचा राजा खंडेराव महाराज यांच्या दर्शनाने आपल्याही जीवनात सोन्या-मोत्यासारखी समृद्धी लाभून जीवनाचे सोने (सार्थक) होईल, अशी त्यांची श्रद्धा होते. म्हणूनच प्रत्येक भक्ताला जेजुरीला पुन्हा पुन्हा जावेसे वाटते. त्यांच्या मनाला खंडोबा दर्शनासाठी हुरहुर लागून राहते आणि त्यांचे मन त्यांना सांगू लागते...

**चला जाऊ जेजुरी पाहू खंडेराव राजा**

**येळकोट येळकोट म्हणून चालल्या देवांच्या फौजा** *(गीत क्र. २४)*

अशी ही जेजुरी म्हणजे खंडोबाभक्तांचे सुखाचे माहेर. जेजुरीला जावे आणि खंडेराय माऊलीजवळ चार सुख-दु:खाच्या गोष्टी बोलाव्यात, गुजगोष्टी कराव्यात आणि त्याच्या चरणावर मस्तक ठेवून आनंदाने चार अश्रू ढाळावेत. वर्षभरातल्या कष्टमय जीवनाला, तोचतोपणाला कंटाळलेल्या सासुरवाशिणीला असे वाटणे साहजिकच आहे. म्हणूनच अशी जेजुरी पाहण्यास आतुर झालेली एक सखी दुसऱ्या सखीला सांगू लागली आहे :

**आल्या ग जन्मात सये जेजुरी करावी**
**नवलाखाची पायरी बाई ध्यानात धरावी** *(गीत क्र. २५)*

अशा या दोन जिवाभावाच्या सख्या जेजुरीला खंडेरायाच्या दर्शनाला आल्या आहेत. खंडेरायाचे दर्शन घेऊन गडाचे भव्य रूप मनात साठवत आहेत. त्यातील एकीला या गडाबद्दल फारच कुतूहल वाटू लागले आहे. एवढा मोठा गड कुणी बांधला असेल? असा प्रश्न तिला पडला आहे. म्हणून ती दुसरीला विचारत आहे की :

**जेजुरीचा गड कोण्या राजानं बांधिला**
**उंच कमानी दरवाजा आत चौक साधविला** *(गीत क्र. २६)*

अशा प्रकारे गप्पागोष्टी करत करत या दोन सख्या आनंदाने गडावर फिरत आहेत आणि फिरत फिरत एका वाघ्या-मुरळीच्या ताफ्याजवळ येताच त्यांच्या कानावर शब्द पडू लागले आहेत :

**म्हाळसा बाणूबाई दोघी दळिती भंडार**
**देव माझा खंडेराया, वाघ्या तोडितो लंगर**
**जेजुरी गडावरी वाघ्या मुरळी नाचती**
**म्हाळसाबाई बोले नंदी गाडीचे बुजती** *(गीत क्र. २७)*

पहिले गाणे संपून दुसरे गाणे सुरू झाले आहे. दुसरे संपून तिसरेही सुरू झालेय. अशी एकामागून एक गाणी सुरू होतात आणि संपतात. या दोघीही देहभान विसरून गाणी ऐकत असतात. खंडेरायाचे समक्ष दर्शन घेऊन आणि ऐकलेल्या वाघ्या-मुरळ्यांच्या गाण्यातून मनात साठविलेल्या खंडेरायाला पाहून दोघींचेही मन शांत होते आणि त्यांच्या मुखातून एकाच वेळी शब्द बाहेर पडतात -

**देवा पाहून मन झाले शांत**
**माझ्या देवाला सांगते गुपित !** *(गीत क्र. २८)*

अशा प्रकारे मानवी मनाचा वेध घेत देवाला लौकिक पातळीवर आणून आपल्या भाव-भावना त्याच्याशी एकरूप केल्या जातात, तेव्हा अवघ्या समाजजीवनाचे प्रतिबिंब अशा लोकगीतांतून जास्त स्पष्ट होत जाते. म्हणूनच लोककथा, लोकगीते, वाघ्या-मुरळीची गाणी निवेदनात्मक शैलीतून साकार होताना मराठी माणसांच्या भावविश्वाला खंडेराय किती व्यापून राहिला आहे, याची साक्ष पटते.

## कोळी लोकगीतांतील खंडोबा

जसे धनगर, रामोश्यांमध्ये खंडोबाचे भक्त व्यापक प्रमाणात आढळतात तसे ते कोळी लोकांमध्येही आढळतात. कोळ्यांची भक्ती पाहावयाची झाल्यास जेजुरीतील सोमवती यात्रेत त्यांच्या सश्रद्ध भक्तिसोहळ्याचे दर्शन भाविक यात्रेकरूंना पाहावयास मिळते. या समाजात 'भगतलोक' या देवाची नित्यनैमित्तिक आराधना करतातच; परंतु लहानापासून वृद्धांपर्यंत खंडोबाची नित्यसेवा करणारा हा समाज आहे. प्रत्येक सोमवतीला मुंबई व इतर ठिकाणच्या कोळीवाड्यातून हे लोक आपले देव पालखीने मिरवत जेजुरीला घेऊन येतात, त्याला 'पोवा' असे म्हणतात. एका एका पोव्यात जवळ जवळ ३०० ते ४०० स्त्री-पुरुष सहभागी होतात. ही सर्व मंडळी शनिवारपर्यंत जेजुरीत येऊन पोहोचतात. त्यांच्याबरोबर देवाच्या चांदीच्या मूर्ती, ढोल, पालखी व निरनिराळे ध्वज असतात. खंडेरायाची गाणी गात ही मंडळी शनिवार-रविवार असे दोन दिवस जागरण करीत असतात. सोमवारी गडावरील मुख्य खंडोबा पालखीबरोबर त्यांनी बरोबर आणलेली छोटी पालखीही बाहेर काढतात. पालखीत देव, देवकाठी, छडी वगैरे साहित्य असते. पूर्वी कोणी 'एक गोणभर भंडारा-खोबरे उधळीन' असा जर नवस केला असेल, तर ते यावेळेस मोठ्या भक्तिभावाने गोणभर भंडारा-खोबरे उधळतात. पालखी वाजत-गाजत कऱ्हा नदीवर जाते. सर्व कोळी भक्तगण जिथे देवाला स्नान घालायचे असते तिथून काहीशा अंतरावर पाण्याच्या धावत्या प्रवाहात थांबून असतात. त्यांची खंडोबावर

अपार श्रद्धा असल्यामुळे ते म्हणतात, 'देवाची अंघोळ झाली म्हणजे जे येणारे पाणी असते ते आपण अंगावर घेतले किंवा त्या पाण्याने अंघोळ केली की मन पवित्र होते. साऱ्या यात्रेचे समाधान आणि पुण्य लाभते.' असेच सोमवती अमावास्येनिमित्त जाणाऱ्या पोव्याचे खास असे सांघिक कोळीगीत असते. ते असे :

**है पावलाय देव मना मल्हारी**
**है पावलाय देव मना मल्हारी**
**देवा तू धावरे धावरे मल्हारी**
**देव माझा कोल्याला पावलाय मल्हारी**
**गडाला पायरी नवलाख मल्हारी**
**देव माझा किल्यान बसलाय मल्हारी**
**देवाची उडती निशानी मल्हारी**
**देव माझा गडाव चालला मल्हारी**
**देवाची निघाली पालखी मल्हारी**
**देव माझा करयवं निघाला मल्हारी**
**देवाला आंघोळी घालतान मल्हारी**
**देव माझा वस्ती गेला मल्हारी**
**देव माझा किल्यान आयला मल्हारी**
**है पावलाय देव मना मल्हारी** ***(गीत क्र. २९)***

## आंबवण्या

सोनकोळी जमातीची खास लोकगीते म्हणता येतील, असा कोळी लोकगीतांचा एक प्रकार आहे, त्यांना 'आंबवण्या' असे म्हणतात. यातील बरीचशी गाणी उत्स्फूर्त व आयत्या वेळी रचलेली असतात.

वारा थांबल्यानंतर होडी वल्हवताना किंवा खोल समुद्रात गाडलेल्या खांबांना लावलेली मोठमोठ्या माशांनी भरलेली अवजड 'डोली'ची जाळी ओढून होडीवर घेतेवेळी कोळी लोक या आंबवण्या गातात. काही आंबवण्या मल्हारी देवाच्या नावाने आळवल्या जातात, तर काही आंबवण्या रंगेल आणि थोड्या अश्लीलही असतात. मल्हारी देवाच्या आंबवण्या स्त्रियाही गातात. परंतु दुसऱ्या प्रकारच्या आंबवण्या फक्त पुरुषच गातात. जुन्या काळात रानातून सरपणाच्या मोळ्या डोक्यावर घेऊन घरी येताना किंवा दुसरीकडे वाहताना कोळी बायका 'आंबवण्या' म्हणायच्या. परंतु अलीकडच्या आधुनिक काळात या बायकांच्या तोंडी आंबवण्या क्वचित प्रसंगीच आढळतात. आंबवण्यांचा विशेष गुण म्हणजे दूर समुद्रात जाळी ओढण्यासाठी गेलेल्या पुरुषांना या आंबवण्यातून, गावातल्या कुणाही लहान-मोठ्या व्यक्तीवर टीका करता येते. शिवाय अशा वेळेस समुद्रावर म्हटल्या गेलेल्या या आंबवण्यात आलेली टीका, थट्टा किंवा बदनामी कुणी मनावर घ्यायची नाही, असा कोळी लोकांत संकेत आहे. त्यामुळे या आंबवण्यातून गावाच्या पाटलाच्या सुनेची, मुलीची किंवा एखाद्या घरातील गुप्त गोष्टीची जाहीर थट्टा करायला कोळी मागे-पुढे पाहत नाहीत. काही ग्रंथांत अशा प्रकारचे उल्लेख असले तरी अलीकडच्या काळात आंबवण्यातून अशा प्रकारची थट्टा-मस्करी कोणी करत असल्याचे आढळत नाही.

जेजुरीच्या मल्हारीरायावरील आंबवण्या अशा :

१) **पावलाय रे देव मलारी है**
**देव माजा जेजुरीघरचा मलारी है**
**देवाचा हालद्या भंडार मलारी है**
**देव पावण्यानि पावशी मलारी है**
**देवाची नवलाख पायरी मलारी है** ***(गीत क्र. ३०)***

२) **बाबा खंडेरी डोंगोर भालावी**

हे खंडेरी डोंगोर भालावी
देवाची दरी मुंडेरी भालावी
माज्या येताल बंदवा भालावी
दादा कोल्यांना पावलारू रे भालावी
अरे जलानचे बैनी भालावी
माज्या तूं  थलच्या लखम्या भालावी
माज्या तूं मेसको बैनी भालावी
माज्या घाटाच्या भिकंररा भालावी
देवा तुजी काली निशाणी भालावी
दादा बांलाना पावलास भालावी *(गीत क्र. ३१)*

खंडोबाच्या दर्शनाला जेजुरीला जाताना पुढीलप्रमाणे गाणे म्हणतात :

३) जेजुरी घर जाता, वारे दोही भुजी कलकी
मधी चाले पालखी, देवा मल्हारीची
जेजुरीवाटे काही उदूमाली,
दोही अंगीमळे हाळदीचे
वाटे लागले डराडू
किल्ल्यावरी बिऱ्हाडू देवा मल्हारीचा
वाट पाण्याची होदा
त्यामध्ये कमळ देवा सोनियाचा
सोनियाचा कमळ देवा, दिसे अती फार
दाखव रे देवा आपले जेजुरी घर
देवाच्या देवळाला सोन्याचे दरवाजे
त्यामधी सावराजे काय खंडोबा देव
जेजुरी घरा जाता वाटे बाभूळीची बना
हेलकोटू म्हणा, देवा मल्हारीचा
वाटे हाळदीचे मळे, उतरा रे करोंडे देवा भंडाराचे
वाटे नऊलाख पायरी
नऊलाख दिवटी देवाच्या मजूल्याला
वाटे वाण्याची दुकाना
पिवळी निशाणा देवा मल्हारीची *(गीत क्र. ३२)*

४) पावलाय रे देव मलारी
रे देव माज्या देव मला मलारी
रे पाव माज्या देव मला मलारी
देवा तुजी निंगाली स्वारी मलारी
करे नयला देव चाल्लाय मलारी
देवाची गबळ्यानं झोली हाय मलारी
देवाची उरतेय भंडार रे मलारी
देवा चिमटीनं भुशान रे मलारी
देवा नदीवं डेवरीलं मलारी

देवा तुज्या झयल्या आंगोली मलारी

**देवा रथाव चरविलाय रे मलारी**
**देव किल्ल्याला येतोय यो मलारी**
**भानूचे वाऱ्याला देव ऐकलाय रे मलारी**
**भानूचे नवलाख मेंडरं मलारी**

**देवा किल्ल्याना चाललास मलारी**
**देवा तुजी लावली सांकोल रे मलारी**
**देवाची होतान चागरान मलारी**
**वाग्या मुरल्या नाचतान मलारी**
**देवाला दिलं आसन रे मलारी**
**देव माजा जेजुरी घरचा मलारी**

**देवाचा हालद्या भंडार मलारी**
**देवाची नवलाख पायरी मलारी**
**देव पावण्यानं पावशी मलारी**
**पावलाय रे देव मलारी**
**देवाचा हेलकोट बोला मलारी** ***(गीत क्र. ३३)***

याशिवाय विविध प्रसंगांवर आधारित शेकडो कोळी लोकगीते, लोकसाहित्यविषयक वेगवेगळ्या ग्रंथांत आढळतात. झलक म्हणून बाणाई आणि खंडेराव देव यांच्या पहिल्या भेटीवर चित्रित झालेले एक हृदयंगम गीत येथे उद्धृत करीत आहे.

**चालली चालली गो भानयबाय बाऊडी पान्याला**
**उसलील्या निली भानयनी बुरायिल्या दुरी**
**मगारी बगिते गो भानयला वलवायला नाई कोनी**
**पुराडी बगिते गो भानयला वलवायला नाई कोनी**
**तवारसी येत होता गो खंडेराव देवू**
**तो ते बाद घोडेवर बैसला गो**

मागे-पुढे पाहत बावडीवर पाणी भरायला चाललेली धनगराची धांदरट पोर बाणाई. घोड्यावर बसून आलेला खंडोबा देव तिला मध्येच हटकतो आणि रूबाबात विचारतो, **''तू बाय कोनाची कोनुं?''** बाणू लाजत-मुरडत देवाला उत्तर देते, **'मी हाईनी धनगराची भानय गो !''**

**''तू बाय कोनाची कोनुं?''**
**''मी हाईनी धनगराची भानय गो!''**
**''तू दादा कोनाचा यो कोनु?''**
**'' मी हाई खंडेराव देवु !''**
**उजवा का यो हातु देवानी वटल्या घातिला गो**
**कारिल्या कारिल्या गो देवाने हालदुल्या भंडारा**
**लाविल्या लाविल्या गो भानयच्या कपाली लाविल्या गो**
**डावा का यो हातु भानयच्या दुरी लाविला**
**चालती झाली गो भानयबाय आपुले घराला**
**सदा काली भानय कुंकवाचं मेटु**
**''आज का गं भानय, हलदुल्या भंजरु?''**
**''वाटे भेटला खंडेरावू देवु''**

''त्यांनी लाविल्या हलदुल्या भंडारू'' *(गीत क्र. ३४)*

## अहिराणी लोकगीतातील खंडोबा

खान्देशातील गावागावामध्ये प्रमुख बोली बोलल्या जाणाऱ्या 'अहिराणी' मध्ये खंडोबावरील विपुल लोकगीते निर्माण झाली आहेत. त्यातही, खान्देशातील अनेक खंडोबास्थानामध्ये सर्वात महत्त्वाचे व पौराणिक माहात्म्य लाभलेले स्थान म्हणून चंदनपुरीला अधिक महत्त्व आहे. यामुळे चंदनपुरीशी संबंधीत लोकगीतांचा भरणा अधिक आहे.

१) खंडेरावाचं लगीन

**मोठे मोठे डोळे, देता मिश्यावरी ताव**
**मला काय माहित जेजोरीचा खंडेराव ॥१॥**
**म्हाळसा कशी म्हणे जेवण दाळ रोटी**
**मारीला बोकड्या धनगराच्या भानूसाठी ॥२॥**
**म्हाळसा परिस भानू आणली सडाची**
**नाही चढू दिली इला पायरी गडाची ॥३॥**
**म्हाळसा कशी म्हणे मी त वाण्याची व्हईल**
**धनगराची भानू गडाखाली मी ठेवील ॥४॥**
**म्हाळसा कशी म्हणे मी त वाणीयाची पोर**
**धनगराची भानू इनं बाटविलं घर ॥५॥**
**म्हाळसा कशी म्हणे मी त वाणीयाची मूल**
**धनगराची भानू इनं बाटविली चूल ॥६॥**
**दैवतात झालं मनुष्यात नवल काही**
**सवतीचं तोंड पाहिलं गं भानूबाई ॥७॥**
**देव खंडेराव उंबड वाण्याचा जवाई**
**सतरंजी दुपट्टावर वर घोंगडी तगाई ॥८॥**
**देव खंडेराव चंदनपुरीच्या पाटात**
**भानाई करता हिनं घातलं पोटात ॥९॥**
**धनगरीण बाई तुझ्या ताकामध्ये लेंढ्या**
**भानाई करता देव वाळे शेळ्या मेंढ्या ॥१०॥**
**जेजुरीचा खंडेराव आणली भानाई पाटाची**
**नाही चढू दिली इला पायरी घाटाची ॥११॥**
**देव खंडेराव आणली भानाई करून**
**इच्छा अंगावरी भंडारा पडतो चोरून ॥१२॥**
**जेजुरीचा खंडेराव अवतार शंकराचा**
**मालक झाला भानू म्हाळसाचा ॥१३॥**
**गावाच्या खालती काय वाजत गाजत**
**सोनेरी बासिंग लग्न खंडेरावाचं लागत ॥१४॥** *(गीत क्र. ३५)*

२) भानू-खंडूचं लगीन

**गिरणा थडीना धवया खडा**
**चंदनपुरीना धनगर वेडा रे**
**हजार मेंढरसना वाडा**
**त्यांनी रे दिना गावला वेढा**
**हिरवा मांडव तोडीला रे**

बाणू ना दारसे मांडव टाका रे
कलोरी कोणले बलावू रे
बाणू ना दारसे मांडव टाका रे
कलोरी कोणले बलावू रे
कलोरी जगदंबा बहिण
पत्र पाठवा रे बहिणीला
पत्र मिळना का बहिणीला
पत्र वाचून आनंद झाला
बहिण व्याघ्रावर स्वार
हाती त्रिसूल घेतला
पहाड पर्वत जोडीले रे
वनी देवी चंदनवाडीला
पाया खंडू ना मांडव रे
पाया मल्लू ना मांडव रे
हळद फोडली बहिणीने
भोळा नऊ वार
बामण कोणले बलावू रे
बामण काशी विश्वनाथ रे
राहस काशी क्षेत्रले
पत्र पाठवा बामनले
पत्र मिळनं त्या बामनले
पत्र वाचून आनंद झाला रे
सोड या काशी क्षेत्रले
वना चंदनपुरीले
कया ना खंडू ना मांडव
कया मल्लू ना मांडव रे
जाया पाचना टाइम
बामन मंगल बोलतं
भानू खंडून लागनं लगीन *(गीत क्र. ३६)*

३) म्हाळसा-बाणाई सवतीमत्सर
उंच वसरीला । समोर देवघर ।
येता जाता नमस्कार । देवा माझ्या मल्हारीला ।।
मना घुरट कोनी । धनगराची बानू ।
जेजुरीचा खंडेराया । तुला लुब्ध झाली बानू ।।
काखंला कोकरू । बानू चालली नटत ।।
मल्हारी देवानं । झेंडा रवला पेठेत ।।
धनगरीण बाई । तुझ्या ताकामंदी माशा ।।
देव ह्यो मल्हारी । सोडीना तुहा पिच्छा ।।
धनगरवाड्यात । कुतऱ्याचा केंघा ।।
देवा मल्हारीनं । बानू नेली लालबागा ।।
धनगरवाड्यात । कुतरी भुकती ।।
देव मल्हारीनं । बानू नेली कोन्या गती ।।

बानूबाई धनगराची । म्हाळसा वाण्याची ॥
नाही तिला रेंघू दिली । उंच पायरी गडाची ॥
काखंला कोकरू । बानू बुथीची देखिली ॥
म्हाळसाबाईनं । आरती उभ्यानं टाकली ॥
म्हाळसा बानाई । भांडती सवती दोघी ॥
दोघींचा झगडा । आईक माह्या देवा ॥
म्हाळसा मने बानू । तुझं काज काई ॥
मल्हारी राया देव । चोरून भंडारावी ॥
बानाई धनगराची । म्हाळसा वान्याची ॥
दोघींच्या दोन जाती । मल्हारी देवासाठी ॥ *(गीत क्र. ३७)*

४) देव निघना चंदनपुरीले
देव निघना चंदनपुरीले रे ।
वना रे चंदनवाडीले रे
तटे ते भानुबाईना वाडा रे ।
हजार धनगरसना मेळा रे ।
जाऊन राम राम घातला रे ।
धनगर माराया उठला रे ।
तो ते रे भानुबाईना वाडा ।
तीन निंबना डगळा ।
त्यावर बसेल कावळा रे ।
तो का भानुबाईना वाडा ।
भानूले विचारले रे लागा ।
हजार धनगरसना मेळा रे ।
भानू रे बाईना वाडाले ।
देव बोलाले लागना रे ।
मल्हारी रे बोलाले रे लागना ।
कोणी रे भोजन ठेवलं मला ।
धनगर भानगडी कराले लागनात ।
देव बोलाले लागणारे ।
मल्हार बोलाले लागना
तुम्ही रे भानगडी करू नका रे ।
तुम्ही रे मारामारी करू नका रे ।
मी काय सांगस तेवढं ऐका ।
मी काय बोलंस तेवढं ऐका ।
मनी रे संचानी बा रीत ।
सव्वा खंडीनं भोजन रे ।
सात रांजण भाकरी ।
जो का माले पुराई रे ।
त्यांना रे आठे चाकर व्हसू ।
त्याने रे आठे काम करसू ।
एक टाइमनं भोजन मनं ।
अशी रे भाऊ मनी रीत । *(गीत क्र. ३८)*

५) देव निघंना शिलागणी

**आर बोर न जंगल रे**
**पार हेकळ ना**
**मौर काटाक्यानं जाम रे**
**भीड कोणी रे भिडले**
**हाती सोनेरी चाबूक रे**
**देव ना वारू थयथय नाचे**
**हरी ना वारू थयथय नाचे**
**मालूना वारू थयथय नाचे**
**देव निघना शिलांगणी**
**आई बा निघना शिलांगणी**
**मालू ना वारू थयथय नाचे**
**काही कांबळनं आसन**
**देव निघना चंदनपुरीले**
**देव खंडेराव चंदनपुरीना पाटात**
**बाणाई करता येऊ घातलं पाटात**
**देव खंडेराव धनगरना भाचा**
**परणी आणि वाण्याघरनी म्हाळसा**
**वाण्याघरनी म्हाळसा जेवणी दाळरोटी**
**बोकड्या पाठवात धनगरणी बाणूसाठी**
**याय मावळना भेंडीनी सेंडीवर**
**ईज चमकनी धनगरनी मेंढीवर**
**आसन उसनं डोला मुसलमानना**
**सतना संगती पीर नंदूरबारना** ***(गीत क्र. ३१)***

६) खंडोबा लग्नमंडप

**काठ्या मांडवना गडना राजा**
**देव मांडव गड घरना राजा**
**मांडव घातले पितळी लाखा**
**तांबानी मेख सोनेरी देखा**
**मांडव गडावर निमनं झाड**
**छाया पडे घम्मा घोर**
**छायाखाली देव रमला**
**देव दचकून जागा झाला**
**नजर गेली सूर्यातळी**
**सूर्यातळी गाव मोघ्यानं**
**मोघ्यानी वस्ती बंदोबस्ती**
**गिरक्या मारे त्या कोटले**
**फेऱ्या घाले त्या कोटले**
**देव दरबार जवळ आला**
**दरबार होता भर झोपात**

भर रात्री हाक मारी
हाक मारी त्या दरबारले
भाला लायात त्या कोटले
तोडी जंजरी कुलूप
देव गावात शिरला, मल्हारी गावात शिरला *(गीत क्र. ४०)*

७) म्हाळसा-बानाई
पिकंना पिकंना चंदनपुरीना बजरा
चंदनना मळा वर मल्हारी गोजरा
पिकंना पिकंना चंदनपुरीना शिवार
बानू नारी करता सोडलं मल्हारीनं घर
म्हाळसा बानाई दोन्हीच्या दोन जाती
मल्हार देवा करता जेवल्या एक ताटी
म्हाळसा म्हणे मी वाण्याची पोर
बानू धनगरनी हिनं बाटवलं घर
म्हाळसा म्हणे मी जेवनू दूधपुरी
बानूना जीव करता बोकड्यांना गळे सुरी
म्हाळसा सवाई कयी बानाई चढनी
चडू नही दिधी तिले पायरी गडनी
बानाईले पाही म्हाळसाले क्रोध वना
भंडारना थाळा उभल्यानं आदळना
जेजुरीना देव देव तुना मना एक
भंडारना गाडा वारू जुपसू समाईक
जेजुरीना वाटे कशानी धावपळ
बैल नंदीनी सुटी पडे गेजमाळ
जेजुरी गडावरी वाघ्याचा झाला मेळा
तठूनी ओळखिला बाळ भगतना गळा
जेजुरीले जाता आडवी लागे कऱ्हाबाई
तठूनी आरती भोळा मल्हारीले दायी
नेंनता बाळले दिवटी बुदली तोलेना
जेजुरी गडावरी कोणी येळकोट बोलेना
मना घर खंडेराव मना खंडीना येव्हारा
सोनानी छत्तरी घडू मोत्यांना देव्हारा
देव खंडेराव आनंद कया मना
पानना फुलना घट उजवसू तुना *(गीत क्र. ४१)*

८) चंदनपुरीचा खंडोबा
गिरण व मोसम ना मेळा तिथे सोनेरी पिंपळ
त्याले लाया रेशमी नाडा झोका खाती साती बाया
झोका खाता हार तुटना वेचून वेचून हार गुंफला
तोहि हार म्हशांना गळे
जुंप रे म्हशा रंगीत गाडी
रंगीत गाडीले खिल्लारी जोडी

**रथ चालना सूर्यातळे, सूर्यातळे गाव मोघ्याना**
**मोघ्यानी वस्ती बंदोबस्ती**
**गिरक्या मारी त्या कोटले**
**थाप पारी त्या दरबारले**
**दरबार होता भर झोपात तोडिले जंजरी कुलूप**
**देव गावात शिरला**
**देव गया दुबळान घर**
**नको येऊ बा मना घरा**
**तुझे अगणीचे घर मनारे अमंगळ संसार**
**तुनीरे नाही होणार सेवा**
**तुनी नाही होणार चाकरी**
**नको रे खेड्या मन धरू**
**बोला भक्तांओ सदानंदाचा येळकोट !**
**खंडेराव महाराज की जय !** ***(गीत क्र. ४२)***
(वरील गाणे अंगात येतेवेळी आणि दिवटी-बुधली करतेवेळी म्हणतात.)

९) वान्या रे बांध हयदीनी पुडी
**मन-घर खंडेराव भंडारानी मोठी गोडी**
**देव खंडेराव खंडे खंडे झुंजे**
**त्यांना डावा भुजे बानाबाई निजे**
**देव खंडेराव यावा खंडे खंडे तारा**
**त्याना डावा भुजे बानाबाई घाली वारा**
**देव खंडेराव याना खंडे खंडे मोती**
**त्याना डावा भुजे बानाई उभी होती**
**वाजती सयागया वाजती शंखभेरी**
**खंडेराव नवरदेव सर्वा मुलखे चाल करी**
**जेजुरी गडावर सोनाना तालिमखाना**
**खंडेराव नवरदेव मुरल्या गाती गाना**
**बंधवाले सांगू आणू जेजुरी जत्रा भाऊ**
**चांदीना खंडेराव मोतीन्या लडा लावू** ***(गीत क्र. ४३)***

## अहिराणी लोकगीतातील खंडोबाची 'वाङ्मयीन मूर्ती'

खंडोबाची व्यक्तिचित्रे अनेक लोकगीतांतून त्या त्या ठिकाणच्या बोलीभाषेत रेखाटलेली आढळतात. खान्देशी अहिराणी लोकगीतांमध्ये खंडोबाच्या व्यक्तिचित्राचे स्वरूप साधारण पुढीलप्रमाणे आढळते :

**मोठे मोठे डोळे, देता मिश्यावरी ताव**
**मला काय माहित, जेजोरीचा खंडेराव**

खंडोबाच्या रुबाबदार व पुरुषार्थरुप व्यक्तिमत्त्वाची झलक या दोन ओळींतून चितारली आहे. तर पुढील गीतात खंडेरायाचे धनगराच्या वेशातले व्यक्तिचित्र रेखाटले आहे :

**तुझ्या खांद्यावर घोंगडी रे देव मल्हारी काना**
**तुझ्या डोक्याला पागोटी रे देव मल्हारी काना**
**तुझ्या भुंड्याला लंगोटी रे देव मल्हारी काना**
**हाती चंदनाची काठी रे देव मल्हारी काना** ***(गीत क्र. ४४)***

वरील व्यक्तिचित्रण म्हणजे खंडोबाची वाङ्मयीन मूर्तीच आहे.

### लिंबाची गोष्ट (ग्रामीण कथा-काव्य)

ही लोककथा डॉ. गुंथर डाएटस् सोंथायमर यांच्या संशोधनातून पुढे आली आहे. अस्सल ग्रामीण बाज असलेली, बोलीची नादमय लय आणि लफ्फेदार नोकझोक असलेल्या या कथेमध्ये वाचकाला गुंतवून ठेवण्याचे सामर्थ्ये आहे.

**तवा आसं काई झालं, महाराज । खंडुबानी म्हाळसानी काई केलं । म्हाळसान खंडुबा आसी कुटं श्याजारी बसली व्हती । तवा रोज आपली आसी कुटं बसाइची । तवा हिगडीपरधान त्याचा म्याव्हना, 'इजिमाइलासिका,' म्हंगाला, 'यांचा वाकुडपणा आणला पाइजे काइतरी'। तवा परधानानी काइ केलं । जे पळत जे सुटला ती भॉळ्यापसी ग्याला । भॉळा म्हणतो, 'आरे, आरे, परधाना का आलास'। 'आता काइ सांगू, द्यावा, तुला । द्यावाजीनी सोगट्याचं डाव मागितलत' । 'आसुं हे', म्हंगाला, 'हा, हा, आसं हे' । म्हणाला, 'आ ल्याका, कशाचं डाव,' भॉळा म्हणतो । 'हा भांडणं लावाइच्यामाघं आलाइ । ह्यो रे, कसलं सोगट्याचं डाव नेहतोय' । तवा मंग त्यानी काइ केलं। 'बरं,' म्हंगाला, 'बरं, बबा, आलास । जा सोगट्याचं तिथलं दोन डाव उचल आण जा घेवूनशनी' । आता त्यानी काइ केलं । दोन सोगट्याचं डाव उचाललं आण ग्याला घेऊनशानी । आता द्यावाजवळ जवळ ग्याला । 'ये, द्यावाजी, द्यावाजी' । 'आरे, काइ म्हनतो' । 'आरे, ही तुला करमणुक आणली, हे बग' । 'आरे, काइ' । 'आरे, सोगट्याचं डाव उगाची उगाच बसतोस आण मुकाट्या बसतोस तं हे खेळलं मजी करमणुक तरी व्हइल तुला' । म्हंगाला, 'बरी की आणलीस । आ ल्याका, बरं, का वाइट' । आता देव आंतरी म्हणतो 'च्याइलासिका ह्यानी भांडान आणलं घरात । ह्यानि हे कशाचं डाव आणलेत । बरं आणलं हे बरं झालं' । आता महाराज काई झालं । त्यानी ते डाव न्याह्याल्यावर द्यावाजीच्या म्होरं टाकलं । आता द्यावाजीनी घेतलं गॉळा करुन । आता आसं काइ झालं । आंधुळआष्ट्यान किली आण द्यावाजी आता डाव खेळलं पाइजेत । आता द्याव आपला ग्याला डावाव, डावाव बसला । आता पयिला डाव बॉलला पाचाचा । डाव पडला आडचाचा । पुन्हा डाव बॉलला धाचा । डाव पडला पाचाचा । पुन्हा डाव बॉलला पंधराचा । डाव पडला धाचा । पुन्हा डाव बॉलला इसाचा डाव पडला पंधराचा । पुन्हा डाव बॉलला पंचविसाचा। डाव पडता इसाचा । झालं द्यावाचं डाव पुरं । आता म्हाळसाव डाव आलं । आता म्हाळसानी काई केलं । नाहून धुवून महाराज भांगटिळा करून, रंगन वढून, पिवळं पाताळ निसून, उजवा पायी रंगनात टाकला आण डावावर बसली । पहिला डाव बुलली सवाचा । डाव पडला आडचाचा। पुन्हा डाव बुलली आडचाचा । डाव पडला पाचाचा । पुन्हा डाव बुलली पाचाचा । डाव पडला धाचा । पुन्हा डाव बुलली धाचा । डाव पडला पंधराचा । पुन्हा डाव बुलली पंधराचा । डाव पडला इसाचा । डाव बुलली इसाचा । डाव पडला पंचविसाचा । झालं डाव पुरं । 'आता, द्यावाजी,' म्हंगाली, 'काई कराइचं। तर आता डाव आपूण खेळलो, याचा इसाब करायचा' । 'आ ल्याका,' म्हंगाला, 'कशाचा इसाब आलाय । झालं आसतील कुणाचं तरी जास्ती, आता काइ कराइचय' । 'छा छा,' म्हंगाली, 'द्यावा, रडीची खडी घिवू नकुस । खरं आसल ती खरं व्हइल । कुणाचं डाव जास्ती झालं ती इसाब कराई पाइजे । ती बघितलं पाइजे' । आता म्हंगाला, 'तिच्याइला बघा, करा' । म्हंगाली, 'माझं डाव जास्ती झालं तर तुम्ही सम्द उतरून आंगावलं ठेवलं पाइजे । तुमचं जर जास्ती झालं तर कच्च्या घागरीनी पाणी मी तुमच्याहितं वाहीन' । 'आसं हे,' म्हंगाला । 'हा हा,' म्हंगाली, 'आंस हे, आरे द्यावाजी, तुम्ही डाव क्यावढ्याचं बॉलला व्हता' । 'इच्यामाइलासिका, मी बोललो व्हतो पाचाचा वाटतं' । 'मंग क्यावढ्याचा डाव पडला'। 'डाव पडला आडचाचा, वाटतं' । 'आण त्वा डाव क्यावढ्याचा बॉलला' । 'डाव बोललो धाचा' । 'डाव क्यावढ्याचा पडला' । 'डाव पडला पाचाचा' । 'पुन्हा डाव क्यावढ्याचा बॉलला' । 'डाव बोललो पंधाराचा' । 'डाव क्यावढ्याचा पडला' । 'डाव पडला धाचा' । 'पुन्हा डाव क्यावढ्याचा बॉलला' । 'डाव बोललो,' । म्हंगाला, 'इसाचा। डाव पडला पंधराचा । डाव बोललो पंचविसाचा आण डाव पडला इसाचा ।' म्हंगाला, 'झालं आमचं डाव पुरं' । म्हंगाली, 'बरं, तुमचा**

इसाब झाला, आता आमचा करा बघू'। म्हंगाला, 'बरं, करा । तुम्ही डाव क्यावढ्याचा बोलला व्हता' । 'आम्ही डाव बोललो व्हतो सवाचा । डाव पडला आडचाचा' । 'द्यावा, डुकीला काइ हे ती खाली उतरून ठेव' । म्हंगाला, 'डुकीला मंदील हे' । 'ठेव बघू उतरून' । उतारला । 'द्यावा,' म्हंगाली, 'डाव बुलली आडचाचा। डाव पडला पाचाचा। आंगामंदी काइ हे, उतरून ठेव' । म्हंगाला, 'हाये कोट' । 'उतरुन ठेव' । ट्यावला उतरुन । 'आता डाव क्यावढ्याचा बुलली' । 'डाव बुलली पाचाचा । डाव पडला धाचा' । 'द्यावा, कंबरला काइ हे, उतरुन ठेव' । म्हंगाला, 'कबंरला करगुटा हे' । 'ठेव उतरुन । पुन्हा डाव क्यावढ्याचा बुलली'। 'पंधराचा। डाव पडला इसाचा'। म्हंगाली, 'द्यावा, हातात काइ हे' । म्हंगाला, 'सॉन्याची आंगठी हे' । 'उतरून ठेव खाली' । द्यावानी ठेवली । 'पुन्हा डाव बुलली इसाचा । डाव पडला पंचविसाचा' । 'द्यावा,' म्हंगाली, 'पायामंदी काइ हे' । 'तॉडा हे' । तॉडा ट्यावला काढून । आता म्हंगाली, 'द्यावा, जास्ती डाव कुणाचं झालं'। 'डाव,' म्हंगाला, 'तुमचंच जास्ती झालं' । 'आमचं जास्ती झालं ना, द्यावा, सम्द उतरून ठेवलस पण तेवडं गळ्यातलं कातांडं उतरून ठेव' । 'छा छा छा छा,' म्हंगाला, 'ते कातडं नाइ उतरून ट्यावायचो' । 'का, आरे, द्यावा,' म्हंगाली, ' ते कातांडं तं तेवढं उतरून ठेव'। 'छा छा,' म्हंगाला, 'तु काइ जरी केलस तरी ते काइ ट्यावायचो नाही । ते बॉटभर कातांडं मला पॉट भराइ पाहिजे' । तं म्हंगाली, 'त्या बॉटभर कातांड्यावर सारी रात वाघ्यामुरूळी उभी करशील । जागरान करशील, तुझ्या नावानी सारी रात गाणं गातील, जागरानं व्हतील।' मंग द्यावानी काइ कातांडं ठेवलं नाइ उतरुन । झ्यांडा भंडारी घितली आण देव रूसूनशानी आसा कुठं, महाराज, चावढीमंदी ग्याला । देव चावढीमंदी निजल्यागत झाला । आता ते निजल्यागत झाल्यावर सप्नी बाणाई दिसली । परधानाला काइ म्हणतो, 'आरे, आरे, परधाना, लवकर,' म्हंगाला, 'सुतार बोलव । हा चंदनखांब कोर । ह्यां खांबामंदी मनुष्य शिरलय'। 'आरे, द्यावा,' म्हंगाला, 'तुला का,' म्हंगाला, 'याड लागलं का काइ, आरे, ह्या खांबामंदी मनुष्य कुटं शिरतं व्हइ। आरे, तुझं मुतानी पॉट फुगलं आसल आण उताना निजला आसशील आण सपान पडलं आसल तुला, मनुष्य कुटं खांबात शिरतं व्हइ'। 'काइ जणू, तिच्याइलासिका,' म्हंगाला, 'पण मला सपान पडलय, तिच्याइलासिका, शिरलय' । 'आरे, मुताबिताया ग्याला व्हतास का' । 'आरे,' म्हंगाला, 'गेलो व्हतो । ग्याल्यावानी झालतो । एवडं एवडं याक डबार साटलं व्हतं याक घोडं पाणी प्याया सारकं' । 'आरे, खरं का खोटं' । 'आरे, खरच साचल्यावानी झालं व्हतं'। 'बरं झालं, तिथली कर्तुक तिथं' । मंग काइ झालं, महाराज । देव आसा रूसून आता म्हंगाला, 'परधाना ह्या नगराला हाळी मार' । हाळी मारुनशानी आता म्हंगाला, 'शिकारीला जावू । चला रे, चला' । देव चालला शिकारीला । मंग काइ केलं । तॉफा बंदुक्याचं बार भरलं । सबन नगराला हाळी मारली । 'चला, रे चला, देव चालला शिकारीला' । द्यावाच्या माघं बारा हजार सैना । निघूनशानी चालली । जिजुरगड सॉडला आण आशी कुटं चाललिया खालती । तवा जाता जाता पानपटी इसरून राहिली । तवा हिगडी परधानाला काइ म्हणतो, 'आरे, आरे, परधाना, पानपटी घेऊन ये आपल्याला' । परधान माघारा ग्याला पानपटी आणाइला । तिकून म्हारनी आपल्या सरपानाच्या मॉळ्या घेवून आल्या । सरपानाच्या मॉळ्या घेवून आल्यावर म्हाळसा वरनं बगतिया। 'आरे, आरे, द्याव चालला रूसून । ह्या द्यावाला, रांडाहो, म्होरं,' म्हंगाली, 'सरपानाच्या मॉळ्या घेऊन जा, पाच मॉकळ्या घागरी घेऊन जा। द्याव माघारा फिरवा' । आता त्या म्हारनी काइ म्हणू लागल्या, 'आगं, बया, देव चालला रूसून जाइना हालक्या उलासानी आण बाणाई इना चुडा भरूनशनी आमचं गं काइ जातय' । 'बरं, रांडाहो, नाही ना तुम्ही जात,' म्हंगाली, 'तुम्हाला मिरच्याची धुरी दिती, तुमची कोपटं सम्दी जाळती आण तुम्हाला मिरच्याची धुरी दिवून जाळते' । आता एक म्हारीन व्हती म्हातारी । 'आगं, रांडाहो,' म्हंगाली, 'यावडा द्याव लावला रूसूनशानी म्हाळसानी आण तुमची गं काइ किम्मत हे। चला की द्यावाला आडव्या जावू' । मंग काइ झालं, आशा कुटं त्या म्हारनीनी, बाबा, अशा घ्यातल्या गवर्याच्या पाट्या, कुणी घ्यातल्या सरपानाच्या मॉळ्या, कुणी घ्यातल्या मॉकळ्या घागरी आण द्यावाला आडव्या ग्याल्या । देव हिकून निघालाया । हिगडी परधानानी पाहिलं। 'आरे, आरे, द्यावाजी, मॉठा,' म्हंगाला, 'आपल्याला आपसकून झाला'। 'आरे, कशाचा' 'आ ल्याका,' म्हंगाला, 'मॉकळ्या घागरी आल्या । सरपानाच्या मॉळ्या आल्या आण गवर्याच्या पाट्या आल्या । आपल्याला मॉठा आपसकून झाला' । 'आरे,' म्हंगाला,

'आपल्याला बूलीपरमान घेवून ये। मॉकळ्या घागरी व्हतील पाणी प्यायला । गवर्या व्हतील इस्तू प्याटवाइला आण सरपान व्हइल चुलीला लावाइला । घेऊन ये दिलं तं त्यांनी ।' ह्यानी काइ केलं, कुरकुरपचं भंडार उधळलं आण त्या घागरी मधानी भरलीत । ह्या गवर्याचं झालं तळीव मळीव । सरपानाचं झालं ऊस आण ते परधान आसा जवळ जवळ ग्याल्यावर, 'आगं ये, बायाहो, ह्या मॉळ्या द्यायायच्यात का' । 'दियाचीत की, बाबा, झालं, बाबा' । खाली जु डुकीवनं टाकतीत तं त्याचं बनलीत ऊस । मंग म्हारनी फिरल्या । 'बाबा,' म्हंगाली, 'काइ, रे तु घ्याणार पडला, आरे ह्या थळावनं त्या थळाव, त्या थळावनं त्या गुर्हाळाव, टिपरं टिपरं गॉळा करुन आणलं' । ल्याकराबाळाला चालावलइ, आण तुला रे, कोण देतया । झालं, बाबा, त्या बदालल्या । आता ग्याला गवर्यावाल्यापसी ।' 'आगं, बायाहो, ह्या पाट्या द्याता का' । 'आरे, बाबा,' म्हंगाली, 'घ्यातल्या तं दियाच्या हाइत की' । बाया आशा खाली उतरुन बगतीत तं ते सम्द तळीव मळीव । 'आरे, बाबा,' म्हंगाली, 'कसला रे, आलाइ तु घ्याणार ।' हे घर पीट, त्या घरी जा। त्या दारात उभी राहा । तिथनं योक निवद घे, हितनं योक निवद घे । आन ल्याकराबाळाला गॉळा करुन चालवलत, आण तुला, रे कुटलं दियाचं' । आता ग्याला, बाबा, घागरीवं । 'आगं, बायाहो, तुमच्या घागरी दियाचित का' । 'व्हइ की, बाबा, दियाचित, म्हंगाली, 'आता घागरी जु डुकीवनं खाली उतारतीत तं मदानी डबाबलीत । 'आरे बाबा, आमच्या घागरी भरलीत । ह्या कडा उचकट, त्या दगोड उचकट, ते झाडझुडूप, तिथं मद बघ हितं मद बघ । हितला वाइच, तितला वाइच, तिला वाइच गॉळा क्याला । आण घागरी भरुनशानी चालावलीत पॉराबाळाला खायान तुला रे, कुटला दियाचा'। झालं, बाबा, त्या बी बदालल्या । मंग काई झालं । 'आशा त्या घागरी,' आता म्हंगाला, 'गड्या बूलीपरमान एक एक घागर तरी द्या' । मंग एक घागर घितली । गवर्यावाल्याक ग्याला । म्हंगाला, 'पाच गवर्या तरी द्या' । पाच गवर्या घ्यातल्या उसवाल्याकं ग्याला । पाच ऊस घेतलं आण द्यावापसी ग्याला । 'ये, द्यावाजी, द्यावाजी,' आ, 'टिकूरं खाता का टिकूरं' । 'काइ म्हणतो,' म्हंगाला, 'लका आरे, टिकूरं खातो का,' म्हंगाला, मनं काइ म्हणतो । आरे, ऊसाचं टिपरं खातो का टिपरं । 'उसाचं टिपरं म्हंगालास, व्हय,' म्हंगाला आण हिकडं मंग ते घेतलं तवा, बाबा, आता काइ झालालं हे, जागरान सार्यारात चक्क पुजूनशानी मधी घागर ठेवतो । चवकडं चार ऊस बांधतो । त्याला ती कडाकनी बांधतो । सार्यारात त्याचं जागरान घालतो । मंग हे जागरान हितं झालं । म्होरं कर्तुक काइ झाली त्याची । मंग देव आसा शिकारीला ग्याला । शिकार करू लागाला । पयिली हाळी मारली । गादगादा रान भेलं । दुसरी हाळी मारली । झाडं झुडं भिली। तिसरी हाळी मारली । कडाबाली सुटल्या । चवथी हाळी मारली। आशी कुठं खांडं पिटवून काडली । पाचवी हाळी मारल्यावर शिकार करू लागला । सहावी हाळी मारली । आसं कुटं मासाचं उडवं घातलं । आशा कुटं शिकारीच्या सिराड्या रचल्या, आण देव शिकार करू लागला। तवा बारा हजार सैना आसी कुटं तान्ह्याली । जळसोस सॉधला । पाणी नाही कुटं आण बारा हजार सैना जिजुरगडाला आली । द्यावानी काइ केलं । आसा कुटं देव काळ्या कड्याला बसला । 'आरे, आरे, परधाना,' म्हंगाला, 'गड्या, आता कंठास पराण आला । तहान तं लागली । पाणी तं नाही' । परधान मंग ही कडा सोधतोय, ही बारव सोधतोय । ती नदी सोधतोय । पाणी काइ कुठं नाही । मॉट्या कड्याव चढला तवा तिथं योक भुजंग म्यालाला व्हता । तवा त्या भुजंगाची लाळ बॉटावानी गळून आपली ती याक्या नळीतनं ती आपलं डबार साचलं व्हतं । 'आईला,' म्हंगाला, 'तितं पाणी हे । म्हणून बिगीबिगी ग्याला । पहिली झारी बुडावली । आता देव प्याल्याशिवाय आपूण कसं प्यायाचं। म्हणून द्यावाला भरून चालावली । आता ते इस चालावलं भरून । अंतरी म्हाळसाला कळलं । 'आरे, आरे, देव मराया करतो । आत हे इस पेवूनशानी जगदुनयाला आंधार पडल' । मंग काइ केलं म्हाळसानी, गरूड पक्षाची बाळं बॉलावली । 'आरे, आरे, पक्षाच्या बाळाहो लवकर,' म्हंगाली, 'लगुलग मानंच्या जॉरानी, पायाच्या न्याटानी, पखाच्या जॉरानी झारी पालथी करा। पालथी करूनशानी तेवडं इस वतून द्या' । गरुड पक्षाची बाळं जी सुटली, जशी जशी गुंगाट्यानी गिली, तशी, पायाच्या न्याटानी, पखाच्या जॉरानी आन मानंच्या न्याटानी पालथी झारी किली । पालथी झारी क्याल्यावर बाणधनुष्या परधानानी जॉडला आण 'आईलासिका,' म्हंगाला, 'देव तान्ह्यालाया द्यावासाठी मी पाणी चालावलं । इजीमाइला पक्षानी पालथं केलं' । म्हणून बाणधनुष्या जॉडला । जे पक्षा जी निघाला ती कमळाच्या

झाडाव जावून बसला । कमळाच्या झाडाव बसल्यावर तिथं काइ केलं, बाणधनुष्या आसा जॉडावा त तिथं त्या भुजंगाव नदार गिली । 'आरे, रेरेरे, रे, रे,' म्हंगाला, 'च्याइलासिका मॉठा घात झाला । आईला, या गरुडपक्षानी हे जर इस नसतं वतलं तं देव प्याला आसता तं म्याला आसता' । मंग काय केलं, गरूडपक्षाची बाळं बॉलावली । त्यांच्या पाठीवनं हात फिरावला । त्यानला सुडून दिली । आता द्यावाला पाणी न्याहाइचं कुठलं । तवा, दादा, काइ केलं । मोठा आघ्राळ्या योक वड व्हता । त्या वडावर चढला आण तिथनं, बाबा, वडाव चढूनशानी पाहिलं । तं या ल्यांड्याचं धूर, सा सा महिन्याचं ढिग ही कुठं प्याटलालं त्याचा कुठं धूर निगत व्हता । 'आईला,' म्हंगाला, 'त्यो धूर निघतोय त्या ठिकाण्याव,' म्हंगाला, 'पाणी आसल' । देव तं मुरून बसलाई । लगे परधान ग्याला । आण म्हंगाला, 'पाणी द्यावा,' म्हंगाला, 'धूर निघतोय तिथं पाणी आसल । मी घेवून येतो' । 'बरं, बरं,' म्हंगाला, आता त्यो परधान जी निघाला तं, बाबा, ग्याला । आता ग्याल्याव आळशी कुंडी. आण दुबळी धुंडी त्यांचं घर आसं नेमकं कॉपर्याव, त्यांनी याता याता पाहिलं । आता पाहिल्यावर मंग काइ इकीमिकीला म्हणतीत, 'आगं, बया, कोंडे, आगं,' म्हंगाली, 'ते काइ ग यतया' । 'आगं,' म्हंगाली, 'काइ आसल ति लेंडघार हे । आगं, आपल्या मिंढ्या ग्याल्या उठून आण ती लेंडघार नाइका आखराव इती ती आसल'। 'आगं, नाही गं धोंडे,' म्हंगाली, 'आगं, माणुस दिसतय' । 'आगं नाही नाही,' म्हंगाली, 'लेंडघार आसल' । बरं, आसा जवळ जवळ ग्याला । तं ही माणुस दिसलं । 'आगं,' म्हंगाली, 'बया, इना का आला तं कोण म्याला,' म्हंगाली, 'आपलं गं का न्याह्याचाइ। ' नेहलं तं, म्हंगाली, 'बाणाईचं धनदिरव्य निहील । आपलं गं काइ न्याह्याचाइ गरिबाचं' । मंग, बाबा, आसा जवळ आला। आता जवळ आल्यावर आसा कुठं बाणाईनी पाहिला । सात रत्नाची झारी । आसी कुटं त्यानी पाहिली । सात रत्नाची झारी ठीविली आण नवू रत्नाची झारी द्यावाला भरून दिली । नवू रत्नाची झारी भरून दिल्यावर परधानानी कुटं घितली । आता देव पाणी प्याल्याशिवाय त्याला पाणी प्यायाचं नाही । आता, बाबा, त्या द्यावापसी ग्याला । देव काळ्या कड्याला चिपून बसलाइ । आता लांब जु हाये ह्या भिताडाइतका देव लागला हासाइला । आता देव हासाया लागल्यावर, 'आ ल्याका,' म्हंगाला, 'द्यावा, तू खुशाल हासतोया आण मला पळून पळून नकोसी परान झाला । धर, पाणी पे' । 'आता लका, माझी गिली तहान । आता नाइ मला तहान' । 'आ ल्याका,' म्हंगाला, 'काइ द्यावा तु' । तवा मंग काइ झालं । देव म्हंगाला, 'माझी गिली तहान' । मंग आता तहान गिली म्हंगाल्यावर 'काइ ल्याका,' म्हंगाला, 'द्यावा, मी पळून पळून कटाळलो । आण तु म्हणतो माझी तहान गिली' । 'बरं,' म्हंगाला, 'परधान आता माझी गिली तहान । तु पे पाणी । आण कुठनं आणलय पाणी तिथं जाऊ' । 'आरे,' म्हंगाला, 'द्यावा, तिथं कसलं आलय । तिथं माइंदाळ्या बाया । उफारटी थानं टाकलीत माघं कुकरी करढं पितीत । काइ, रे, ती आपल्याला जगून दितीत । तु काइ बॉलला-बिललास तर मारतील, बाबा, आपल्याला' । 'नाइ, नाइ,' म्हंगाला, 'काइ नाइ बॉलाइचो । तु सांगशील तसा मी काही बोलाइचो नाही । तु सांगशील तसा वागल ।' 'आसा वागशील'। 'हा,' म्हंगाला, 'आसा वागल' । आता, बाबा, देवन दोघं निघालं । आता आसं निघल्यावर जवळ जवळ जुग्याला तं आळशा कुंडीचन दुबळ्या धुंडीचं कॉपर्याव बिर्हाड । 'आगं, कोंडे,' म्हंगाली, 'काल योक आला व्हता । आज दोघं दिसतितय, कोण गं, बया, हे' । 'आगं नाही गं, धोंडे, त्या लेंडघारी हेता' । त्या म्हंगाली, 'मिंढ्याच्या आखारव आल्या आसतील । त्या दुन्ही इतिताया' । 'आगं नाही गं माणसावानी दिसताइन आगं,' म्हंगाली, 'इना का आलं तं आपलं गं काइ न्याह्याचाइ । नेहलं तं, बाणाईचं निहीतील' झालं, बाबा, आसं जवळ जवळ आलं । साडंतिनशे सनगरनी, साडंतिनशे धनगरनी आशा कुटं उभ्या राहिलीत । उफारटी थानं टाकलीत । कुकरी करढं पितीत । आण माघं कुणी घेतलय मुसाळ, कुणी घ्यातला फाटा, कुणी घेतलं लाकुड, कुणी घ्यातलाइ पाटा, कुणी घ्यातलाइ वरुटा । आशा कुटं उभ्या राहिलीत । उभ्य राहिल्यावर बाणाई काय म्हणती । 'बरा बॉलाल तं बरा नाही तं भला, कुटून करा कनकीचा उंडा' बरं हे । आता हे जवळ जवळ ग्याल्यावर, साडंसातशे उभ्या राहिलीत । तवा हा जवळ जवळ देव ग्याला । देव एकदम त्यातितका हे तं त्या भिताडावानी । 'ये, बायाहो, आल्याका,' म्हंगाला, 'तुम्हाला काइ नवरंबिवरं हेत का नाही' । आरं, तुझा मुढदा ग्याला तुझा यागदाचा, अमचं नवरंबिवरं लागला वानाइला'। जवा लागलीतइ कुटाइला तवा कुणी वरूट्यानी मारतय, कुणी पाट्यानी

मारतय, कुणी लाकडानी मारतय । जे जे देव त्यातनं निसाटला, ल्यांड्याच्या ढिगाव जावून बसला । गबा गबा ल्यांड्या खाया लागला । मंग बाणाई आली । 'आगं, रांडाहो,' म्हंगाली, 'ते याड्यावनं यडं आण गबा गबा ल्यांड्या खातय आण त्याला ग काइ मारता' । झालं, बाबा, त्या घरूघर ग्याल्या । मंग त्यो देव तिथंच रहिला । परधान जेजुरगडाला पळून आला आण देव तिथंच राहिला । तिथं राहिल्याव साजंचा ग्याला । सांजचा ग्याल्याव मेंडकं शेळकं आपल्यावानी जमून आलं मग आसा देव तिथं आला । 'ये, ल्याका,' म्हंगाला, 'मला गडी ट्यावता का रे, कुणी'। 'हा, हा तुज्यासारका काइ म्हणतो । आ ल्याका, माझी हे तारमळ, तिच्याइला, राहा, म्हातार्या, राहा, माज्याहितं, आता, बाबा, तु ट्यावलास, सकाळच्या पहारी तुज्या बाइकुनी भाकरी क्याल्या, दॉघाच्या आपल्या'। 'दॉघाच्या भाकरी खावून घ्यातल्या । तरी म्हातार्याचं पॉट भराना । आता बाइकू सांजची म्हणू लागली, 'बया, आपल्या दॉघाचं जेवान खाल्लं'। तरी म्हंगाली, 'त्याचं पॉट भराना । नकू बाबा, आपल्यात' । 'ये बाबा, तु आलास,' म्हंगाला, 'म्हातार्या आपल्याला नकू, बाबा, तु आपलं हाये तिच बरं हे' । मगं, बाबा, त्यो म्हातारा तिथनं निघला । 'आता,' म्हंगाला, 'काइ इचार क्याला' । म्हंगाला, 'हे आता बाणाईच्या हितं ट्यवा' । मंग बाणाईच्या हितं ट्यावला । मंग त्याला सवाखंडीचं आनपाणी, रांजणभरुन ताक मंग आसा देव खावू लागला । मंग फुगू लागला । दुइदुइ हातानी । दह्यादुधाचं फुरकं मारू लागला । मिशा वारू लागला । मंग देव चाकरी राहिला । द्यावाच्या चालल्या हिकडं मिंढ्या । दुनवीच्या चालल्या हिकडं । द्यावाच्या मिंढ्या आल्या तट फुगून आण दुनवीच्या मिंढ्या लागल्या लाडलाड कराइला । 'लका, म्हातारं, चांगलं मिंढ्या चारतइ । म्हातार्यानी मिंढ्या चारल्या' । म्हातार्याला बाणाई काइ म्हणती । 'आरे, म्हातार्या, आरे, बसलाइस तं,' म्हंगाली, 'ते नवालाखाची गोधन हे ती कॉकर्याला वाइच लिंबाबिंबाचं ढाळ घालीनास' । म्हातारं जी गेलं आण लिंब धर की टाक, आण बाभळ धर का टाक, ती नवालाखाची गोधन पार मारून टाकली । ठार कुकरी मारली । आता ठार कुकरी मारल्यावर, बाणाई जु आली सांच्यापाहारी बघाइला तं ही कुकरी सबंधी मारुन टाकलीत । मरून पडलीत । 'आरे, आरे, वाटुळ्या,' म्हंगाली, 'सारी कुकरी मरून पडलीत, आरे, चला ये, माझी बघाइला' । तवा आपलं गनगावडं बघाइला गेलं । पार कुकरी गड्यानी मारली । मंग आता कुकरी जु बघाइ गेलं कुरंकुरपचं भंडार उधाळलं तं ती गडी बघाया ग्याल्यावर ती कुकरी गुचू गुचू गुचू गुचू गुचू पाला खातीत । 'आ ल्याका, बाणाई, काइ ग लबाड हेस तु' । 'आ ल्याका, म्हंगाला, 'काइ कुकरी पाला खातीतइ आण काइ फुगलीतइ आण तु म्हणतीस की कुकरी मारली । लका, लबाड कशी बुललीस' । झालं, बाबा, बाणाईला लबाड किली । आता म्होरं काइ झालं, 'आता मिंढ्या,। म्हंगाली, 'नान्हाइ जायाच्या' । म्हातारा ग्याला नान्हाइला । 'बाणाई,' म्हंगाला, 'लवकर ये भाकर घेवून । सवा खंडीचं आणपाणी आण रांजण भरून ताक' । बाणाईनी भाकरी क्याला । सवा खंडीचा घाटाघुटा क्याला । आं रांजंन भरून ताक घेतलं आं बाणाई भाकरी । घेवून गिली । ह्यानी धर मिंढी आपट, धर मिंढी आपट । रक्ताचं पूर इकीकं, मिंढ्यच्या शिराड्या इकीकं, बाणाई जु तिथं गिली तं करूळं क्यास तुडू लागली' । 'आरे, आरे, आरे, म्याल्या ही रे, काइ,' म्हंगाली, 'केलंस । आरे,' म्हंगाली, 'सार्या मिंढ्या मारून टाकल्यास । रक्ताचं पूर चाललत । मिंढ्याच्या शिराड्या रचलीत । आण कसल्या नान्हतोस' । 'आ ल्याका, दम, बाणाई, मला जेवूंदे जरा, भूक लागली आधी । 'आरे, तुझी डुली गिली,' म्हंगाली, 'कसला जेवतोइस तु आरे, सारं वाटूळं केलस जिनगानीचं' । 'बरं बरं बरं,' म्हंगाला, 'म्होरं हो, म्होरं हो, म्होरं हो,' ह्यानी कुरकुरपचं भंडार उधाळलं । जशी जशी जी मिंढ्याची म्होर लागली तशा बाणाईला कशाला आइकत्यात । बाणाई ह्यो पायी उच्यालती की त्यो पायी सराट्यानी भरतोइ । त्या पायातलं सराटं काढती की दुसरा पायी भरतोइ । आशी बाणाई तिथं कटळून गिली । जे जे मिंढ्या जी सुटल्या ती कुनब्याच्या जोंधळ्यात ग्याल्या । तरी बाणाई तिथंच चाललीया । ह्यानी काइ केलं । त्या दह्याचा ड्यारा घ्यातला वतून आण त्या दुइ दुइ हातानी वरबडू लागला । मिशा वारु लागला । दुइ दुइ हातानी वरबडून आसा तट फुगला । पाणीबिणी प्याला । आण मंग मिंढ्यच्या माघं ग्याला । तं त्या कुनब्याच्या सार्या जोंधळ्याला मिंढ्यानी याढा दिला । हा जावूनशानी तिथं एक कुळव पडला व्हता । तवा त्या कुळवाला उसं दिलं आण तिथं आपला निजला । पेशल निजला आण मिंढ्यानी पेशल जोंधळा खाल्ला । आता, बाबा, कुनबी आला याढ्यला तं जोंधळा पार वावरातला खाल्ला । 'आ ल्याका,

**उन्हाळा क्याला' । म्हंगाला, 'आ ल्याका, माझा जोंधळा पार खाल्ला । चला बघाइला माझा भरून घ्यायाचाइ' । म्हणून आसं पाच पंच निघालं आण जोंधळा बघाया जु चाललं तं ह्यानी कुरकुरपचं भंडार उधाळलं, आगदी जोंधळा पण निस्ता दुइथड्या बसलाइ । सबन सारका आगदी । 'आ, तुझ्या आइलासिका,' म्हंगाला, 'लबाड रे, काइ तु काइ बॉललास, आरं, जोंधळा दुइथड्या बसलाइ आण सबन सारका बसलाइ आण तू म्हणतोस की जोंधळा पार खाल्ला । म्हणून चार्ही कोपरं हिंडला ह्या कॉपर्याला ग्याला । त्या कॉपर्याला ग्याला । पंच म्हणू लागलं, 'लका, आता आम्हाला बघाया आणल्यासारकं हुरड्याला चार कणसं तरी मोड' । म्हणून चार कॉपर्याव ग्याला । कनीस काइ मॉडाया जिव व्हइना । तवा तीन कॉपरं हिंडलान चवथ्या कॉपर्याव ग्याला । तिथं बाँब ठुकली । ती, बघा, आता तीन कॉपरं इतीतन योक कॉपरा जातोय । तवा त्यानी कणीस नाही मोडलं । आण मंग काइ झालं महाराज, तिथनं तथि कर्तुक झाली । आता सांजचा म्हातारा ग्याला, आता गनगावडं बॉलावलं । 'ये गनगावड्याहो,' म्हंगाला, 'हिकडं या काइ रे, म्हातार्या' । तं म्हंगाला, 'ह्या बाणाईचन माझं लग्न लावा आण ही ल्यांड्याची आक्षादा टाका दॉघावबी आण कॉकर्याची गोधन सुडून द्या । कुकरी ब्या ब्या कराइ लागली की आम्हाव आक्षादा टाका' । आसं हे म्हंगाले, 'तं आसं हे' । मंग काइ झालं, बाबा, ते ठरावलं । मंग संध्याकाळी आसी सांजची नवलाख जानी चरुन आली । कॉकर्याची गोधन सुडली आणि मंग सामंधुमं ल्यांढ्याची आक्षादा टाकली । आण त्याची लग्न लागल्यावर लगचे त्यानी काइ केलं, बाणाई घातली घोड्यवरी उधाळलं कुरंकुरपचं भंडार, बाणाई घातली घोड्यवर, आला जिजुरगडला निघून । बाणाई बघती माघारी । 'आरे, आरे, द्यावा । गनगावड्याचं लागलं भांडण । धुल्यामोगर्याचं लागलं भांडण । जगदुनव्या लागली माझ्यासाठी मराइ । उधळ,' म्हंगाली, 'कुरकुरपचं भंडार आन त्यांची भांडणं तोडव' । त्यांनी कुरकुरपचं उधाळलं भंडार आन त्यांची भांडणं तोडावली ।** त्यांनी जसं राज्य केलं तसं तुम्ही करा ॥[८]

## भानसेचे वऱ्हाड : गद्य-पद्यमिश्रित कहाणीचा बाज

वेंकोना हा 'भानसेचे वऱ्हाड' या रचनेचा कर्ता असून त्याचा निश्चित काल उपलब्ध नाही. पण 'खंडेरायाचे ऐसें लग्न । पढतां वांछित होतें पूर्ण । शिवाश्रीतें व्यंकोबाने । गायिजेलें सद्भावानें ॥' या उल्लेखावरून हा कवी तंजावरच्या शिवाजीच्या काळातील (इ.स.१८३३ ते १८५६) असावा, असे वाटते. खंडेरायाच्या दुसऱ्या लग्नाची ही कथा आहे. खंडेरायाला स्वप्नात भानारी (बाणाई) दिसते. **'तनु जीयेची केतकीपरी । मांड्या कदली जणुं केस सोनेरी ।'** अशा भानरीला स्वप्नात पाहून देव मोहित होतो. तो म्हाळसेकडे जातो. ती त्याचे स्वागत करते. 'रत्नताटी सड्रस पक्वान्न' वाढते, त्रयोदशगुणी तांबुल देते, तरीही तो प्रसन्न होत नाही. भानारीच्या वेडाने त्याचे मुख कोमेजलेलेच राहते. 'तुमचे मुखकमळ कोमेजलेले का?' असे म्हाळसा विचारते. तीस 'सहा महिने, सहा राज, सहा घटिका, सहा पळे शाहरी असल्या तुम्हा आम्हां उभयतांत वाईट पडले' असे सांगून शिकारीचे निमित्त करून खंडेराव भानुरीच्या शोधार्थ निघतो आणि तिच्याशी लग्न करून तिला घरी घेऊन येतो, अशी ही कथा आहे. लोकजीवनातही पारंपरिक संदर्भ व संकेत आणि मधूनच कहाणीचा बाज घेऊन ही कथा येते.

ही रचना श्लोकबद्ध असल्याचे मराठी वाङ्मयकोशात म्हटले आहे. वस्तुत: ती गद्य-पद्यमिश्रित असून अधूनमधून संवादस्वरूपीही आहे. पद्य दिंडीत असून त्यातून कथा पुढे जाते व पद्यानंतर 'बोलूणे (म्हणजे संवाद) असा निर्देश येतो. पुढे **॥ म्हाळसा बोलते॥, ॥देव बोलतो॥, ॥मोरलिंग बोलतो॥, ॥भैरव बोलतो॥** असा निर्देश करून संबंधित पात्राचा संवाद येतो. कधी 'देव जागा होवोनि पुरोहित चिंतामणिभट्टास पाहून काय बोलतो', असे 'बोलणे' येते व त्यानंतर 'पद' येते. उदाहरणार्थ,

**देव जागा होवोनि पुरोहित चिंतामणिभास पाहून काय बोलतो॥ पद॥**
**स्वप्न देखीलें मी कथूं कोणासी ॥ म्हणे चिंतामणि कथीं म्हाळसेसी ॥ध्रु.॥**
**देव आला तैं म्हाळसेपासीं ॥ भावें पंचारतिं करी तयासी ॥१॥**
**रत्नताटी सड्रस पक्वान्न ॥ वाढी तै देव करी भोजन ॥२॥**
**दिलें तांबुल त्रयोदशगुणे ॥ म्हणे व्यंकोबा ऐक सावधान ॥३॥**
**म्हाळसा बोलते ॥ स्वामी तुमचे मुखकमळ कां कोमेजलें आहे ॥**

**देव बोलतो ।। पिंपळाच्या पारावर सदर केलो होतों ।।**
**तेव्हां चिंतामणिभट्ट मणालाज ।।४।।**

लोकजीवनातील कहाणीचा बाज तसेच अद्‌भुताचा स्पर्शही या लेखकाला आहे. हा बाज कसा, ते पाहा.

**।। भा. बो. ।। सख्यांनो कौलाच्या पेठेच्या हाटास जाऊं ।। चला ।। दिंडी ।। जाडी घोंगडी घेतली ।। भानु दुकानी बैसली ।। पुढें घोंगडी टाकिली ।। देव येवुनि काय बोले बोली ।। बो.।। घोंगडीचा मोल काय ।। भा. बो. ।। सव्वा लाख सोनटक्का ।। दे. बो. ।। ऐसे घेणार गिरायीक कोण ।। भा. बो. ।। ऱ्डीचा कानोबा ।।१।। द्वारकेचा कृष्णनाथ ।।२।। गोकु-चा नरसिह ।।३।। चौथे तुम्ही आलां आहां ।।**

प्रधानाच्या सल्ल्यानुसार म्हाताऱ्याचे रूप घेऊन देव भानुसेच्या घरी गुराखी म्हणून राहतो. मोडक्या कुऱ्हाडीने लाकडे तोडतो. तिच्या शेळ्यामेंढ्या चारायला नेतो. एकदा भंडारा उफराटा फुंकतो, त्यामुळे शेळ्यामेंढ्या माना टाकतात. भानुसेच्या आज्ञेनुसार देव पुन्हा शेळ्यामेंढ्या उठवतो. 'हे भाव काय?' असा प्रश्न भानुसार विचारते, तेव्हा 'मी जेजुरीचा मार्तंड भैरव । तुला वऱ्हाड करून घेणेस आलो' असा गौप्यस्फोट तो करतो. त्यावर 'कोणी गुराख्याने ओहढून नेली.' असे माझे गोत म्हणेल. यासाठी 'तूं तेजी स्वार होवोनि गोतानिर्शी मला बलावून घेऊन जा।।' असे भानुसार त्यास सांगते. त्याप्रमाणे खंडेराय तिला घरी घेऊन येतो. म्हाळसा व भानुसा यांच्यात कुरबुर होते. पण पुढे हे भांडण विरते. अखेर 'देव दोघ्या बाइलीसींसहित आनंदाने भक्ताचे मनोरथ पुरवीत जेजूरगडी नांदतो.' असा कथेचा समारोप करून **'भानसेचे लग्न जे गाती। जगीं यशोवंत होती।।ध्रु.।। धनधान्यादि संपत्ती।। पुत्रपौत्रकळत्र लाभती।।'** अशी फलप्राप्तीही वेंकोबाने सांगितली आहे. लोककथेच्या जवळपास जाणारी ही रचना पारंपरिक 'पुराण ग्रंथ' रचनेपेक्षा वेगळी आहे.[९]

## शाहिरी वाङ्मयातील खंडोबा

महाराष्ट्राला शाहिरांची परंपरा खूप मोठी आहे. होनाजी बाळा, सगन-भाऊ, राम जोशी, प्रभाकर, परशुराम, अनंत फंदी, हैबती, पठ्ठे बापूराव या आणि अशांसारख्या अनेक नामांकित शाहिरांनी आपली कला महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात नेऊन पोहोचवली आणि अवघ्या मराठी माणसांचे मनोरंजन केले. त्यामुळे या शाहिरांचे महाराष्ट्रावर आणि मराठी माणसांवर पिढ्यानूपिढ्यांचे उपकार आहेत.

ऋषी, संत, पंत, वरदी कवींनी आणि लोकसाहित्यकारांनी आपल्या लडिवाळ प्रेमभक्तीच्या आविष्कारातून लीलास्वरूप वर्णन करून खंडोबाची प्रेमळ वाङ्मयमूर्ती उभी केली, त्याच प्रकारे शाहिरांनीही आपल्या खास शाहिरी ढंगात लावणी, पोवाडे आणि भूपाळीच्या माध्यमातून या लोकदेवाचे गुणगान गात खंडोबाभक्तीचा 'नवा बाज' निर्माण केला. यातही दोन लोकप्रिय शाहिरांचेच नाव अग्रक्रमाने घेतले जाते आणि ते म्हणजे शाहीर होनाजी-बाळा आणि शाहीर सगन-भाऊ. या महान शाहिरांनी खंडोबावर लावणी, भूपाळी लिहून खंडोबा वाङ्मयात मोलाची भर घातली आहे. शिवकालीन शाहीर अज्ञानदास याच्या पोवाड्यातही पालीच्या खंडोबाचा उल्लेख आला आहे.

## शाहीर अज्ञानदास

शाहीर अज्ञानदास याचेच दुसरे नाव अग्निदास. कार्यकाल - सतरावे शतक. वास्तव्य - पुणे. या शिवकालीन शाहिराने अफजलखान वधाच्या प्रसंगानंतर शिवाजीराजांच्या मातोश्री जिजाऊ माँसाहेबांच्या सांगण्यावरून 'अफझलखान वध' नावाचा पोवाडा लिहिला. सध्या उपलब्ध असलेला हा सर्वांत जुना पोवाडा आहे. (सुरावर म्हणता येणाऱ्या या गद्यप्राय रचनेस 'कटिबंध' किंवा 'कडाका' असेही म्हटले जाते.) या पोवाड्यात पालीच्या खंडोबासंदर्भात स्फुट उल्लेख आढळतो. शाहीर अज्ञानदास लिहितो :

**खान दरमजली कूच केला । चालूनि पालीकारणें गेला ।।**
**पालीचा खंडोबा । अजामत दावी मोगलाला ।**
**न्हाटो-न्हाटो रे भाई बोलिला । तीन कोस मोड केला ।।**
**दीपमाळ बांधिली देवाला । मग खानाचा भोग पुरला[१०] ।।**

म्हणजेच अफजलखानाने ज्या वेळी पालीच्या खंडोबा मंदिरावर आक्रमण केले, त्या वेळेस या देवाने खानाला चांगलीच 'अजामत' (हिसका) दाखविली, म्हणून खंडोबा मंदिरासमोर खानाने दीपमाळ बांधली. तेव्हा कुठे खानाची सहीसलामत सुटका झाली, असे या शाहिराला वरील रचनेतून सुचवायचे आहे.

अशा प्रकारे औरंगजेबामुळे 'मल्लुखान' तर अफजलखानामुळे 'अजामतखान' ही दोन मुसलमानी नावे खंडेरायास प्राप्त झाली.

## शाहीर होनाजी-बाळा

होनाजी सयाजी शिलारखाने. मूळ गाव सासवड. संपूर्ण आयुष्य पुण्यात पेशवेदरबारी व्यतीत. होनाजी बाळाच्या जन्माबद्दल ठामपणे माहिती सांगता येत नाही. शाहिरी वाङ्मयाचे काही संशोधक अभ्यासक इ. स. १७५४ ते १८४८ हा त्यांचा जीवनकाल मानतात. काही संशोधक त्यांची वाङ्मयीन संपदा आणि पेशवे दरबारी असणारे वास्तव्य यावरून त्याचा कार्यकाल अठराव्या शतकाचा उत्तरार्ध आणि एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध मानतात. तमासगिरांच्या तत्कालीन प्रथेनुसार लावणी किंवा इतर काव्य रचणाऱ्यापुढे गाणाऱ्याचे नाव लावले जाई. म्हणून रचनाकर्ता शाहीर होनाजी आपल्या नावापुढे गायक 'बाळा'चे नाव लावत असे. अवघ्या महाराष्ट्राचे सश्रद्ध कुलदैवत जेजुरीच्या खंडोबावरील लावणी हा त्याच्या एकूणच अध्यात्म रचनेतील मानदंड ठरलेला आहे. त्याने लिहिलेली 'लावणी मार्तंडाची'हे संत तोडीचे भक्तीपर गीत असून, त्याच्या ठायी वावरणाऱ्या श्रेष्ठ खंडोबाभक्तीची आठवण करून देते ते पुढील रचनेवरून आपल्या लक्षात येईल :

**त्रिशूळधारी श्रीमल्हारी उभा पर्वतावरी ।**
**वामांगी म्हाळसा शोभती चार आयुधे करी ।**
**धर्मात्मज सत्यऋषी निभ्रांत त्या मनचुल पर्वती ।**
**सबळ दैत्य मणिमल्ल ते पद्मनोभववरदे या क्षिति ।**
**निर्जरास ते आले ऋषी आश्रमाप्रती ।**
**यज्ञकुंड विध्वंसुन ऋषी प्रमदे लागून ताडिती**
**सहकुटुंबे ऋषी जाऊन राहिले आणिके स्थळी निश्चिती ।**
**हे संकट वर्तमान सांगू गेले इंद्राघरी ।**
**इंद्र म्हणे ते अजिंक जिंकील विष्णू क्षणभितरी ।।१।।**

**असे ऐकून मखकारक विष्णु मंदिरात पातले ।**
**रत्नमंडपी हरीने त्यास वर्तमान सांगितले ।**
**तो म्हणे क्षणात त्रिनेत्र निवटील हे असुर मातले ।**
**चला सांगू कैलासी दैत्य जे तुम्हा श्रमी वर्तले ।**
**भेटून शिवास निशाचरे अनुचित श्रवणी घातले ।**
**हे ऐकून शूळपाणी प्रतापे क्रोधाग्नि तापले ।**
**पिनाककर म्हणे चला शीघ्र तुम्ही मृत्युलोकी सत्वरी ।**
**विदारून दैत्यास ऋषी स्थापून मनचुल शिखरी ।। २।।**
**सप्तकोटी सुरगणांसहित कर्पूरगौर धावले ।**
**ऋषीरक्षणालागी त्वरे मनचुलगिरी पावले ।**
**सांभचमु आणि दैत्यचमुद्वय युद्धी सरसावले ।**
**विषकंठाचे वीरे दैत्यदळ स्वर्गपंथी लाविले ।**
**मणिमल्ल दोघे उरले ते शंभुकरे विसाविले ।**
**प्राणातांचे समयी काही वरदान मागू भावले ।**
**दैत्य म्हणे निलकंठा तू मज चरणरजे उद्धरी ।**
**मल्हारी हे नाम जनमुखी वदीव कुंभिनीवरी ।।३।।**

**शततारका नक्षत्र शुद्धपक्षी मार्गेश्वरी ।**
**चंपाषष्ठी मित्रवार अवतार धारी पेमरी ।**
**मल्लांतके नेमिली तेथून संस्थान पाली दुसरी ।**
**नळदुर्गी तिसरे स्थळ बरवे चवथे जेजोरी ।**
**कृपाकटाक्षे करून पूजिती भक्त मूर्ती निजकरी ।**
**तो हा मल्हारी दृष्टि पाहिला नगाचे शिरी ।**
**होनाजी बाळा म्हणे आश्रय धरिला अंतरी।**
**तुजविण आता नसे आम्हाला त्रैलोक्यभीतरी ।**
**त्रिशूळपाणी धारी श्रीमल्हारी उभा पर्वतावरी[११] ।।४।।**

होनाजी-बाळाने लिहिलेल्या या लावणीत खंडोबाचे सारे चरित्रच आपल्यापुढे मूर्तिमंत उभे राहते. या लावणीमध्ये त्याने 'मल्हारीमाहात्म्या'तील मार्तंडभैरवाचा अवतार आणि विजयाची कथा गुंफली असून, त्यात तीर्थक्षेत्रांचा क्रम सांगितला आहे.

खंडोबाच्या एकूण चौदा मुख्य तीर्थक्षेत्रांपैकी 'जेजुरी' हे सर्वांत महत्त्वाचे तीर्थक्षेत्र व प्रस्थानपीठ म्हणून ओळखले जात असले तरी होनाजीने आपल्या लावणीमध्ये पेमरी (पेंबर), पाली, नळदुर्ग आणि शेवटी जेजुरी असा क्रम दिला आहे. अर्थात्, त्याचा हा आत्माविष्कार आहे हा भाग वेगळा.

## शाहीर सगन-भाऊ

शाहीर सगन-भाऊच्या जन्म-मृत्यूबद्दल तंतोतंत माहिती उपलब्ध नसल्यामुळे त्याचा कार्यकाल ठामपणे सांगता येत नसला तरी साधारण इ.स. १७७८ ते १८५० असा त्याचा कार्यकाल मानला जातो. परंतु तो शाहीर होनाजी बाळाच्या काळातच होऊन गेला हे मात्र निश्चित.

महाराष्ट्राचा हा बहुरंगी, बहुढंगी लोकप्रिय शाहीर कलाकार खरा प्रसिद्धीच्या झोतात आला तो त्याने खंडोबावर लिहिलेल्या अमर भूपाळ्यांमुळे. पेशव्यांसह साऱ्या बहुजन समाजाचे कुलदैवत असलेल्या खंडेरायाची लोकप्रियता त्या काळी शिगेला जाऊन पोहोचली होती. खंडेरायावर लिहिलेल्या भूपाळ्यांमुळे आणि त्यांचे आपल्या अनेक शाहिरी कार्यक्रमांत सुंदर सादरीकरण करीत असल्यामुळे तो बहुजन समाजाच्या जास्तीत जास्त जवळ जाऊन पोहोचला. परंतु आणखी महत्त्वाचे असे की, यापेक्षाही तो खंडेरायाच्या अधिक जवळ जाऊन पोहोचला. तेव्हापासून जेजुरी गडावरील मंदिरात रोज पहाटे आणि लिंग कऱ्हेपठारावर गणपूजेच्या वेळी त्याची भूपाळी म्हटली जाऊ लागली. आजतागायत त्यात खंड पडलेला नाही आणि भविष्यातदेखील पडणार नाही.

ज्याप्रमाणे अनेक संतकवींनी खंडोबावर आरत्या लिहिल्या परंतु पहिला मान मिळाला तो समर्थ रामदासांनी लिहिलेल्या आरतीलाच. त्याचप्रमाणे खंडोबावर अनेकांनी जरी भूपाळ्या लिहिल्या असल्या तरी खंडोबाचरणी महत्त्वाचे स्थान मिळाले ते सगन-भाऊने लिहिलेल्या भूपाळीलाच. खरोखरच, सगन-भाऊचे भाग्य थोर.

शाहीर सगन-भाऊच्या स्मृतिप्रीत्यर्थ जेजुरीमध्ये दरवर्षी सांस्कृतिक कला महोत्सव मोठ्या थाटामाटात साजरा केला जातो. त्याच्या नावाने दरवर्षी एका प्रसिद्ध कलाकाराला पुरस्कारही दिला जातो. त्याची खंडोबावरील भूपाळी तर जेजुरीच्या घराघरांत केव्हाच जाऊन पोहोचली आहे. आजही महाराष्ट्रातल्या अनेक खंडोबा तीर्थक्षेत्री खंडोबाभक्त सगनभाऊच्या भूपाळ्या आवडीने गाताना दिसतात. एकूणच खंडोबा वाङ्मयामध्ये या भूपाळ्यांना अढळस्थान प्राप्त झाले आहे.[१२]

सगनभाऊ विरचित 'खंडोबाच्या भूपाळ्या' :

(१) **प्रात:काळी उठूनी गणपतीचे । करी विष्णू स्मरण । काशी उज्जैनी अवंढी परळी । त्र्यंबक त्रिनयन ।। १ ।। सोमनाथ सोरटी बद्रिके । रामेश्वरी स्नान । श्रीशैल्या मल्लिकार्जुन । मानता जाण ।।२।। मातृलिंग गोकर्ण तारीले । चांडाळी भिन्न । भक्त अलभ्या ऋषि स्मरावे । दत्त हनुमान ।।३।। मोक्षाच्या पुऱ्या सात । हरिद्वार किंचित पहा । द्वारका जगन्नाथ । क्षणभरी पंचवटीत रहा ।।४।। गंगोत्री कुशावर्त जल निर्मळ गंगानाथ । विठ्ठलचरणी वाहू तुळशी भक्त । करील साह्य ।।५।। सगनभाऊ मारुतीस म्हणती । नाथ प्रसन्न**

आहे । वृक्ष बकुळे वरती पक्षी । रावे गजबजती ॥६॥ कागांचा कलकलाट दारी । चिमण्या चिवचिवती । भक्त तयांचे प्राणी कोकीळा । आंबे वणी राहाती ॥७॥ उंच वृक्षावर तास पिंगळे । मोर ठाव करिती । कुंभ घेऊनी शिरी देवांगना । पाण्याला जाती ॥८॥ कायापूर जेजुरी शुद्ध ॥ सव्यांगी कऱ्हा वाहाती । लेप सुगंधित उटणे । बानू म्हाळसा लाविती ॥९॥ घंगाळी उष्णक उदक । देव चौरंगी नहाती । पिवळे पितांबर । कस्तुरी टिळा लेती ॥१०॥ एक फुलाई माळीण । गळा हार घालिती । एक मालावती मुरळी । गुण आवडीने गाती ॥११॥ रंभाई शिंपीण भरवी । शेल्याला दोरा भरवी । अलंकार पिवळे अंगावर । शालजोडी पिवळी ॥१२॥ दिले चंदनाचे पाट बसाया । घालिती रांगोळी । उठ लवकरी मलूराया । म्हाळसा बोले प्रात:काळी ॥१३॥ उटणे मी लाविते तुम्हाला । सण आज दिपावळी । छत मंडप झालरी । फुलांचे पडदे मंदिरी ॥१४॥ ठायी ठायी उदबत्त्या दारी । सुगंधित सारे । ऐने महाल चमचमा चमकती । हंड्या बिलवरी ॥१५॥ घ्या दिवटी जळे मशाल । उजळे प्रकाश महाद्वारी । अंगणात दीपमाळा पेटल्या । आगीन झाडे चारी ॥१६॥ ऐने महाल लखलखा झळकती । कळस सोनेरी । सडे सुगंधित अंगणे । वर रांगोळ्या पाट ॥१७॥ हरोहार समया जळती । ऋषि पंक्तीचा थाट । बानू म्हाळसा वाढिती । हाती सोन्याचे ताट ॥१८॥ अमृत फळ नारिंगे । गोड द्राक्षे अंजीर केळी । पुढे तबकामध्ये आणून ठेवीती । मालावती मुरळी ॥१९॥ उठी लवकर मलुराया । म्हाळसा बोले प्रात:काळी । उटणे मी लाविते तुम्हांला । सण आज दिपवाळी ॥२०॥ सुगंधित विडे मुखी रत्नाला । लांछीत प्रभा दिसती । भरगच्ची पोशाख अंगावर जाम पठाण वस्ती ॥२१॥ शिरी मंजील शिरपेचकंठी । चौकडा ठाव देती । वर मोत्याचा तुरा चमकतो । दीपकाच्या ज्योती ॥२२॥ चुन्या करून पोशाख म्हाळसा । तबकामध्ये ठेविती । डुबदागिन्यामध्ये बानुबाई । शृंगारची नटती ॥२३॥ करूनी सोहळा श्रृंगार म्हाळसा । पडद्यातून पाहती । जामदार करी भार हारोहार । हुकूमामध्ये राहती ॥२४॥ सारखा गजर चरणी । शेष पाताळी डुलती । ऐकूनिया नाद शिखरे । वर पारवे घुमती ॥२५॥ लखलखाट बिजल्यांचा । तारे स्वरूपांचे तुटती । जरी पदरांचा झोक शेलारी । निर्गुणची पिवळी ॥२६॥ केळी कर्दळीचा गाभा म्हाळसा । फुलचाफे कळी । उठी लवकर मलुराया । म्हाळसा बोले प्रात:काळी ॥२७॥

(२) उटणे मी लाविते तुम्हाला सण आज दीपावळी । परमेश्वर शिवसांब कृपाघन सोमनाथ सोरटी । शक्ती युक्ती सर्वांग भूषणे । हिमगिरीजा गोरटी ॥१॥ महंकाळ कंकाळ काळहर । काळ केशरी शिवा । अष्टमूर्ती लक्षणा शैल्य शिव । दु:ख निवारक शिवा ॥२॥ रेवाटट वास । वासुदेवकीता । निर्गुणा निर्विकल्पा । निर्गुणा निशाकलंका । तांडवाधीशदेवा विश्व पाताल पालका ॥३॥ प्रथमनाथ मृत्यूंजय तारक । विश्वेश्वर शंभो । सकल गुणा ना त्रिपुरांतक । मणिमल्लांतक विभो ॥४॥ त्रिभुवन सभाघन दाट बैसले । देव तेहतीस कोटी । आले नारद तुंबर सभेमध्ये । सांगती गोष्टी ॥५॥ वाघ्या मुरळ्यांचा गजर । पुढे वाजती घाटी । अनुहात गगनांत चौघडे । यात्रेची दाटी ॥६॥ गुरु मुकुंदराज प्रसन्न गोडनाम । बापूच्या कंठी । हरीभाऊची जोडी मोठी । वक्तशीर गाठी ॥७॥ पूर्वीचे सुकृत । फळ आले हो शेवटी । मलुनाम अक्षर । वर लिहिले लल्लाटी ॥८॥ माझे सहस्त्र अपराध । देवा घालावे पोटी । करा कृपेची छाया । जागा द्या मज चरणाजवळी ॥९॥ हेच मागणे तुम्हां मागतो । नामा त्रिकाळी । उठी लवकर मलुराया । म्हाळसा बोले प्रात:काळी । उटणे मी लाविते तुम्हांला । सण आज दिपावळी ॥१०॥

(३) धावपाव लवकरी दयाळा । पठारच्या मल्हारी । प्रभो तुम्ही जेजुरीच्या मल्हारी । तुझे गुण गातो हृदयी स्मरतो करून पंचाक्षरी ॥१॥ क क क क काय तुझे गुण वर्णावे दयाळा । ख ख ख ख खंड्यांचा हात भलारे तुजला ॥२॥ ग ग ग ग गंग्या बारूवर स्वार रंग पिवळा । घ घ घ घ घटका सोन्याची जाते अमृत वेळा ॥३॥ न न न न नमस्कार हा मी लोळे चरणावरी । तुझे गुण गातो हृदयी स्मरतो करूण पंचाक्षरी ॥४॥ ट ट ट ट टाकूनिया लळा भंडारावरी । ठ ठ ठ ठ ठाण ठोकतो आहेस आमुच्या शिरी ॥५॥ ड ड ड ड डवहंकार नको गर्व धरू अंतरी । ढ ढ ढ ढ ढाल नामाची उभार बिंदीवरी ॥६॥ न न न न नमस्कार हा मी लोळे चरणावरी । तुझे गुण गातो हृदयी स्मरतो करूण पंचाक्षरी ॥७॥

परमेश्वराला मानवी पातळीवर पाहण्याच्या मानसिकतेचे कितीतरी नमुने या लोकगींतामधून आढळतात. रूसवे-फुगवे, पतीला मूळ पदावर आणण्यासाठी करावी लागणारी लाडीगोडी, अनुनय हे सारे या लोकगींतामधून येते. मानवी वासनांचे जे रूप त्याचे सगळे उच्चकोटीचे भावाविष्कार या गीतांमधून आढळतात. म्हणूनच खंडोबा जनसामान्यांना आपलासा वाटतो. सामान्यातून असामान्यत्वाकडचा, व्यक्तिविकासाचा प्रवास या साहित्यातून घडतो.

पुढील प्रकरणात खंडोबाची वेगवेगळी प्रतीके आणि वेगवेगळ्या उपासनापद्धती यांच्याबद्दल चर्चा करू.

[]

**संदर्भ - टिपा**


१. तीर्थक्षेत्र जेजुरी येथे वाघ्या - मुरळ्यांच्या 'जागरण' कार्यक्रमातून संकलित केलेली लोकगीते (गीत क्र. १, ६, १०, १३, १६, १८, २२-२४, २८.)

२. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), कुलदैवत, पृ. ३७३, ४०४, ४१०-४१३, ४१६, ४१८-४१९, ४२१-४२३, ४२८-४२९ ( गीत क्र. २-५१७, १२, १९-२१, ३०-३२, ४०-४३).

३. भा. इ. सं. मं. अहवाल १८३२ पृ. ४१६ (गीत क्र. ९).

४. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.), एक होता राजा, भाग - ३, पृ. ३३, ३७-३८ (गीत क्र. ८, ११, २५-२७).

५. (पंडित) जोशी महादेव शास्त्री (सं.), तीर्थरूप महाराष्ट्र, भाग - १, पृ. १३५ (गीत क्र. १४-१५).

६. महाराष्ट्र लोकसाहित्य माला, पुष्प पहिले, पृ. ११-१२ (गीत क्र. ३४).

७. पगार सयाजी निंबाजी, खानदेशातील ग्रामदैवते आणि लोकगीते, पृ. ८२, ११५. (गीत क्र. ३५-३९, ४०).

८. (डॉ.) सोंथायमर गुंथर डायटस्, किंग ऑफ हंटर्स वॉरिअर्स, ॲन्ड शेफर्डस् : एस्सेज ऑन खंडोबा, पृ. १९८-२०५.

९. जोशी वसंत स. (सं.), दक्षिण भारतातील मराठी वाङ्मयाचा इतिहास, तंजावर खंड, पृ. १२९-१३१.

१०. आक्वर्थ ह्यारी आर्बथ्नाट/शाळिग्राम शंकर तुकाराम (सं.), इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे, पृ.९.

११. शाळिग्राम शंकर तुकाराम (सं.), होनाजी बाळा यांच्या लावण्या, पृ. ६-७.

१२. उत्तर पेशवाईपासून मौखिक परंपरेतून चालत आलेली, जेजुरी गडावरील खंडोबा मंदिरात नित्य पहाटे व कऱ्हेपठार खंडोबा मंदिराच्या आवारात दरवर्षी उत्सवाप्रसंगी म्हटल्या जाणाऱ्या शाहीर सगनभाऊ विरचित भूपाळ्या.

पूर्वीच्या काळी धर्मप्रधान भारतीय समाजमनाची व्यापक प्रमाणात अशी धारणा होती की, ''आपल्याला कोणत्यातरी अज्ञात दैवी शक्तीने चमत्काराने संकटातून तारावे, आपल्या प्रापंचिक आधि-व्याधी त्या शक्तीच्या योगे दूर व्हाव्यात, आपल्या काम-कामनांची पूर्तता तिने करावी, म्हणून आपण त्या शक्तीची पूजा करावी म्हणजे ती शक्ती आपणास प्रसन्न होईल. आपोआपच दु:ख संकटातून आपली मुक्ती होईल.'' या भावनेतूनच दैवतांच्या पूजा-अर्चेचा प्रकार रूढ झाला. पुढे या देवतांच्या विकसनप्रक्रियेत टप्प्याटप्प्याने त्यांची प्रतीके निर्माण झाली. निरनिराळ्या उपासनापद्धती आस्तित्वात आल्या. वेगवेगळ्या विधी साजऱ्या होऊ लागल्या.

## प्रतीके

खंडोबाच्या उपासनापद्धतीमध्ये लिंग, तांदळा, मूर्ती, टाक इत्यादी प्रतीके प्रामुख्याने आढळतात. पूर्वी भक्तलोक देवीच्या मुखवट्याप्रमाणे खंडोबाचा मुखवटा बनवून घेत. परंतु हे प्रतीक फारसे प्रचारात आढळत नाही. काही मुरळ्यांजवळ ते आजही पाहावयास मिळते, परंतु तुरळकपणेच.

**लिंग :**

मल्हारीमाहात्म्यात मार्तंडभैरव हे लिंगद्वयाने प्रगट झाल्याचे वर्णन आहे. शिवाय मार्तंडभैरव हा शिवाचा अवतार असल्यामुळे त्याच्या प्रतीकांमध्ये 'लिंग' हे महत्त्वाचे प्रतीक मानले जाते. बहुतेक खंडोबा स्थानी खंडोबा-म्हाळसा अशी लिंगद्वय आढळतात, तर काही ठिकाणी त्यांच्याबरोबर बाणाईचेही तिसरे लिंग आढळते. ही लिंगे स्वयंभू म्हणजे न घडविलेली, रुद्राक्षासारखी ओबडधोबड व अचल असतात. ती खडकातूनच निर्माण झालेली असतात.

**तांदळा :**

ही एक न घडविलेली चळ शिळा असून बहुधा वर निमुळती होत गेलेली आढळते.

**मूर्ती :**

खंडोबाच्या मूर्ती बैठ्या, उभ्या, अश्वारूढ अशा स्वरूपात आढळतात. यांपैकी बैठी मूर्ती सिंहासनस्थ असते. मांडी घालून बसलेल्या मूर्तीच्या दोन गुडघ्यांखाली आसनावर मणि-मल्लाची मुंडे असतात. या मूर्ती चतुर्भुज असून, त्यांच्या हातात खड्ग, त्रिशूळ, डमरू व पानपात्र या वस्तू आढळतात. सोबत कुत्रा आणि घोड्यांच्या मूर्तीही आढळतात. तर कधी खंडोबा, म्हाळसा व बाणाई यांच्या मूर्ती उभ्या आढळतात. अनेक ठिकाणी मार्तंडभैरवाच्या शिवस्वरूपाचे प्रतीक म्हणून नंदी हे वाहन आढळते. अश्वारूढ मूर्तीत कधी खंडोबा एकटा असतो, तर कधी त्याच्या पाठीमागील बाजूस म्हाळसा असते.

**टाक :**

प्रत्येक खंडोबा भक्ताच्या देव्हाऱ्यात पूजेचा 'टाक' हमखास आढळतो. हे टाक सोन्याचे, चांदीचे किंवा रुप्याचे बनविलेले असतात. घरातल्या देव्हाऱ्यात हा टाक शक्यतो सोन्याचा असावा, असा संकेत आहे. सुवर्णाच्या पर्णावर उठावाच्या छापाने बनविलेली खंडोबाची प्रतिमा अश्वारूढ असते. मागे म्हाळसा बसलेली असते. कुळधर्म-कुळाचाराच्या प्रसंगी 'टाक' आवश्यक असतो. लग्न, मुंज, घट बसविताना, जागरण-गोंधळ इत्यादी प्रसंगी हे टाक प्रामुख्याने पुजले जातात. नव्याने तयार केलेले टाक जेजुरीला किंवा इतर महत्त्वाच्या खंडोबास्थळी नेऊन मंदिरातील मार्तंडभैरवाच्या लिंगास स्पर्श करून त्यावर भंडारा टाकून आणतात.

**पाऊतका तथा पादुका :**

या प्रतींकामध्ये पावलांचे ठसे दगड किंवा मार्बलवर कोरलेले असतात. तसेच सोने-चांदीच्या पातळ पत्र्यावर उमटविलेले असतात. सध्या पावलांच्या ठश्यांची चित्रे असलेल्या रंगीत स्टाईल फरशीही सर्वत्र उपलब्ध असतात.

## उपासनापद्धती

खंडोबाच्या उपासनापद्धतीमध्ये देवाची पूजा, अभिषेक, नैवेद्य याचबरोबर नवसफेडीसाठी देवाला मौल्यवान वस्तू अर्पण करणे, दीपमाळ बांधणे, मंदिराचा जीर्णोद्धार करणे, पायऱ्या बांधणे, अन्नदान करणे, वारी मागणे, खेटे घालणे, वाघ्या-मुरळीकडून खंडोबाचे जागरण घालणे, लंगर तोडणे, कान टोचणे, भंडारा-खोबरे उधळणे, तळी

भरणे, पशुवध, मेंढी वाहणे, वावर जत्रा करणे यांसारख्या सौम्य उपासनापद्धती आज सर्वत्र रूढ आहेत.

कमरेस गळ अडकवून देवापुढे टांगून घेणे म्हणजेच 'बगाड घेणे', हाळावरून चालणे, रक्ताचा टिळा देवास लावणे, पवाड करणे, अंगावर चाबूक मारून वार करणे यांसारखे अघोरी, आत्मक्लेशदायी उपायही केले जातात, परंतु अलीकडच्या काळात यावर कायद्याने बंदी आणली आहे. तरी यातील मांडीत मोगरी खुपसून त्यातून निघालेल्या रक्ताचा टिळा देवाला लावणे हा उपासना प्रकार कर्नाटकात आजही काही ठिकाणी पाहावयास मिळतो.

## सौम्य उपासनापद्धती

**वावर जत्रा :**

नवविवाहतांनी एखाद्या प्रख्यात खंडोबाक्षेत्री दर्शनास जाऊन, वेशीत शिरल्यानंतर पत्नीला पाच पायऱ्या चढेपर्यंत उचलून घेणे ( पायऱ्या नसल्यातर चालता-चालता काही अंतर पत्नीला उचलून घेणे), मंदिरात जोडीने देवाचे दर्शन घेणे, अभिषेक करणे, देवाच्या नावाने देवासमोर वाटीभर तेल जाळणे, मंदिरासमोरील दगडी अथवा पितळी कासवावर भंडार-खोबरे उधळणे, तळीभंडाराचा विधी करवून घेणे, शक्य असल्यास अन्नदान करणे किंवा गोरगरीब, भिकारी, अपंगाना धनदान करणे. हा संपूर्ण विधी नवदांपत्यानी करणे म्हणजेच वावरजत्रा करणे होय. खंडोबाउपासनेत हा एक महत्त्वाचा धार्मिक विधी मानला जातो.

**जागरण घालणे :**

लग्न-मुंजीसारख्या संस्कारानंतर देवदर्शनाला जाणे आणि वाघ्या-मुरळ्यांचे जागरण घालणे (करविणे) हा कुलाचार सर्व कुलाचारांमध्ये फार महत्त्वाचा मानला जातो. पाच उसाच्या किंवा जोंधळ्याच्या ताटांच्या मखरात प्रतीकात्मक देवाची स्थापना करून वाघ्या-मुरळ्यांचा समूह तुणतुणे, घोळ, घाटी या वाद्यांच्या साथीने गाण्यांचा जो कार्यक्रम करतात, त्याला 'जागरण घालणे' असे म्हणतात.

**रंगभोग :**

रंगभोगाचे दोन प्रकार आहेत.

१) अंगभोग : देवाच्या अंगाला चंदनाची उटी लावून देवाची दहीभाताने पूजा मांडणे म्हणजेच देवाचे अंगभोग होय.

२) रंगभोग : भंडार-खोबरे उधळून, नाचगाणे करून देवाची सेवा केली जाते याला देवाचे रंगभोग असे म्हणतात. अशी सेवा वाघ्या-मुरळी आणि इतर लोककलावंत करतात.

**लंगर तोडणे :**

दगडास जाड साखळदंड बांधून त्याच्यावर भंडारा-खोबरे उधळून तो हिसके देऊन तोडण्यात येतो, याला 'लंगर तोडणे' असे म्हणतात. आजकाल बऱ्याच ठिकाणी साखळदंड हलका आणि छोटा वापरून हा विधी केला जातो, कर्नाटकात मात्र आजही मोठा साखळदंड तोडूनच हा कुलाचार साजरा केला जातो.

**भंडारा-खोबरे उधळणे :**

देवास बोललेला नवस पूर्ण झाल्यानंतर अगोदर बोलल्याप्रमाणे भाविकभक्त महत्त्वाच्या खंडोबा मंदिरासमोरील नंदी, कासव अशा ठिकाणी, पालखीवर भरपूर भंडारा-खोबरे उधळून देवाला दिलेले वचन पूर्ण करतात.

**भंडारा-खोबऱ्याची 'तुला' करणे :**

काही भक्त 'मुलगा झाल्यास मुलाला तुझ्या दर्शनाला आणून भंडारा-खोबऱ्यामध्ये त्याची तुला करीन' असा नवस बोलतात. नवसप्राप्तीनंतर मुलाचे पालक संबंधित खंडोबास्थळी जाऊन हा विधी करतात. वजन-तागड्यात एका बाजूला मुलगा बसवतात, तर दुसऱ्या बाजूच्या तागड्यात भंडारा-खोबरे टाकतात. दोन्ही तागडी समसमान झाल्यानंतर नवस पूर्ण झाल्याचे मानतात. मुलाच्या लग्नाअगोदर कधीही तुला करता येते.

**कान टोचणे :**

खंडोबाच्या काही निस्सीम भक्तांमध्ये मुलाचा कान टोचल्याशिवाय त्याचा विवाह करता येत नाही, असा प्रघात आहे. लग्नाच्या अगोदर कधीही कान टोचता येतो. शक्यतो मुलगा लहान असतानाच हा विधी केला जातो. कुठल्याही महत्त्वाच्या दिवशी मुलाला नवे कपडे घालून नजीकच्या प्रसिद्ध खंडोबास्थळी न्यायचे आणि त्याचा

डावा कान टोचून त्यामध्ये सोन्याची बाळी घालायची, असा विधी केला जातो. मुलाचा कान पुजाऱ्याकडून अन्यथा सोनाराकडून टोचून घेतात. बाळी त्या दिवशी कानात ठेवून नंतर काढली तरी चालते, परंतु काही भक्त आयुष्यभर बाळी तशीच कानात ठेवतात.

**वारी मागणे :**

खंडोबाच्या नावाने ठराविक काळात कोटंब्यातून भंडाऱ्याची अथवा धान्याची पाच घरी भिक्षा मागणे म्हणजेच वारी मागणे होय.

**खेटे घालणे :**

खेटे घालणे म्हणजे ठराविक दिवशी देवदर्शनास जाणे. काही भाविक प्रत्येक ठराविक वारी (शक्यतो रविवारी) नजीकच्या प्रमुख खंडोबास्थळाला दर्शनासाठी जातात. काही भक्त प्रत्येक रविवारी जाऊन एकवीस वाऱ्या पूर्ण करतात, तर काही भक्त अखंड वर्षभर प्रत्येक रविवारी खेटे घालत असतात.

**कावडी घालणे :**

प्रात:काळी उठून, आन्हिक उरकून कावडीला नमन करून खांद्यावर घ्यावे. नंतर वाहत्या गंगेत (कुठल्याही वाहत्या स्वच्छ पाण्यात) जाऊन गंगेस नमस्कार करून स्तुती करून स्नान करावे. नंतर कावडीतील कलश भरून तिची पूजा करून ती कावड खांद्यावर घ्यावी. नंतर देवळात येऊन पूजेच्या वेळी त्यातील पाणी घालावे व पुष्कळ भंडारा वाटावा. बाहेर येऊन एक कावड झाली म्हणून साक्षीविनायकास प्रार्थना करून सांगावे. याप्रमाणे एक हजार कावडीचा नेम जे आचरतात, त्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात, असे खंडोबा उपासनेमध्ये सांगितले आहे.

**पशुवध करणे :**

काही लोक देवाला नवस करताना देवासमोर पशुवध करण्याचा संकल्प करतात. हे करताना त्यांच्या मनात एक विशिष्ट भावना असते. ते ज्या पशूचा वध करतात, तो पशू उत्तम गतीला जातो. पशुयोनीतून मुक्त होतो व पुढच्या जन्मी चांगल्या योनीत जन्म घेतो, असा समज आहे.

**मेंढी वाहणे :**

भक्त लोक आपल्या शेळ्या-मेंढ्यांना आजार झाल्यास तो बरा व्हावा म्हणून नवस करतात व नवसपूर्ती झाल्यानंतर, नवस बोलल्याप्रमाणे लाकडाच्या शेळ्या-मेंढ्या तयार करून बाणूबाईला वाहतात. विशेष करून अशा प्रकारचे नवस करण्याचे प्रमाण धनगर समाजात जास्त आढळते.

**पिंड बांधणे :**

नवसपूर्ती म्हणून काही भक्त देवाला 'पिंड बांधणे' हा विधी करतात. एखाद्या प्रसिद्ध खंडोबास्थानी नवस बोललेला भक्त ताज्या पाण्यामध्ये सव्वा किलो तांदळाचा भात स्वत: शिजवतो. देवालयातील मूळ पिंडीवर पांढऱ्या किंवा पिवळ्या रंगाचे नवे कापड टाकून त्यावर भाताची पिंड बांधली जाते. सर्व पूजा-विधी झाल्यानंतर पिंडीवरील कापडासहीत तांदळाची पींड अलगद उचलून बाजूला ठेवली जाते. मूळ पिंडीवर अभिषेक केला जातो. नंतर 'पिंड बांधणे' विधीतील भात गाईला चारला जातो.

**वाटीभर तेल जाळणे :**

काही प्रख्यात खंडोबाक्षेत्री मंदिरासमोर वाटीभर तेल जाळण्याची प्रथा आहे. हा विधी करण्यामागचा उद्देश हा की, वाटीभर तेल जळण्याबरोबर माणसाच्या आयुष्यातील 'इडा-पिडा' ही जळून जातात. असा 'समज' जनमानसात रुढ असल्यामूळे खंडोबादर्शनासाठी येणारे भक्त हा विधी आवर्जुन करताना दिसतात.

**दीपमाळ बांधणे :**

अपत्यप्राप्ती व्हावी, धन-दौलत मिळावी, घरातील एखादे मंगलकार्य निर्विघ्नपणे पार पडावे असे नानाविध स्वरुपाचे नवस भक्त खंडोबासमोर बोलतात. काही भक्त देवाला साकडे घालताना 'नवसप्राप्ती होताच देवा तुझ्या दारात दीपमाळ बांधीन' असे वचन देवासमोर कथन करतात. नवसप्राप्ती होताच बोलल्याप्रमाणे देवालयासमोर दीपमाळ बांधून देतात. असे नवस पूर्वीच्या काळी बोलले जात असत. सध्यस्थितीत अशा स्वरुपाचा नवस शक्यतो बोलला जात नाही. महाराष्ट्र-कर्नाटकामधील एकूण चौदा मुख्य खंडोबास्थाने तसेच एकूणच खंडोबा उपासनाक्षेत्राच्या परिघात येणाऱ्या राज्यांमधील अनेक खंडोबास्थानासमोर ज्या दीपमाळ बांधलेल्या दिसतात, त्या सर्व नवस फेडण्याच्या माध्यमातून निर्माण झालेल्या आहेत. खंडोबाउपासनाक्षेत्रात सर्वात महत्वाचे स्थान समजल्या जाणाऱ्या जेजुरीगडावर सर्वात जास्त दीपमाळा आढळतात. त्यातील बहुतांशी दीपमाळा बंगाली धाटणीच्या बांधलेल्या आहेत.

**तळीभंडार किंवा तळीभंडारा करणे :**

तळीभंडार करणे म्हणजेच तळी भरणे होय. प्रत्येक कुळधर्म-कुळाचाराच्या वेळेस तळीभंडार केला जातो. षड:रात्रौत्सव, जागरण-गोंधळ इत्यादी कार्यक्रमाच्या वेळेस तसेच लग्न-मुंजीच्या धार्मिक संस्कारानंतर लोक जेजुरीला जातात. त्या वेळी गडावर किंवा कऱ्हेपठारावर क्षेत्रोपाध्यांकडून हा विधी करवून घेतात. परगावाहून आलेले बरेच भक्त कुठल्याही संस्काराविना जीवनात सुख-समाधान लाभावे म्हणूनही आवर्जून तळीभंडार करवून घेतात.

तळीभंडार करताना ताम्हणामध्ये विड्याची पाने, सुपारी, खोबऱ्याच्या वाट्या, पैसे, भंडारा इत्यादी साहित्य घेतले जाते. त्यानंतर पाच, सात किंवा अकरा अशा संख्येमध्ये घरातील मंडळी जमून ताम्हणावर हात ठेवून वरील विधिमंत्र म्हणतात. नंतर 'येळकोट येळकोट जयमल्हार' अशी गर्जना करून ताम्हण तीनदा उचलतात. ताम्हण खाली ठेवल्यानंतर उपस्थित सर्वांना भंडारा लावला जातो. नंतर पानसुपारी, खोबरे व दक्षिणा सर्वांना दिली जाते व पुन्हा एकदा ताम्हण उचलून देवाचा जयघोष केला जातो. त्या वेळी दिवटी प्रज्वलित करून खंडेरायाला ओवाळले जाते.

**तीर्थक्षेत्र जेजुरी येथील पेशवेकालीन तळीभंडार विधिमंत्र :**

**हर हर महादेव, चिंतामणी मोरया**
**बहिराव की चांग बोलो**
**भवानी की जय, हनुमान की हुं**
**गरुड का झरारा, आस्मान का तारा**
**फेर बाजे नगारा**
**सोन्याची जेजुरी, रूप्याचा फवारा**
**मोत्याचा तुरा, देव आले घरा**
**सदानंदाचा येळकोट**
**काळबहिरीचं चांगभलं**
**'बोला खंडोबाच्या नावानंऽऽऽ... चांगभलंऽऽ!'**[१]

पेशवाईच्या अस्तापर्यंत श्रीक्षेत्र जेजुरीमध्ये गडकोट आणि कऱ्हेपठार या दोन्ही ठिकाणी तळीभंडारचा जयघोष वरीलप्रमाणे केला जात असे, असा काही ग्रंथांमध्ये उल्लेख आढळतो. नंतर कोणत्या साली वरील जयघोषात बदल झाला, कोणी केला, का केला, याची निश्चित उत्तरे मिळत नाहीत.

**तीर्थक्षेत्र जेजुरी येथील वर्तमानकालीन तळीभंडार विधिमंत्र :**

**अगड्डुम नगारा, सोन्याची जेजुरी।**
**निळा घोडा, पाव में तोड़ा ।**
**मस्तकी तुरा, बेंबी हिरा ।**
**अंगावर शाल, सदाहि लाल ।**
**म्हाळसा सुंदरी, आरती करी ।**
**देव ओवाळी, नानापरी ।**
**खोबऱ्याचा कुटका, भंडाराचा भडका ।**
**अडकल के भडकल, भडकल के भंडार ।**
**बोल बोल हजारी, वाघ्या मुरळी ।**
**खंडोबा भगत, सलाम सलाम ।**
**हर हर महादेव, चिंतामणी मोरया ।**
**आनंदीचा उदो उदो, भैरोबाचा चांगभले ।**
**सदानंदाचा येळकोट येळकोट ।**
**कऱ्हेपठार महाराज की जय ।**
**खंडेराव महाराज की जय ।**
**येळकोट येळकोट जय मल्हार ।** [२]

**अहमदनगर परिसरातील तळीभंडार विधिमंत्र :**

तळीभंडार करताना किंवा तळी उचलताना महाराष्ट्रातील सर्व खंडोबाक्षेत्री एकच विधी केला जात असला, तरी त्या वेळी म्हणावयाच्या मंत्रामध्ये प्रादेशिक भाषाभेदानुसार थोडाफार बदल आढळतो. अहमदनगर व परिसरात तळीभंडार करतेवेळी खालील मंत्र म्हटला जातो :

**सदा आनंदाचा येळकोट**
**हर हर महादेव**
**चिंतामणी मोरया**
**आनंदीचा उदो उदो**
**बहिरोबाचं चांगभलं**
**गरूडाच्या गरूडा**
**आसमंत का तारा**
**देव गेले जेजुरा**
**सोन्याची जेजुरी**
**निळा घोडा**
**जीव तांबडा**
**पाव मे तोडा**
**कंबरी करगोटा**
**मस्तकी तुरा**
**मोत्याचा तुरा**
**बेंबी हिरा**
**अंगावर शाल**
**सदा देव निहाल**
**म्हाळसा सुंदरी**
**आरत्या करी**
**देव ओवाळी**
**नाना परी**
**खोबऱ्याचा कुटका**
**दिवटीचा भडका**
**सदा आनंदाचा येळकोट** [३]

**खानदेशातील तळीभंडार विधिमंत्र :**

**सदानंदाचा येळकोट**
**हर हर महादेव**
**चिंतामण मोऱ्या**
**गरुडाच्या गरुडा**
**आसमंत तारा**
**देव चालले जेजुरा**
**सोन्याची जेजुरी**
**मोत्याचा तुरा**
**निळा घोडा**
**पाव मे तोडा**
**कंबरी करधोडा**
**अंगावर शाल**
**सदादेव लाल**
**म्हाळसा सुंदरी**

**आरती करी**
**देव ओवाळी नानापरी**
**खोबऱ्याचा खडका**
**भंडाऱ्याचा भडका**
**सदानंदाचा येळकोट** [४]

## अघोरी तथा आत्मक्लेशदायी उपासनापद्धती

**बगाड घेणे :**

मानेस अथवा कमरेस गळ टोचून देवापुढील उंच खांबावर बसविलेल्या आडव्या लाकडाच्या टोकास टांगून घेऊन गाडीच्या चाकाप्रमाणे फिरणे म्हणजेच देवाला प्रदक्षिणा घालणे याला 'बगाड घेणे' असे म्हणतात. आता या अघोरी प्रकाराला कायद्याने बंदी आहे. ज्या ठिकाणी अशा स्वरूपाची प्रथा आहे, त्या ठिकाणी त्याचे स्वरूपही अगदीच सौम्य आहे.

**हाळावरून चालणे :**

एका चरात रसरशीत अंगार (विस्तव) फुलवून व त्यावर भंडारा टाकून त्या विस्तवावरून पाच पावले चालणे.

**रक्ताचा टिळा लावणे :**

मांडीत लोखंडी मोगरी किंवा तलवार मारून (खुपसून) निघालेल्या रक्ताने देवास टिळा लावणे. कर्नाटकात 'वीर' या खंडोबाच्या भक्तांमध्ये ही प्रथा होती. सध्या ती कालबाह्य झाली आहे.

**वारू :**

ज्याच्या अंगात देवाचे वारे आलेले असते, त्यांना 'वारू' असे म्हणतात. हे वारू स्वतःच्या अंगावर चाबूक मारून घेऊन अंगाची कातडी लोंबावयास लावतात.

**पवाड करणे :**

हा देहदंडाचा एक भयावह प्रकार आहे. यात नवस करणारा आपल्या पायाच्या पिंढरीच्या खालच्या भागात अर्धा ते पाऊण इंच जाडीची पहार (लोखंडी खुंटी) आरपार घुसवतो. नंतर ही पहार काढून त्या छिद्रातून तेवढ्याच घेराची चामड्याची वादी ओवून काढण्यात येते. मग याच छिद्रातून बाभळीची काटेरी फांदी ओढून काढतात. हा प्रकार आता फक्त कर्नाटकातील देवरगुड्ड येथील 'कंचवीर' नामक हरिजन भक्तच करताना आढळतात.

पवाडाचा आणखी दुसरा प्रकार आहे. या प्रकारात एका बाजूस पाच खिळे व दुसऱ्या बाजूस मध्यावर एका ठोकलेल्या पट्टीचा वापर होतो. मधल्या खिळ्याने ती पट्टी डाव्या हाताच्या मनगटात आरपार ठोकण्यात येते. मग वरच्या पाच खिळ्यांना तेलात भिजलेल्या वाती बांधून, त्या प्रज्वलित करून खंडोबाची आरती करण्यात येते. पूर्वी 'पवाडा'मध्येच लंगर तोडण्याचा समावेश होता. परंतु 'लंगर तोडणे' याचा सौम्य उपासनापद्धती म्हणून भक्तांनी स्वीकार केल्यामुळे आजही ही उपासनापद्धती सर्वत्र रूढ असल्याचे आढळते.

## खंडोबा उपासनासंदर्भातील काही पौराणिक कथा

**हरिद्राचूर्णाची (भंडाऱ्याची) उत्पत्ती कथा :**

कैलास शिखरावर एकदा शंकराचा दरबार भरला होता. दरबारामध्ये सर्व देवगण जमले होते. ते सर्व जण गौरवर्ण व विद्युल्लतेसारखे चमकदार दिसत होते. हे पाहून रजनीने (रात्र) आपल्या शरीराकडे पाहिले. तेव्हा आपले काळे शरीर पाहून तिला अतिशय लाज वाटली. काहीशा रागातच तिने शंकरांना आपली स्थिती वर्णन करून विनंती केली की, 'कृपा करून आपण माझे शरीर पिवळे करा.' यावर शंकर तिला म्हणाले, 'तू स्कंद पर्वतावर जा व औषधी वनस्पतीचे रूप घे. त्यामुळे तू पिवळी होशील व सर्व जण तुला आपल्या अंगावर प्रथमतः घेतील. मी ज्या वेळी मणि-मल्लाचा वध करीन, त्यावेळी मला प्रथमतः तुझीच आठवण येईल, हे लक्षात ठेव.'

शंकराने सांगितल्याप्रमाणे रजनीने हरिद्रेचे रूप घेतले. काही दिवसांनंतर ही हळदीची रोपे पार्वतीने पाहिली व प्रथमतः दुधात चूर्ण करून तिने ते अंगास लावले. त्यामुळे शंकरालासुद्धा हरिद्राचूर्ण म्हणजे भंडाराच जास्त

आवडतो. मल्हारीपूजा करण्यासाठी भंडाऱ्याची अत्यंत आवश्यकता असते. हा विधी ब्राह्मणानेच करावा. सोने, चांदी, तांबे किंवा पितळेचा त्रिशूळ, डमरू, खड्ग, पानपत्राच्या प्रथम मूर्ती तयार कराव्यात. हळदीवर पाणी मारून त्याचे तेरा टिळे देवास मंत्रपूर्वक लावावेत. नंतर एकादशअक्षरी मंत्र उलट्या अक्षरांचा तयार करावा व हळकुंड उगाळून बारा टिळे लावावेत. हे जमले नाही तर मूलमंत्राचा जप करीत हळदीमध्ये पाणी ओतावे व तीळ आणि भस्म घालावे. अशा प्रकारे हा भंडारा दरवर्षी एकदा तरी तयार करावा, असे खंडोबा उपासनेमध्ये सांगितले आहे.

**हरिद्राचूर्णाची उत्पत्तीची दुसरी कथा :**

हरिद्राचूर्ण तथा भंडाऱ्याची आणखी एक वेगळी कथा सांगितली आहे. ती अशी : मणि-मल्ल दैत्यांच्या भीतीने 'योगनिद्रा' हरीस म्हणजे भगवान विष्णूस सोडून एका खडकाखाली लपून राहिली होती. तिचा शोध लावण्याकरिता ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांनी अनुक्रमे पळस, पिंपळ आणि वड या वृक्षांचे रूप घेतले. त्यांनी तपसाधना करण्यास सुरुवात केली. 'त्रिपूर' या नावाचे एक लक्ष जपाचे एक आवर्तन पूर्ण झाल्यानंतर एक घटना घडली. आवर्तन पूर्ण होताच भगवान विष्णूच्या आसनाखाली प्रचंड आवाज झाला. अचानक झालेल्या या आवाजामुळे विष्णू भयभीत होऊन पळत सुटले. ब्रह्मदेवाजवळ येऊन त्यांनी झालेला प्रकार सांगितला. ब्रह्मदेव त्वरित विष्णूच्या आसनाजवळ गेले, तर त्यांना तिथे एक पिवळ्या वनस्पतीचा अंकुर दिसला. तो अंकुर बघितल्यावर त्यांनी तत्काळ तो वृत्तांन्त भगवान शंकराला सांगितला. शंकराने त्या वनस्पतीची सोळा उपचारांनी श्रीसुक्त मंत्राने पूजा करण्यास विष्णूस सांगितले व तसे केल्याने त्रिपुरादेवी प्रसन्न होईल, असेही सांगितले. बराच वेळ प्रार्थना केल्यानंतर त्रिपुरादेवी शिळेखालून म्हणाली, 'ही शिळा फोडा व मुळाशी असलेली गाठ प्रयत्नाने काढा. त्याचे चूर्ण करून ते अंगाला लावून माझ्या नावाचा एक लक्ष जप करा. म्हणजे शत्रूंचा नाश होईल.' मग ब्रह्मदेवाने त्या गाठीचे नाव विचारल्यावर देवी त्रिपुरा म्हणाली, 'काळाचा नाश करणाऱ्या हरीला देखील लावले म्हणून माझे नाव हरिद्रा आहे.'

म्हणून हीच हरिद्रा तथा हळद उर्फ भंडारा मल्हारीरायाला फार आवडतो.

**दवणा :**

एकदा 'देव' नावाचा शिवगण परमविनयी होऊन श्रीशंकरास नमन करता झाला. त्याचे शुद्ध अंत:करण आणि निरागस भक्ती पाहून श्रीशंकर त्याच्यावर प्रसन्न झाले व त्यास त्यांनी वर मागण्यास सांगितले. तेव्हा शिवगण देव शंकराला म्हणाला, 'देवा, मी तुमचा दास आहे. तुमच्या कृपाशीर्वादाने मला येथे काहीही कमी नाही, परंतु माझे मनी एक विचार आला आहे की, धोतऱ्याचे सुगंधरहित फूल आपण मस्तकावर धारण करून त्याचा उद्धार केला, तसे मलाही सुगंधित व औषधी वनस्पतीत रूपांतर करून आपण आपले शिरपेचात स्थान द्यावे व माझाही उद्धार करावा.'

यावर भगवान शंकर 'तथास्तु' म्हणाले व नंतर त्यांनी मणि-मल्ल युद्ध समाप्तीनंतर या गणाचा उद्धार आपली सुवर्ण राजधानी जेजुरीनजीक असलेल्या दवणे मळा येथे केला व त्यास सतत आपले सान्निध्य दिले. आजही दवण्याच्या पिकासाठी जेजुरीजवळील 'दवणे मळा' प्रसिद्ध आहे. येथील ताजा दवणा रोजच श्री खंडोबादेवाला वाहिला जातो. दवणा ही वनस्पती सुगंधित असल्यामुळे त्यापासून अत्तर, उदबत्ती तसेच वेगवेगळी आयुर्वेदिक औषधे बनविली जातात.

**भरीत-रोडगा :**

फार पूर्वी 'तारकासुर' या महाबलाढ्य राक्षसाने भूतलावरील लोकांना खूप त्रास दिला होता. त्याचा वध शिवपुत्र कार्तिकेयच करू शकणार होता. परंतु शिवाचे अद्याप लग्न झाले नव्हते. म्हणून सर्व देव त्या प्रयत्नास लागले. त्यांनी मदनास शंकरापुढे नाचण्यास पाठविले; परंतु शिवाने अतिशय क्रोधायमान होऊन आपल्या तृतीय नेत्रकटाक्षाने त्याचे दहन केले. तेव्हा ब्रह्मदेवाने चंद्रास विनंती केल्याप्रमाणे चंद्र आपली बरीच अमृतवर्षे मदनाच्या राखेत जाऊन बसला. काही कालावधीनंतर शंकराचा पार्वतीशी विवाह झाला. एके दिवशी पार्वतीने शंकरास विनंती केली की, आपण मदनाला ठार केल्यामुळे प्रजोत्पत्ती होत नाही, तरी कृपया यावर उपाय करावा. यावर शंकराने मदनास परत आणण्याचे आश्वासन दिले व हिमालयावर भस्मात राहिलेल्या चंद्रास मदनयोगाने व शिवकृपेने नवजीवन प्राप्त झाले. राखेत हिरवा कोंब फुटला व अमृतवर्षाने त्याचा स्रवणारा कंद तयार झाला. तो शिवाने आणून पार्वतीस दिला व तिने तो खाल्ला. कालांतराने तिला कार्तिकेय व गजानन अशी दोन अपत्ये झाली पहिल्याप्रमाणे प्रजोत्पत्ती सुरू झाली.

मणि-मल्ल वधानंतर पृथ्वीवर मल्हारी आले असता सर्वांनी त्यास निरनिराळ्या प्रकारचे नैवेद्य दाखविले. एका गरीब ब्राह्मणाने त्याच्याजवळ असलेल्या वांग्याचे भरीत तयार केले व त्यात भरपूर कांदे आणि इतर मसाल्याचे पदार्थ घालून चविष्ट पदार्थ बनविला. कणकेमध्ये थोडे तूप घालून त्याचा रोडगा बनवून तो मल्हारीस अर्पण करण्यासाठी गेला. या पदार्थाने मल्हारीदेव खूपच प्रसन्न व समाधानी झाले. अशा प्रकारे श्रीमल्हारीस कांद्या-वांग्याचे भरीत व रोडगा अतिशय प्रिय झाला. तेव्हापासून चंपाषष्ठीच्या नैवेद्यात भरीत-रोडग्याला महत्त्व प्राप्त झाले आहे. मदनाच्या राखेत उगवलेला कोंब म्हणजेच खंडेरायाचे आवडते 'वांगे' होय.

**दिवटी-बुधली**

युद्धात मणि-मल्ल दैत्यांचा वध केल्यानंतर सर्व देवांनी मार्तंडभैरवाला रत्नजडित सिंहासनावर बसविले. सोन्याची रत्नजडित दीपिका (दिवटी) दाखवून (ओवाळून) त्यांनी मार्तंडाची आरती केली. त्यामुळे मार्तंडभैरव सर्व देवांवर प्रसन्न झाले. त्या दिवसापासून भक्तांच्या हातात दिवट्या व तेलासाठी बुधल्या घेण्याची प्रथा सुरू झाली. दिवटी ही सोन्याची, चांदीची, पितळेची, लोखंडाची किंवा लाकडाचीसुद्धा असते. तिचा आकार मशालीसारखा असतो. कुळाचाराच्या वेळेस दिवटी प्रज्वलित करून मग मार्तंडभैरवाची भक्तिभावाने पूजा-अर्चा करावी. डाव्या हातात दिवटी घेऊन उजवा हात तिला लावून देवाला पायापासून मस्तकापर्यंत ओवाळावे. त्यानंतर देवाची आरती करावी. आरती केल्यानंतर नैवेद्य दाखवावा व दुधाने दीपिका मालवावी. दिवटी हे ज्ञानाचे व बुधली हे बोधाचे प्रतीक आहे. म्हणूनच नाथमहाराज म्हणतात :

**बोध बुधली ज्ञान दिवटी ।**
**उजळा महाद्वारी ॥**

**कोटंबा**

प्रत्येक खंडोबाभक्ताच्या घरात, देव्हाऱ्यात कोटंबा असतो. कोटंबा हा पितळी, लोखंडी अथवा लाकडापासून बनविलेला असून तो अष्टकोनाचा असतो. म्हणूनच त्याला अष्टदिशांचे प्रतीक मानले जाते. याचा आकार तळाकडे निमुळता होत गेलेला असतो. कोटंबा हे पूर्णपात्र असल्याने त्यामध्ये देवाला नैवेद्य दाखविला जातो. काही खंडोबाभक्त देवाची भक्ती म्हणून दर रविवारी कोटंब्यातून वारी (भिक्षा) मागतात.

**घोळ व चंगा**

घोळ व चंगा ही दोन्ही वाद्ये असून, ती दोन्ही लोखंडापासून बनविली जातात. चंगा हे वाद्य हाताच्या अंगठ्यात घालून वाजवितात, तर घोळ हे वाद्य तलवारीच्या मुठीच्या आकाराचे असून, तेही हातात धरून वाजवितात. ही दोन्ही वाद्ये खंडोबाला प्रिय असल्याने अनेक भाविकांच्या घरात यांची पूजा केली जाते. तसेच ही दोन्ही वाद्ये 'वाघ्या'कडेही पाहावयास मिळतात.

**गाठा**

मणि-मल्ल दैत्यांच्या संहारासाठी इंद्राने जेव्हा शंकराजवळ वारी मागितली होती, त्या वेळेस शंकराचे सतत स्मरण राहावे म्हणून त्याने गळ्यात गाठा बांधला होता, असा उल्लेख खंडोबावरील काही उपासनापर छोट्या पुस्तिकांमध्ये आढळतात. गाठा सोने अगर चांदीचा असतो. तो इतर धातूंचा बनविला जात नाही.

**घोडा**

शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण केल्यानंतर मणि-मल्ल दैत्यांविरुद्ध युद्धाच्या वेळी ते नंदी या आपल्या वाहनावर आरूढ होऊन आले होते. परंतु प्रत्यक्ष युद्धाच्या वेळेस अश्वाचा उपयोग केला, तसेच मणि दैत्याचा वध केल्यानंतर मणिच्या विनंतीवरून मार्तंडभैरवाने अश्वासहित रूपाची जोड मिळविली. नंतर ज्यावेळी मार्तंडभैरव शक्ती म्हाळसासह प्रेमपुरी येथे लिंगद्वयरूपाने प्रगट झाले, तेव्हा धर्मपुत्र सप्तर्षींनी आणि देवांनी मार्तंडभैरवाची अश्वारूढ 'मृण्मयी मूर्ती' (मातीची) तयार केली. ब्रह्मदेवाने त्या मूर्तीचे ध्यान करताच धनुष्याकृती लिंगे गुप्त झाली व तेथून मार्तंडभैरव शक्ती म्हाळसासह अश्वारूढ रूपात प्रगट झाले. तेव्हापासून 'घोडा' हे खंडोबाचे वाहन मानण्यात येऊ लागले.

जेजुरी गडावरील मंदिरातील मंडपात (मध्यगृह) डाव्या बाजूस घोड्याची एक भव्य दगडी मूर्ती आहे. तिला 'मणिरूप अश्वमूर्ती' म्हणतात.

**कुत्रा**

कुत्र्यामुळे भैरवरूप सूचित होते. भैरवमूर्तीत, भैरवाच्या हातातील दैत्यमुंडातून गळणारे रक्त पिणारा ऊर्ध्वमुखी

कुत्रा असतो. मार्तंडभैरवाच्या हातात रक्तस्रावी दैत्यमुंड नसले तरी भैरवाची खूण असलेला कुत्रा आहे. या कुत्र्याबद्दल पुढील आख्यायिका सांगितली जाते :

वामन अवतारामध्ये बळी राजास भगवान विष्णूने दान मागितले, तेव्हा क्षणाचाही विलंब न करता 'दानवीर' बळीने ते दिले. वामनरूपी विष्णूने बळीला पाताळात राज्य करण्यासाठी पाठविले. बळीच्या मनाचा मोठेपणा पाहून विष्णू त्याच्यावर प्रसन्न झाले आणि त्याच्या राजधानीत द्वारपाल म्हणून राहू लागले. मात्र, तेहतीस कोटी देवांतील काही देवांना ही गोष्ट आवडली नाही. त्यांच्यामधील 'सामवेद' नेहमी द्वारपाल विष्णूची अवहेलना करीत असे. तेव्हा विष्णूने त्याला कठोर शाप दिला की, 'तू मृत्युलोकी कुत्रा होऊन भुंकत राहशील.' विष्णूची शापवाणी ऐकून सामवेद भयंकर घाबरला. त्याने विष्णूची मनधरणी करून उःशाप मागितला, तेव्हा विष्णूने त्यास सांगितले की, 'द्वापार युगातील अवतारामध्ये मी तुझा शिवमंदिरात ठेवून उद्धार करीन. '

पुढे द्वापार युगामध्ये भगवान विष्णूच्या श्रीकृष्ण अवतारामध्ये खंडोबाने कृष्णाला कुत्रा बनविल्यानंतर आणि पुन्हा मानवरूप बहाल केल्यानंतर जेव्हा बाळ श्रीकृष्ण खंडोबादर्शनासाठी जेजुरीला आला, त्या वेळी त्याने 'सामवेदा'चा उद्धार केला. तेव्हापासून खंडोबा उपासनेमध्ये कुत्र्याला विशेष महत्त्व आहे.

**कासव**

भारतातील प्रत्येक हिंदू मंदिरात किंवा समोर कासवाची प्रतिकृती कोरलेली असते. त्याला तिथे महत्त्वाचे स्थान दिलेले असते. कासव हा प्राणी असा आहे की, तो कोणालाही उपद्रव करत नाही. तसेच त्याच्या अंगी मोठी सहनशीलता असते. त्याने सर्व विकारांवर, षड्रिपुंवर विजय मिळविलेला आहे. तो आपले कोणतेही अवयव दिसू देत नाही तो ते सर्व अवयव कवचामध्ये सुरक्षित ठेवतो. म्हणून पूर्वीपासून आपल्या हिंदू मंदिरांमध्ये किंवा समोर कासवाची प्रतिकृती कोरलेली असते व आजही नवीन मंदिरासमोर आवर्जून ती कोरली जाते. कारण कोणत्याही देवतेच्या दर्शनास जाताना मनातील सर्व विकार नष्ट करून कासवासारखी वृत्ती ठेवूनच जावे, तरच आपल्यात व परमेश्वरामध्ये भेद उरत नाही. परमेश्वर व आपण पूर्ण एकरूप होऊन जातो, हा उद्देशही कदाचित कासवाच्या प्रतिकृती कोरण्यामागे असावा. म्हणून हिंदू देवता-मंदिरे आणि कासव यांचा जवळचा संबंध आहे, असे धार्मिक वाङ्मयीन उल्लेख आढळतात.

## महिनेवार नैवेद्य

खंडोबाभक्तांनी प्रत्येक महिन्यात देवाला कोणकोणत्या पदार्थांचा नैवेद्य दाखवावा, याची सविस्तर माहिती कवी गंगाधरकृत 'मार्तंडविजय' या ग्रंथात दिली आहे. अशा प्रकारचा नैवेद्य 'बारोमास' दाखविणे पुण्यकारक समजले जाते. परंतु वर्षभर अशा प्रकारे नैवेद्य दाखविणे न जमल्यास प्रत्येक महिन्यात तीन दिवस तरी असा क्रम आचरावा. भाविक भक्तांना त्याचे उत्तम फळ मिळते.

**१) चैत्र :**

देवाला दहिभाताचा नैवेद्य दाखवावा. नंतर ब्राह्मणास सुवासिक पाणी (वाळा घातलेले किंवा पाण्यात गुलाबाची फुले काही वेळ ठेवून) पिण्यास देणे. त्यामुळे देव प्रसन्न होतो, सुखशांती मिळते.

**२) वैशाख :**

वरील चैत्र महिन्याप्रमाणेच.

**३) ज्येष्ठ :**

आंबरस काढून त्याचा नैवेद्य दाखवावा. शक्य असल्यास ब्राह्मणभोजन घालावे.

**४) आषाढ :**

सिद्धान्नांचा नैवेद्य दाखवावा.

**५) श्रावण :**

जिलेबी, मांडे यांचा नैवेद्य दाखवावा.

**६) भाद्रपद :**

मोदक, बुंदीचे लाडू व इतर अन्नपदार्थ यांचा नैवेद्य दाखवावा.

**७) अश्विन :**

श्रीखंड, सुतरफेणी व इतर पक्वान्नांचा नैवेद्य दाखवावा.

**८) कार्तिक :**

सर्वांच्या आवडीच्या गोड पदार्थांचा व अधिक महिन्यात अनारशांचा नैवेद्य करावा.

**९) मार्गशीर्ष :**

केशरीभात, वांगीभात, खिचडीचा (तूप घालून) देवाला नैवेद्य दाखवावा. शक्य असेल तर ब्राह्मणभोजन घालावे. हा क्रम महिनाभर करणे जमले नाही तर शुद्ध अष्टमी, पौर्णिमा व वद्य चतुर्दशी असे तीन दिवस तरी हा नैवेद्य दाखवावा.

**१०) पौष :**

तिळाच्या भाकरी (लोणी लावून) व तिळाचे आणि कांद्याचे निरनिराळे पदार्थ.

**११) माघ :**

पुरणपोळ्या, दूध व खसखशीची खीर यांचा नैवेद्य दाखवावा.

**१२) फाल्गुन:**

उडदाचे वडे (गोड दह्यात मुरवून), तीळवडे, पापड यांचा नैवेद्य दाखवावा. शक्य असेल तर ब्राह्मणभोजन घालावे.

## सिद्धान्न

एक शेर दूध, चार तोळे मूग डाळ, आठ तोळे तांदूळ, दोन तोळे गूळ, अर्धा तोळा जिरे, दोन तोळे तूप, अर्धा तोळा लवंग, थोडी काळी मिरी (तांदूळ व मुगाची डाळ वाटून घ्यावी.)

अर्धा शेर गहू भिजवून अर्धवट वाटावेत. त्यात अर्धा शेर खसखशीचे दूध घालावे. खोबरे (ओले) पावशेर, गूळ अर्धा शेर, लवंग-वेलदोडे एक तोळा असे सर्व पदार्थ घेऊन, नीट शिजवून त्यांची खीर करावी. या प्रकाराला सिद्धान्न असे म्हणतात. या सिद्धान्नाचा खंडेरायाला नैवेद्य दाखवावा. घरच्या मंडळींनी जेवताना तो प्रसाद म्हणून घ्यावा.

## व्रते

काही उपासनापर ग्रंथांत सांगितलेली व्रते पुढीलप्रमाणे

**शनिवार व्रत :**

शनिवारच्या दिवशी भल्या पहाटे प्रात:स्मरण करावे. अंगास माती लावून शुद्ध जलाने स्नान करावे. तंत्रोक्त मंत्राने स्नान केल्यानंतर व्रताचा संकल्प करावा. या दिवशी निरंकार उपवास करावा. रात्रीच्या पहिल्या प्रहरानंतर स्नान करून प्रथम पूजासाहित्य मिळवावे. त्यात मुख्यत: अष्टगंध असावे. सुगंधित अशी विविध रंगांची फुले घ्यावीत परंतु त्यात पिवळ्या रंगाच्या फुलांचा विशेष समावेश असावा. तुळशी, बेल, दुर्वा व फळेही वाहावीत. प्रथम एकाग्र चित्ताने मानसपूजा करावी. नंतर हळदीचे लिंग तयार करून त्याची षोडशोपचारे पूजा करावी व देवास नैवेद्य अर्पण करावा. देवास त्रयोदशगुणी विडा व त्याबरोबर सुवर्णदक्षिणा द्यावी. नंतर कापराची आरती करून ओवाळावे. देवासमोर ‘मल्हारीमाहात्म्य’ व ‘सहस्रनाम’ वाचावे आणि रात्री तिथेच झोप घ्यावी.

रविवारी पहाटे उठावे. नेहमीचे आन्हिक उरकावे. नंतर देवाला नैवेद्य अर्पण करावा व ब्राह्मण दांपत्यास जेवण द्यावे. तांबूल व दक्षिणा देऊन त्यांस निरोप द्यावा. इतरेजनांना तांबूल दान करावे. एखाद्या कुत्र्यास भाकरी खायला द्यावी. (कुत्र्याला मुळीच भुकेल्यापोटी परत पाठवू नये.)

अशा प्रकारे हे शनिवार व्रत पूर्ण होते. हे व्रत पूर्ण केल्याने भाविक भक्तांची सर्व प्रकारची कार्यसिद्धी होते.

**रविवार व्रत :**

रविवारी प्रात:काळी उठावे. व्रताचा संकल्प करावा. सर्व नित्यनेम बाजूला सारून मौनव्रती राहावे. मनामध्ये कार्याचे चिंतन करावे. देवापुढे हात जोडून उभे राहावे व धूप, दीप, नैवेद्य दाखवून पूजा करावी. मंत्राचा, सहस्रनामाचा किंवा माहात्म्याचा जप सूर्यास्तापर्यंत करावा. मल्हारीस साष्टांग नमस्कार करून कुठल्याही खंडोबा मंदिरात जावे.

पूजेमध्ये फुले, पत्री, दवणा, बेल यांचा समावेश करावा. देवाची षोडशोपचारे पूजा करावी आणि त्यास नैवेद्य दाखवून विडा व दक्षिणा द्यावी. पिठाचे नऊ दिवे करून त्याने मल्हारीस ओवाळावे. नंतर स्वहस्ते ब्राह्मणाचे पाय धुवावेत व गंध लावून पुष्पमाला घालाव्या. नंतर त्याच्या कपाळी भंडारा लावून धूपी, दीप, कापूर इत्यादी उपचार देऊन ब्राह्मणांना समाधानी करावे. तसेच सुवासिनींना हळद-कुंकू लावून गंध लावावे. हनुवटीस बुक्का लावावा, भांगात गुलाल भरावा. धूप-दीप दाखवावा. सुवासिनी, ब्राह्मणास उत्तम अन्न देऊन पानविडा-दक्षिणा देऊन साष्टांग नमस्कार करावा.

हाच प्रकार चंपाषष्ठीला श्रावण महिन्यात कृष्णाष्टमीस, माघ महिन्यात चतुर्दशीस, आश्विन महिन्यात शुद्ध नवमीस चंद्रोदयी करावा. उडीदवडे, बारीक वाटलेली डाळ, त्यात मिरे-लसूण घालून ते तुपात तळून घ्यावे. दही, भरीत रोडगा असा नैवेद्य दाखवावा. नंतर तांबुल दक्षिणा द्यावी. असे अन्न देवास फार आवडते.

**उंड्या रविवार व्रत :**

एखाद्या रविवारी मोजून पाच पशांचा (पाच मुठी) तांदूळ शिजवून त्याचे पाच भाग करणे. पहिल्या भागाचा नैवेद्य कुत्र्याला खायला देणे. दुसरा भाग अग्नीला दान करणे, तिसरा भाग गाईला चारणे, चौथा भाग खंडोबाला नैवेद्य दाखविणे आणि नैवेद्याचा पाचवा भाग स्वत: खाणे. मात्र, आपण नैवेद्याला हात न लावता पालथे झोपून हात पाठीमागे बांधून थेट तोंड लावून (कुत्र्यासारखे) खाणे. रविवारचा हा संपूर्ण विधी करण्यालाच 'उंड्या रविवार' असे म्हणतात.

**अन्नपूर्णा व्रत :**

जेजुरी गडावरील मानव रूपातील वास्तव्यात म्हाळसा आणि बाणाई या सवती-सवतींचे पटेना. तेव्हा खंडेरायाने दोघींची वेगवेगळी बिऱ्हाडे थाटली. म्हाळसा गडावर आणि बाणाई गडाखाली राहू लागली. खंडेराय रविवारी बाणाईकडे, तर राहिलेल्या वारांना म्हाळसाकडे राहू लागले. परंतु बाणाईवरील अतिप्रेमामुळे ते बाणाईला बरोबर घेऊन एक दिवस गडावर अचानक गायब झाले. तेव्हा, नारदमुनींच्या सांगण्यावरून म्हाळसाने खंडेरायाच्या प्राप्तीसाठी जयाद्रि पर्वताच्या (गडाच्या) पायथ्यापाशी शिवलिंगाची प्रतिष्ठापना करून पहिले अकरा दिवसांचे व दुसरे एकवीस दिवसांचे अनुष्ठान केले. दुसऱ्या अनुष्ठानाचे फळ तिला तत्काळ मिळाले. नंदीला खंडेरायाबद्दल विचारले असता त्याला बोलण्याची अनुमती नसल्याने त्याने मानेने केलेल्या खुणेवरून म्हाळसाला खंडेराय आणि बाणाई जिथे लपले होते ते ठिकाण सापडले.

तेव्हापासून खंडोबाभक्त स्त्रिया घरामध्ये शिवलिंगाची स्थापना करून अकरा किंवा एकवीस दिवसांचे अनुष्ठान करतात. म्हणजेच या काळात उपवास-पूजा करतात. घरात शिवलिंगाची प्रतिष्ठापना करण्याऐवजी गावातील शिवमंदिरात किंवा फक्त जिथे शिवपिंड आहे, अशा ठिकाणी पूजा केली तरी चालते. हे व्रत फक्त विवाहित स्त्रियाच करतात.

अनुष्ठान करण्यामागचा उद्देश हा की, आपल्या पतीने आपल्यावर, मुला-बाळांवर खूप प्रेम करावे, तो नेहमी निर्व्यसनी राहावा, त्याने कौटुंबिक जबाबदाऱ्या व्यवस्थित पार पाडाव्यात, तो आपल्याशी प्रामाणिक राहावा, परस्त्रीशी त्याने संग करू नये इत्यादी.

**हिंदोळाव्रत :**

हिंदोळाव्रताचे वर्णन 'श्रीक्षेत्र जेजुरीमाहात्म' या लघुग्रंथात पुढीलप्रमाणे आले आहे :

''चैत्र शु. ३ पासून वैशाख शुद्ध तृतीयेपर्यंत सोन्याचा अथवा रूप्याचा अगर पितळेचा किंवा निदान लाकडाचा डोल्हारा करून त्यात म्हाळसा व मार्तंड यांस बसवून षोडशोपचारे पूजन करावे. पूजेकरिता सुंगधी चंदन पीताक्षता, गुलाब, मोगरा वैगेरे फुले, बेल, दुर्वा, बुका, कापूर हे पदार्थ असावेत. दहिभाताचा नैवेद्य दाखवावा. शिवाय नैवेद्यात कंदर्पमिश्रित भरीत व कनकीचा रोडगा हे असावेत, देवापुढे तांबूल व दक्षिणा ठेवावी. पुरणाच्या दिव्याने आरती करावी. नंतर दिवटी पेटवून तिची पूजा करून तळी भरावी. रात्री जागर एक प्रहरपर्यंत करून गीतनृत्याने मल्लारीस संतुष्ट करावे. हे हिंदोळाव्रत एक महिना केले असता विपुल सुख प्राप्त होते.''[५]

## द्वार प्रदक्षिणा (जेजुरी)

द्वारप्रदक्षिणेमध्ये महाद्वार, मध्यमद्वार व उत्तमद्वार अशा तीन प्रकारच्या प्रदक्षिणा आहेत. याचे उल्लेख स्थानिक जेजुरी माहात्म्याबद्दल लिहिलेल्या काही छोट्या पुस्तकांत आढळतात. अशा प्रकारचे 'प्रदक्षिणा माहात्म्य'

महाराष्ट्र-कर्नाटकातील प्रत्येक महत्त्वाच्या खंडोबास्थानी आढळते. उदा. जेजुरी, निमगाव दावडी इत्यादी ठिकाणी.

**१) महाद्वार प्रदक्षिणा :**

श्री क्षेत्र जेजुरीच्या पूर्वेस मोरगावला दर्शन घेऊन मग दक्षिणेला वीरभद्र, पश्चिमेला व उत्तरेला भुलेश्वराचे दर्शन करावे म्हणजे महाद्वार पूजेची पूर्तता होते.

**२) मध्यमद्वार प्रदक्षिणा :**

साकुर्ड्याच्या बोंबलेश्वरापासून प्रारंभ करून शिवरीची यमाई, लवेश्वर, नाझऱ्याचा नागेश्वर असे दर्शन घेतल्यानंतर प्रदक्षिणा व यात्रा पूर्ण होते.

**३) उत्तमद्वार प्रदक्षिणा :**

या यात्रेचा किंवा प्रदक्षिणेचा प्रारंभ जेजुरी गडावरील मंदिराच्या दक्षिणेला असलेल्या गणपतीस वंदन करून करावा. नंतर हेगडी प्रधान तथा भगवान विष्णूचे दर्शन करून खाली वीरभद्राचे दर्शन घ्यावे. शेवटी मंदिरातील भुलेश्वराचे दर्शन घेऊन खंडोबाचरणी ही यात्रा किंवा प्रदक्षिणा पूर्ण करावी. या क्षेत्री पिंडदानादी विधी निषिद्ध मानले आहेत. स्वप्नात कुत्रा अथवा घोडा आला तर खंडोबाचे बोलावणे आले, असे समजून भक्तमंडळी जेजुरीची वारी करतात.

**४) मेरु प्रदक्षिणा :**

मल्हारी तीर्थात स्नान करून खंडोबाचे दर्शन घ्यावे. मग गडाखाली उतरून जाणाई तीर्थ, लक्ष्मी तीर्थ व मल्हारी तीर्थाला उजवीकडून वळसा घालून जयाद्री प्रदक्षिणा करावी. नंतर कवाड खिंडीत जाऊन पठारलिंगाचे दर्शन घ्यावे. तेथून पुढे विजाळ्यावर उतरावे व लवथळेश्वराचे दर्शन घ्यावे. नंतर जननी तीर्थावर येऊन पुनश्च मार्तंडभैरवाचे दर्शन घ्यावे. अशा रीतीने एक मेरु प्रदक्षिणा पूर्ण होते. अशा अकरा प्रदक्षिणा पूर्ण झाल्यावर एक मोठी प्रदक्षिणा घालावयाची असते. ती अशी :

मल्हारीमार्तंड तीर्थ, कवाडखिंड, शंकरेश्वर, बोंबलेश्वरास उजवीकडून वळसा घालून लवथळेश्वर व परत जननीतीर्थ अशी ही मोठी प्रदक्षिणा आहे. ती पूर्ण झाली की, खंडोबास भंडारा वाहावा व त्याची प्रार्थना करावी. या मोठ्या प्रदक्षिणेच्या योगाने इच्छित फलप्राप्ती होते, अशी अनेक खंडोबाभक्तांची श्रद्धा आहे.

## खंडोबादेवाचे पंचायतन

श्रीखंडोबा देवाच्या भक्तांमध्ये काहीजण खंडोबाच्या पंचायतनाची पूजा करतात. पंचायतन पुढीलप्रमाणे

**मूर्तिपूजेचे पंचायतन :**




मध्यभागी मल्हारी, बाणाईसह म्हाळसा, ईशान्य दिशेस हेगडी प्रधान, आग्नेय दिशेस गणपती, नैर्ऋत्य दिशेस पंचलिंग व वायव्येस अन्नपूर्णा अशा प्रकारे पंचायतन मांडून श्री खंडोबा देवाची पूजा केली जाते.

**शालिग्रामचे पंचायतन :**




या पंचायनात स्वत: खंडोबा देव हेच मार्तंडभैरवरूपी सूर्य आहेत.[६]

## रुद्र आणि रुद्राक्ष

विविध रूपांतील शक्तिस्वरूप शिवपत्नी पार्वती, शिवपुत्र गणपती, शिव आणि रुद्र एकच मानल्यामुळे रुद्रअंश असणारा रुद्रपुत्र मारुती, भैरव हा उग्र स्वरूपातला शंकरच मानल्यामुळे विविध रूपांतील भैरव, **खंडोबा**, ज्योतिबा, रवळनाथ हेदेखील शंकराचा अवतार मानले गेले आहेत. त्यामुळेच या देवतांच्या उपासनेत रुद्रपूजेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. त्या रुद्राविषयी माहिती पुढीलप्रमाणे :

ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद व अथर्ववेद हे चार वेद. यापैकी सर्वांत प्राचीन वेद ऋग्वेद. त्यात रुद्राचा उल्लेख आहे पण शिवाचा नाही. ऋग्वेदामध्ये शिव शब्द विशेषण म्हणून आलेला आहे. देवतावाचक म्हणून आलेला नाही. हा रुद्र कसा आहे ? अग्नीसारखा तांबूस, लाल आहे. माथी जटाभार असलेला, उग्र प्रकृतीचा, भीषण शब्द करणारा, त्याच्या अवकृपेमुळे मानवी जीवनात अनेक संकटे व दु:खे निर्माण होतात, पण हवी दिल्यास संतुष्ट होतो, कल्याणकारक बनून भक्तांना रोगमुक्त करणारा असा आहे. त्याच्याबद्दल मनात भीतीच जास्त आहे.

रुद्राची अकरा आवर्तने पाठ म्हणून एकादष्णी करण्याचा प्रघात आहे. या रुद्राचे किंवा शतरुद्रियाचे नमक आणि चमक असे दोन भाग असून, त्यांनी शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन वाजसनेयी संहितेचे सोळा आणि अठरा अध्याय व्यापलेले आहेत. पैकी सोळाव्यात रुद्राला जे नमन आहे त्या नमनाचा रोख रुद्राचा रोष आपणावर न व्हावा व ज्याच्यापासून आपणांस त्रास पोहोचण्याचा संभव आहे अशा सर्वांपासून रुद्राने आपले रक्षण करावे हा आहे. त्याची सुरुवात अशी आहे-

**ॐ नमस्ते रुद्र मन्यवे उतो तो इषवे नम: ।**

अर्थ - हे रुद्रा तुझ्या रोषाला (मन्यु) व तुझ्या बाणांना नमस्कार असो. रक्षणावर भर असल्याने या आध्यायातील सहासष्ट मंत्रांपैकी अर्ध्या मंत्रात रुद्राच्या धनुष्याचा व बाणांचा उल्लेख आहे. या अध्यायाची एकंदर मांडणी अशी आहे की हे रुद्रा. सर्प वगैरे हिंस्र प्राण्यांना ठार करून यातुधानांना (राक्षसांना) आमच्यापासून दूर घालवून दे. हे भगवान तुझ्या धनुष्याची दोरी सोडून टाक आणि बाणही फेकून दे कसे. हे रुद्रा! आमच्या कोवळ्या मुलाबाळांचा, आमच्या वृद्ध मातापितरांचा, आमच्या गायी, घोड्यांचा नाश करू नकोस. आम्ही यज्ञात तुला नेहमी हवी देत आलेले आहोत. चोर, लुटारू, खड्‌गधारी तसेच रथकार, कुंभार, लोहार, शिकारी या सर्वांवर तुझे आधिपत्य आहे. तुला नमन असो. ऊन, पाऊस, विजा, विहिरी, तळी या सर्वांत वास करणाऱ्या रुद्रा तुला नमन असो! हे जटाधारी रुद्रा ही पाहा आमची बुद्धी तुझ्या स्वाधीन केली तर आमच्या गावातील माणसे आणि गुरेढोरे सर्व निरोगी आणि धष्टपुष्ट होवोत इत्यादी.

याप्रमाणे नमकाध्यायात रक्षणाची प्रार्थना केल्यावर चमकाध्यायात आपल्या यज्ञाने तुष्ट होऊन रुद्राने आपणास काय द्यावे ते 'हे मला मिळो, हे मला मिळो' अशा शब्दांनी वर्णिलेले आहे. त्याचा एकंदर सूर असा की, माझ्या यज्ञाच्या योगाने मला उत्तम अन्न, सुदृढ शरीर, दीर्घायुष्य, राजयक्ष्म्यादी रोग, भय, शत्रू यांपासून अलिप्तता, सर्व प्रकारचे सुख, गाढ झोप येईल अशी शय्या, उत्साहवर्धक पहाट आणि आनंदात जाईल असा सर्व दिवस (सुखं च मे, शयनं च मे, सूषाश्च मे, सुदिंनच मे), तांदूळ, जवस, उडीद, तीळ, मूग, चणे वगैरे धान्य व सोने, रूपे, पोलाद, लोखंड, शिसे, कथील, पाषाण, मृत्तिका वगैरे खनिज पदार्थ, गायी, कालवडी, खोडे, बैल हे सर्व मला मिळोत.

तात्पर्य, रुद्र ही ऋग्वेदातील उग्र देवता आहे. उपासकाला त्याची भीती वाटे व त्याच्या शस्त्रांपासून मुक्तता मिळावी अशी प्रार्थना आहे. त्याचा कोप होऊ नये, त्याने संतुष्ट राहावे म्हणून भीतीपोटी त्याला यज्ञात हवी दिला जात असे. उद्देश, हवी घेऊन त्याने संतुष्ट राहावे, उपासकास संरक्षण देऊन, त्याचे कल्याण करावे अशी इच्छा आहे.

आर्य भारतात आल्यावर त्यांचा येथील त्यांच्यापूर्वी आलेल्या रहिवाशांशी, आदिवासींशी, द्रविडांशी संबंध आला. प्रारंभीच्या संघर्षानंतर आर्य-द्रविडादी लोक एकत्र नांदू लागले. आर्यांनी मूळच्या लोकांच्या, द्रविडांच्या काही लोकप्रिय देवता स्वीकारल्या. 'शिव' ही त्यांपैकी एक. आर्यांनी शिवाला रुद्र स्वरूपात पाहिले. शिवही तांबडा, रुद्रही तांबडा. शिव जटाधारी, रुद्रही जटाधारी. शिवाच्या तृतीय नेत्रात अग्नी, तर रुद्रच अग्निस्वरूप. यामुळे 'शिव तोचि रुद्र, रुद्र तोचि शिव' ही कल्पना रूढ झाली.

यजुर्वेदामध्ये रुद्राच्या शिवस्वरूपाचा विकास दिसून येतो. शतरुद्रियामध्ये रुद्राची शंभर नावे येतात. श्वेताश्वतर उपनिषदांमध्ये रुद्र महादेव स्वरूपात विकसित झाला. अथर्व वेदात रुद्राचा महादेव म्हणून उल्लेख येतो. या रुद्रशिव कल्पनेमध्ये डोंगरी अनार्यांचा देव आणि सैंधव संस्कृतीतील पशुपती यांची भर पडून सध्याच्या शंकर देवतेचे स्वरूप बनले.[७]

## खंडोबाचे मूर्तिवैज्ञानिक ध्यान-स्वरूप

एकोणिसाव्या शतकात लिहिल्या गेलेल्या 'श्रीतत्त्वनिधी' या ग्रंथात आठ-आठ भैरवांचे एक याप्रमाणे चौसष्ट भैरवांचे आठ वर्ग सांगितले आहेत. त्यातील पहिल्याच 'असितांग' वर्गातील मार्तंडभैरव हा तिसरा अवतार आहे.[८] वरील ग्रंथात मैलार खंडोबा तथा मार्तंडभैरव अवताराचे मूर्तिवैज्ञानिक ध्यान-स्वरूप वर्णन पुढीलप्रमाणे दिले आहे :

**आद्याष्टकं सुवर्णाभं त्रिशूलं डमरूं तथा ।**
**पाशं चासि दधानं च ध्यायेत्सर्वाङ्गसुन्दरम् ।**

या वर्गातील भैरवमूर्ती चतुर्भुज, त्रिशूल-डमरू-पाश-खड्ग धारण करणारी आणि सुवर्णवर्णाची असते. परंतु, यात आलेला पाश खंडोबाच्या हातात आढळत नाही. मात्र, पाशाच्या ऐवजी त्या जागी पानपात्र ठेवले की, हे वर्णन खंडोबालाही लागू पडते.

स्कंद पुराणातील मैलारलिंग ध्यानस्तोत्रातील मैलारलिंगाचे मूर्तिस्वरूप दाखविणारा भाग पुढीलप्रमाणे दिला आहे :

**मैलार मालचीनाथं सर्वजंतुहिते रतम् ।**
**भजामि भंजतां कल्पपादपं पश्या मुदा ।।**
**शुभ्राङ्गं भूषणैर्युक्तं हरिद्राचूर्णसंयुतम् ।**
**पीताम्बरमुदाराङ्गं भजतां कामदं सदा ।।**
**त्रिशूलं डमरूं खड्गं वरदं च कराम्बुजैः ।**
**बिभ्राणं प्राणिरक्षार्थं सर्वकालमतन्द्रितम् ।।**
**देवानां रक्षणार्थाय दानवानां वधाय च ।**
**मैलारं रूपमास्थाय शङ्करः शङ्करोऽभवत् ।।**
**गजसिंहवराहार्क्षव्याघ्ररूपधरान् खलान् ।**
**दुष्टान् शत्रून् विनिघ्नन्तुं तुरगेण चचार ह ।।**
**शुकैः प्रभूतनिनदैः कंठबद्धकपर्दकैः ।**
**भानुवारे मनुष्याणां उत्सवे सार्वकालिके ।**
**तं वंदे वरदं देवं वारिजस्थं महेश्वरम् ।।**
**स्मरणाद्यस्य देवस्य मैलारस्थामितौजसः ।**
**हरिद्रया कृतं रम्य भंडारं भजतां नृणाम् ।।**

या ध्यानस्तोत्रात मैलार, मालचीनाथ अशी नावे आहेत. देवाचे वाहन अश्व असून, रविवार हा त्याचा विशेष दिवस आहे. यात त्रिशूल-डमरू, खड्ग ही तीनच आयुधे सांगितली आहेत. चौथा हात वरदमुद्रेत असल्याचे वर्णन आहे. पण वरदमुद्रेच्या जागी पानपात्र आढळते.

आणखी एका ध्यानात मल्लारीदेवाच्या मूर्तीचे व वस्त्रालंकारांचे वर्णन करून पुढे त्याच्या परिवार पशुंविषयीचे (घोडा, कुत्रा) वर्णन दिले आहे. 'मल्लारीमाहात्म्या'त हे वर्णन खालीलप्रमाणे आहे :

**मुकुटमणिमयूखप्रोज्झिताशेषरत्नम् ।**
**विमलशशिकलांङ्गं सुंदरेन्दीवराक्षम् ।।**
**अनुकृतशशितेजः कुंडलं चारूहासं ।**
**प्रकटदशनशोभानिर्जितानेकहारम् ।।१।।**
**अभिनवमणिमुक्ताहारचांपेयमाला ।**
**विविधकुसुमगुच्छः शोभिवक्षःस्थलाढ्यम् ।।**
**सकणपवनभुग्दोर्दण्डभूषाभिरामम् ।**
**करडमरुनिनादैः पूरितैरर्थगर्भम् ।।२।।**
**त्रिभुवनभुवनेशं पीतकौशेयवासं ।**
**दनुजदघ्नपक्षं प्रस्फुरत्खड्गहस्तम् ।।**
**भुजगफणसुगुप्तैर्भूषणैर्न्यस्तभूषम् ।**
**प्रणतसुरकिरीटव्याप्तपादारविन्दम् ।।३।।**
**सितहयवरपत्रं हारसंभूषिताङ्गम् ।**
**परिवृतमतिघोरैः सप्तभिः सारमेयः ।।**
**कनकागिरिसमाभं नैशचूर्णाभिरामम् ।**
**सकलनिगमगुह्यं नौमि मल्लारिदेवम् ।।४।।**

यातही खड्ग, डमरू या आयुधांचा उल्लेख आला असून, घोड्याचा वर्ण शुभ्र सांगितला आहे, तर कुत्र्यांची संख्या सात धरली आहे. यावरून खंडोबा परिवारात सात या संख्येला विशेष महत्त्व असल्याचे जाणवते. 'मल्लारीसहस्रनामा'त खंडोबाचे ध्यान पुढीलप्रमाणे दिले आहे :

**ध्यायेन्मल्लारिदेवं कनकगिरिनिभं म्हाळसाभूषिताङ्कम् ।**
**श्वेताश्वं खड्गहस्तं विबुधबुधगणैः सेव्यमानं कृतार्थम् ।।**
**युक्ताङ्घ्रिनघ्र दैत्यमुण्डं डमरुविलसितं नैशचूर्णाभिरामम् ।**
**नित्यं भक्तेषु तुष्टं श्वगणपरिवृतं नित्यमोङ्कारगम्यम् ।।**

या ध्यानात सुवर्णवर्ण, मांडीवर म्हाळसा, पांढरा घोडा, हातात खड्ग व डमरू, दैत्याच्या डोक्यावर पाय, कुत्र्यांचा परिवार व हळदीची शोभा यांचा उल्लेख आला आहे. आयुधावरून हे द्विभुजमूर्तीचे वर्णन वाटते. कारण त्रिशूल व पानपात्र धारण करणाऱ्या आणखी दोन हातांचा यात उल्लेख केला नाही.

'शारदातिलक' नामक ग्रंथातही मार्तंडभैरवाची अशा प्रकारची वर्णने आढळतात.

## खंडोबाची संस्कृत-मराठी स्तोत्रे

**भंडारायंत्र :**

भंडारा वाहताना म्हणावयाचा मंत्र :

**स्कंदनाभि समुदमूर्ते । श्रीमैरालप्रियकरि ।**
**गौरीप्रिय तडिद्गौरी । लक्ष्मीसुते नमोऽस्तु ते ।।**

**मराठी अनुवाद**

स्कंदाप्रमाणे नाभी असणाऱ्या आनंदमूर्ती, श्री मैरालाला प्रिय करणाऱ्या, गौरीला प्रिय असणाऱ्या, विजेप्रमाणे गोरा वर्ण असलेल्या हे लक्ष्मीकन्ये, नमस्कार असो.

**प्रातःस्मरण :**

**प्रातःस्मरामि भवभीतिहरं सुरेशम् ।**
**मल्लारिमिन्द्रकमलाननविश्ववंद्यम् ।।**
**श्रीम्हाळसावदनशोभितवामभागम् ।**

**मल्लारिदेवमनघं पुरुषं वसन्तम् ॥१॥**
**प्रातर्भजामि मणिमल्लजरूण्डमालम् ।**
**माणिक्यदीप्तिशरदोज्ज्वलदन्तपंक्तिम् ॥**
**रन्तैर्महामुगुटमण्डितमष्टमूर्तिम् ।**
**सन्तप्तहेमनिभगौरशरीरपुष्टम् ॥२॥**
**प्रातर्नमामि फणिकज्जलमुक्तदीपम् ।**
**चन्द्रार्ककुण्डलसुशोभितकर्णयुग्मम् ।**
**सत्पात्रखड्गडमरुं च त्रिशूलहस्तम् ।**
**खण्डेन्दुशेखरनिभं शशिसूर्यनेत्रम् ॥३॥**
**इदं पुण्यमयं स्तोत्रं मल्लारेर्यः पठेन्नरः ।**
**प्रातः प्रातः समुत्थाय सर्वत्र विजयी भवेत् ॥**

**मराठी अनुवाद**

सर्व प्राणिमात्रांमध्ये राहणाऱ्या, निष्पाप, म्हाळसाच्या मुखाने ज्याचा डावा भाग शोभिवंत झाला आहे अशा, रात्री उमलणाऱ्या कमळाप्रमाणे मुख असणाऱ्या, विश्वाला वंदनीय असलेल्या, संसाराची भीती नाहीशी करणाऱ्या, देवांचा स्वामी अशा मल्हारी देवाचे मी सकाळी स्मरण करतो ॥१॥

तापलेल्या सोन्याप्रमाणे तेजस्वी व पुष्ट शरीर असलेल्या, मणि-मल्ल राक्षसांच्या मुंडक्यांची माळ घातलेल्या, माणकांचे तेज व शरद ऋतूप्रमाणे झळाळणारी दंतपंक्ती असलेल्या, चमकणाऱ्या महामुकुटाने शोभणाऱ्या अष्टमूर्तीला (शिवाला - मल्हारीला) मी सकाळी भजतो ॥२॥

चंद्र-सूर्य हेच नेत्र असलेल्या, चांगले खड्ग, डमरू व त्रिशूल हातात असणाऱ्या, सूर्य-चंद्रांच्या कुंडलाने सुशोभित दोन कान असलेल्या, सर्परूपी काजळापासून मुक्त झालेल्या दिव्याप्रमाणे असलेल्या, चंद्रकोर मस्तकी असलेल्या (शिवाप्रमाणे) अशा (मल्हारीला) मी सकाळी नमस्कार करतो ॥३॥

हे पुण्यकर मल्हारी स्तोत्र सकाळी उठून रोज जो म्हणेल तो सर्वत्र विजयी होईल.

**पसायदान :**

**श्री पालीराय शरणागत दीनवाणी ।**
**का कर्ण गोचर नव्हे वद खड्गपाणी ।**
**दीन मी म्हणुनी करिशी उपेक्षा ।**
**पाहा ढळे पतीत पावन दिव्यदीक्षा ॥१॥**
**नेणे जपे नच तपे नच दान धर्मा ।**
**जाणे दुराचरण पाप निषिद्ध कर्मा ॥**
**ऐसा कळूनि निरूपाधिक सत्यपाला ।**
**रक्षावे सर्व जननि जनका निजाला ॥२॥**
**देवाधिदेव करुणाकर दीनबंधो ।**
**दावी तुझे चरण पंकज भाव सिंधो ॥**
**सेवा विहीन म्हणूनी करीशी उपेक्षा ।**
**कैशा मला त्रिदश वदीत पार्वतीशा ॥३॥**
**देही म्हणोन कर जोडोनि अर्थिमुद्रा ।**
**दावू तुला तुजविणे न घडेल रुद्रा ॥**
**दे तु, न दे, तव पदांबूज मी न सोडी ।**
**पालीपुरी रमण निर्दली वारो पाडी ॥४॥**

**मल्हारीअष्टक :**

**मल्हारी करुणा करी मजवरी । ताप त्रयाते हारी ।**

**तारी या भवसागरी मजसी या । रंकासी हाती धरी ।**
**म्हाळसापती स्वामी राजसा । पावशी मला सत्य भरवसा ।**
**म्हणुनिया तुझी मांडली स्तुती । पाव सत्वरे म्हाळसापती ।**
**आस ही तुझी फार लागली । दे दयानिधे बुद्धी चांगली ।**
**देऊ तू नको दुष्ट वासना । तूच आवरी आमुच्या मना ।**
**सर्व शक्ती तू सर्व देखणा । कोण जाणितो तुझीया गुणा ।**
**माणसे आम्ही सर्व लेकरे । माय बाप तू हे असे खरे ।**
**तुझिया कृपेविण ईश्वरा । आसरा आम्हा नाही दूसरा ।**

**मल्लारि स्तवनम् :**

**हरिद्राप्रियरुद्राय**
**म्हालसापतयेनम: ।**
**भद्रकामाय बाणाया:**
**मल्लारे खड्गपाणिने ।**
**अरित्वे ह्यापि मल्लस्य**
**शांतये सख्यदायिने ।**
**शैतलाय च शैलस्य**
**मार्तंडाय नमो नम: ।**
**सन्मतिं संसुखं शांतिम्**
**कल्याणम्प्रगतिन्नयम् ।**
**अखंड देही भण्डारम्**
**अस्माकंहेबलव्रत ।**

**मराठी अनुवाद**

हरिद्रा (हळद) प्रिय असणाऱ्या रुद्राला, म्हाळसाच्या पतीला नमस्कार असो. बाणाईविषयी शुभ कामना असणाऱ्या, हातात खड्ग असणाऱ्या, मल्लाशी वैर असूनही त्याच्या शांतीसाठी मैत्री देणाऱ्या (करणाऱ्या), पर्वतावरील शीतलतेप्रमाणे असणाऱ्या मार्तंडाला नमस्कार असो.

सामर्थ्य हेच व्रत असलेल्या (मल्लारी), चांगली मती असलेल्या, सुखरूप अशा, शांती असलेल्या, कल्याणकर, प्रगतीप्रत नेणाऱ्या आम्हाला अखंड भंडारा दे.

**श्रीमल्लारिहृदय :**

**श्रीगणेशाय नम: । ॐ अस्य श्री मल्लारिहृदय-**
**मंत्रस्य । ब्रह्माविष्णुमहेश्वरा ऋषय: ।। अनुष्टुभ्**
**छंद: । श्री गंगाम्हालसायुक्तमल्लारिः देवता ।।**
**भूर्भुव: स्व: इति बीजम् ।। तत्सवितुर्वरेण्यं इति शक्ति: ।**
**भर्गो देवस्य धीमहि इति कीलकम् ।। धियो यो न:**
**प्रचोदयादित्यस्थम् ।। श्री मार्तंड-भैरव प्रीत्यर्थम् । मम**
**समस्तपुरुषार्थसिध्यर्थे जपे विनियोग:**
**अथ न्यास: ।**
**ॐ ऐं मल्लारये नम: अंगुष्टाभ्यां नम:, हृदयाय नम: ।**
**ॐ ऱ्ही म्हालसानाथाय नम: तर्जनीभ्यां नम:, शिरसे स्वाहा ।।**
**ॐ श्री मेघनाथाय नम: मध्यमाभ्यां नम: शिखायै वौषट् ।।**
**ॐ क्लीं महीपतये नम: अनामिकाभ्यां नम:, कवचाय हुं ।।**

**ॐ सौं मैरालाय नमः कनिष्ठिकाभ्यां नमः, नेत्रत्रयाय वौषट्**
**ॐ ऐं ऱ्हीं श्रीं क्लीं सौं खड्गराजाय नमः, करतल-**
**करपृष्ठाभ्यां नमः, अस्त्राय फट् ॥**
**ॐ भूर्भुवः स्वरोम् इति दिग्बंधः ॥**
**अथ ध्यानम् ।**
**ध्यायेन्मार्तंडरूपं अचल-चलविभू कोटिसूर्यप्रकाशं ।**
**आनंद विश्ववंद्यं सकलजनकरं कर्मधर्मादिनाथं ।**
**अश्वां बोधावरूढं परमविमलं कोटिकंदर्पदर्पम् ॥**
**अथ ऋषिन्यास :**
**ॐ ऱ्हीं विष्णवे नमः तर्जनीभ्यां नमः, शिरसे स्वाहा॥**
**ॐ श्रीं महेश्वराय नमः मध्यमाभ्यां नमः शिखायै वौषट्॥**
**ॐ क्लीं कामबीजाय नमः अनामिकाभ्यां नमः, कवचाय हुं॥**
**ॐ सौं शक्तिबीजाय नमः कनिष्टिकाभ्यां नमः नेत्रत्रगाय वौषट्॥**
**ॐ ऐं व्हीं श्रीं क्लीं सौं ब्रह्मा-विष्णुमहेश्वरेभ्य नमः करतल करपृष्टाभ्यां नमः, अस्त्राय फट्॥**
**पूर्वे श्वेतांबरं देवं आग्नेयां रूद्र भैरवं। दक्षिणे चंडरूपाय नैर्ऋत्यां क्रोधभैरवं॥ पश्चिमे उन्नतग्रीवं, वायव्यां कालभैरवं ॥ उत्तरे सिद्धिसिद्धांत ईशान्यां शिवकर्पूरं॥ ऊर्ध्वे काल विरूपाय। अंबरे मल्ल हरिणीं। अंतिरिक्षे सदानंद। यळूकोटिस्वरूपिणं॥ एवं एकादशं देवं रक्षेत् त्रैलोक्य सर्वदा। विजयी सर्व कामार्थ। क्षेत्रपाल महीपते। भ्रुवोर्मध्येतु ॐकार द्विदले सहस्त्र भावनः। नेत्रे त्रिपुरांतकं देवं॥ नासिकं कामहारकं॥ मुखे मुमुक्षुनाथाय। कंठं कर्म कलामृतं॥ हृदयं हरि लिंगाय॥**
**स्कंदे कर्म हरि प्रियं। पृष्ठे प्रीलप रूद्राय। उदरे उदयार्कजम् कंठे रक्षतु कार्यार्थी। नाभीं नारद जायते॥ गुहयं गुरूपथाम्नाय। जंघे जिव प्रदोवतु॥ जानुमंडल जानाथ पदं प्रासादप्राप्तये। अंगुष्ठे सर्व तीर्थानि सर्वांगे परमेश्वरः। एवं अंगेषु दिव्यस्य॥ मार्तंड स्वरूपणिं। प्रथमं काशीनाथाय। द्वितीयं पंचलिंगयो तृतीयं प्रेमलिंगाय। चतुर्थे देवरूपिणीम्। पंचमं पंच प्राणाय षष्टं षड्भुजक्षेमक॥ सप्तकं सपाकं सिद्धी। अष्टमं अंबिकाप्रियम्। नवमं नागनाथ च। दशमं शोषहारकं। एकादशं महारूद्र द्वादशं ज्योतिःलिंगयोः। त्रयोदशं त्रियोगीच चतुर्दशं भुवनत्रये॥ पंचदशं मंडलं पूर्व॥ षोडषं च समाधिने। सप्तदशं गुहयरूपं। अष्टादशं अब्जकम्॥ नवदशं नैसर्गिकं देवी॥ तन्नो देवो प्रसन्नता॥ एकोन विंशति नमानि विश्वंभर भस्वरूपयोः। ज्ञानसिद्धी भवेत्प्राप्ती॥ एकादश जपं जले॥ स्मशाने दशपाठं च सप्तवारं पठेन्नरः॥ सर्व योः भवेत् हानिः संग्रामे विजयी भवेत्॥ अश्वत्थं बिल्वं मांदार चंदनं धातृचंपकं॥ शामा सुगंधि कादंबा नववारं पठेत्सुख॥**
**मंत्रसिद्धिं नवरात्रेण। अष्टरात्रं च देवतम्। पंचरात्रे जनवश्यं त्रिरात्रं त्रिसमाहितः। द्विरात्रं व्याघ्र सपाृणाम् मोहन मंत्र मालिका। एवं हृदयमर्तांडपाठःशुभकुलं जयेत। मार्तंड क्षेत्र मान्यो वा। कर्म धर्म सुखावहं। एवं विंशंति ते कार्य। मार्तंड रूप दर्शिनम्। भावार्थ तारको देव परब्रह्म स्वरूपिणीम्॥**
**इति श्रुति-स्मृति योगार्णव श्री मार्तंड अवतार। प्रोक्तं ईश्वर-पार्वती संवाद मल्लारि हृदय संपूर्ण॥**

**मराठी अनुवाद**

श्रीगणेशाला नमस्कार असो. ॐ या श्रीमल्लारिहृदय मंत्राचे ब्रह्मा, विष्णू व महेश्वर हे ऋषी आहेत. या मंत्राचा छंद अनुष्टुभ. या मंत्राची देवता - गंगा व म्हाळसा या दोघींनी युक्त मल्हारी ही होय. 'भू र्भुवः स्वः' हे या मंत्राचे बीज (मूळ). 'तत्सवितुर्वरेण्यं' ही याची शक्ती. 'भर्गो देवस्य धीमहि' हे या मंत्राचे कीलक. 'धियो यो नः प्रचोदयात्' हा भाग म्हणजे याच्या अस्थी.

श्रीमार्तंडभैरवाला प्रसन्न करण्यासाठी आणि माझ्या सर्व पुरुषार्थसिद्धीसाठी जपाला सुरुवात करतो.

**न्यास :**

ॐ ऐं मल्लारीला नमस्कार. दोन्ही अंगठ्यांना नमन. हृदयाला नमन.
ॐ ऱ्हीं म्हालसानाथाला नमस्कार. तर्जनींना नमन. डोक्याला नमन.
ॐ श्री मेघनाथाला नमस्कार. मध्यमांना (मधली बोटं) नमन.

शेंडीला नमन (वौषट्).

ॐ क्लीं महीपतीला नमस्कार. अनामिकांना नमन. कवचाला हुं (नमन).

ॐ सौ मैरालाला नमस्कार. करंगळीला नमन. तीन डोळ्यांना वंदन (वौषट्).

'ॐ ऐं ऱ्हीं श्रीं क्लीं सौ' खड्गराजाला नमस्कार. दोन्ही हातांच्या तळव्यांनी नमन.

अस्त्राय फट् ह्न टाळी वाजवावी.

ॐ भूर्भुवः स्वः हा दिग्बंध

**ध्यान :**

मार्तंडरूपी, अचल, चल विभू कोटीसूर्यांचे तेज धारण करणाऱ्या, आनंदस्वरूपी, जगाला वंद्य अशा, सर्व जनांचा निर्माता, कर्मधर्म इत्यादींचा स्वामी, अश्वारूढ (घोड्यावर असलेल्या) अतिशय पवित्र, कोटीमदनांचे सौंदर्य धारण करणाऱ्या (अतिशय सुंदर) अशा मल्लारिराज, विजय प्राप्त करणाऱ्या म्हाळसाकांत सिद्धाचे ध्यान करावे.

**आता ऋषिन्यास :**

ॐ ऱ्हीं विष्णूला नमस्कार (तर्जनींनी डोक्याला हात).

ॐ श्रींमहेश्वराला नमस्कार (मध्यमांनी शिखेला वौषट्).

ॐ क्लीं कामबीजाला अनामिकांनी नमस्कार (कवचाय हुं).

ॐ सौं शक्तिबीजाला करंगळींनी नमस्कार. (तीन डोळ्यांना वौषट्).

ॐ ऱ्हीं श्रीं क्लीं सौ ब्रह्मा, विष्णू व महेश्वरांना हाताच्या तळव्यांनी नमन.

पूर्व दिशेला श्वेत वस्त्र परिधान करणाऱ्या देवाला माझा नमस्कार. आग्नेय दिशेस रुद्र भैरवाला, दक्षिण दिशेला चंडरूप धारण करणाऱ्या देवाला, नैर्ऋत्येस क्रौधभैरवाला, पश्चिमेला उन्नतग्रीवास, वायव्येस कालभैरवाला, उत्तरेला सिद्धिसिद्धांतास, ईशान्य दिशेस शिवकर्पूराला, ऊर्ध्व दिशेस विरूपाला, अंबरात मल्लाचे हरण करणाऱ्या देवाला, अन्तरिक्षात सदानंदाला माझा नमस्कार (क्रमाने असे म्हणत त्या त्या दिशांना नमस्कार करावा.)

अशा प्रकारे यळकोट स्वरूप अकरा प्रकारचा देव नेहमी त्रैलोक्याचे रक्षण करो. हे क्षेत्रपाला महीपती, सर्व कामनांच्या सिद्धीसाठी विजयी हो.

दोन भुवयांच्या मध्ये ओंकार, दोन पापण्यांमध्ये सहस्रभावनाचा वास असतो. नेत्रामध्ये त्रिपुरांतक देव तर नासिकेत मदनाला ठार करणारा, मुखामध्ये मोक्ष मिळविण्याची इच्छा करणाऱ्यांचा स्वामी, तर कंठात सर्व कर्मांचे अमृतत्व साठविलेले आहे. हृदय हरिलिंगासाठी, खांद्यामध्ये हरिप्रिय कर्म वास करते. पाठीवर रुद्रासाठी तर उदरामध्ये उदयार्कज निवास करतो. कंठामध्ये कार्य साधू इच्छिणारा देवाला राखतो, तर नाभीमध्ये नारद असतो. गुह्यस्थानी गुरुपथ, तर मांड्यांमध्ये जीवस्वरूप देव. गुडघ्यामध्ये आणि पायामध्ये परमेश्वराचे स्थान, अंगठ्यात सर्व तीर्थे, तर सर्वांगामध्ये परमेश्वर. अशा प्रकारे परमेश्वराच्या दिव्य अंगाचे मार्तण्डस्वरूपाचे ध्यान करावे. (त्याला नमन करावे.) (आता १९ वेगवेगळ्या नावांनी नमस्कार) पहिले नमन काशिनाथाला, दुसरे नाव पंचलिंग, तिसरे प्रेमलिंग, चौथे देवरूपिणी, पाचवे पंचप्राण, सहावे षड्भुजक्षेत्रक, सातवे सपाकसिद्धी, आठवे अंबिकाप्रिय, नववे नागनाथ, दहावे शेषहारक, अकरावे महारुद्र, बारावे ज्योतिर्लिंङ्ग, तेरावे त्रियोगी, चौदावे भुवनत्रय, पंधरावे मंडलपूर्व, सोळावे नाव समाधिन्, सतरावे गुह्यरूप, अठरावे अब्जक, एकोणिसावे नैसर्गिक देव अशा प्रकारे विश्वंभर, भस्वरूप अशा देवाची १९ नावे होत. याद्वारा ज्ञानसिद्धी प्राप्त होते. या नावांचे अकरा वेळा पाण्यात किंवा सात वेळा स्मशानात दहा पाठ करावेत, म्हणजे ज्ञानसिद्धी प्राप्त होते. सर्व शत्रूंचा नाश होतो आणि संग्रामात (लढाईत) विजय प्राप्त होतो.

अश्वत्थ, बिल्व, मंदार, चंदन, धोत्रा, चाफा, श्यामा, सुगन्धी, कदंब (ह्यांची पत्री वाहून) नऊ वेळा सुखकारकरीत्या (या स्तोत्राचे) पठण करावे. नऊ रात्रींनंतर मंत्रसिद्धी होते. आठ रात्रींनंतर देवताप्राप्ती होते. पाच रात्रीत लोक वश होतील. तीन रात्रींनंतर मंत्रसिद्धी, देवताप्राप्ती, लोकवश होणे यातील गोष्टी एकत्रितपणे प्राप्त होतील. दोन रात्रींनंतर मंत्राची माळ वाघ आणि सापांचा मोहनमंत्र ठरेल. अशा प्रकारे हृदयमार्तंडाचा पाठ शुभकुलाला विजयी करेल.

सुरुवातीचे अष्टक (आठ), सुवर्णाप्रमाणे तेजस्वी, त्रिशूल, डमरू, पाश, तलवार धारण करणाऱ्या सर्वांगसुंदर देवाचे ध्यान करावे.

मल्हारी, म्हाळसाकांत, सर्व प्राणिमात्रांच्या हितामध्ये रमलेल्या, सेवा करणाऱ्या (भक्तांना) कल्पवृक्षाप्रमाणे असणाऱ्या या देवाला मी पूजितो. त्या मल्हारीला आनंदाने पाहा. गौरवर्ण असलेला, अलंकारांनी युक्त, भंडाऱ्याने युक्त, पीतांबरधारी, उदार असणारा हा (मल्हारी देव) पूजा केली असता इच्छित गोष्टी देणारा होतो.

करकमलांनी त्रिशूळ, डमरू, तलवार व वरदमुद्रा धारण करणाऱ्या, प्राणिमात्रांच्या रक्षणासाठी नेहमी जागृत असणाऱ्या, देवांच्या रक्षणासाठी व दानवांच्या वधासाठी मल्हारीचे रूप स्वीकारून शंकर (कल्याणकर) झाला.

हत्ती, सिंह, डुक्कर, अस्वल, वाघ यांची रूपे धारण करणाऱ्या दुष्टांना व दुष्ट शत्रूंना ठार करण्यासाठी (मल्हारी) घोड्यावरून हिंडला.

गळ्याला झुलुपे बांधलेल्या (कंठबद्धकपर्दकैः), खूप आवाज करणाऱ्या mythical शस्त्रांनी सर्वकाळी, माणसांच्या उत्सवामध्ये रविवारी हिंडतो. केवळ स्मरणाने सर्व पापांचा नाश होतो अशा, अतिशय तेजस्वी मल्लारी देवाचा, ज्याचा भक्तांनी सुंदर हळदीने भंडारा केला आहे, अशा त्या कमळामध्ये राहणाऱ्या, वर देणाऱ्या महेश्वर देवाला मी वंदन करतो.

ज्याच्या मुकुटातील रत्नांनी सर्व रत्नांना दूर सारले आहे, स्वच्छ चंद्राच्या कलेप्रमाणे अंग असणाऱ्या, सुंदर कमळाप्रमाणे डोळे असणाऱ्या, ज्याच्या कुंडलांनी चंद्राच्या तेजाचे अनुकरण केले आहे अशा, सुंदर हास्य असणाऱ्या, ज्याच्या दातांच्या शोभेने अनेक हिऱ्यांना पराभूत केले आहे अशा, सुंदर अशा रत्नांच्या व मोत्यांच्या हारांनी युक्त अशी सोन्याची माळ धारण करणाऱ्या, निरनिराळ्या फुलांच्या गुच्छांनी ज्याचे भरदार वक्षःस्थळ शोभून दिसत आहे, सर्पाचे बाहुभूषणाने शोभून दिसणाऱ्या, हातात असणाऱ्या डमरूच्या आवाजाने ज्याने स्वर्ग व आकाश भरून टाकले आहे, त्रिभुवनाचा स्वामी असणाऱ्या, पिवळे रेशमी वस्त्र धारण केलेल्या, दनुजराक्षसाचा नाश करणाऱ्यांच्या बाजूचा, ज्याच्या हातात खड्ग तळपत आहे अशा, सापाच्या फणांनी रक्षिलेल्या दागिन्यांनी शोभणाऱ्या, नमस्कार केलेल्या देवांच्या मुकुटांनी ज्याचे पदकमल व्यापले आहे अशा, भयंकर अशा सात कुत्र्यांनी वेढलेला, सोन्याच्या पर्वताप्रमाणे शोभणाऱ्या, प्राणिमात्रांच्या भस्माने शोभून दिसणाऱ्या, सर्व वेदांचे रहस्य असणाऱ्या मल्लारी देवाला मी नमस्कार करतो.

**मालाग्रहण मंत्र :**

**माले माले महामाले सर्वशक्तिस्वरूपिणि**
**चतुर्वर्गस्त्वयि न्यस्तस्तस्मान्मे सिद्धिदा मम ॥१॥ (भव)**

**अविघ्नं कुरू माले त्वं जपकाले सदा मम ।**
**भूतप्रेतपिशाचेभ्यो देवताभ्यो वरप्रदे ॥२॥**

**अर्थ** : हे सर्वशक्तिस्वरूप असणाऱ्या महामालारूपी माले, (धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे) चार वर्ग तुझ्या ठिकाणी आहेत, म्हणून तू मला माझ्या सिद्धी देणारी हो ॥१॥

हे वरदायिनी (वर देणाऱ्या) माले, माझ्या जपाच्या वेळी नेहमी भूत-प्रेत-पिशाच व देवतांपासून मला संकटमुक्त कर. (भूत, प्रेत, पिशाच आणि देवतांकडून होणाऱ्या विघ्नातून मला मुक्त कर.)॥२॥

**मालायै नमः। सर्वोपचारार्थे गंधपुष्पैः संपूज्य**

**अर्थ** : मालेला नमस्कार असो. (१६) षोडषोपचारे पूजा (करायची) म्हणून (त्याऐवजी) सोळा उपचारांसाठी गंध आणि फुलांनी मालेची पूजा करून (मालेला वंदन करावे.)

**मंत्र : ॐ ऱ्हीं भ्रूं त्रूं सूं ऱ्हूं ध्रूं**

**म्रियमाणानंद गंगाम्हाळसाभ्यां सहिताय श्रीमार्तण्डभैरवरूपाय श्रीमल्लारये नमः।**
**ह्म्यूं ध्रूं ऱ्हूं सूं त्रूं भ्रूं ऱ्हीम्। मंत्रैकादशावृत्तिः ...**

**अर्थ** : मर्त्य लोकांचे आनंद (स्थान) असलेल्या गंगा व म्हाळसा (या देवतांबरोबर) असणाऱ्या श्रीमार्तण्डभैरवरूपी मल्हारीला नमस्कार असो.

ह्म्यूं ... ध्रूं ... या मंत्राचा अकरा वेळा जप करावा. पुन्हा मूलमंत्राचा (ॐ ... ह्रीं भ्रूं... इ.) अकरा वेळा जप करावा. (दोन हात, दोन पाय, डोके व कंबर असा) षडंगन्यास करून जप करावा.

**त्वं माले सर्वदेवानां प्रीतिदा शुभदा मम ।**
**शुभं कुरूष्व मे भद्रे यशो वीर्यं च देहि मे।।१।।**

**अर्थ** : हे माले तू सर्व देवांना आनंद देणारी आहेस आणि माझ्या शुभ (गोष्टी) देणारी आहेस. हे कल्याणी (भद्रे) माझे शुभ (कल्याण) कर आणि मला यश तसेच सामर्थ्य दे.

**गुह्यातिगुह्यगोप्ता त्वं गृहाणास्मत्कृतं जपम् ।**
**सिद्धिर्भवतु मे देव त्वत्प्रसादान्महेश्वर ।।२।।**

**अर्थ** : हे महान् ईश्वरा (महेश्वरा), तू रहस्यांमधील अति गहन रहस्याचे रक्षण करणारा आहेस. आम्ही केलेल्या (या) जपाचा (तू) स्वीकार कर. हे देवा, मला तुझ्या कृपेमुळे सिद्धी प्राप्त होवो.

**मल्हारीकवच - ब्रह्मांडपुराण :**

**।। अथ न्यास ।।**
**ॐ मल्हारये नम: ।।**
**अंगुष्ठाभ्यां नम: ।।**
**ॐ म्हाळसानाथाय च तर्जनीभ्यां नम: ।।**
**ॐ मेघनाथाय मध्यमाभ्यां नम: ।।**
**ॐ महीपतये अनामिकाभ्यां नम: ।।**
**ॐ मैराळ्यकनिष्ठिकाभ्यां नम: ।।**
**ॐ खड्गराजाय करतलपृष्ठाभ्यां नम: ।।**
**।। एवं हृदयादि: ।।**
**।। अथ ध्यानम् ।।**
**ध्यायेन्मल्लारिदेवं कनकगिरीनभं म्हाळसाभूषितांकम्**
**श्वेताश्वं खड्गहस्तं विबुधबुधगणै: सेव्यमानं कृतार्थम्**
**युक्तांघ्रि दैत्यमुण्डं डमरुविलसितं नैशचूर्णाभिरामम्**
**नित्यं भक्तेषु तुष्टं श्वगणपरिवृतं नित्यमौकारगम्यम्**
**ॐ मुनीनां सप्तकोटीनां वरदं भक्तवत्सलम् ।।**
**दुष्टमर्दनदेवेशं वंदेऽ हं म्हाळसापतिम् ।।१।।**
**अनुग्राह्य भूतानां मणिरत्नगिरौ स्थिताम् ।।**
**प्रसन्नवदनं नित्यं वंदेऽहं मल्लवैरिणम् ।।२।।**
**सर्वदेवमयं शांतं कौमारं करुणाकरम् ।।**
**आदिरुद्रं महादेवं वंदेऽहं सात्त्विकं प्रियम् ।।३।।**
**भुक्तिमुक्तिप्रदं देवं सर्वाभरणभूषितम् ।।**
**कोटिसूर्यप्रतिकाशं वंदेऽहं असुरांतकम् ।।४।।**
**आदिरुद्रं महादेवं मल्हारीं परमेश्वरम्।।**
**विश्वरुपं विरूपाक्षं वंदेऽहं भक्तवत्सलम् ।।५।।**
**इदं पठति भक्ताय मल्हारीप्रीतिकारकम् ।**
**भक्तानां वरदो नित्यं प्रणतोऽस्मि महेश्वरम् ।।६।।**
**वने रणे महाघोरराजचोरभयेषुच ।**
**ग्रहपीडासु चोग्रासु विषसर्पभयेषु च ।।७।।**
**शाकिनी डाकिनी भूता: पिशाचोरगराक्षसा ।**
**मल्लारिकवचं जाप्यं भयं नास्ति कदाचन ।।८।।**
**सदा मल्लारि मल्हारि इतिकीर्तनम् ।**
**सप्तजन्मकृतं पापं तत्क्षणादेव नश्यति ।।९।।**
**त्रिकालं य: पठेन्नित्यं शिवलोकं स गच्छति ।**

**देहांते परमं स्थानं शिवेन सह मोदते ।।१०।।**

**।। इति श्रीब्रह्मांडपुराणे मल्लारिमाहात्म्ये मल्हारीकवचं संपूर्णम् ।।**

**।। श्री मार्तंडभैरवार्पणमस्तु ।।**

**।। शुभं भवतु ।।**

**मराठी अनुवाद**

**न्यासारंभ :**

ॐ मल्हारीला नमस्कार असो.

(मल्हारी देवाला) दोन अंगठ्यांनी नमस्कार असो.

ॐ दोन तर्जनींच्या साहाय्याने म्हाळसानाथाला (म्हाळसेच्या पतीला) नमस्कार. (तर्जनी = अंगठ्याशेजारील हाताची बोटे)

ॐ दोन मधल्या बोटांनी (मध्यमा) मेघनाथाला नमस्कार.

ॐ दोन्ही अनामिकांद्वारे (करंगळीशेजारची बोटे) महीपतीला नमस्कार असो.

ॐ दोन कनिष्ठिकांनी (करंगळी) मल्हारीला माझा नमस्कार असो.

ॐ दोन तळहातांनी खड्गराजाला माझा नमस्कार असो.

(अशा प्रकारे क्रमाने नमन करीत दोन हात जोडावेत.) (अशाच प्रकारे हृदयादिन्यास करावा.)

**आता ध्यानारंभ**

**अर्थ :** सुवर्णपर्वताप्रमाणे कांती असलेल्या (तेजस्वी), म्हाळसेमुळे ज्याची मांडी शोभून दिसत आहे अशा, पांढराशुभ्र घोडा असणाऱ्या, हातात खड्ग धारण केलेल्या, जाणकार व सज्जनांकडून सेवा केली जाणाऱ्या, कृतार्थ अशा, दैत्याचे डोके ज्याच्या पायाशी आहे अशा, भस्मविलेपनाने सुंदर दिसणाऱ्या, भक्तांवर नेहमी प्रसन्न असणाऱ्या, ज्याच्याभोवती नेहमी श्वान (कुत्री) असतात अशा आणि जो नेहमी ओंकाराद्वारे जाणला जातो अशा मल्हारी देवाचे ध्यान करावे.

सात ऋषी आणि सात कोटी गणांना (देवसैनिकांना) वर देणाऱ्या, भक्तवत्सल, दुष्टांचे मर्दन करणाऱ्या (दुष्टांचा नाश करणाऱ्या) आणि देवांचाही स्वामी असलेल्या म्हाळसापतीला मी नमस्कार करतो. ।।१।।

सर्व प्राणिमात्रांवर कृपा करून माणिक व रत्नांच्या पर्वतावर राहणाऱ्या, नित्य प्रसन्नमुख अशा मल्ल (राक्षसाच्या) शत्रूला (मल्लौरिणम्) मी वंदन करतो. (मल्लवैरिणम्) ।।२।।

सर्व देवांचा ज्यामध्ये समावेश आहे अशा शांत, सुकुमार, करुणाकर, आदिरुद्र, सात्त्विकप्रिय अशा महादेवाला मी नमस्कार करतो ।।३।।

(सर्व प्रकारचे) भोग आणि मुक्ती देणाऱ्या देवाला, सर्व दागिन्यांनी मढलेल्या, कोटी सूर्यांचे तेज धारण करणाऱ्या असुरांचा अंत करणाऱ्या (मल्हारीदेवाला) मी वंदन करतो. ।।४।।

आदिरुद्र, महादेव, विश्वरूप व विरूपाक्ष आणि भक्तवत्सल मल्हारी परमेश्वराला मी नमस्कार करतो. ।।५।।

मल्हारीला आनंद देणारे हे (स्तोत्र) भक्तासाठी तो पठण करतो. तो भक्तांना नेहमी वर देणारा असतो त्या महेश्वराला माझा नमस्कार आहे. ।।६।।

(हे स्तोत्र पठण करणाऱ्याला) वनामध्ये, रणांगणावर, अतिभयंकर ठिकाणी (महाघोर) भय राहत नाही. राजा तसेच चोरापासून भय नाही. उग्र अशा ग्रहपीडा होत नाहीत. भयंकर सर्प व विष यांचे भय नाही. ।।७।।

शाकिनी, डाकिनी, भूत, पिशाच, राक्षस, सर्प इत्यादींचे भय मल्हारी कवचाचा जप करणाऱ्याला कधीही नसते. ।।८।।

नेहमी मल्हारीचा त्रिवार जप करणाऱ्याचे सात जन्मी केलेले पाप क्षणात नष्ट होते. तीन वेळा या स्तोत्राचे नित्य पठण करणारा शिवलोकी जातो. देहान्तानंतर तो परमोच्च स्थानी शिवाबरोबर आनंदित होतो. ।।९।।

जो कोणी तीनही काळी याचे पठण करील, तो शिवलोकाला जाईल व मृत्यूनंतर शिवासह श्रेष्ठस्थानी आनंदित होईल. ।।१०।।

**आरत्या**

आरती म्हणजे आर्त स्वराने आणि करुणाद्र मुद्रेने केलेली परमेश्वराची आळवणी होय. देवतेचे पुजन झाल्यानंतर तबकात निरंजन अथवा कापूर, अक्षदा घेऊन आरती ओवाळिली जाते. ओवाळीत असताना निरंजन परमेश्वराच्या मस्तकापर्यंत न्यावे, मस्तकावर नेऊ नये. कारण तसे केल्यास मानवाने खुद्द परमेश्वरालाच आशीर्वाद दिल्यासारखे होते. मोठ्या आवाजात, विशिष्ट चालीवर व एकाग्र चित्ताने आरती म्हणावी असा धार्मिक संकेत आहे देवतासंबंधित आरतीत त्या दैवताचे चारित्रात्मक गुनगान किवा माहात्म्यकथन मोजक्या शब्दात केले जाते. साधु-संतावरही स्तुतिवाचक आरत्या म्हटल्या जातात. आरतीच्या शेवटी इहलोकीचे कल्याण साधण्यासाठी नम्र प्रार्थनात्मक शब्दातून त्या देवतेला साकडे घातले जाते. याचाच अर्थ 'आरती' हा संबंधित दैवताबद्दल वाटणारा शुद्ध सात्विक आणि श्रद्धात्मक आविष्कार असतो.

मराठी मुलुखात कोणत्याही स्थळी औचित्यपूर्ण आरत्या म्हटल्या जात असल्या तरी प्रारंभ 'सुखहर्ता, दु:खहार्ता' या गणेशाच्या आरतीनेच होतो. नंतर संबंधित देवता व त्यानंतर इतर देवतांच्या आरत्या म्हटल्या जातात. उदा. शंकर, दत्तात्रेय, विठ्ठल, हनुमान, दुर्गा इत्यादी. भक्तांची वर्दळ असलेल्या एखाद्या प्रसिद्ध देवालयात अथवा एखाद्या सार्वजनिक धार्मिक उत्सवात आरतीच्या वेळी ढोल आणि झांज या पारंपरिक वाद्यांचीही साथ केली जाते. त्यामुळे आरतीच्या सादरीकरणात सूर, ताल, लयीचा एक सुरेख मेळ साधला जातो.

'' अधर्म माजविणाऱ्या मणि-मल्ल दैत्यांचा, शंकराने मार्तंडभैरव अवतारधारण करून निप:त केला आणि सकल भूलोक भयमुक्त केला'' हाच तपशील बहुतांशी खंडोबावरील आरत्यामध्ये वारंवार येतो. किंभवना याच तपशिलावर प्रामुख्याने खंडोबावरील आरत्यांच्या रचना झालेला आढळतात. खंडोबा, मार्तंडभैरव, मालो-महीपती, मैराळ अशा खंडोबाच्या १०८ नावांपैकी अनेक नावे या आरत्यामध्ये गुंफलेली आढळतात.

श्री नरहरी सोनार, समर्थ रामदास, मध्वमुनीश्वर, वरदविठ्ठल इत्यादी संत तसेच इतर कवींच्या नावावर खंडोबावरील आरत्या विपुल प्रमाणात आढळतात. रचनाकर्त्याचे नाव आरतीच्या शेवटच्या ओळीत गोवलेले असते. काही आरत्यामध्ये रचनाकरांची नावे आढळत नाहीत. या सर्व प्रकारच्या आरत्या मौखिक परंपरेतून पुढे चालत राहतात. 'संत साहित्यातील खंडोबा' या प्रकरणामध्ये पृ. क्र..., ..., ... वर अनुक्रमे नरहरी सोनार, समर्थ रामदास, मध्वमुनीश्वर, मौनीनाथ महाराज या संताच्या आरत्या दिल्या आहेत. इतर काही आरत्या पुढीलप्रमाणे :

**(१) आरती चरण कैरवाची म्हाळसावरा भैरवाची ।**
**हरिद्राचूर्ण लिप्त अंगी । म्हाळसा शोभे वामभागी**
**शोभला चरणाधो भागी । मल्लमणि साह्य पार्श्वभागी**
**तप्त चामीकर सद्दीप्ती**
**रुचिकरचार**
**डमरूतखार**
**घ्यावरि स्वार**
**जटेमधि मूर्ति बालवधूची शोभली कोर शिरी विधूची ॥१॥**
**आरती चरण कैरवाची म्हाळसावरा भैरवाची ॥ धृ.॥**
**सुभग पीतांबर कटि पिवळा वरि कटि सूत्र नाग काळा ॥**
**शोभती नेत्र तीन ज्याला मुगुट शिरी कंठि मुंडमाला ।**
**प्रज्वलित शूल करी झळके**
**भक्त सुखसदन**
**करूनि मणिकदन**
**जाळिला मदन**
**आरती हरिली सप्तमुनिची वासना पुरवुनि तन्मनिची ॥२॥**
**आरती चरण कैरवाची म्हाळसावरा भैरवाची ॥**
**सुरासुर नमिती तुझ्या चरणा-दयाघन भक्त दैन्यहरणा ।**
**करिशि जगदुद्भव स्थितिहरणा-महेशा दीन जनोद्धरणा ।**
**बलवत्कालि कल्मशनाशा**

भक्त कैवारि
सख्या मल्लारि
भवांबुधितारि
स्तवनि मति कुंठित शुतिची काय मग कथा मम स्तुतिची ॥३॥
आरती चरण कैरवाची म्हाळसावरा भैरवाची ॥

- कै. बळवंतराव नाना कामाठी

(२) जय देव जय देव जय खंडेराया।
आरती ओवाळू उधळू भंडारा ॥धृ.॥
सुवर्णाची काया। सुवर्णाचा श्रृंगार।
सुवर्णाची शोभे। हाती तलवार।
आनंदाने भक्त । उधळती भंडार ॥१॥
मंगलमूर्ती तुझा। जयजयकार
भक्तांचे संसारी। उधळिशी भंडार।
सुवर्णाचा त्यांचा। करीशी संसार।
जेजुरीच्या हाती पिवळा भंडार ॥२॥
पालीचाही त्या बेलभंडार ॥ जय देव ॥
देवांचा तूं राजा। राजाधीराजा।
भक्तांचा कैवारी। राजाधीराजा।
आदर्शाची मूर्ती। त्रिभुवनी कीर्ति।
आरती गाण्या देई। विनायक स्फूर्ति ॥३॥

- वि. र. कुलकर्णी

भूपाळ्या

(१) उठा उठा हो महिपती। म्हणवुनि विनवी गंगासती।
द्वारी वाजंत्री वाजती। गीत गाती सुस्वर ॥१॥
विणा मृदंग घेऊनि करी। भक्ती मुरळ्या नव किन्नरी।
गायन करिती परोपरी। नव नागरी सुंदरा ॥२॥
नेत्रकमले चराचर। पाहे आपुल्या तूं क्षणभर।
दाटी झाली नारी नर। आले दर्शन घ्यावया ॥३॥
उठोनि मालो आपल्या द्रष्टी। पाहे विधिनिर्मित हे सृष्टी।
भंडाऱ्याच्या उडती मुष्टी। भक्ता हाती एकदा ॥४॥
रत्नजडित सिंहासनी। त्यावर कमळाचे आसनी।
बैसो मालो सहकामिनी। प्रात:काळी साजिरा ॥५॥
नेसोनि पिवळा पितांबर। पिवळे अलंकार सुंदर।
पिवळा उधळला भंडार। पाई तोडर पिवळा ॥६॥
चंद्रकांती त्या नखी। राहोनि झाल्या वाटे सुखी।
तेथील शोभा सहस्त्रमुखी। नये शेषा वर्णिता ॥७॥
अंकी माळसा सुंदरी। जिचा चपळा न पवे सरी।
लज्जित होऊनिया अंतरी। पाहे श्रीमुख साजिरे ॥८॥
गणेश महिपती चरणांकित। पाई अर्पूनिया जीवित।
मालोपासी मागे हीत। पाई ठाव आपल्या ॥९॥

(२) **उठी उठी हो मैराळा । मालो महिपती मल्हारी**
**अमृत भरोनि गंगा । तिष्टे रत्नांची झारी ।।धृ.।।**
**इंद्रदिक सूर मिळोनि, आले दरबारी ।**
**मृदंग कहाळ वाजविताती । पणवानक भरी ।।**
**तुजविण नाही कोणी आम्हा । दुसरा कैवारी ।**
**मुख प्रक्षाळूनी देई । सुकृत प्रेमाची वारी ।।१।।**
**हळदीकेशरकर्दम करूनी सुगंधी ।**
**उटणे करू तिष्ठती दासी सिद्धी अष्टविधी ।।**
**सनकादिक नारद गाती नाना प्रबंधी ।**
**ज्ञानार्कोदय झाला वेगी प्रबोधी ।।२।।**
**वस्त्रे अलंकार घेऊनि तिष्ठती गण कोटी ।**
**जयजयकारे सुरवर करिती सुमनांची वृष्टी ।।**
**ध्याती त्याला देसी संतती, संपत्ती यश तृष्टी ।**
**दत्तवरद विठ्ठलकवि वंदीत गर्जुनि यळकोटी ।।३।।**

- दत्तवरद विठ्ठलकवी

**महाराष्ट्रीय भक्त परिवारांतील प्रचलित खंडेरायाची अष्टनामावली**

| | | |
|---|---|---|
| १) खंडोबा | २) मल्हार | ३) मल्हारी |
| ४) खंडेराय | ५) सदानंद | ६) म्हाळसाकांत |
| ७) मल्हारीमार्तंड | ८) मार्तंडभैरव | |

**श्रीखंडेरायाची १०८ नावे**

**'अ'**

१) ॐ अनंगदहनाय नम: २) ॐ अमरेशाय नम: ३) ॐ अंधकध्वंसये नम:
४) ॐ असूरमर्दनाय नम: ५) ॐ असूरातंकाय नम: ६) ॐ अहिरुद्राय नम:

**'उ'**

७) ॐ उदारधीराय नम: ८) ॐ उमावराय नम:

**'क'**

९) ॐ कर्पूरगौराय नम: १०) ॐ कल्मषदहनाय नम: ११) ॐ कालाग्निरुद्राय नम:
१२) ॐ कैलासपतये नम:

**'ख'**

१३) ॐ खड्गधराय नम: १४) ॐ खड्गपाणये नम: १५) ॐ खड्गराजाय नम:
१६) ॐ खंडेरायाय नम:

**'ग'**

१७) ॐ गंगाधराय नम: १८) ॐ गंगाप्रियाय नम: १९) ॐ गणभैरवाय नम:
२०) ॐ गिरजापतये नम: २१) ॐ गौरीप्राणेश्वराय नम: २२) ॐ गौरीशंकराय नम:

**'च'**

२३) ॐ चंदनभूषणाय नम: २४) ॐ चंद्रमौलये नम: २५) ॐ चंद्रशेखराय नम:
२६) ॐ चपलखड्ग धारणाय नम:

**'ज'**

२७) ॐ जगन्नाथाय नम: २८) ॐ जगदीशाय नम: २९) ॐ जगदीश्वराय नम:

३०) ॐ जगदुद्धाराय नम: ३१) ॐ जटाजुटाय नम: ३२) ॐ जटाजुटगंगाधराय नम:
३३) ॐ जाश्वनिळाय नम:

**‘त्र’**

३४) ॐ त्रितापहाराय नम: ३५) ॐ त्रितापशामकाय नम: ३६) ॐ त्रिपूरहराय नम:
३७) ॐ त्रिपूरारये नम: ३८) ॐ त्रिमूर्तये नम: ३९) ॐ त्रिशूलधारये नम:
४०) ॐ त्रिशूलहस्ताय नम:

**‘त्र्य’**

४१) ॐ त्र्यंबकाय नम:

**‘द’**

४२) ॐ दंभोलीधराय नम: ४३) ॐ दर्याणवाय नम: ४४) ॐ दशवक्त्राय नम:
४५) ॐ दीनवत्सलाय नम: ४६) ॐ दुष्टमर्दन देवेशाय नम: ४७) ॐ देवेंद्राय नम:

**‘ध’**

४८) ॐ धूर्जटये नम:

**‘न’**

४९) ॐ नागेंद्रभूषणाय नम: ५०) ॐ निलकंठाय नम: ५१) ॐ निलग्रीवाय नम:
५२) ॐ निर्विकाराय नम: ५३) ॐ निराकाराय नम:

**‘प’**

५४) ॐ पंचाननाय नम: ५५) ॐ पशुपतये नम: ५६) ॐ पार्वतीवल्लभाय नम:
५७) ॐ पिनाकपाणये नम: ५८) ॐ पंचदशनेत्रकमलाय नम:

**‘प्र’**

५९) ॐ प्रेतासनाय नम:

**‘भ’**

६०) ॐ भक्तवत्सलाय नम: ६१) ॐ भक्तिप्रिताय नम: ६२) ॐ भवमोचकाय नम:
६३) ॐ भस्मोद्धराय नम: ६४) ॐ भालचंद्राय नम: ६५) ॐ भुजंगनाथाय नम:
६६) ॐ भूतभव्यत्रिननाय नम: ६७) ॐ भैरवाय नम:

**‘म’**

६८) ॐ मणिसूदनाय नम: ६९) ॐ मणिहराय नम: ७०) ॐ मल्लांतकांत नम:
७१) ॐ महादेवाय नम: ७२) ॐ महारुद्राय नम: ७३) ॐ महेश्वराय नम:
७४) ॐ मार्तंडभैरवाय नम: ७५) ॐ मार्तंडाय नम: ७६) ॐ मायाचालकाय नम:
७७) ॐ मालुखानाय नम: ७८) ॐ म्हाळसाकांताय नम: ७९) ॐ मुनितापशमनाय नम:
८०) ॐ मृडाणीवराय नम: ८१) ॐ मेघनाथाय नम: ८२) ॐ मैराळाय नम:

**‘र’**

८३) ॐ रजनीश्वराय नम:

**‘ल’**

८४) ॐ लोकपालाय नम:

**‘व’**

८५) ॐ वागीश्वराय नम: ८६) ॐ वासुकीभूषणाय नम: ८७) ॐ विश्वंभराय नम:
८८) ॐ विषकंठभूषणाय नम: ८९) ॐ वीररुपाय नम: ९०) ॐ वृषभध्वजाय नम:

**‘व्य’**

९१) ॐ व्यांघ्राबराय नम: ९२) ॐ व्योमकेशाय नम:

**‘श’**

९३) ॐ शंकराय नम: ९४) ॐ शंशाकचिन्हाय नम: ९५) ॐ शशिशेखराय नम:

९६) ॐ शिववरदमूर्तये नम:　　९७) ॐ शिवसांभाय नम:　　९८) ॐ शिवाय नम:
९९) ॐ शूलपाणये नम:

**'स'**

१००) ॐ संग्रामवीराय नम:　　१०१) ॐ सदाशिवाय नम:　　१०२) ॐ सर्पभूषणाय नम:

**'श्री'**

१०३) ॐ श्रीकंठाय नम:

**'ह'**

१०४) ॐ हयपतये नम:　　१०५) ॐ हयवाहन नम:　　१०६) ॐ हरिद्राप्रियरुद्राय नम:
१०७) ॐ हिमनगजामाताय नम:

**'ज्ञ'**

१०८) ॐ ज्ञानदानकाय नम:

## जेजुरी येथील यात्रा-उत्सव

**यात्रेलागी मालोचे जे जाती सप्तपद मार्गीरे**
**देव तयाते सन्मुख येऊनी घेऊन जाती रे**
**यात्रेचा जे उत्सव नेत्री मल्हारीचा पहाती रे**
**कैलासी ते सहपरिवारे एक कल्पवरी राहती रे**
**मल्हारीने रणी मारीले मल्ल आणखी मणी रे**
**या स्तोत्राच्या पठणे नर तो होय धरेचा धणीरे** [८]

### यात्रा

खंडोबाच्या उपासनेत रविवार, सोमवती अमावास्या, चैत्री पौर्णिमा, मार्गशीर्ष शुद्ध चंपाषष्ठी, पौषी पौर्णिमा, माघी पौर्णिमा या दिवसांना विशेष महत्त्व असल्यामुळे महाराष्ट्र-कर्नाटकातील एकूण चौदा मुख्य खंडोबास्थळी (आणि खंडोबाच्या अशा इतर अनेक ठिकाणी) या दिवसांना मोठ्या यात्रा भरत असतात. हे जरी खरे असले तरी सर्वांत महत्त्वाचे स्थान असलेल्या जेजुरी तीर्थक्षेत्री भक्तांचा लोंढा जरा जास्तच वाटतो, नव्हे जेजुरीत दररोजच गर्दी असते. यात्रेच्या वेळेस तर भक्तांचा अक्षरश: महापूरच लोटलेला असतो. लाखो भाविक-भक्त खंडोबा दर्शनासाठी जेजुरीत गर्दी करतात. जेजुरीत वर्षातून सात-आठ वेळा अशा यात्रा भरतात. प्रत्येक यात्रेचे स्वरूप व महत्त्व वेगळे असते. या यात्रा - उत्सवान पौराणिक संदर्भांचा आधार आहे. हे संदर्भ खंडोबावरील अनेक उपासनापर ग्रंथात आढळतात.

**रविवार :**

शंकराने कैलास पर्वतावर धर्मपुत्र सप्तर्षींच्या रक्षणार्थ स्वारोचित मनूच्या तेराव्या कृतयुगाच्या समाप्तीस ८८,००० दिवस अवकाश असताना चैत्र शुद्ध पौर्णिमेला दुसऱ्या प्रहरी 'मार्तंडभैरव' अवतार घेतला. तो दिवस रविवारचा होता आणि मणि-मल्लाबरोबरच्या युद्धानंतर एका वर्षाने मार्तंडभैरव प्रेमपुरी येथे येऊन म्हाळसासह अश्वारूढ रूपात प्रकट झाले तो दिवसही रविवारचाच असल्यामुळे खंडोबाचा वार 'रविवार' मानण्यात येऊ लागला असे उल्लेख खंडोबाच्या उपासनावर वाङ्मयात आढळतात. त्यामुळे जेजुरीत प्रत्येक रविवारी भाविक खंडोबादर्शनासाठी गर्दी करतात. जेजुरीगड मंदिर आणि कऱ्हेपठार मंदिर या दोन्ही ठिकाणी मोठ्या प्रमाणावर या दिवशी भक्तांची वर्दळ असते. या दिवशी काही खंडोबाभक्त कोटंबा पूजन करून पाच घरची वारी मागतात. 'रविवार' श्रीम्हाळसाच्या नेवासे व म्हाडदोळ येथेही महत्त्वाचा मानला जातो.

**सोमवती अमावास्या :**

सोमवारी येणाऱ्या अमावास्येला 'सोमवती' असे म्हणतात. जयाद्री माहात्म्यात सोमवती अमावास्येची पर्वणी साधून तेहतीस कोटी देव जेजुरीला मार्तंडभैरवाच्या यात्रेला आल्याचा उल्लेख पौराणिक ग्रंथात आढळतो. दुसरे असे की, खंडोबा देव त्याच वेळेस कऱ्हा नदीवर स्नानासाठी गेले होते. म्हणून आजही या दिवशी देवाच्या

उत्सवमूर्ती पालखीतून वाजत-गाजत नदीवर स्नानासाठी नेल्या जातात. खंडोबाच्या सर्व यात्रांमध्ये सोमवती अमावास्येला विशेष महत्त्व आहे. साधारण वर्षातून दोनदा सोमवती अमावास्या येते. या यात्रेमध्ये प्रत्येक वेळी भाविक-भक्त मागील सोमवती यात्रेच्या गर्दीचे उच्चांक मोडत असतात.

**चैत्री पौर्णिमा :**

चैत्र शुद्ध पौर्णिमेला दुसऱ्या प्रहरी (चित्रा नक्षत्र, वसंत ऋतू) शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण केला तेव्हापासून त्या दिवशी खंडोबाची 'सुवर्ण राजधानी' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जेजुरी नगरीत मोठ्या प्रमाणात हा उत्सव साजरा केला जातो. या दिवशी येथे मोठी यात्रा भरते.

**मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी (चंपाषष्ठी) :**

या दिवशी मार्तंडभैरवाने मल्लासुर दैत्याचा युद्धात वध केला होता. पुढच्या वर्षी याच दिवशी, मार्तंडभैरव प्रेमपुरी येथे शक्ती म्हाळसासह लिंगद्वयरूपाने प्रकट झाले. त्या वेळेस तेहतीस कोटी देव आणि धर्मपुत्र सप्तर्षींनी मार्तंडभैरवाची चाफ्याच्या फुलांनी पूजा केली होती. त्याची आठवण म्हणून दरवर्षी चंपाषष्ठी मोठ्या थाटामाटात साजरी केली जाते. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा ते षष्ठी या सहाही दिवशी दूरवरून भाविक लोक दर्शनासाठी जेजुरीला येत असतात.

**पौषी पौर्णिमा :**

पौषी पौर्णिमेला मृग नक्षत्र, सिंह लग्नाच्या शुभमुहूर्तावर सातारा जिल्ह्यातील पाल तथा पाली (पेंबर) येथे मानवधारी खंडोबाचा म्हाळसाशी विवाह झाला. त्याची आठवण म्हणून प्रत्येक वर्षी या दिवशी जेजुरीत खंडोबाचे म्हाळसाशी लग्न लावले जाते. या यात्रेला भटक्या जमातीतील लोक मोठ्या प्रमाणात जमतात. त्यांच्यातील भांडणतंट्याचा न्यायनिवाडा त्यांच्यातील पंचमंडळी यात्रेच्या दुसऱ्या दिवशी येथेच करतात. पौषी पौर्णिमेला जेजुरीत गाढवांचा मोठा बाजार भरतो. या बाजारासाठी गुजरात, राजस्थान इत्यादी ठिकाणांहून मोठ्या संख्येने व्यापारी जेजुरीला येतात.

**माघी पौर्णिमा :**

माघी पौर्णिमेला जेजुरी येथे खंडोबा देवाच्या लग्नाची वरात थाटामाटात निघते. कोळी समाजातील स्त्री-पुरुष या यात्रेत मोठ्या प्रमाणावर सहभागी होतात. याच दिवशी शिखरकाठ्या मंदिराच्या कळसाला टेकवण्याचा कार्यक्रम होतो. अनेक ठिकाणांवरून 'मानकरी' भक्त काठ्या घेऊन गडावर येतात.

**उत्सव**

**गणपूजा :**

मार्तंडभैरव अवतारानंतर देव प्रेमपुरीहून येऊन कऱ्हेपठारी शक्ती म्हाळसासह लिंगद्वय रूपाने प्रकट झाल्यानंतर याच दिवशी म्हणजे आषाढ शुद्ध प्रतिपदेला तेहतीस कोटी देव आणि शिवगण देवाबरोबर येथे आले व त्यांनी मार्तंडभैरवाची मनोभावे पूजा-अर्चा केली. त्याची आठवण म्हणून प्रत्येक वर्षी जेजुरीकर लिंग कडेपठारावरील मंदिरात हा उत्सव 'गणपूजा' या नावाने भव्य स्वरूपात रात्रभर साजरा करतात.

**देवदीपावली :**

कऱ्हेपठार हे खंडोबा देवाचे आद्यस्थळ मानले गेल्यामुळे 'मान' म्हणून फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस येथे देवदीपावली उत्साहात साजरी केली जाते. सकाळी मंदिर स्वच्छ धुऊन देवास पंचामृताने अभ्यंगस्नान घालतात. नंतर अत्तर लावून पोषाख चढविला जातो. मंदिराच्या समोरील मारुतीच्या ओट्यावर पाळणा (चोपाळा) बांधून त्यात श्रींस वाजत-गाजत बसविले जाते. सनई-चौघड्याच्या मंगल सुरात, आनंदी वातावरणात खंडेराव महाराजांना २१ वेळा झोका दिला जातो. जेजुरीतील बरेच भक्तलोक आपण दिवाळीस जेवढे पदार्थ करतो, तेवढे पदार्थ करून देवाला त्या पक्वान्नांचा महानैवेद्य दाखवतात. तेव्हा देवाच्या नावाने भजन केले जाते. काही भक्तगण आनंदाने देवासमोर नृत्यही करतात. अशा प्रकारे देवदीपावली साजरी करून उन्हे उतरू लागताच उत्सवमूर्तींना पुन्हा मंदिरात नेऊन मूळ स्थानावर सन्मानाने स्थानापन्न केले जाते. हा उत्सव फक्त कडेपठारावरच साजरा होत असल्याने कडेपठारवासीयांबरोबरच जेजुरीतील अवघे ग्रामस्थ या उत्सवात उत्साहाने सहभागी होतात.

**तेलहंडा :**

मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस जेजुरीत गडावरून तेलहंड्याची मिरवणूक निघते. यात प्रथम मानकरी नंतर ग्रामस्थ

व इतर यात्रेकरू भाविकभक्त तेल टाकतात. जमलेले सर्व तेल रात्री १२ वाजण्याच्या मुहूर्तावर गडावरील मंदिरात श्रीखंडोबादेवाची पूजा झाल्यावर देवाच्या पिंडीवर ओतले जाते. या विधीला देवाच्या लग्नाचे 'तेलवण' असे म्हणतात. तेलवण पडल्यावर दुसऱ्या दिवशी येथे चंपाषष्ठीची यात्रा फार मोठ्या प्रमाणावर भरते.

**चंपाषष्ठी षड्रात्रौत्सव :**

खंडोबा हा विविध जाती-धर्मांतील अनेक कुटुंबांचा कुलदेव असल्याने मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेपासून देवीच्या नवरात्रासारखेच खंडोबाचे नवरात्र सुरू होते. परंतु ते नऊ दिवसांचे नसून सहा दिवसांचेच असते. मार्गशीर्ष शुद्ध षष्ठीला म्हणजेच चंपाषष्ठीला या नवरात्राची सांगता केली जाते. म्हणून या नवरात्राला 'चंपाषष्ठी षड्रात्रौत्सव' असे म्हणतात. याच दिवशी 'स्कंदषष्ठी'सुद्धा असते. उत्सवाच्या पहिल्या दिवशी जेजुरी नगरीत प्रत्येकाच्या घरी घट बसविले जातात. तसेच बाहेरगावचे भक्तगणही आपल्या घरी आवडीने घट बसवितात. तांब्याचा कलश गव्हाच्या राशीवर ठेवून तांब्यामध्ये पाच विड्यांची पाने ठेवली जातात. नंतर पानांची माळ घातली जाते. दुसऱ्या दिवसापासून सहाव्या दिवसापर्यंत फुलाची माळ घातली जाते. षड्रात्रौत्सवाच्या काळात जेजुरीसह खंडोबाच्या अनेक महत्त्वाच्या स्थळी तसेच महाराष्ट्र आणि राज्याबाहेरही अनेक भक्तगण देव्हाऱ्यासमोर बसून देवाच्या टाकाची पूजा करून 'मल्हारी माहात्म्य', 'मल्हारी सहस्रनाम', 'मार्तंडविजय' व इतर खंडोबा पोथ्यांचे वाचन करतात. सहाव्या दिवशी घट उठविले जातात. या वेळेस पुरणपोळीच्या नैवेद्याबरोबर ठोंबरा, रोडगा, वांग्याचे भरीत, पातीचा कांदा, लसूण यांचा नैवेद्य देवास दाखवला जातो. त्या दिवसापासून भक्तलोक कांदा-लसूण खाण्यास प्रारंभ करतात. काही ठिकाणी गव्हाच्या ओंब्या, ज्वारीचा हुरडा, तीळ-गूळ एकत्र कांडून त्याचा दिवा करून त्यामध्ये फुलवात लावतात. या दिव्याला 'उंडी' असे म्हणतात. नैवेद्य दाखविल्यानंतर तळी भरली जाते आणि दिवटी-बुधली घेऊन आरती केली जाते. आरतीनंतर भक्त 'लाक्षणिक जेजुरी'ला जाऊन येतात. म्हणजेच जेजुरी किंवा खंडोबाचे इतर जवळचे जे स्थान असेल, त्या दिशेने चार पावले चालत जायचे. देवाला ओवाळून भंडारा-खोबरे उधळून 'येळकोट येळकोट जय मल्हार' असा जयघोष करायचा व परत माघारी यायचे. याला 'मारग माळणे' असेही म्हणतात. प्रत्यक्ष खंडोबा तीर्थस्थळाला किंवा लाक्षणिक जेजुरीला जाऊन आल्यानंतर दिवटी दुधाने विझवायची असते (ही बुधली प्रत्येक नवीन पिढीत 'सोमवती अमावास्ये'च्या यात्रेमध्ये बदलली जाते.) नंतर उत्सवाची सांगता होते. या सहा दिवसांच्या काळात भक्तलोक उपवास करतात. या कुळधर्माच्या काळात काही कुटुंबांत मुलाबाळांसह आहाळावरून 'पाच पावले' चालण्याचा विधी केला जातो.

जेजुरी तीर्थक्षेत्री या षडरात्रौत्सवाला अनन्यसाधारण महत्त्व असल्याने प्रत्येक वर्षी देशभरातील लाखो भक्त या पवित्र काळात खंडोबा दर्शनाचा लाभ घेतात. मार्गशीर्ष शुद्ध पंचमीला खंडोबा-म्हाळसाच्या लग्नाचे तेलवण केले जाते. उत्सव काळात मंदिरासमोरील दीप प्रज्वलित केले जातात. गडावर विद्युत रोषणाई करून गड सुशोभित केला जातो. दररोज विविध सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन केले जाते. खंडोबाच्या माहात्म्यकथेत घोडा आणि कुत्र्याला विशेष महत्त्व असल्यामुळे चंपाषष्ठीच्या दिवशी जेजुरीत प्रत्येक घरी घोडा आणि कुत्रा यांना पुरणपोळी खायला दिली जाते. तसेच काही कुटुंबांत वाघ्या-मुरळीकडून कोटंबा पूजन, लंगर तोडणे इत्यादी कुलाचार केले जातात.

**विजयादशमी-दसरा :**

जेजुरीमध्ये प्रत्येक वर्षी दसरा मोठ्या थाटामाटात साजरा केला जातो. या उत्सवाला भाविक लोक दूरदूरवरून येऊन हजेरी लावतात. विशेषत: धनगर समाजातील भक्तांचा सहभाग या उत्सवात नजरेत भरण्याइतपत असतो.

नवरात्रौत्सवामध्ये मंदिरातील उत्सवमूर्ती (खंडेराय-म्हाळसा, बाणाई) सभामंडपात (बालदरी) आणून बसविल्या जातात. दसऱ्याच्या दिवशी उत्सवमूर्ती भंडारगृहातून पालखीमध्ये बसवून सीमोल्लंघन व ग्रामप्रदक्षिणेसाठी बाहेर काढल्या जातात. सायंकाळी पालखी महाद्वारातून खाली आणली जाते. गडाला प्रदक्षिणा घालून पालखी रमण्याच्या वाटेला आणली जाते. त्याच वेळेस कऱ्हेपठारावरील खंडोबा मंदिरातील देवाच्या उत्सवमूर्ती घेऊन तेथील पालखी रमण्याच्या दिशेने निघते. त्या वेळी दोन्ही पालखींसमोर शोभिवंत दारूकाम केले जाते. सनई-चौघड्याच्या मंगल स्वरांत येथील कलावंत खंडोबाची लोकगीते गाऊन उपस्थित भाविकांचे मनोरंजन करतात.

ज्याप्रमाणे विठ्ठलाचे वारकरी आषाढी-कार्तिकीला खांद्यावर भगव्या पताका आणि हातात टाळ-चिपळ्या घेऊन ग्यानबा-तुकारामाच्या नामघोषात एक एक पाऊल पुढे टाकून पंढरपुराची वाट चालू लागतात, त्याप्रमाणे ज्या

ठिकाणी पायी मोकळे चालणे अवघड असते, त्या ठिकाणी भक्तलोक अवघड डोंगरवाटेवर खंडोबाची अवजड पालखी खांद्यावर घेऊन, आनंदाने बेभान होऊन नाचवत नाचवत, 'येळकोट येळकोट'च्या नामगजरात पुढे पाऊल टाकतात. वळणावळणाची बिकट वाट चालून गेल्यावर पालखी डोंगरमाथ्यावर येते. तिथे आपटापूजन झाल्यानंतर पालखी विसाव्याच्या ठिकाणी जाऊन थांबते आणि बरोबर याच ठिकाणी दोन्हीकडच्या पालख्यांना नाचवून रमवले जाते म्हणूनच या भागाला 'रमणा' असे नाव रूढ झाले आहे. या अपूर्व सोहळ्याच्या शुभप्रसंगी सनई-चौघड्याच्या मंगलमय वातावरणात शोभेच्या दारूची नेत्रदीपक आतषबाजी केली जाते. त्या वेळी सारा 'रमणा' उजळून निघतो. आतषबाजीनंतर दोन्ही पालख्यांमध्ये परस्पर दिशांना मोठे आरसे लावले जातात. त्या वेळी दोन्ही आरशांमध्ये समोरासमोरील प्रतिबिंब दिसते. या कार्यक्रमाला 'दसऱ्याची भेटाभेट' असे म्हणतात. प्रतिबिंब दिसल्यानंतर दोनही पालख्या आपापल्या मंदिरांकडे जाण्यास निघतात. गडावरील पालखी निघाल्यानंतर विसाव्याच्या ठिकाणी आपटापूजन होते. त्यानंतर पालखी पेशवे तलाव, जुन्या जेजुरीमार्गे वाजत-गाजत नाचवत गावामध्ये आणली जाते. तेव्हा वाईट प्रवृत्तीच्या नाशाचे प्रतीक म्हणून रावणाच्या प्रतिमेचे दहन केले जाते. त्यानंतर नजरपेठेतून (पुणे-पंढरपूर रस्त्यावरून खंडोबा मंदिराकडे वेशीमार्गे जाणारा फाटा) भुईनळ्याच्या आतषबाजीमध्ये पालखी महाद्वाराच्या दिशेने हळूहळू मार्गक्रमण करू लागते व सूर्योदयाच्या वेळी महाद्वारात प्रवेश करते. नंतर मंदिराला पालखी प्रदक्षिणा घालून उत्सवमूर्ती भंडारगृहात स्थानापन्न केल्या जातात. त्यानंतर देवाच्या मळ्यातील ज्वारी (जोंधळा) 'रोजमारा' 'पगार' म्हणून उपस्थितांना वाटली जाते. (ती ज्वारी घरात ठेवल्याने संसारात सुखसमृद्धी नांदते, अशी जनश्रद्धा असल्याने भक्तलोक ती ज्वारी पुढच्या दसऱ्यापर्यंत पिवळ्या रंगाच्या छोट्या पिशवीत भंडारा टाकून देव्हाऱ्यात ठेवतात.) कऱ्हेपठारावरही असाच सोहळा चालतो. या वेळी गडावरील मंदिरासमोर पानसे सरदारांनी अर्पण केलेल्या तलवारीच्या कसरत स्पर्धेचा कार्यक्रम होतो. विजेत्यांना 'मार्तंड देवसंस्थान कमिटी'द्वारे बक्षिसे वाटली जातात.

विजयादशमीच्या दोन दिवस अगोदर जेजुरी गावामध्ये झेंडूच्या फुलांचा मोठा बाजार भरतो. हा बाजार प्रसिद्ध आहे.

**ध्वजोत्सव :**

पौषी पौर्णिमा व माघी पौर्णिमा या दोन यात्रांमध्ये जेजुरी गडावर शिखर काठ्यांचा ध्वजोत्सव साजरा केला जातो. त्यामागील लोककथा पुढीलप्रमाणे सांगितली जाते :

मार्तंडभैरवाने मणि-मल्ल या दैत्यबंधूंशी युद्ध करण्याचे ठरविले, तेव्हा सप्तर्षींनी व शिवगणांनी वृषभचिन्हांकित म्हणजेच नंदीची प्रतिमा असलेला ध्वज युद्धासाठी निवडला व मार्तंडभैरव विजयी झाल्यानंतर तो ध्वज आनंदाने नाचवला. त्याचेच प्रतीक म्हणून वरील दोन पौर्णिमांच्या दिवशी साजरा होणारा उत्सव म्हणजेच ध्वजोत्सव किंवा काठ्यांचा उत्सव होय. ध्वजोत्सवाला संगमनेर व बारामती तालुक्यांतील भाविकभक्त मोठ्या संख्येने उपस्थित राहतात. सुपेगावच्या खैरे पाटलांची एक शिखर काठी असते. दुसरी संगमनेरच्या होलमांची असते. या दोन काठ्यांबरोबरच होळकर ट्रस्टची एक शिखर काठी असते. या तीन काठ्या मानाच्या आहेत. याव्यतिरिक्त अनेक ठिकाणांवरून भक्त सश्रद्ध भावनेने काठ्या घेऊन येतात. या सर्व काठ्यांना पिवळे ध्वज असतात. ध्वजोत्सव पाहण्यासारखा असतो.

**महाशिवरात्र :**

जेजुरी गडावरील गुप्त मल्लेश्वराचे (शिवमंदिर) मंदिरद्वार फक्त याच दिवशी उघडले जाते. त्या वेळी दर्शनासाठी दूरवरून भाविक भक्त येतात व अनेक तास रांगेत उभे राहून गुप्तमल्लेश्वराचे दर्शन घेतात. या वेळी खंडोबा मंदिरावरील कळसातील शिवलिंगाचेही भक्तलोक आवर्जून दर्शन घेतात.

**जागर :**

आश्विन महिन्यात येणाऱ्या प्रत्येक शुक्रवारी व शनिवारी आदिमाया शक्ती जननी तथा जाणाई (जेजुरी गाव) तसेच जेजुरीगड आणि कऱ्हेपठारावरील खंडोबा मंदिरात पूजा झाल्यावर छबिना निघतो. यात गुरव-पुजारी, मानकरी लोकांच्या डोक्यावर दिवटी ठेवतात. तसेच इच्छा व्यक्त केल्यास इतर भक्तांच्याही डोक्यावर हे आरतीपात्र (पेटती समई) ठेवली जाते. सनई-चौघड्याच्या सुरात व दिवट्यांच्या लखलखत्या प्रकाशात हा स्नेहभरित सोहळा रात्रभर चालतो. यात खंडोबाची अवीट गोडीची जुनी पदे सनईच्या मंगल सुरात ऐकण्यास मिळतात. गाणी ऐकता ऐकता रात्र कधी सरते, ते उपस्थित लोकांना कळतही नाही. येथे आदिमाया शक्तीस पहिला मान असल्याने शुक्रवारी जेजुरी गावातील जननी (जानाई) मंदिरात जागर होतो व नंतर शनिवारी जेजुरीगड व कऱ्हेपठारावरील मंदिरात जागर

होतो. तिन्ही ठिकाणी हा सोहळा साजरा होत असला तरी कऱ्हेपठारावरील सोहळा पाहण्यासारखा असतो. रात्रभर देवाचा छबिना चालतो व देव रात्रभर जागविले जातात. म्हणून या सोहळ्याला 'जागर' असे म्हणतात.

पुढील प्रकरणात संशोधकाच्या नजरेतून, खंडोबा व्युत्पत्तीबद्दल व्यक्त केलेल्या मत-मतातरांच्या माध्यमातून माहिती घेऊ.

[]

**संदर्भ - टिपा**

१. नऱ्हे शंकर, उमाजी राजे, पृ. १४५.
२. जेजुरी येथील गडकोट व कऱ्हेपठारावरील खंडोबा मंदिराच्या आवारात हा विधी सादर होताना समक्ष संकलित केलेले विधिमंत्र गीत.
३. चंदनपुरी येथील खंडोबा मंदिराच्या आवारात हा विधी सादर होताना समक्ष संकलित केलेले विधिमंत्र गीत.
४. वाळके मार्तंड, खंडोबाचं लग्न, पृ. १३८.
५. खाडे बापूराव खंडेराव, श्रीक्षेत्र जेजुरीमाहात्म्य, पृ. ७७.
६. बारभाई आप्पासो उर्फ शिवदास कोंडिबा, श्री क्षेत्र जेजुरीचा खंडोबा, पृ. १९-२०.
७. टांकसाळे मधुकर, पाऊलखुणा, पृ. १८-२१.
८. श्रीतत्वनिधी
(श्री खरे ग. ह. याच्या 'मूर्तिविज्ञान' या ग्रंथामध्येही अशा स्वरूपाची माहिती दिली आहे).
९. प्रसाद : खंडोबा विशेषांक: ऑगस्ट १९७८, पृ. ९६.

दैवतांविषयींच्या बहुव्यापक संदर्भांचा शास्त्रीय दृष्टिकोनातून चिकित्सक पद्धतीने अभ्यास करून संबंधित नवीन मुद्द्यांच्या आधारे स्वयंप्रज्ञेद्वारे नवनवीन निष्कर्ष काढणे म्हणजेच देवता किंवा दैवतविज्ञान होय.

देवताविज्ञान ही भारतीय इतिहासाची शाखा आहे. अलीकडच्या काळात देवताविज्ञान हे स्वतंत्र शास्त्र निर्माण होऊ पाहत आहे. देवतांच्या विकसन प्रक्रियेचा मूलगामी शोध घेत त्यात घेतला जातो. तो शोध घेताना पौराणिक कथा, दंतकथा, लोककथा, देवतांच्या प्रकटीकरणापूर्वीची पार्श्वभूमी अभ्यासली जाते. दैवताची उपासना सुरू झाल्यापासून वर्तमानकाळापर्यंतच्या प्रत्येक कालखंडातील सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, धार्मिक परिस्थितीचा परिणाम त्या दैवतावर काय झाला हे पाहिले जाते. संबंधीत दैवताच्या श्रेणीतील इतर देवतांशी तुलना करून त्यांच्यातील साम्यस्थळे तसेच सौम्य भाषेत भेद शोधले जातात, त्याचबरोबर त्यांच्या वेषभूषा, प्रतीके, उपासनापद्धती, लोकप्रियता इत्यादी घटकांची तुलनात्मक मीमांसा केली जाते. याशिवाय गत आणि वर्तमान काळात समाजमनात असणाऱ्या त्या दैवताच्या श्रद्धास्थानाचाही नानाविध अंगांनी देवताविज्ञानात पद्धतशीर अभ्यास केला जातो. त्यासाठी जुनी शस्त्रास्त्रे, वास्तू, मूर्ती, वीरगळ, शिलालेख, मुद्रा, भूर्जपत्रे, ताडपत्रे, ताम्रपट, हस्तलिखिते, बखरी, मौखिक परंपरा, नव अभ्यासक-संशोधकांचे मुद्रित संदर्भग्रंथ इत्यादी संदर्भसाधनांचा उपयोग त्या त्या अनुषंगाने स्थळ, काळ व व्यक्ती यांच्या निर्देशांसह करता येतो.

विज्ञान क्षेत्रातील कोणत्याही विषयाच्या अनुषंगाने संशोधनात्मक अभ्यास करीत असताना ज्याप्रमाणे प्रयोगशाळेत झालेल्या प्रात्यक्षिकांवर भर देऊन तंतोतंत अनुमान काढण्याचा प्रयत्न केला जातो, त्याचप्रमाणे देवताविज्ञानाचा अभ्यास करीत असताना वास्तवाला धरूनच तर्कांद्वारे संबंधित विषयातील प्रधान घटकांचे निष्कर्ष काढले जातात. पुष्कळदा मुद्रित पूर्वसाहित्य संदर्भांवर ते आधारभूत असतात. आपण ज्या दैवताबद्दल संशोधन करीत आहोत, त्या दैवताबद्दल पूर्वसंशोधन संदर्भ साहित्यसूचीमध्ये कपोलकल्पित भाष्य असण्याची दाट शक्यता असते. म्हणजेच त्यातील संदर्भसाहित्य सर्वच्या सर्व निखळ सत्य असण्याची अजिबात शक्यता नसते किंवा पूर्वसाहित्याच्या सूचीमध्ये अपवादात्मक काही संदर्भ पूर्वग्रहदूषितही असू शकतात.

बऱ्याच वेळा प्रसिद्धीसाठी हपापलेली या क्षेत्रांतील काही मूठभर माणसे संशोधनाच्या नावाखाली संबंधित दैवताबद्दल काल्पनिक, तर्कविसंगत आणि बाळबोध स्वरूपाची मते मांडत असतात किंवा अवघ्या समाजमनात रूढ झालेल्या त्या दैवताच्या प्रतिमेच्या विरुद्ध गुंतागुंतीचे काल्पनिक निष्कर्ष काढून संबंधित विषयातील आपले अज्ञान उघड करीत असतात. किंबहुना ते आपल्या मौखिक अथवा लिखित आचरणातून समाजात 'वैचारिक काळिमा' फासण्याचेच काम करीत असतात. त्यामुळे कदाचित समाजात तेढ निर्माण होऊ शकते. तसेच टीकेला बळी पडलेल्या दैवतांबद्दल समाजात सहानुभूतीची प्रचंड लाट निर्माण होऊन तथाकथित टीकाकाराचे सामाजिक अस्तित्व धोक्यात येण्याची शक्यता असते. त्यामुळे देवताविज्ञानातील नवसंशोधकांनी आपल्या संशोधन विषयाशी संबंधित असणारा प्रत्येक संदर्भ पुन्हा पुन्हा पडताळून पाहूनच त्या विषयाला अंतिम स्वरूप देणे अपरिहार्य आहे.

अलीकडच्या काळात इ. स. १९५० नंतर 'खंडोबा' या लोकप्रिय भारतीय लोकदैवतावर काही प्रमाणात संशोधनपर लेखनाचा प्रयत्न झाला आहे. त्यात देशी-विदेशी अभ्यासकांचा प्रामुख्याने समावेश आहे. परंतु खंडोबावरील संशोधनाला पूर्णत्व आले आहे असे म्हणणे धाडसाचे ठरेल. कारण खंडोबा हा विषय इतका व्यापक आणि गुंतागुंतीचा आहे की, भविष्यातील नवसंशोधकांना ते एक नेहमीच आवाहन ठरणार आहे.

इ. स. १९५२ साली श्री. श. बा. जोशी यांच्या 'मऱ्हाठी संस्कृती' या ग्रंथातून खंडोबाच्या कानडीपणाचा संशोधकांना प्रथमच परिचय झाला. (संत एकनाथकृत भक्तिवाङ्मयात 'मैराळ देव कानडे' आणि 'कानडा खंडेराय' असे दोन उल्लेख आढळतात, तर संत मध्वमुनीश्वर मल्लारीच्या रूपाची ओळख 'कानडे रूपडे चोखडे साबडे नाम मल्हारी' अशी सांगतात. वाघ्या-मुरळीच्या पारंपरिक लोकगीतांतही 'देव कानडा, कानडा मल्हारी' अशा प्रकारचे उल्लेख येतात.) यानंतर श्री. पांडुरंग देसाई यांचा 'मल्हारी मार्तंडभैरव' नावाचा लेख नोव्हेंबर १९५७ च्या 'नवभारत'मध्ये प्रसिद्ध झाला. पुढच्याच महिन्यात म्हणजे डिसेंबर १९५७ मध्ये याच विषयावर श्री. ग. ह. खरे यांचा लेख 'केसरी'त प्रसिद्ध झाला व इ.स. १९५८ मध्ये त्यांचेच 'महाराष्ट्राची चार दैवते' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. वेगवेगळ्या चार दैवतांच्या चार भागांत विभागलेल्या या पुस्तकाच्या एका भागामध्ये खंडोबाबद्दलची माहिती देण्यात आली आहे. इ.स.१९६१ साली डॉ. रा. चिं. ढेरे यांचे 'खंडोबा' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. काही ऐतिहासिक कागदपत्रांमध्ये इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांचेही खंडोबावरील स्फुट संशोधनात्मक लेखन आढळते.

जर्मनीच्या हायडेलबर्ग विद्यापीठाच्या साऊथ एशियन इन्स्टिट्युटचे तत्कालीन संचालक आणि जागतिक

कीर्तीचे भारतीय विद्येचे अभ्यासक (इन्डॉलॉजिस्ट) प्रा. डॉ. गुन्थर डायटस् सोन्थायमर यांचे इ. स. १९८९ साली खंडोबावर समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून संशोधन करून लिहिलेले 'पॅस्टोरल डेटीज् इन् वेस्टर्न इंडिया' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यांच्या मृत्यूनंतर (इ.स.१९९२) त्यांच्या अनुयायी-शिष्या अमेरिकेतील स्टेट अॅरिझोना विद्यापीठातील भारतीय विद्येच्या अभ्यासक प्रा. डॉ. अॅन फेल्डहौस यांनी सोन्थायमर यांच्याच काही अप्रकाशित लेखांचे संपादन करून इ.स.१९९७ साली 'किंग ऑफ हंटर्स, वॉरिअर्स अॅण्ड् शेफर्डस् एस्सेज् : ऑन खंडोबा' हे पुस्तक प्रकाशित केले. हे दोन्ही ग्रंथ आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रसिद्ध झाले. सद्यःस्थितीत महाराष्ट्रातील विद्यापीठांमध्ये खंडोबा विषयावर एम्.फिल., पीएच्.डी. या पदव्यांसाठी नव्याने संशोधन होताना दिसते आहे.

## महात्मा जोतिबा फुले यांचे खंडोबाविषयी मत

म. जोतिबा फुले यांनी आपल्या 'गुलामगिरी' या प्रसिद्ध ग्रंथात जोतिबा, खंडोबा आणि भैरोबा या महाराष्ट्राच्या लोकप्रिय दैवतांच्या कथांचा उपयोग मतप्रचारासाठी केला आहे. असे करताना त्यांनी या दैवतांना प्राचीन बळीच्या राज्यातील राज्याधिकारी बनविले आहे. खंडोबाची 'वीर पुरुष' म्हणून प्रतिमा उभी करत असताना ते पुढीलप्रमाणे आपले मत मांडतात :

'' ... त्याचप्रमाणे दक्षिणेत दुसरे क्षेत्र बळीच्या ताब्यात होते, त्यास महाराष्ट्र म्हणत असत. व त्यातील सर्व क्षेत्रवासी लोकांस महाराष्ट्रीय म्हणत असत, त्याचा उपभ्रंश हा होय. ते महाराष्ट्र क्षेत्र अतिशय मोठे असल्यामुळे बळीराजाने त्याची नऊ खंडे केली होती. यावरून त्या प्रत्येक खंडाच्या अधिकाऱ्याचे नाव खंडोबा पडले होते. असे सापडते व त्याच्या योग्यतेप्रमाणे त्याच्या हाताखाली एक अथवा दोन ही प्रधान असत. त्याचप्रमाणे दर एक खंडोबाचे हाताखाली बहुत मल्ल असत, म्हणून त्यास मल्लूखान म्हणतात. त्यांपैकी जेजुरीचा खंडोबा हा होता. तो आपल्या आसपासच्या क्षेत्रपतींच्या ताब्यातील मल्लांच्या खोडी मोडून त्यास ताळ्यावर आणीत असे. यास्तव त्याचे नाव मल्ल-अरी पडले होते. त्याचाच अपभ्रंश मल्हारी हा होय. तो धर्मन्यायाने लढण्यामध्ये इतका अहंकार बाळगीत असे की, त्याने कधी आपल्यास पाठ दाखविलेल्या शत्रूवर वार केला नाही. म्हणून त्याचे नाव मार-तोंड पडले होते. ज्याचा अपभ्रंश 'मार्तंड' हा आहे. तसाच तो दीनांचा कैवारी असे. तो गाण्याचा मोठा षोकी असे, कारण त्याने स्थापिलेला एक प्रसिद्ध मल्हार राग आहे. तो इतका उत्तम आहे की, त्याच्या अत्प्रयाने मिय्या म्हणून जो मुसलमान लोकांमध्ये प्रसिद्ध गायक होऊन गेला त्याने सुद्धा दुसरा एक मल्हार केला आहे.[१]

अर्थात्, वरील खंडोबा मिथक पूर्णपणे काल्पनिक स्वरूपाचे असल्यामुळे दैवतविज्ञानाच्या अभ्यासकांना ते शास्त्रीयदृष्ट्या मान्य नाही ही वस्तुस्थिती आहे. सदर मिथकाबद्दल मत व्यक्त करताना डॉ. रा. चिं. ढेरे लिहितात, ''जोतिबांचे हे कल्पनारंजन मतप्रचाराच्या अभिनवेशांतून उद्‌भवलेलं आहे... मूळ कथेचा विपर्यास किंवा मुळाशीं विसंगत कल्पनारंजन किती करावयाचें, हें ज्याच्या त्याच्या अभिनिवेशावर, प्रवृत्तीवर व क्षमतेवर अवलंबून राहतें''[२]

## खंडोबा : ऐतिहासिक वीरपुरुष - श्री. ल. रा. पांगारकर

खंडोबा हा मूलत: एक ऐतिहासिक वीरपुरुष असावा, परंतु कालांतराने त्याला लोकश्रद्धेतून देवतास्वरूप प्राप्त झाले असावे, अशा प्रकारची मते काही आधुनिक संशोधकांनी (!) व्यक्त केली आहेत. ह.भ.प. ल. रा. पांगारकरांनी आपल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात एकनाथांच्या वाघ्या-मुरळीवरील भारुडांच्या निमित्ताने खंडोबाविषयी जे प्रतिपादन केले आहे, ते असे :''ऐतिहासिक दृष्टीने पाहता खंडेराव हा देवगडकर जाधवांच्याही फार पूर्वी झालेला एक शिवावतार असावा, असे मी तीस वर्षांपूर्वी 'खंडेराय व शिवराय' या शीर्षकाखाली एक लेख लिहून प्रसिद्ध केले होते. खंडेराय हा शिवरायासारखा रक्षक व गोब्राह्मणप्रतिपालक विख्यात वीर होता. म्हणजे हा शिवावतार ऐतिहासिक असावा.''[३]

श्री. त्र्यं. गं. धनेश्वर (अहमदनगर) यांनीदेखील 'वेरूळची लेणी' या पुस्तकात वरील स्वरूपाचेच मत मांडले आहे. त्यांच्या मते ''खंडेराव ही इ.स. ६२० मध्ये होऊन गेलेली एक बौद्धविरोधक ऐतिहासिक व्यक्ती असावी.''[४]

श्री धनेश्वरांनी अंदाजे काळ नोंदवून जरी हिंदू-बौध धर्मात वैचारिकदृष्या परस्पर तेढ निर्माण करणारे वरील

प्रकारचे वक्तव्य केले असले तरी या विधानाला कुठलाही ऐतिहासिक आधार किंवा भक्कम पुरावा दिला नाही. त्यामुळे 'कल्पनारंजन' यापलीकडे त्यांच्या मताला काही अर्थ नाही.[४]

'समयपरीक्षा' (बारावे शतक) नावाच्या कानडी जैन ग्रंथात हिंदू देवतांची निंदा करताना, ''खंडोबा ही देवता मूलत: ऐतिहासिक वीरपुरुष असल्याचे'' सूचित केले आहे.

## खंडोबा : मार्तंड/सूर्य - श्री. बी. ए. गुप्ते

खंडोबाच्या 'मल्हारी मार्तंड भैरव' या नावातील 'मार्तंड' या शब्दाचा आधार घेऊन अनेकांनी खंडोबाच्या स्वरूपात सूर्योपासनेचा अंश शोधण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. बी. ए. गुप्ते यांनी १९९६ साली लिहिलेल्या 'हिंदु हॉलिडेज् ॲण्ड् सेरिमोनिअल्स' या ग्रंथात प्रथम हे मत मांडले. गुप्ते लिहितात :

"... Martand is one of the names of the Sun, the great luminary. It is, therefore, difficult to reconcile the theory of incarnation of Shiva, the god of destruction, with the power attributed to Khandoba. He is supposed to protect people from epidemics. It is suggested that the whole story is but a sun-myth, in which its yellow rays have destroyed the yellowish or pea fog of the Northern mountains, where the Aryans lived before they came down to India. The story of the hunter fits in, when Mrigashirsha the fifth mansion, resembles the head of an antelope, shatataraka, the hundred-star mansion, the Banai, the quiver holding 100 arrows, the Ursha major, the Seven Rishis and cannis the dog of astronomical chart. The arrival of the Sun, therefore, at this particular point, indicated the defeat and death of the demons."[५]

महर्षी वेदव्यास विरचित 'मल्लारिमाहात्म्यम्' या संस्कृत ग्रंथात ''मार्गशीर्षामले पक्षे षष्ठ्यां वारों शुमालिन:। शततारागते चन्द्रे लिंङ्ग स्याद दृष्टिगोचरम'' असा मार्तंडभैरवाने लिंगरूपाने पृथ्वीवर निवास केल्याचा दिन सांगितला आहे.[६]

'मऱ्हाठी संस्कृती' या ग्रंथाचे लेखक श्री. श. बा. जोशी यांनीही खंडोबाचा सूर्याशी संबंध जोडला आहे. ते आपल्या ग्रंथात लिहितात :

''मार्तंड म्हणजे सूर्य. 'इंद्रापर्वता' हे संयुक्त नाव जसे निरनिराळ्या दोन देवता एकत्र आल्याचे दाखविते, तसे मल्लारीमार्तंड हे आणखी दुसऱ्या दोन देवांच्या निरनिराळ्या उपासना मार्गांचे संमीलन किंवा एकीकरण होऊन एक देव बनला असल्याचे निदर्शक आहे... तिसऱ्या शतकात इराणमध्ये मित्रपंथ (मिथ्राइझम) विशेष प्रबळ होता. या मित्रपंथाचा 'मणि' या नावाचा एक मोठा प्रचारक त्या काळात होऊन गेला. त्याने त्या देशातील विरोधास न जुमानता मित्रपंथाचा प्रचार केला. विरोधकांकडून शेवटी त्यास मरणही प्राप्त झाले, तरीही त्याच्यानंतर त्याचा पंथ जगातील निरनिराळ्या देशांतून प्रसार पावला. तिसऱ्या शतकात उदय पावलेल्या मणिपंथीय सूर्योपासनेचा प्रचार गुप्तांच्या काळातील परकीय स्वाऱ्यांबरोबर भारतातही झाला असणे अशक्य नाही. त्या काळातील सूर्याच्या मूर्ती म्हणजे या स्वाऱ्यांचे जणू काही प्रतीकच... मणिपंथाकडून सूर्योपासना घेतली, तरी त्यातला मणिराक्षस मारून टाकला! परकीयांच्याकडून कोणतीही गोष्ट घेतली असे म्हणणे स्वाभिमानास बोचक ठरते. मल्लासुराबरोबर मणि हा दैत्यही त्या पुराणात मारला गेला.''[७]

'मार्तंडभैरव' हा विवक्षित भैरव आहे, असे ठामपणे मत मांडणारे श्री. ग. ह. खरे 'मार्तंड' या शब्दावरून खंडोबाचा सूर्याशी संबंध लावताना दिसतात, ही आश्चर्याची बाब म्हणावी लागेल. ते लिहितात : ''याचीं नावें तपासलीं, तर याच्या कल्पनेंत शिंव, त्याचें एक रूप भैरव आणि सूर्य अशा तीन देवांचें मिश्रण झाल्याचे प्रतीत होतें आणि याच्या मूर्ती अभ्यासिल्या तर या मिश्रणाची समजूत अधिक दृढ होते.''[८]

डॉ. रा. चिं. ढेरे यांचे मत असे : ''खंडोबांत सूर्योपासनेचा अंश शोधण्याचा प्रयत्न ज्या 'मार्तण्ड' या शब्दामुळें केला जातो, तो शब्द सूर्यवाचक नसून ज्या भैरवाशीं मैलाराचे तादात्म्य कल्पिलें गेलें, त्या भैरवाचें विशेषण आहे.''[९]

## खंडोबा : स्कंद - इतिहासाचार्य वि. का. राजवाडे

खंडोबा या नावातील मूळ शब्द 'खंड' यावरून इतिहासाचार्य राजवाडे यांनी खंडोबा म्हणजे स्कंद असा

अर्थ प्रचारात आणला आहे. 'खंडोबा' या शब्दाची व्युत्पत्ती देताना ते लिहितात :

''हेमचंद्र 'हरस्कंदौ' या संस्कृत द्विवचनाचें 'हरखंडा' असे प्राकृत रूप देतो. 'खंडा' हे अनेकवचन आहे; कां कीं, प्राकृतांत प्राय: द्विवचन नाहीं. तात्पर्य, 'स्कंद' या संस्कृत शब्दाचे प्राकृत रूप 'खंड' असें होतें. त्याचें ममतादर्शक मराठी रूप 'खंडू' व प्राशस्त्यदर्शक मराठी रूप 'खंडोबा'. म्हणजे महाराष्ट्रात जेजुरी, पाली वगैरे ठिकाणचे जे खंडोबा आहेत, ते मूळचे स्कंद होत. स्कंद म्हणजे कार्तिकस्वामी. कार्तिकस्वामींचें देऊळ पुण्याच्या पर्वतीस आहे, तें स्कंदाचें म्हणजे खंडोबाचेच होय. इतकेच की, पर्वतीवरच्या त्या देवाचे नाव संस्कृत आहे व जेजुरीच्या देवाचे नाव प्राकृत आहे. स्कंद ही देवता फार पूर्वीपासून वीरांची व योद्ध्यांची आहे. स्कंदाला सेनानी हे अपरनाम आहे. त्याची उपासना वीर करतात. महाराष्ट्रातील सर्व जातींचे मराठे खंडोबा हे आपले कुलदैवत का समजतात, ते वरील उद्घाटनावरून समजणार आहे. खंडोबा हे शिवदैवत आहे, असे कित्येक लोक समजतात, ते अर्थात् निराधार आहे. स्कंद पुराणात स्कंदोपासकांची म्हणजे खंडोबाच्या उपासकांची माहिती सापडते.''[१०]

कै. राजवाडे यांनी हेमचंद्राचा दाखला देऊन जी उत्पत्ती सांगितली आहे ती हेमचंद्रानुसार नाही हे श्री. ग. ह. खरे यांनी साधार दाखवून दिले आहे. त्यांच्या मते : ''त्यांनीं (कै. राजवाडे यांनी) 'हरखंडा' हें रूप कोठून आणलें, हेच समजत नाहीं. हेमचंद्राच्या प्राकृत व्याकरणांत 'समासेवा' (२/९७) या सूत्रावर व्याख्यान करतांना उदाहरण म्हणून 'हरस्कंदौ' यांचीं प्राकृतांत 'हरस्खन्दा' किंवा 'हरन्दा' अशीं रूपें बनतात म्हणून सांगितले आहे. येथें 'ड' नसून 'द' आहे.[११]

डॉ. रा. चिं. ढेरे यांनी राजवाड्यांच्या वरील मताचे खंडन करून खंडोबा-स्कंद एकात्म्याला पूरक अशी पुढील कारणे दिली आहेत आणि ती अगदी योग्यही वाटतात.

१) ज्या 'खंडोबा' नावावरून खंडोबाचे स्कंदाशी एकात्म्य कल्पिले जाते, ते नाव केवळ महाराष्ट्रातच प्रचलित आहे. खंडोबाला दोन बायका आहेत आणि मराठी समजुतीप्रमाणे स्कंद हा ब्रह्मचारी, इतकेच नव्हे तर स्त्री-द्वेष्टा आहे.
२) खंडोबाचे वाहन घोडा आहे, तर स्कंदाचे वाहन मोर आहे.
३) खंडोबा एकमुख व चतुर्भुज आहे तर स्कंद हा षण्मुख व द्वादशभुज आहे.
४) खंडोबा हा शिवाचे मार्तंडभैरव रूप आहे - म्हणजे पर्यायाने शिव आहे, तर स्कंद हा शिवपुत्र आहे.
५) 'मल्लारिमहात्म्यात' मार्तंडभैरवाच्या म्हणजे खंडोबाच्या सप्तकोटी गणांचे आधिपत्य स्कंद-कार्तिकेयाकडे असल्याचे वर्णन आहे. म्हणजे 'माहात्म्यकारा'लाही स्कंद हा खंडोबाहून वेगळा असल्याचेच अभिप्रेत आहे. नाम-भेद, चरित्र-भेद व मूर्ति-भेद अशा त्रिविध भिन्नतेमुळे खंडोबा-स्कंद एकात्म्य सिद्ध होऊ शकत नाही.[१२]

## खंडोबा : सप्तकोटीश्वर - श्री. ग. ह. खरे

श्री. ग. ह. खरे यांनी गोव्यातील सप्तकोटीश्वर या देवाचा खंडोबाशी संबंध दाखविला असून यासाठी ते 'एळ्कोटी महादेव' व 'यळ्कोटी तपोधन' या लैखिक उल्लेखांचा आधार घेताना दिसतात. याविषयीचे मत व्यक्त करताना खरे लिहितात :

''तो (खंडोबा) सात कोटी प्रकारचे सैन्य घेऊन मणिमल्लासुरांशीं लढला म्हणून तो एळ्कोटी देव बनला. याचें संस्कृतीकरण सप्तकोटी देव-नाथ-ईश्वर म्हणजेच सप्तकोटीश किंवा सप्तकोटीश्वर किंवा सप्तकोटेश्वर असें म्हटलें, तर त्यांत काहीं चूक होईल असे वाटत नाहीं. गोवें प्रदेशांत या नावाचें एक फार प्रसिद्ध देवस्थान आहे. पूर्वी हे दिवाडी बेटांतील नारवें नांवाच्या वाड्यामध्ये होते; सध्या तें दिवाडी बेटाच्या उत्तरेस पंचगंगेपलीकडे हिंदळें येथें आहे. आतां नव्या ठिकाणासही नारवेंच म्हणतात. गोव्याचे कदंब राजे त्याचे उपासक होते, असे दिसते... एळ्कोटी महादेवाच्या समानार्थी सप्तकोटीश्वर फार प्राचीन देवस्थान आहे. याचेंच सुलभीकरण कोटीश्वर, कोटेश्वर इत्यादी आहे. यापुढे जाऊन माझे असेही म्हणणे आहे की, सप्तकोटीश्वररूपाने मैलारलिंग किंवा मल्लारिच तेथे वास करीत आहे... कदंब राजांनी स्वत:स 'मलेवर मारि' असें एक बिरूद लावून घेतलें आहे. याचा अर्थ 'मलयवरूंना- डोंगरी लोकांना-गिरिजनांना मारणारा, ठार करणारा असा आहे. अशी एक कल्पना आहे कीं, मल्लारि शब्दामधील 'मल्ल' हे पूर्वपद गिरिजनांचें द्योतक असावें. अर्थात् मल्लारि म्हणजे गिरिजनांचा शत्रू होईल. मल्लारि, एळ्कोटी महादेव व सप्तकोटीश्वर हे एकदेवतावाचक असतील तर ही देवता गिरिजनांच्या विरुद्ध लढणाऱ्या लोकांची होईल.''[१३]

डॉ. रा. चिं. ढेरे यांनीही श्री. खरे यांच्या मताला काही प्रमाणात दुजोरा दिला आहे. त्यांच्या मते :

१) ‘एळकोटी तपोधन’ व ‘एळकोटी महादेव’ है मैलारनिदर्शक लैखिक उल्लेख श्री. देसाई व श्री. खरे यांनी निदर्शनास आणले आहेत. ‘एळकोटी’ (येळकोट) ही खंडोबा उपासनेतील गर्जना सर्वत्र रूढ आहे. ‘एळू’ या कानडी शब्दाचा अर्थ ‘सात’ असा आहे. अर्थातच एळकोटी - एळूकोटी म्हणजे ‘सप्तकोटी’. ‘मल्लारिमाहात्म्या’त मार्तंडभैरवाचे सैन्य सप्तकोटी गणांचे असल्याचे वर्णन येते. त्या वर्णनावरून मार्तंडभैरव हा ‘सप्तकोटीश्वर’ या विशेषणाला पात्र ठरतो.

२) तसेच सप्तकोटीश्वर या गोमंतकातील देवाचे उपासक असलेले कदंब राजे स्वत:स ‘मलेवरमारी’ म्हणजे गिरिजनांना (मल्लांना) मारणारे असे बिरूद लावून घेतात. त्या बिरूदातून ‘मल्लारि’ या नावाचे रहस्य सूचित होते. सप्तकोटीश्वराचे उपासक ज्याअर्थी स्वत:स ‘मल्लारि’ म्हणवून घेतात, त्याअर्थी गोमंतकातील सप्तकोटीश्वर हा मल्लारीच असला पाहिजे, हा तर्कही युक्तिसंगत वाटतो.[१४]

## खंडोबा : रवळनाथ - श्री. ग. ह. खरे

रवळनाथ या देवाची उपासना मुख्यत: कोकण, गोमंतक आणि कारवार या भागात चालते. रवळनाथाची मूर्ती उभी असते. मूर्तीचा डावा पाय किंचित वाकवून पुढे केलेला असतो. चतुर्भुज असलेल्या या मूर्तीच्या प्रत्येक हातात खड्‌ग, त्रिशूल, डमरू व पानपात्र या वस्तू दिसतात. त्यास मिशाही दाखवितात. त्याचे वाहन असलेला घोडा मूर्तीच्या उजव्या बाजूला कोरलेला असतो. काही ठिकाणी घोड्याऐवजी कुत्राही दाखवितात. रविवार हा रवळनाथाचा वार. हा देव ब्रह्मचारी असल्याची त्याच्या उपासकांमध्ये समजूत आहे. तर काहींच्या मते त्याला पावणाई नावाची एक बायको आहे. तिच्या मूर्तीचे स्वरूप काही ठिकाणी द्विभुज तर काही ठिकाणी चतुर्भुज असे आढळते. तिच्या चतुर्भुज रूपातील आयुधे आणि रवळनाथांच्या हातातील आयुधे यांमध्ये बरेच साम्य आढळते. रवळनाथाच्या पुजाऱ्यांमध्ये मुख्यत्वे घाडी, रावळ, गुरव किंवा सुतार या लोकांचा समावेश असतो. या सर्व तपशिलावरून श्री. ग. ह. खरे यांनी रवळनाथ आणि खंडोबा एकच आहेत, असे मत व्यक्त केले आहे. ते लिहितात, ‘‘रवळनाथ-रवळदेव-रवळेश्वर हे खंडोबाचेंच एक नांव असून, त्याच्या मूर्तीवरून त्या दोघांचें एकरूपत्व चांगलेंच प्रत्ययास येते.’’[१५]

‘‘रवळनाथ म्हणजे परमेश्वराच्या तृतीय प्रकृतीचें प्रतीक आहे. ही देवीची मूर्ती आहे,’[१६] असे मत श्री. नानासाहेब चापेकर यांनी ‘चित्पावन’ या ग्रंथात व्यक्त केले आहे.

डॉ. रा. चिं. ढेरे यांचे मत असे : ‘‘मूर्तीची भुजसंख्या, आयुधे, क्वचित दिसणारा घोडा व कुत्रा यावरून रवळनाथ हा खंडोबा असावा, असा भास होतो. परंतु घोडा व कुत्रा सर्वत्र आढळत नाहीं, दोन बायका नाहीत, भंडारासारख्या उपासनेच्या खुणा नाहींत आणि नांवाचेंही नाते जमत नाहीं यावरून खंडोबाशीं त्याचा प्रत्यक्ष संबंध नसावा, असें वाटतें. तो एक भैरव श्रेणीतील स्वतंत्र देव आहे.’’[१७]

‘केदारविजय’ या केदारमाहात्म्यपर ग्रंथात केदार (जोतिबा) आणि रवळनाथ एकच असल्याचे ग्रंथकाराने सूचित केले आहे. असे असताना श्री. खरे केदाराला आणि रवळनाथाला वेगवेगळे मानतात. त्यांच्या मते - ‘हा जोतिबा सौम्य भैरवरूपी आहे. तथापि, हा खंडोबा आहे की नाही, याविषयी शंका आहे. येथे कुत्रा, भंडार, एळकोट व खंडोबासंबद्ध इतर आचार यांचे अवशेष नाहीत. येथे कुंकू उधळतात व ‘चांगभले‘ असा जयघोष करतात. तो भैरवाच्या अत्युग्र रूपातून सौम्य रूपाकडे जाणारी खंडोबाच्या पुढची पायरी आहे, असे वाटते.’’[१८]

‘केदारविजय आणि करवीरमाहात्म्य’ या ग्रंथातही खंडोबाचा साधारण पुढीलप्रमाणे उल्लेख येतो : ‘‘केदारविजय या ग्रंथाचा चरित्रनायक केदारवळेश म्हणजेच कोल्हापूरजवळील ज्योतिबा असून मल्लारीमार्तंडला त्याचा सहकारी मानले आहे. केदारवळेश यास महालक्ष्मीने कोल्हासुर दैत्याबरोबर युद्ध करण्यास आणले. तेव्हा षोडशसिद्ध, अष्टभैरव, अष्टादश भैरवगण, चामुंडा आणि महामातृका व चोपडाई, महालक्ष्मी, यमाई या तीन अनादी शक्ती यांच्या साहाय्याने केदारवळेशने कोल्हासुर दैत्याचा वध केला. त्याच वेळेस मार्तंडभैरवाने मल्याळ देशात मैराळ हा दैत्य मारला म्हणून त्याला तिकडे ‘मार्तंडमैराळ’ म्हणतात आणि जेजुरीला मणिमल्लसुराचा वध केला म्हणून त्याला ‘मल्लारीमार्तंड’ हे नाव मिळाले.’’

## खंडोबा : मूलस्थानदेव, स्वयंभूदेव - श्री. ग. ह. खरे

मूलस्थानदेव हा लिंगस्वरूपात आढळणारा देव आहे. आठव्या शतकापासूनच्या अनेक कानडी लेखात या

देवाचे निर्देश येतात. श्री. ग. ह. खरे यांच्या मते, 'तें खंडोबाचेंच पर्याय रूप असावें.'[१९]

खरे यांच्या मताचा परामर्श डॉ. रा. चिं. ढेरे पुढीलप्रमाणे घेतात. त्यांच्या मते : ''या मूलस्थानदेवाप्रमाणेच आणि कित्येकदा मूलस्थानदेवाबरोबरच 'स्वयंभूदेव' किंवा 'स्वयंभू कलिनाथदेव' या नावाच्या आणखी एका देवाचा निर्देश येतो. मूलस्थानदेव जर खंडोबाचे पर्यायरूप होऊ शकत असेल तर स्वयंभूदेवालाही वगळता येणार नाही. परंतु तसे मानणे बरोबर ठरणार नाही. रवळनाथ, केदार ही भैरव श्रेणीतील दैवते आणि मूलस्थानदेव, स्वयंभूदेव ही मैलारश्रेणीतील दैवते यांना मैलार व त्याचे उन्नत रूप मार्तंडभैरव यांच्याशी एकरूप मानावयाचे ठरवले, तर मुरुगन, अय्यप्पन यांसारखी दक्षिणी दैवते आणि म्हस्कोबा, पोटोबा, रोकडोबा, बिरोबा यांसारखी नामभेदाने वावरणारी महाराष्ट्रातील भैरवाची रूपे यांनाही मैलार-खंडोबा मानावे लागेल. धर्मश्रद्धेच्या क्षेत्रात समन्वयाच्या प्रवृत्तीने अशा प्रकारचे एकात्म्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न होतोही. मात्र, संशोधनाच्या क्षेत्रात तसे मानून चालणार नाही.''[२०]

## खंडोबा : इंद्र - श्री. श. बा. जोशी

श्री. श. बा. जोशी यांच्या मते, 'मल्लारी' या नावाने महाराष्ट्रात आणि 'मल्लय' नावाने कर्नाटकात प्रसिद्ध असलेला हा देव एकच असला, तरी या उभय प्रदेशांतील त्याच्या रूपांची घडण काहीशी भिन्न आहे. 'मल्लय' हा 'गिरीश'रुद्र (मल्ले-डोंगर) आहे, तर 'मल्लारि' हा इंद्र आहे. याविषयीची चर्चा करताना 'मऱ्हाठी संस्कृती'या ग्रंथात ते पुढीलप्रमाणे आपले मत मांडतात :

'पुरे आणि पर्वत यांविषयी ऋषींना आपुलकी नव्हती त्याविषयी विरोधच असावा आणि त्यांचा तो विरोध त्यांनी आपण रचलेल्या रूपकातून पर्यायाने व्यक्त केला असावा... या दृष्टीने मल्लासुर म्हणजे पर्वतेयांचा नाश करणारा देव म्हणजे तो (मल्लारि) इंद्र असावा, असे वाटते. मल्लारीची मूर्ती अश्वारोही असून तिच्या हातात खड्गासारखे आयुध आहे, यावरूनही हा देव इंद्र असावा, असा तर्क चालतो... मल्लय्य ही देवता मुळात पत्तिजनांचीच असावी, असे म्हणावे लागते. नंतर इंद्रा-पर्वता या स्वरूपात या दोन्ही देवतांचा 'कूडल-संगम' (आर्य-द्रविड) झालेला दिसतो.'[२१]

श्री. जोशी यांनी वरील विवेचनासाठी 'मल्लारीमहात्म्या'तील कथेचा आणि मल्हारीच्या रूपवैशिष्ट्यांचा आधार घेतला असला तरी त्यांची ही कल्पना अगदी निराधार वाटते.

दुसरे असे की, ''खंडोबा परिवारात खंडोबाची दुसरी पत्नी बाणाईला असाधारण महत्त्व आहे. इंद्राच्या सात कन्यांपैकी बाणाई ही एक. दूताकरवी इंद्राने तिला बालिकेचे रूप देऊन पृथ्वीवर सोडून दिले असता एका धनगराने तिचा सांभाळ केला. वयात येताच तिचा खंडोबाशी विवाह झाला. जरी धनगराने तिचा सांभाळ केला असला तरी मूळ ती इंद्राची लेक. खंडोबा तिचा पती म्हणजे इंद्र खंडोबाचा सासरा होय.'' प्रचलित लोककथेवरून असा निष्कर्ष काढला तर श्री. श. बा. जोशी यांचे मत निरर्थक वाटते.

## भारताचार्य चिं. वि. वैद्य

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ३२ व्या वार्षिक समारंभाचे अध्यक्ष श्री. भास्करराव जाधव यांनी 'मराठी लोक व मराठ्यांची भाषा' या विषयावर दिलेल्या अध्यक्षीय भाषणावर प्रतिक्रिया म्हणून लिहिलेला भारताचार्य चिं. वि. वैद्य यांचा लेख 'लोकशिक्षण' मासिकाच्या सप्टेंबर १९३२ च्या अंकात 'मराठ्यांच्या चालीरीती' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झाला. या लेखात भारताचार्यांनी श्री. जाधवांच्या खंडोबाविषयक मतांचा परामर्श घेऊन आपले स्वतंत्र विचार मांडले आहेत. ते पुढीलप्रमाणे :

''... खंडोबासंबंधाने हा द्राविडी सुब्रह्मण्य स्कंदस्वामी आहे, असे रा. जाधव म्हणतात ते बरोबर नाही, असे माझे मत आहे. स्कंद या शब्दाचा खंड होऊ शकेल. पण खंडोबा म्हणजे शंकर, अर्थात् तो स्कंदाचा पिता आहे. म्हणून तो व हा एक नव्हेत. हा देव मराठ्यांचाच आहे. दक्षिणेकडे तो नाही. द्राविडांचा एळकोट यात का येतो, हे मात्र गूढ आहे. खंडोबाची दोनच स्थाने प्रसिद्ध आहेत एक जेजुरी व दुसरे बेदराजवळचे. पण दोन्ही स्थाने महाराष्ट्रात आहेत. महाराष्ट्राबाहेर खंडोबाची पूजा किंवा स्थान द्रविड- कर्नाटकात असल्याचे मला तरी माहीत नाही. सुबानराव, साबाजी वगैरे नावे सुब्रह्मण्यावरून आली असतील, पण हा देव महाराष्ट्रात नाही.''[२२]

## श्री. विष्णू नीळकंठ छत्रे

भारताचार्य चिं. वि. वैद्य यांच्या लेखातील खंडोबा व विठोबा या दैवताविषयीच्या मतांना विरोध करणारे आणि या दोन्ही दैवतांविषयी नवीन माहिती सांगणारे श्री. विष्णू नीळकंठ छत्रे यांचे पत्र 'लोकशिक्षण' मासिकाच्या नोव्हेंबर १९३२ च्या अंकात प्रसिद्ध करण्यात आले. पत्रातील खंडोबाविषयक मजकूर पुढीलप्रमाणे आहे :

''... खंडोबा हा द्राविड सुब्रह्मण्य स्कंदस्वामी आहे, असे जे जाधव म्हणतात तेच बरोबर आहे आणि हा स्कंददेव महाराष्ट्र, कर्नाटक व तेलंगण या तिन्ही प्रांतांत एक आवडते दैवत आहे.''

महाराष्ट्रात खंडोबाची विशेष प्रसिद्ध अशी दोनच स्थाने श्री. चिंतामणराव देतात व ती म्हणजे जेजुरी आणि बेदराजवळचे एक पण महाराष्ट्रात यांखेरीज अन्य प्रसिद्ध स्थाने आहेत. महाराष्ट्राबाहेरही खंडोबाची पूजा किंवा स्थान द्राविड-कर्नाटकात असल्याचे श्री. चिंतामणरावांना माहीत नसेल. परंतु तिकडेही या दैवताची पुष्कळ प्रसिद्ध स्थाने आहेत व तेथील पूजाही खंडोबासारखीच आहे. उदाहरणार्थ, धारवाड जिल्ह्यातील राणी बेन्नूर या तालुक्याच्या गावानजीकचे एक स्थान व दुसरे संस्थान रामदुर्ग सुरेबानजवळचे. एवढेच नव्हे, तर कर्नाटकात ज्या नावाने हे दैवत विशेष ओळखले जाते, ते 'मैलारलिंग' हे नाव हैदराबाद संस्थानातील बीड या गावाजवळील खंडोबास दिलेले आढळते. येथेही राणी-बेन्नूर जेजुरीप्रमाणे शिवलिंग आहे.

महाराष्ट्रात खंडोबास दोन बायका आहेत. त्यांची नावे म्हाळसा व बाणाई. पहिली लग्नाची व दुसरी पाटाची. कानडी मैलारलिंगासही दोनच बायका आहेत. एक म्हाळसा आणि दुसरी कुर्बत्तिअव्वा. पहिली लग्नाची व दुसरी रखेली आहे. द्राविड प्रांतातील सुब्रह्मण्याला देखील दोनच बायका आहेत. एक देवसेना अथवा देवयानी आणि दुसरी कुर्वत्तिअम्मा. दोन्ही लग्नाच्या, परंतु दुसरी अगदी हलक्या धीवर, कैकाडी असल्या जातीची (सं. कैवर्त-कोळी, कैकाडी). कर्नाटकी दैवताच्या एका बायकोचे नाव महाराष्ट्रीय आहे व दुसरे द्राविड आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे.

ही सर्व माहिती मी पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या एका बैठकीत वाचली होती; व त्या वेळी श्री. चिंतामणराव तेथे हजरही होते. पुढेही कार्तिकस्वामीच्या स्त्रियांसंबंधी वाद गेल्या वर्षी चालू असता माझी मुलगी कु. नर्मदाबाई छत्रे हिने त्याच्याच आधारे एक लेख 'ज्ञानप्रकाश'त छापला होता. परंतु त्याकडे श्री. चिंतामणरावांचे लक्ष बहुधा गेले नसावे.

आपल्याकडे खंडोबा संप्रदायाची खंडोबा, हयबती, गोडाजी, मल्हारी, दलपती, बाजीराव ही नावे जशी प्रचलित आहेत, त्याप्रमाणेच तिकडेही खंडप्पा, हयप्पा, गुंड्डाप्पा, मल्लप्पा अशी त्याच अर्थाची नावे अगदी रोजच्या व्यवहारात भेटण्याइतकी प्रचलित आहेत. सुब्रह्मण्याची सुब्रह्मण्य, दंडपाणी इत्यादी नावे ब्राह्मणांत विशेष रूढ आहेत आणि मुर्घन्, षण्मुख, आरूमुख (आरू = सहा), वेलन् (= भालाईत, वेल = भाला) ही नावे अब्राह्मणांत रूढ आहेत. यांपैकी वेलन हे नाव अपभ्रष्ट होऊन वेलंग या स्वरूपात एक ग्रामनाम म्हणून महाराष्ट्रात आढळते. ते वाईजवळ आहे व जवळच्याच डोंगरावर कार्तिकेयाची मूर्ती आहे. खंडोबाचा दिवटी, बुधली, घोडा वगैरे सरंजाम कर्नाटकातील मैलारलिंगाचाही आढळतो. दोन्ही ठिकाणी हळद हाच भंडार वापरतात. दोन्ही प्रांतात दैवतांचा मदतनीस प्रधान हा 'हेगडी'याच नावाचा आहे.

श्री शिवाजीमहाराजांप्रमाणे पूर्वी केव्हा तरी कोणा एका धाडसी वीराने हलकी माणसे हाताशी धरून राष्ट्रावरील प्रचंड संकट स्वतेजाने नाहीसे केले असावे व त्याची उपासना या संप्रदायाच्या रूपाने आजवर चालत आली असावी. त्याचे मदतगार म्हणजे कोळी, धनगर, कैकाडी वगैरे हलक्या वन्य जाती. हे सात ठिकाणचे लोकसमूह मदतीस म्हणून आले, तेच हे 'येळकोट' (येळ = सात). खंडोबाच्या संप्रदायातल्याप्रमाणेच वाघ्या-मुरळी सोडण्याची चाल कर्नाटकातील दैवतासंबंधानेही आहे. वरील सर्व विवेचनावरून हे ध्यानात येईल की, खंडोबा तोच मैलारसिंग व तोच सुब्रह्मण्य स्कंद. 'स्कंद' चा 'खंड' होणे हे श्री. चिंतामणरावांस शक्य दिसतच आहे. त्यांची मुख्य अडचण अशी दिसते की, तेच दैवत शिव व त्याचा पुत्र स्कंद ह्या दोघांचाही अवतार कसा होऊ शकेल? पण ही अडचण वाटते तेवढी मोठी नाही. ऐतिहासिक व्यक्ती ह्या सत्यवस्तूवर अवतार ही केवळ कल्पनाच बसवावयाची असते. त्यात सर्वत्र एकमत होईल, अशी कशी अपेक्षा करावी? खुद्द शिवाजीमहाराज हे विष्णूचे अवतार आहेत, अशी कल्पना 'शिवभारतकार' करतात, तर त्याच वेळी तो शिवाचा अवतार असे समजत नाहीत काय ? महाराष्ट्रात गणरायाला अष्टनायिकांची प्राप्ती व स्कंद अविवाहित, तर द्रविड-देशात बरोबर याच्या उलट प्रकार. तेव्हा खंडोबाची उपासना सर्व ठिकाणी एकच आहे, हे पाहिल्यानंतर अवताराच्या द्वैताने विचारात द्वैत होण्याचे कारण नाही.''[२५]

## पुन्हा भारताचार्य चिं. वि. वैद्य

श्री. विष्णू नीळकंठ छत्रे यांच्या पत्राला भारताचार्य चिं. वि. वैद्य यांनी 'विविध ज्ञानविस्तार' मासिकाच्या १९३३ च्या अंकात सविस्तर उत्तर दिले. 'खंडोबा व विठोबा' या शीर्षकाखाली दिलेल्या उत्तराचा खंडोबाविषयक भाग पुढीलप्रमाणे :

''... खंडोबा आणि विठोबा या दोन देवतांची भक्ती महाराष्ट्रातच आहे. उत्तर हिंदुस्थानात नाही आणि मला वाटते, या देवतांची भक्ती या नावांनी व प्रकारांनी महाराष्ट्राच्या दक्षिणेस कर्नाटक-तेलंगण- तामिळ प्रांतांतही नाही हे सिद्ध आहे. तथापि, या देवांची मुख्य स्थाने महाराष्ट्राच्या दक्षिण भागाने - विशेषत: कानडी मुलखाच्या सरहद्दीवर असल्याने हे देव आम्ही महाराष्ट्रीयांनी कर्नाटकातून घेतले, असे अनुमान करण्याकडे प्रवृत्ती होते व कर्नाटकी मोह पडणारे लेखक त्यास बळकटी आणतात परंतु माझ्या मते हे देव व यांची नावे महाराष्ट्रीय आहेत, याची कारणे पुढीलप्रमाणे देता येतील :

१) प्रथम या नावात जो 'बा' प्रत्यय आहे तो महाराष्ट्रीय आहे. वप्तृ, बप्प, बाप, बा अशा प्रकारच्या व्युत्पत्तिपरंपरेने तो संस्कृतोत्पन्न असून महाराष्ट्रातच रूढ आहे. राघोबा, पांडोबा, सदोबा वगैरे अनेक नावांत तो दिसतो. अर्थात् मूळ शब्द खंडू व विठू असून त्याला सन्मानार्थी 'बा' प्रत्यय लागून खंडोबा व विठोबा हे शब्द झाले आहेत. तात्पर्य, ही नावे स्पष्ट महाराष्ट्रीय आहेत.

२) यांची देवस्थानेही महाराष्ट्रात आहेत. कर्नाटकात किंवा तामिळ-तेलंगणात नाहीत. निदान विठोबाचे देवस्थान तिकडे नाही, खंडोबाचेही नाही सुब्रह्मण्याचे आहे पण सुब्रह्मण्य म्हणजे स्कंद अथवा कार्तिकस्वामी होय. खंडोबा तर शंकर होय. तेव्हा बापलेकांचा गोंधळ कसा करता येईल? रा. छत्रे याचा उलगडा करण्याचा प्रयत्न करताना असे म्हणतात की, 'ऐतिहासिक व्यक्ती या सत्यवस्तूवर अवतार म्हणून केवळ कल्पनाच बसवावयाची असते' व उदाहरण म्हणून शिवाजीस विष्णूचाही अवतार मानले आहे व शिवाचाही मानले आहे, ही गोष्ट देतात. पण खंडोबा कोणी ऐतिहासिक व्यक्ती नाही, तर तो प्रत्यक्ष शंकर होय. स्कंदही कोणाचा अवतार नाही, तो शिवाचा पुत्र आहे. तेव्हा तामिळ किंवा कानडी सुब्रह्मण्य हा महाराष्ट्रीय खंडोबा होऊ शकत नाही. मी या लेखात दाखविल्याप्रमाणे 'स्कंद'चा अपभ्रंश 'खंड' एका शिलालेखातही आहे. 'स्कंदपिता' या शब्दाचा अपभ्रंश 'खंडोबा' असा झाला असावा. शिवाजीस एका काळीच दोन देवांचा अवतार मानले नाही. प्रथम विष्णूचाच शिवभारताने मानले व नंतर शंभर वर्षांनी बखरकारांनी नामसादृशावरून शिवाचा अवतार मानले. वरील देवतांत व्यक्ती भिन्न आहेत आणि त्याही पितापुत्र अशा आहेत. तेव्हा खंडोबा हा सुब्रह्मण्यापासून घेतला, असे म्हणता येणार नाही. महाराष्ट्रातील खंडोबा तामिळ-कर्नाटकातील सुब्रह्मण्याचा बाप आहे, हा भेद लक्षात ठेवलाच पाहिजे.

'पूर्वी कोणी तरी केव्हा तरी हलकी माणसे हाताशी धरून राष्ट्रावरील संकट नाहीसे केले व त्याची उपासना या रूपाने आजवर चालत आली असावी,' असा केव्हा तरी कोणी तरी शब्दांनी अनैतिहासिक तर्क करून खंडोबा हा मुळात एक मनुष्य होता, असे प्रतिपादणे केव्हाही मान्य होणार नाही. खंडोबा हा शिवाचाच अवतार धर्मदृष्ट्याच मानिला आहे.[२३]

## श्री. आबा तथा पांडुरंग मार्तंड चांदोरकर

श्री. आबा चांदोरकर यांचा 'सह्याद्रीतील मावळा-मावळा' या शीर्षकाचा लेख 'सह्याद्री' मासिकाच्या फेब्रुवारी १९३५ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखात श्री. चांदोरकरांनी 'मल्हारी-खंडोबा'विषयी व्यक्त केलेले विचार पुढीलप्रमाणे :

''... नगर, पुणे व सातारा या तीन जिल्ह्यांच्या पश्चिमेस सह्याद्रीच्या पायथ्याशी किंवा कुशीत जो प्रांत आहे, त्यासच मल्लराष्ट्र किंवा मल्लदेश म्हणता येते. सांप्रत यालाच मावळ म्हणतात. असल्या या महाराष्ट्रात मल्ललोक राहत होते... असे हे मल्लराष्ट्र आणि मल्ललोकसमाज अफाट होता त्यामुळे त्यांना जिंकून आत्मसात् करण्याचे अवघड कार्य आर्यांना करण्यास अनेक वर्षे लागणे साहजिकच आहे. हे कार्य दख्खनमध्ये ज्या वीरपुरुषाने पार पाडले, त्याचे नाव स्कंद होय. त्यामुळे त्याला अपरनाम मल्ला(ल्हा) री हे मिळाले. सांप्रत जेजुरीस जो खंडोबा आहे, तो या वीरपुरुषाचे प्रतीक होय. स्कंद= खंड+बा (मानार्थी). याने या महामल्ल (मावळ) देशातील मणिमल्ल (मल्लश्रेष्ठ) नावाच्या मुख्य राजाचा नाश जेजुरीजवळ केला आणि मावळ प्रांत, कऱ्हेपठार आणि नीरथडी या दोन

प्रांतांसह आर्यांच्या हाती आणला. जेजुरीस देवळाच्या प्राकारात या मणिमल्लाची मूर्ती आहे. मणि याचा हा नाश 'मणिमल्ल मर्दुनी' असा श्रीसमर्थकृत खंडोबाच्या आरतीत उल्लेखिला आहे. मावळात मल्लांची लहान लहान अशी राज्ये होती, हे त्यातील रायरी, राजेवाडी (प्रत्येकी ३-३), राजुरी या ग्रामनामांवरून दिसते. यावरून या मल्लांची स्वातंत्र्याची आवडही दृग्गोचर होते. अशा कणखर लोकांना जिंकल्यामुळे आर्यांनी आपला सेनानी जो स्कंद, त्याची देव म्हणून कऱ्हेपठारावर स्थापना केली. हा पुरुष क्षत्रिय असल्याने सांप्रतच्या महाराष्ट्रातील बहुतेक क्षत्रिय घराण्यांचा कुलदेव आहे. अनेक शतकांपूर्वीचा इतिहास विसरल्यामुळे मल्लांच्या सांप्रतच्या वंशजांपैकी काही मावळी घराणीही या देवाची भक्त बनली आहेत. आपल्याकडील पुराणांप्रमाणे स्कंद हा ब्रह्मचारी आहे आणि जेजुरीस तर त्याच्या दोन स्त्रिया दृष्टीस पडतात. तेव्हा याची संगती कशी लावावी? संस्कृत वाङ्मयात देवसेना ही स्कंदपत्नी असल्याचे आढळते. त्यावरून असे दिसते की, मल्लांचा पाडाव होईपर्यंत या सेनापतीने लग्न केले नाही या कार्याचा शेवट कर्नाटकात झाला आणि मग त्यानंतर सेनापतीने लग्न केले. द्रविड देशातील सुब्रह्मण्यदेव म्हणजे कार्तिकस्वामी हा स्कंदच होय आणि नवलाची गोष्ट म्हणजे त्यालाही दोन स्त्रिया आहेत... जेजुरीप्रमाणे पाली (जि. सातारा) येथेही स्कंदाचे (खंडोबा) प्रसिद्ध ठिकाण आहे. बहुधा त्या ठिकाणी सातारा जिल्ह्यातील मल्लांचा त्याने पराभव केला असावा. मैळारास एक स्थान आहे मैलारी म्हणजे मल्लारीच. सांप्रत तर महाराष्ट्रात सहस्रावधी गावांत (किंवा माळांवर) खंडोबाची देवळे आहेत. ज्या वीर आर्याने सबंध मल्लराष्ट्र जिंकून आर्यांच्या हाती दिले, त्याच्यासाठी आर्य इतपत उतराई झाल्यास त्यात काय आश्चर्य? खंडोबाचे मूळ पीठ जेजुरीच होय. मल्ल फार शूर होते 'मले' या तामिळ क्रियापदाचा अर्थ तोंड देणे, अडथळा करणे, शौर्याने लढणे ('शब्दमणिदर्पण' आणि कुमार व्यासांचे 'भारत' या ग्रंथात हा अर्थ आढळतो.) असा असून 'मलिव' या शब्दाचा अर्थ - कटून लढणारा असा आहे. मलिव म्हणजे आपला मावळा होय.

जेजुरीचा खंडोबा महादेवाचा अवतार मानतात आणि आपण त्यास स्कंद म्हटले आहे. तेव्हा या पितापुत्रांचा (खरे म्हटले तर शंकर आणि कार्तिकेय या पौराणिक देवांचा येथे संबंध नसावा स्कंद ही एक खरी ऐतिहासिक व्यक्तीच होती) हा काय घोटाळा आहे? मूळपीठात महादेवाचे लिंग आहे आणि वर खंडोबाची मूर्तीही आहे. माझ्या मते हे कोडे पुढीलप्रमाणे सुटते. शंकर ही देवता मूळ अनार्यांची; त्याप्रमाणे ती या महामल्लांचीही होती. मावळात अनेक शिवमंदिरे आहेत. रोहिड खोऱ्यातील ज्या रोहिडेश्वरापुढे 'हिंदवी स्वराज्या'ची शपथ झाली, तो तेथील मावळ्यांचा आणि पायथ्यापासल्या रायरी राजधानीच्या जुन्या मल्ल राजाचा प्राचीन कुलदेव होता. रोहिडागडावर 'रोहिडमल्ल' याचे एक देऊळ आहे. तमिळ भाषेत मल्लेश्वर म्हणजे शंकरदेव असा अर्थ आहे. बंगळुरास असले एक देऊळ आहे. संस्कृतात 'मल्ल' शब्द शंकरवाचक आढळत नाही. बारा ज्योतिर्लिंगांतील मल्लिकार्जुन (श्रीशैलावरील) हा मल्लांचाच मूळ होय पुढे आर्यांनी शिव ही देवता आपल्या पंचायतनात स्थापन केल्याने तो आपल्या पवित्र क्षेत्रांत आला. वर सांगितल्याप्रमाणे अनार्यांना आत्मसात् करावयाच्या अनेक मार्गांपैकी हा एक मार्ग होता. तेव्हा जेजुरी येथे मल्लांचे जे प्राचीन शंकराचे स्थान होते ते तसेच ठेवून, त्याच्या शेजारी आर्यांनी आपल्या स्कंदाची स्थापना केली. सारांश, ही गोष्ट लक्षात घेतल्यास खंडोबाचे (शंकर का स्कंद?) वरील कोडे आपोआप सुटते आणि जितांना पूर्णपणे नामशेष करण्याच्या युरोपीय क्रौर्यापासून आर्य हे अलिप्त होते, हेही लक्षात येते.''[२४]

## महाराष्ट्रीय ज्ञानकोशकार श्री. श्री. व्यं. केतकर यांचे खंडोबाविषयक मत

'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' या ग्रंथात या ग्रंथाचे संपादक श्री. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी खंडोबाविषयक व्यक्त केलेले मत :

''खांडा हें मूळचे एका जातीच्या हत्याराचें नांव होय. हा शब्द संस्कृत भाषेंत खंडपरशु असा असून तो शिवास लावतात. खंडोबा हें शिवाचेंच स्वरूप समजण्याचा संप्रदाय आहे. मार्तंड व मल्हारी अशीं आणखी दोन खंडोबाची नावें आहेत. मार्तंड हा एक वीर धनगरांमध्ये होऊन गेला असावा. खंडोबा ही जरी एक व्यक्ती नसली तरी मार्तंड नावाचा जो वीर धनगरात झाला, तो खंडोबाचा अवतार मानिला गेला असावा व त्यामुळें खंडोबा व मार्तंड हे शब्द एकमेकांचे वाचक झाले असावेत. खंडोबा व मार्तंड (खंडोबा याअर्थी) ही नांवे संस्कृतांत आढळत नाहीत. मल्हारि म्हणजे मल्ल नावाच्या असुरांचा अरि अशी एक व्युत्पत्ती आहे. मलहारी पापाचे हरण करणारा असेंही कोणी म्हणतात. मलापहार किंवा मलहारी अशी एक नदी असून त्या नदीच्या नांवावरून मल्हारी हें तिच्या कांठच्या प्रांतास नांव पडलें व त्या प्रांतांतील मार्तंड किंवा खंडोबा या देवांसहित तें नांव मिळालें असावें.''[२६]

## डॉ. मधुकर केशव ढवळीकर यांचे खंडोबा विषयक मत

''दीर्घकाळ पडणाऱ्या दुष्काळाला 'दुर्गादेवीचा दुष्काळ' म्हणण्याचा प्रघात आपल्याकडे पडला आहे. मार्कंडेय पुराणातील देवीमाहात्म्यात (९१, ४३-४४) शंभर वर्षं पडलेल्या दुष्काळापासून लोकांचे रक्षण करण्यासाठी दुर्गादेवीने शाकंबरीचे रूप घेतल्याची कथा आहे. बहुधा त्यामुळेच दीर्घकाळ टिकणाऱ्या दुष्काळाला 'दुर्गादेवीचा दुष्काळ' हे नाव पडले असावे, असे वाटते. दुर्गाडी म्हणजे स्मशान. दीर्घकालीन दुष्काळात मरण पावलेल्यांची संख्या खूप असल्याने स्मशान भरून जात असावे. एकंदरीत पुराव्यावरून असे दिसते की, दीर्घकाळ टिकणारे दोन दुष्काळ इ. स. १३९६ ते १४०८ आणि १४६८ ते १४७५ या काळात पडले होते. 'दुर्गादेवी दुष्काळात' बीदरच्या सुलतानाचा एक अधिकारी दामाजीपंत याने सरकारी धान्याचे कोठार फोडून त्यातील धान्य दुष्काळपीडित जनतेला वाटले, ही गोष्ट महाराष्ट्रातील आबालवृद्धांना माहीत आहे आणि याच काळात काही देवतांचे महत्त्व वाढले. महाराष्ट्रात खंडोबा हा एक महत्त्वाचा देव गणला जाऊ लागला. महाराष्ट्रातील लोकधर्मात याचे अनन्यसाधारण स्थान आहे. याचे एक मुख्य कारण असे की, तो गायीगुरांचा आणि शेळ्यामेंढ्यांचा रक्षणकर्ता होता. त्यामुळे पशुपालन हा ज्यांचा प्रमुख व्यवसाय होता त्यांचे तो दैवत होता. प्राचीन काळी भारतात सर्वत्र यक्षपूजा प्रचलित होती. महाराष्ट्रात पैठण (प्राचीन प्रतिष्ठान) येथे तेव्हा खंडक नावाचा यक्ष वास करीत होता, असे 'महामायुरी'नामक एका चौथ्या शतकातील बौद्धग्रंथात सांगितले आहे. काही विद्वानांच्या मते यक्ष खंडक म्हणजे खंडोबा. अजिंठ्याच्या लेण्यातील एका कोरीव लेखात खांडेश्वर नावाच्या एका मांडलिक राजाचे नाव दिले आहे. काहींच्या मते त्याची पुढे खंडोबा म्हणून पूजा होऊ लागली; परंतु त्याचे मूळ रुद्र-शिवात शोधले पाहिजे असे विख्यात संशोधक डॉ. रा. चिं. ढेरे यांचे मत आहे. रुद्र-शिव मूळ शिकारी होता. त्यामुळे खंडोबा पशुपालक आणि शिकारी यांचे लाडके दैवत बनला. पुढे तो चोर-दरोडेखोरांचाही - जे लोकांचे पशुधन लुटत असत त्यांचा - देव झाला. अनेक मध्ययुगीन राजवंशाचे मूळ पूर्वज पशुपालनाचा व्यवसाय करीत असत. कर्नाटकातील होयसाळ राजघराण्याचा मूळ पुरुष असाच लुटारू होता, तर यादवांचा मूळ पुरुष गुरे पळविणाऱ्या चोरांशी लढताना धारातीर्थी पडला. विजयनगरच्या राजांचा मूळ पुरुष पशुपालन करीत असे. आंध्रातील काकतीय हे खंडोबाचे निस्सीम उपासक होते. मध्ययुगातील शिंदे, होळकर, बडोद्याचे गायकवाड यांचे दैवत खंडोबाच आहे. राजकीय अस्थिरतेमुळे आणि आर्थिक हलाखीमुळे सरकारी अधिकारीसुद्धा अगदी दंडनायक आणि महामंडलेश्वरांसारखे उच्च अधिकारीही मालमत्तेची लुटालूट करीत, पशुधन पळवीत, स्त्रियांचे अपहरण करीत असल्याचे इतिहासात दाखले आहेत. आपल्याकडील बेरड, रामोशी इत्यादी गुन्हेगार जमातींचे दैवत खंडोबा आहे, हे ध्यानात ठेवणे आवश्यक आहे, तसेच ते पेंढाऱ्यांचेही आहे. ठग-पेंढाऱ्यांनी मध्ययुगात कसा धुमाकूळ घालून काही लोकांचे जीवन असह्य करून ठेवले होते. (उदा. उमाजी नाईक यांनी इंग्रजांना सळो की पळो केले होते व गरीब जनतेस मदत केली होती).

कै. डॉ. गुंथर सोंथायमर यांनी खंडोबाच्या संदर्भात एक लोककथा सांगितली आहे. तीवरून पशुपालनसुद्धा शेतीइतकेच महत्त्वाचे का गणले गेले, याचे स्पष्टीकरण मिळते. खंडोबाच्या म्हाळसा आणि बाणाई अशा दोन बायका होत्या. पहिली बायको म्हाळसा ही एका लिंगायत व्यापाऱ्याची मुलगी. ती चांगल्या संपन्न घराण्यातील होती. तिचे खंडोबाशी रीतिरिवाजानुसार लग्न झाले होते. दुसरी बायको बाणाई, ही धनगराची मुलगी होती. ती खंडोबाच्या प्रेमात पडली. या लोककथेचे सोंथायमर यांनी फार चांगले विश्लेषण केले आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार दक्षिणेतील बऱ्याच देवांच्या अशा दोन बायका आहेत. त्याचे मुख्य कारण म्हणजे भौगोलिकदृष्ट्या दखखनच्या पठारी प्रदेशाचे दोन भाग पडतात. एक भाग जंगलाचा असून त्यात चेंचू, कोळी यासारख्या जमाती राहतात. कर्नाटकातसुद्धा कडू, कुरूब आणि कडू गोल्ल या जमाती आहेत. ही मंडळी गुरे चारण्यासाठी पठारी प्रदेशातून जंगली भागात जातात. त्यामुळे एका भागात जंगली जमाती आणि दुसऱ्या भागात पशुपालनाचा व्यवसाय करणारे अशी विभागणी झाली आहे. खरे म्हणजे यामागील सत्य थोडे वेगळे असावे. प्रदेश निमदुष्काळी त्यामुळे शेती कोरडवाहू, तेव्हा पशुपालनच खरे भरवशाचे; परंतु महत्त्वाची गोष्ट ही की, या विभागणीमुळे देवाला दोन्ही निरनिराळ्या जमातीतील बायका असणे आवश्यक होते.[२७]

## मतोबा : खंडोबा - श्री. सयाजी निंबाजी पगार

मतोबा हा खंडोबाचा अवतार असल्याची माहिती खान्देशातील ग्रामदैवतांचे अभ्यासक श्री. सयाजी निंबाजी पगार यांनी 'खानदेशातील ग्रामदैवते आणि लोकगीते' या आपल्या एम्.फिलच्या प्रकाशित संशोधनात्मक प्रबंधात नमूद केले आहे. श्री. पगार यांनी या देवतेबद्दल सांगितलेली माहिती पुढीलप्रमाणे :

''मतोबा ही खानदेशातील कृषिदेवता. ह्या कृषीदेवतेची निर्मिती 'खंडोबा' देवतेतूनच झाली आहे. मतोबाची खानदेशात अनेक गावी मंदिरे आहेत. उदा. शिरसगाव या चाळीसगाव तालुक्यातील गावी मतोबाचे मंदिर आहे. मतोबाच्या मंदिरात मतोबाची मूर्ती किंवा गावाच्या वेशीच्या आत दगडाला शेंदूर फासून देवत्व दिले जाते. मतोबाच्या पूजेला कुंकू, हळद, तांदूळ, फुलहार, अगरबत्ती, कापूर इ. वस्तू लागतात. मतोबाच्या मूर्तीला पंचामृताने स्नान घातले जाते. हे पंचामृत दूध, साखर, तूप, मध, तुळशीच्या मंजुळा इत्यादी वस्तूंपासून बनविलेले असते. मतोबा हे ब्रह्मचारी दैवत आहे. मतोबाची मूर्ती घोड्यावर बसलेली पाहावयास मिळते. मतोबाच्या पूजेत रविवारला विशेष महत्त्व आहे. मतोबाच्या हातात तलवारी, कुऱ्हाड, ढाल इत्यादी शस्त्रे आढळतात. घोड्याच्या चारी पायांखाली नागाचे चित्र असते. खानदेशात खेडोपाडी मतोबाची 'तळी' भरतात. प्रसाद म्हणून खोबरे व भंडार ताटात वाढतात. ताटात तांब्या ठेवून त्याच्यावर पाच नामिलची पाने, तुळशीची पाने, रक्षा, भंडार ठेवतात. 'मतोबा की जय!' या नावाची आरती म्हणतात. जमिनीवर घोंगडी ठेवतात. घोंगडीवर ताट ठेवतात. पाच टोप्या घातलेले घरातील कुटुंबीय किंवा भाऊबंदकीतील व्यक्तींना बोलावून तळी भरली जाते. चारी दिशांना भंडारा फेकला जातो. तळी भरून झाल्यानंतर खोबऱ्याचे तुकडे करून देव्हाऱ्यात तसेच चारी दिशांना फेकतात. मतोबाचा भगत गुढीप्रीत्यर्थ सव्वा पावशेर गहू, अडीच रुपये रोख, एक कापूरवडी, पाच लिंबे, अगरबत्ती पुडा, एक नारळ इत्यादी वस्तू भाविकांना आणावयास सांगतो.

मतोबा ही नवसदेवता आहे. असंख्य भाविक अपत्यप्राप्तीसाठी नवस करतात. प्रापंचिक प्रश्न, असाध्य रोग गुढीद्वारे दूर केले जातात. तसेच गुरांच्या आजारपणात गुरांना मतोबाच्या मंदिरासमोर उभे करून घरमालक देवापुढे नतमस्तक होतो. गुरांना घेऊन मंदिराला एक प्रदक्षिणा मारतो. त्यामुळे गुरांचे आजार दूर होतात, अशी शेतकरी वर्गाची समजूत आहे.''[२८]

वरील माहितीवरून मतोबाचे वाहन घोडा, त्याच्या पूजेत रविवारला असलेले महत्त्व, घोंगडीवर ताट ठेवून केला जाणारा तळीभंडाराचा विधी, त्या वेळेस लागणाऱ्या वस्तू, भंडार खोबऱ्याची केली जाणारी उधळण याबाबतीत खंडोबा आणि मतोबा यांच्यात साम्य आढळते. त्यामुळे मतोबा हा खंडोबाचाच अवतार असावा असे वाटते.

## खंडोबा : यादवसम्राट महादेव - श्री. एन.बी.चव्हाण

श्री. एन. बी. चव्हाण लिखित 'कुलस्वामी खंडेराय लीलाग्रंथ' या ग्रंथात श्री. चव्हाण यांनी 'वेदांतदर्शन' व मोल्सवर्थ यांच्या 'इंग्लिश-मराठी डिक्शनरी' या ग्रंथाच्या आधारे व्यक्त केलेले मत पुढीलप्रकारे : ''...देवगिरीचा यादवसम्राट जैतुगी यांचा (इ.स.११९१-१२००) पुत्र महादेव (इ.स. १२४८-१२७१) हाच रयतेचा कुलस्वामी आहे. म्हणजेच कुलस्वामी खंडेराय !'' हे संशोधन आहे असे भासवत असतानाच, '' यादवराजा महादेवाच्या आश्रयास असणाऱ्या हेमाडपंतांनी (विख्यात हेमाडपंती वास्तुरचनेचा निर्माता, 'हेमाद्रि पंडित') स्वप्नात येऊन कथन केल्याप्रमाणे ग्रंथलेखन केले आहे'' असा दावाही श्री. चव्हाण यांनी केला आहे. हे 'ऐतिहासिक कादंबरी' सदृश लेखन करीत असताना, इतिहासावरील अनेक संदर्भग्रंथ उपलब्ध असताना, संबधित मूळ संदर्भांची खातरजमा न करता श्री चव्हाण यांनी सर्वच जबाबदारी हेमाडपंतांवर सोपविलेली दिसतेय !

खंडोबाने वध केलेला मल्ल हा 'आहवमल्ल' असल्याचेही श्री. चव्हाण यांनी म्हटले आहे. ''प्रत्यक्षात आहवमल्ल (इ.स. ९७३ ते ९९७) व सोमेश्वर पहिला (इ. स. १०४२ ते १०६८) हे दोघेही 'आहवमल्ल' हे बिरूद धारण करीत होते.''[२९]

''जो इसऱ्या जयसिंह स्वत:स 'जगदेकमल्ल' संबोधत असे, त्याचा पुत्र 'आहवमल्ल' याने कर्नाटकमधील मृणमैलार येथील मैलार मंदिरात इ. स. १ फेब्रुवारी १०४७ रोजी दान दिल्याचा शिलालेख मंदिरात पाहावयास मिळतो.''[३०]

आपल्या ग्रंथाची संकल्पसिद्धी कशी झाली हे सांगताना श्री. चव्हाण अनुक्रमे 'लेखकाचे मनोगत' व 'प्रास्ताविक' मध्ये लिहितात ''...या ग्रंथनिर्मितीसाठी सहकार्य करणारे मुख्य होते, कुलस्वामी खंडेराय ! त्यांची

प्रेरणा, आशीर्वाद, दैवीशक्ती व प्रतिभा या शरीरास प्राप्त झाली आहे. ...कुलस्वामी खंडेरायानेच हा ग्रंथ या शरीराकडून तयार करून घेतला आहे. तेव्हा त्यातील सर्व कांही त्याचेच आहे. मी निमित्त मात्र आहे... खंडेरायाचे स्वरूप पाहातांना त्यात अनेक लीलांचे गहीरे रंग आढळतात. लीलांद्वारे भक्तांना बोध घेता येईल व सात्विक आनंद उपभोगता येईल. या लीला कोण सांगणार ? या लीलांची नोंद केलेली कोणत्याही ग्रंथात आढळेना. कुलस्वामी खंडेरायालाच शरण गेलो व विनंती केली... तुमच्या अवतार लीला ज्ञात व्हाव्यात, जेणेकरून भक्तांना भक्ती आनंदाचा उपभोग घेता येईल... शब्दातून व्यक्त न करता येणारी भावना, मातेच्या अंत:करणाने समजून घ्यावी... आणि एके दिवशी कुलस्वामी लीलाग्रंथाचे चिंतन करीत असताना खोलीमध्ये सर्वत्र सोनेरी प्रकाशात एका तेजस्वी पुरूषाची आकृती दिसू लागली... मी त्यांना साष्टांग नमस्कार केला. माझ्या मनातील शंका त्यांना समजली असावी, त्यांनीच सुरुवात केली, 'मी तुझ्या अंत:करणातील खंडेरायाचा सेवक : हेमाडपंत... तुझ्या मनातील शंकाचे निराकरण करावे, यासाठी मला यावे लागले... 'कुलस्वामी खंडेराय हेच यादव कुलातील लोकप्रिय सम्राट महादेव होते. प्रत्यक्ष भगवान शंकरांनी दुष्टांच्या नाशासाठी व साधूंच्या रक्षणासाठी हा अवतार घेतला आहे'... हेमाडपंतानी सांगितलेला इतिहास, हाच 'कुलस्वामी खंडेराय' या लीला ग्रंथाचा आधार आहे... तेव्हा हे सर्व कथन प. पू. हेमाडपंतांचे आहे. त्यांनी मनाच्या गाभाऱ्यांत शिरून, बुद्धीला प्रतिभाशक्ती प्रदान करून, माझ्या हाताने हे कागदावर उतरविले आहे.''[३१]

स्वप्न, दृष्टांत, साक्षात्कार, चमत्कार यांचा मेळ वास्तव घटना - संदर्भांशी घातला तर संशोधनाऐवजी ते निव्वळ कल्पनारंजन ठरू शकते. यादवराजा महादेवाला 'खंडोबा' ठरविताना श्री. चव्हाण यांची गतही अशीच झाली आहे.

**म्हाळसा**

म्हाळसा ही खंडोबाची प्रथम पत्नी. तिच्या सान्निध्यामुळेच खंडोबाला म्हाळसाकांत हे नाव मिळाले. म्हाळसा कर्नाटकात 'माळव्व' या नावाने प्रसिद्ध आहे. याशिवाय तिला 'गंगिमाळव्व' आणि 'तुप्पद माळव्व' या नावानेही ओळखले जाते. देवरगुड्ड या खंडोबाक्षेत्री 'गंगिमाळव्व' आणि 'तुप्पद माळव्व' यांची स्वतंत्र मंदिरे आहेत. 'गंगी' हा गंगा शब्दाचा अपभ्रंश आहे. तर तुप्पद याचा अर्थ तुपाची. मल्हारीमाहात्म्यात गंगीमाळव्व आणि तुप्पदमाळव्व या कानडी नावाची संस्कृत रूपांतरे 'गंगा म्हालसिका' व 'घृतमारी' अशी झालेली आढळतात. गंगा म्हालसिका हे ध्वनीरूपांतर आहे, तर घृतमारी हे अर्थरूपांतर आहे. गंगा म्हालसिकापासून गंगी माळव्व आणि धृतमारीपासून तुप्पदमाळव्व ही अपभ्रष्ट रूपे तयार झाली आहेत. गंगिमाळव्वपासून गंगाम्हालसिका हे नाव तयार झाल्यानंतर सुरुवातीला गंगा आणि पार्वती यांच्या भांडणाची आणि नंतर निर्माण झालेल्या ऐक्याच्या अनेक लोककथा निर्माण झाल्या आहेत. वेदव्यास विरचित संस्कृत मल्हारीमाहात्म्यातील प्रेमपुरपष्टि तीर्थवर्णनात अशा स्वरूपाची कथा दिली आहे. त्या कथेचा मराठी अनुवाद सिद्धपाल केसरीने पुढीलप्रमाणे दिला आहे :

**जेथे पार्वतीने आपुले चरण प्रक्षाळिले ।**
**तेथे पार्वतीतीर्थ होते झाले ॥**
**मार्तंडभैरवे अभिवंदिले ।**
**उदकबिंदु लागले गंगेसी॥**
**मग गंगा भैरवावरी रुसली ।**
**कोपे पाताळाप्रती गेली ॥**
**ते वेळीं पार्वती शिवासी भांडली ।**
**मग दोहोंसी केले एकपण ॥**
**गंगागौरीसी एक होऊनी ।**
**सुंदर रूप म्हाळसेचे धरूनी ॥**
**ते मार्तंडभैरवे अर्धांगी घेऊनी ।**
**प्रीती करूनी बैसविली ॥** [३२]

तिम्मशेट वाणी हा म्हाळसाचा पिता. तिम्मशेट हे नावही कानडी असून काही शिलालेखात तिम्मण, तिम्मराज अशी व्यक्तिनामे आढळतात. कर्नाटकातील मैलार या गावाजवळ 'तिम्मापूर' नावाचे एक गावही आहे.

## संशोधकांच्या मते बाणाई म्हणजे ...

श्री. बी. ए. गुप्ते यांनी आपल्या 'हिंदु हॉलिडेज् ॲण्ड् सेरिमोनियल्स' या ग्रंथात खंडोबाला सूर्य ठरविताना चंपाषष्ठीच्या खगोलीय स्थितीचे वर्णन दिले आहे. त्यात बाणाईला 'शततारका नक्षत्रांचे प्रतीक ठरवून बाणाई म्हणजे शतबाण असलेला भाता होय'[३३] असे बाणाई नावाचे स्पष्टीकरण दिले आहे.

पांडुरंग देसाई यांच्या मते 'लढाऊ मल्लारीला खड्गाबरोबर धनुर्बाणांचीही आवश्यकता आहे. या बाणाला त्याच्या भक्तांनीं बाणाई बनवून, उपपत्नीप्रमाणे त्याशीं गाठ घालून दिली.'[३४] अशा प्रकारे ते बाणाईचा बाणाशी संबंध जोडतात.

'पालाई गवळणीच्या भक्तीमुळेच खंडोबा पालीस प्रगटला', या तीर्थक्षेत्र पाली येथील प्रचलित कथेवरून श्री. ग. ह. खरे बाणाईचा पालाईशी संबंध जोडतात. ते लिहितात, ''पालाई ही गवळण, बाणाई ही धनगर आणि बाळाई ही अज्ञात जातीची असली तरी तिन्ही शब्दांनी एकच स्त्री अभिप्रेत आहे, यात शंका नाही. पुष्कळ धनगर दुधाचा नसला तरी लोण्याचा धंदा करतात. यामुळे गवळण व धनगरीण हे शब्द अर्थदृष्ट्या जवळजवळ येतात. पालाईची बाळाई व बाणाई अशी रूपांतरे होणे अगदी शक्य आहे. 'प' बद्दल 'ब' आणि ल, ण, ळ यांची अदलाबदल झाल्याची कित्येक उदाहरणे दाखविता येतील.''[३५]

डॉ. रा. चिं. ढेरे यांचे मत : ''श्री. खरे यांच्या स्पष्टीकरणावरून माझ्या मनात असा विचार डोकावतो की, जर लोण्याचा धंदा करणाऱ्या धनगरांच्या समाजातील बाणाई असेल, तर तुप्पद माळव्व ही बाणाई ठरेल काय ? मंगसुळी येथील बाणाईच्या मूर्तीच्या डोक्यावर उजव्या हाताने सावरलेली चार हंड्यांची उतरंड व हातात कोकरू व कोंबडा दाखविला आहे. हे रूप गवळण-धनगरीण असे संमिश्र दिसते. देवरगुड्ड येथील मैलार मंदिरात तुपाचे अनेक नंदादीप असून, ते धनगरांच्या देणग्यातून तेवत असतात, ही वस्तुस्थितीही तुप्पद माळव्व ही बाणाई असावी, या कल्पनेला पोषक ठरते. असे असेल तर मग बाणाईचे तुप्पद माळव्व हे नाव म्हाळसेला कसे चिकटले? तुप्पद माळव्व आणि कुरूबत्यव्व यांची स्थाने वेगवेगळी कशी बनली? हे प्रश्न आज तरी अनुत्तरीतच राहतात.''[३६]

## हेगडे प्रधान

हेगडे प्रधान हा गंगाजमनी शब्द असून 'हेगडे' या कानडी शब्दाचा अर्थ 'प्रधान' म्हणजेच 'हेगडेप्रधान' होय. श्री. ग. ह. खरे यांच्या मते : ''या शब्दाचे मूळ पॅकर्डे या कानडी शब्दात आहे. पेर - मोठी, बळकट आणि कडे बाजू. म्हणून बळकट बाजू तो पेरकडे प्रधान. या शब्दाचे जुन्या कानडी लेखातच कालानुक्रमे पेकर्डे, वेर्कडे, हेर्कडे, हेर्गडे, वेग्गडे, हेग्गडे इतके पर्याय आढळतात. याचेच अर्वाचीन रूप हेगडे व त्याचे सोपे रूप हेगडी.''[३७]

हेगडे प्रधान हा बाणाईचा भाऊ आणि खंडोबाचा प्रधान आहे, अशी समजूत आहे. कर्नाटकीय धनगरांमध्ये 'हेगडी' आडनाव आढळते. हेगडी हे विष्णूचे रूप आहे अशीही समजूत आहे. जेजुरीत याची बैठी मूर्ती असून मूर्तीस मिशा आहेत. देवरगुड्ड येथील मूर्ती चतुर्भुज असून तिच्या चारी हातात खड्ग, गदा, शंख व पुस्तक या वस्तू दाखविल्या आहेत. पाली येथे याची द्विभुज अश्वारूढ पितळी मूर्ती असून, डावीकडे त्याची बायको आहे. मैलार येथे याची बैठी मूर्ती असून ती चतुर्भुज आहे. मूर्तीचे खालचे दोन हात भग्न झाल्यामुळे त्यातील आयुधे कोणती हे समजत नाही. वरच्या दोन हातात पाश व अंकुश दाखविले आहेत मूर्तीचा चेहरा दाढीमिश्यांनी युक्त आहे.

## वाघ्या

प्राचीन मराठी वाङ्मयात 'वाघ्या' हा शब्द 'वाघा' या स्वरूपात आढळतो. श्री. पांडुरंग देसाई वाघ्याविषयी पुढीलप्रमाणे स्पष्टीकरण देतात : ''कुत्रे मल्लारीला प्रिय आहेत. मल्लारी कुत्र्यांचा तांडा घेऊन स्वारीवर निघतो. मनुष्यरूपी वाघ्या स्वत:स कुत्रे समजून कुत्र्यासारखे चाळे करतो. पाशुपत मतांत भक्त स्वत:स आणि पशुपति म्हणजे पशूंचें पालन करणारा असें मानतात. वाघ्याचें वर्तन यासारख्या भावनेनें प्रेरित झालें आहे.

वाघ्या या नांवाचें मूळ कन्नड भाषेंत सांपडतें. त्याचें कन्नड नांव 'ओग्गय' हा शब्द 'उग्गु' धातुपासून निघाला आहे. 'उग्गु' म्हणजे बोबडें बोलणें, अर्थशून्य किंवा अस्पष्ट ध्वनी काढणें, इत्यादी. या अर्थाला अनुरूप

असें वर्तन करून, म्हणजे कुत्र्याप्रमाणें, गुर् गुर् शब्द करून इत्यादी प्रकारानें ओग्गय किंवा वाघ्या आपल्या नांवाची अन्वर्थकता पटवून देतो.''[३८]

## मुरळी

मुरळी ही देवदासींच्या वर्गातील उपासिका आहे. देवदासी, भाविनी, जोगिणी यांच्याप्रमाणे मुरळी आपले जीवन व्यतीत करते. तिचे लग्न खंडोबादेवाशी लागल्यामुळे आयुष्यभर ती देवाची सेवा करते. जागरण आणि इतर कुलाचाराच्या वेळेस ती वाघ्याला साथ करते.

महाराष्ट्र शब्दकोशात 'मुरळी'ची व्युत्पत्ती दोन प्रकारांनी दिली आहे. १) मैराली-मुरळी आणि २) मरळी-मुरळी. मुरळीचे मरळी हे कानडी नाव. हेमचंद्राच्या 'देशीनमाला' या ग्रंथात 'मुरई' असा शब्द दिला असून त्याचा अर्थ 'असती' असा दिला आहे. 'असती' म्हणजे मुरळीच.[३९]

## घोडा व कुत्रा

खंडोबाच्या परिवारात घोडा आणि कुत्रा या दोन प्राण्यांना विशेष महत्त्व आहे.

**१) घोडा :** घोडा हे खंडोबाचे वाहन कसे झाले याबद्दलची माहिती 'मल्हारीमाहात्म्या'त मिळते. शिवाने मार्तंडभैरव अवतार घेतला, तेव्हा तो नंदीवरच बसून आला होता. पुढे मणि दैत्याचा वध केल्यानंतर त्याने मणिच्या विनंतीवरून त्याच्या अश्वासहित रूपाची जोड मिळविली. त्यानंतर सप्तर्षींनी व देवांनी जी मृण्मयी मूर्ती बनविली होती ती ही अश्वयुक्त होती.

इतर काही माहात्म्यकथांत असेही सांगितले आहे की, गुरुद्रोहामुळे शापित झालेला चंद्रमा जलरूप झाला. परंतु 'शिव जेव्हा भैरवरूप धारण करतील तेव्हा वाजित्व प्राप्त होईल,' अशी आकाशवाणी झाली. म्हणून चंद्राच्या विनंतीवरून मार्तंडभैरवाने चंद्राचा तुरुगरूपात (अश्वरूपात) स्वीकार केला.

**२) कुत्रा :** कुत्रा हे खंडोबाचे 'भैरवरूप' सुचविणारा प्राणी आहे. भैरवमूर्तीत भैरवाच्या हातातील दैत्यमुंडातून गळणारे रक्त पिणारा ऊर्ध्वमुखी कुत्रा असतो. मार्तंडभैरवाच्या हातात रक्त गळणारे दैत्यमुंड नसले तरी त्याच्या भैरवरूपाचे प्रतीक म्हणून कुत्रे दाखविले जाते. **शिवाय खंडोबा हे विशेषकरून धनगर जातीत लोकप्रिय झालेले कुलदैवत असल्यामुळे धनगरांच्या मेंढ्यांचे रक्षण करणारा हा विश्वासू प्राणी कृतज्ञता बुद्धीने खंडोबा मूर्तीच्या शेजारी स्थानापन्न झाला असावा.**

खंडोबा दैवताच्या निर्मितीविषयीच्या मत-मतातरांच्या माध्यमातून अनेक अभ्यासक-संशोधकांनी खंडोबा कोण असावा हे अजमावून पाहण्याचा केलेला प्रयत्न हे अभ्यासातून पाहिले.

पुढील भागात, ज्या देवीला 'देवताविज्ञानातील चमत्कार' असे संबोधले जाते, त्या खंडोबापत्नी म्हाळसाबद्दल चर्चा करू.

[]

## संदर्भ - टिपा


१. मुलाटे वासुदेव (सं.), म. जोतीराव फुले लिखित गुलामगिरी, पृ. ४१-४२.
२. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ३६.
३. पांगारकर ल. रा. (सं.), मराठी वाङ्मयाचा इतिहास (खंड-२), पृ. ४४४-४४५.
४. धनेश्वर त्र्य. ग., वेरूळची लेणी, पृ. ९२-९३.
५. Gupte B. A., Hindu Holidays and Ceremonials, Pages 21-22.
६. महर्षी वेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम्, अ. १८ - ओ. ६.
७. जोशी श. बा., मराठी संस्कृती, पृ. १३९-१४१.
८. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १६९.

९. खंडोबा, डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, पृ. २१.
१०. भा. इ. सं. मं. अहवाल : शके १८३२, पृ. ९२-९३.
११. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, ग. ह. खरे, पृ. १४६.
१२. डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ.२७-२८.
१३. डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. १४३-१४५.
१४. डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. २२.
१५. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १४९.
१६. चाफेकर नानासाहेब, चित्पावन, पृ. १५५-१५६.
१७. डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ३३.
१८. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १६३-१६४.
१९. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १६६.
२०. डॉ. ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ३५
२१. जोशी श. बा., मऱ्हाठी संस्कृती, पृ. १३३-१३९.
२२. जांभेकर गणेश गंगाधर (सं.), लोकशिक्षण (सप्टेंबर १९३२), पृ. ४९६-४९७.
२३. मोरामकर ए. ए. (सं.), विविधज्ञान विस्तार (मार्च १९३३), पृ. ८९-९०.
२४. विद्वंस धोंडो वासुदेव (सं.), सह्याद्री (फेब्रुवारी १९३५), पृ. १४५-१४६.
२५. जांभेकर गणेश गंगाधर (सं.), लोकशिक्षण (नोव्हेंबर १९३२), पृ. ६२९-६३१.
२६. केतकर श्रीधर व्यंकटेश (सं.), महाराष्ट्रीय ज्ञानकोश (भाग १५ वा.),विभाग पंधरावा, १९२५ पृ. (धं) ३.
२७. (डॉ.) ढवळीकर मधुकर केशव, पर्यावरण आणि संस्कृती, पृ. १५३-१५४, १५९-१६०.
२८. पगार सयाजी निंबाजी, खानदेशातील ग्रामदैवते आणि लोकगीते, पृ. ४५-४६.
२९. डॉ. पाठक अरूणचंद्र शं. (सं.), महाराष्ट्र गॅझेटियर- इतिहास : प्राचीनकाळ (खंड-१), (वंशावळ) पृ. ३८२, ३६९
३०. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १३८.
३१. चव्हाण एन. बी., कुलस्वामी खेडेराय लीलाग्रंथ, पृ. ६-७, १६-१७, २०.
३२. सिद्धपाळकेसरी विरचित मल्हारिमाहात्म्य, अ. २० - ओ. २५-२७.
३३. Gupte B. A., Hindu Holidays and Ceremonials, Pages 21-22.
३४. नवभारत, नोव्हेंबर १८५७, पृ. ९.
३५. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १५३.
३६. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ५५
३७. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १५३.
३८. नवभारत, नोव्हेंबर १९५७, पृ. ९.
३९. दाते यशवंत रामकृष्ण / कर्वे चिंतामण गणेश (सं.), महाराष्ट्र शब्दकोश, पृ. २५०९.

विष्णुरूप महालसा नारायणी आणि खंडोबापत्नी म्हाळसा या दोघी एकच असल्यातरी पुराणभेद, प्रादेशिकभेद आणि उपासनाभेदामुळे या देवीचे दोन वेगवेगळे भक्तिपंथ निर्माण झाले, त्याविषयी माहिती घेऊ.

म्हाळसा ही खंडोबाची पत्नी म्हणून आज सर्वश्रुत असली तरी मूळची ती स्वतंत्र देवता आहे. खंडोबाशी विवाहबद्ध झाल्यानंतरही तिने आपल्या स्वतंत्र निवासस्थानाचा त्याग केला नाही. मोहिनीरूपातली म्हाळसा, खंडोबाची पत्नी म्हणून खंडोबाशेजारीच स्थानापन्न झालेली म्हाळसा व खंडोबाची पत्नी म्हणूनही काही ठिकाणी स्वतंत्र मंदिरे अशा वेगवेगळ्या रूपांत म्हाळसाची मंदिरे आढळतात. म्हाळसा हा मोहिनीचा अवतार आहे, असे उल्लेख अनेक पुराणग्रंथांमध्ये आढळतात. अमृतमंथनाच्या वेळी विष्णूने मोहिनी अवतार धारण करून दैत्यांना मोहविले, त्या वेळच्या मोहिनीच्या लावण्यावर भाळून शिव तिच्या प्राप्तीसाठी तिच्या मागे धावू लागले. (हा भाग श्रीमद्‌भागवताच्या अष्टम स्कंधात आलेला आहे.) तेव्हा, शिवाची अतृप्त इच्छा पुरी करण्यासाठी मोहिनीने शिवास असे आश्वासन दिले की, 'तुम्ही पुढे जेव्हा मार्तंडभैरव अवतार धारण कराल, तेव्हा मी म्हाळसा या नावाने अवतरून तुमची इच्छा पूर्ण करीन.' पुढे कालांतराने झालेही तसेच. म्हाळसाबरोबर विवाह करून मार्तंडभैरव म्हाळसाकांत झाले, ही कथा सर्वश्रुत आहेच. ब्रह्मांडपुराणांतर्गत समजल्या जाणाऱ्या 'गौतमी माहात्म्यात' नेवासे हे मोहिनी-शिवाचे वसतिस्थान आहे, असा स्पष्ट उल्लेख आहे. संत एकनाथपूर्व काळापासून मराठी वाङ्मयात अनेक ग्रंथांत म्हाळसा-मोहिनीच्या ऐकात्म्याची वर्णने आढळतात. तरीही काही ग्रंथांत नेवाशासह महाराष्ट्रातील इतर ठिकाणे, कर्नाटक, गोवा, नेपाळ इत्यादी ठिकाणची जी मोहिनी महालसाची मंदिरे आहेत, ती समुद्रमंथनाच्या वेळेस विष्णूने जे मोहिनीरूप धारण केले होते त्या मोहिनीची (मार्तंडभैरवाशी विवाह होण्यापूर्वीची, अविवाहित मोहिनीची) आहेत, असे उल्लेख आढळतात. वर उल्लेख केल्याप्रमाणे आजही अनेक ठिकाणच्या मंदिरांतील मोहिनीरूपाला विष्णुरूप मानतात. परंतु खंडोबाची पत्नी का मानत नाहीत, हा प्रश्न शेवटी अनुत्तरितच राहतो.

मोहिनी महालसा आणि खंडोबापत्नी म्हाळसा यांच्यातील काही नैसर्गिक बाजू पुढीलप्रमाणे सांगता येतील :

१) विष्णूने आपले संपूर्ण मोहिनीरूप पार्वतीला बहाल करून पुन्हा त्यांनी आपले मूळ रूप धारण केले होते. मोहिनी म्हणजेच पार्वती आणि पार्वती म्हणजेच मोहिनी अशी तिची स्वतंत्र ओळख नंतर निर्माण झाली. म्हणून मोहिनीरूपी पार्वती म्हणजे शिवपत्नी म्हाळसा होय.

२) समुद्रमंथनाच्या वेळी दैत्यांना मोहविणे हा तात्पुरता उद्देश सफल झाल्यानंतर पार्वतीला आपले रूप बहाल करण्यापूर्वी मोहिनी शिवाशी वचनबद्ध होऊन शिवाबद्दल तिच्या मनामध्ये प्रेमविषयक भावनिक गुंतवणूक झालेली होती. एवढेच नव्हे तर शिवाशी ती पूर्ण एकरूप झाली होती. ती अशी :

दैत्यांना मोहविण्यासाठी प्रथम मोहिनी अवतार धारण झाला तेव्हा शिव तिथे नव्हते. नंतर शिवाला ही बातमी समजल्यानंतर त्यांनी विष्णूस पुन्हा मोहिनीरूप धारण करावयास सांगितले. मोहिनीरूप धारण केल्यानंतर तिच्या मादक लावण्यावर भाळून, कामविव्हल होऊन शिव तिच्यामागे धावू लागले. तेव्हा तिने शिवास 'मार्तंडभैरव अवतारात म्हाळसा या नावाने आपल्याबरोबर विवाहबद्ध होईन' असे वचन दिले आणि ती गुप्त झाली. त्याच वेळेस अतिशय कामोत्तेजित झाल्यामुळे शिवाने पार्वतीस आपल्या अंकी (मांडीवर) बसविले. हे दृष्य पाहून मोहिनी पुन्हा प्रकट झाली व तिने पार्वतीच्या शरीरामध्ये प्रवेश केला. म्हणजेच मार्तंडभैरव अवतार धारण करण्याच्या किती तरी अगोदर मोहिनी पार्वतीच्या शरीरामध्ये ऐक्य पावून शारीरिकदृष्ट्या शिवाशी संबंधित होती. इत्यादी तपशिलावरून मोहिनी महालसा म्हणजेच शिवमल्हारची पत्नी म्हाळसा होय, असे ठामपणे सांगता येण्यास भरपूर वाव आहे.

मोहिनी महालसा आणि खंडोबापत्नी म्हाळसा यांच्यातील काही साम्यवैशिष्ट्ये :

१) खंडोबाचा वार रविवार तर मोहिनी महालसेचा वारसुद्धा रविवारच आहे.

२) खंडोबाचा मुख्य उत्सव चंपाषष्ठी, मोहिनी महालसेच्या मंदिरातही अनेक ठिकाणी याच काळात उत्सव साजरा केला जातो.

३) महालसा व खंडोबा यांचा अनन्यसबंध आहे, याचा प्रत्यक्षदर्शी पुरावा म्हणजे म्हार्दोळ येथील प्रसिध्द महालसा मंदिराच्या आवारात 'परिवार देवता' म्हणून खंडोबाला स्थान देण्यात आले आहे. संकुल आवारात छोटे खंडोबा मंदिर आहे.

म्हणजेच मोहिनी महालसाचा खंडोबाशी कुठे ना कुठे तरी संबंध येतोच येतो. (मोहिनी अवतार विष्णूचा आणि राम अवतारही विष्णूचाच. नाशिकच्या प्रसिद्ध काळाराम मंदिराच्या आवारात खंडोबाचे मंदिर आहे. तर मुख्य प्रस्थानपीठ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जेजुरी येथील कऱ्हेपठारावरील खंडोबा मंदिराशेजारी रामाचे एक वेगळे

मंदिर आहे. तसेच जेजुरी गडावरील खंडोबा मंदिराच्या आवारातही (कोटाच्या आत) विष्णूची एक वेगळी मोठी मूर्ती आहे. म्हणजेच मोहिनीप्रमाणेच शिवस्वरूप खंडोबा आणि विष्णूचाही कुठे ना कुठे संबंध येतोच.)

खरे तर म्हाळसा हा देवताविज्ञानातील अत्यंत गुंतागुंतीचा विषय आहे. तिचा अभ्यास करताना किंवा तिच्याबद्दलची माहिती संकलित करीत असताना वेगवेगळ्या पुराणांत व ग्रंथांत कित्येक मत-मतांतरे निदर्शनास येतात. म्हणूनच, म्हाळसा हा स्वतंत्रपणे सखोल संशोधनाचा विषय आहे. म्हाळसा हे देवताविज्ञानाला पडलेले नुसतेच कोडे नाही, तर देवताविज्ञानातील तो एक चमत्कार आहे. त्यामुळे स्वतंत्रपणे संशोधन झाल्याशिवाय तिच्या नामरूपामागे दडलेले रहस्य उलगडणार नाही. काही असो, सद्य:स्थितीला तरी बहुतांश दक्षिण भारतीय समाजमनात मोहिनी-महालसा तथा म्हाळसा म्हणजेच 'खंडोबापत्नी म्हाळसा' अशी श्रद्धा रूढ झाली आहे. म्हणूनच काही संदर्भग्रंथांतून, संगणक संकेतस्थळांवरून तसेच महाराष्ट्र, गोवा, कर्नाटक, केरळमधील म्हाळसा मंदिरांना प्रत्यक्ष भेटी देऊन संकलित केलेल्या माहितीचा चिकित्सक अभ्यास करून म्हाळसाबद्दलची निवडक माहिती देण्याचा मी परिश्रमपूर्वक प्रयत्न केला आहे.

## म्हाळसासंबंधी विविध कथा

वेगवेगळ्या पुराणग्रंथांत वेगवेगळ्या ढंगात सांगितलेल्या आणि अलीकडच्या काळात थोड्याफार फरकाने 'गोष्टीरूप माहात्म्य पुस्तिका' मधून लोकप्रचलित झालेल्या म्हाळसासंबंधी काही कथाचा सारांशात्मक भाग :

## आणखी एक 'अमृतमंथन' कथा

पौराणिक काळातील ही गोष्ट. एकदा देवराज इंद्राने अहंकाराने प्रेरित होऊन महर्षी दुर्वासऋषींचा घोर अपमान केला. तेव्हा महाकोपिष्ट दुर्वासांनी सर्व देव-देवतांना शाप दिला की, 'तुम्ही ऐश्वर्यहीन व बलहीन होऊन त्रैलोक्यात संभ्रमावस्थेत वणवण भटकाल.' दुर्वासांची शापवाणी खरी ठरली. शापाच्या प्रभावामुळे सर्व देवतांचे ऐश्वर्य नष्ट झाले. ते संभ्रमावस्थेत आकाश, पृथ्वी, पाताळामध्ये वणवण भटकू लागले. शेवटी पश्चात्तापाने दग्ध होऊन ते सर्वजण श्रीभगवान विष्णूला अनन्यभावे शरण गेले. तेव्हा श्रीभगवान महाविष्णू त्यांना म्हणाले, ''तुम्ही सर्व दानवांना मदतीला घेऊन अमृतमंथन करा म्हणजे तुम्हाला वैभव, सुख, शांती, त्रिभुवनातील राज्य व अमरत्व मिळेल.'' मग सर्व देवांनी श्रीविष्णूने सांगितलेला हा अमृतमंथनाचा प्रस्ताव दैत्यराजा बळीसमोर मांडला. देवांचा बळीराजाबरोबर सुसंवाद चालू असतानाच अचानक आकाशवाणी झाली, ''देव आणि दानवांनी मिळून अमृतमंथनासाठी मंदार पर्वताची रवी आणि वासुकी सर्पाची दोरी करून क्षीरसागर घुसळून काढावा.'' देवांनी ही गोष्ट दानवांच्या कानावर घालताच त्यांनी तत्काळ होकार दिला. त्यामागे त्यांचा असा स्वार्थ होता की, 'देवदेवतांपेक्षा आपण बलशाली असल्यामुळे अमृताची प्राप्ती होताच ते बळकावून आपण स्वत:च प्यायचे व अमर व्हायचे !' ठरल्याप्रमाणे समुद्रात मध्यभागी पर्वत आणून त्याच्याभोवती वासुकी सर्प दोरीप्रमाणे गुंडाळण्यात आला. सर्पाच्या तोंडाच्या बाजूला दैत्य व शेपटीच्या बाजूला देवांनी उभे राहून समुद्र घुसळण्यास सुरुवात केली. परंतु प्रचंड वजनामुळे मंदार पर्वत खोल खोल बुडायला लागला. तेव्हा भगवान श्रीमहाविष्णूने तत्काळ कूर्मावतार धारण करून मंदार पर्वताला आपल्या पाठीवर तोलून धरले. त्यानंतर समुद्रमंथनाचे काम सुरळीतपणे चालू झाले.

अशा प्रकारे समुद्रमंथन करीत असताना बऱ्याच कालावधीनंतर समुद्रातून सर्वप्रथम त्रिभुवनाला जाळणारे, सर्वनाश करणारे जालीम कालकुट हे निळसर विष प्रकट झाले. त्याच्या अतिप्रचंड प्रभावामुळे सगळीकडे हाहाकार माजला. देव-दानव वाट दिसेल तिकडे सैरावैरा धावू लागले. समुद्रमंथनाचे काम अर्थातच थांबले. शेवटी ब्रह्मा, विष्णू आणि इतर देव-दानवांनी मिळून भगवान श्रीशंकराची अनन्यभावे प्रार्थना केली. तेव्हा सर्व प्राणिमात्रांना अभय देऊन श्रीशंकराने ते जालीम कालकुट विष क्षणार्धात प्राशन केले व त्यास आपल्या कंठात स्थिर केले. कालकुटाच्या प्रभावामुळे त्यांचा कंठ निळा झाला. तेव्हापासून ते 'नीळकंठ' या नावाने प्रसिद्ध पावले.

देव आणि दानवांवरील संकट टळल्यामुळे समुद्रमंथनाच्या कामास पुन्हा उत्साहाने सुरुवात होऊन गती आली. ते कार्य पुढे कित्येक वर्षे चालले. दरम्यान, समुद्राच्या तळाशी दडलेली एकेक रत्ने हळूहळू वर येऊ लागली. त्याची देव आणि दानवांत वाटणी झाली. देवांनी कामधेनू, ऐरावत, पारिजात, शंख घेतले तर दैत्यांच्या वाटणीला अलौकिक अश्व व सुरा (मद्य) आले. मंथनातून निघालेल्या अप्सरांची दोन्हीकडेही वाटणी झाली. चंद्राला श्रीशंकराने

आपल्या जटेत धारण केले तर श्रीविष्णूने धनुष्य व कौस्तुभमणी स्वीकारले. श्रीमहालक्ष्मीने श्रीविष्णूला वरिले. अशी बारा रत्ने मिळाल्यानंतर अमृताचा दिव्य कुंभ घेऊन स्वत: श्रीधन्वंतरी क्षीरसागरातून वर आले. शेवटची दोन : धन्वंतरी व अमृत धरून, एकूण १४ रत्ने समुद्रमंथनातून प्राप्त झाली.

दैत्यांचे सर्व लक्ष अमृताकडेच लागून राहिल्याने त्यांनी आत्तापर्यंत उत्पन्न झालेल्या रत्नांच्या वाटणीत धूर्तपणे देवांना झुकते माप देऊ केले होते. परंतु अमृताचा कुंभ बाहेर येत आहे, हे दिसताक्षणीच त्यासाठी टपून बसलेल्या दैत्यांनी त्याच्यावर एकदम झडप घातली व तो कलश हिसकावून घेऊन ते दंडकारण्यात पळाले. ज्या अमृताच्या प्राप्तीसाठी महाकठीण असे अमृतमंथन केले तो अमृतकुंभच दैत्यांनी पळविल्यामुळे देवगण अतिशय हताश व चिंतातुर झाले. अगोदरच बलशाली असलेले दैत्यगण अमृत प्यायल्यानंतर अमर होतील व आपले पूर्ण उच्चाटन करून त्रिभुवनात अधर्माचे राज्य करतील, या भीतीने देवगणांनी पुन्हा श्रीविष्णूचा धावा सुरू केला. त्यातील काही देवगण अमृतकलश मिळविण्यासाठी दैत्यांचा पाठलाग करू लागले.

भगवान श्रीविष्णूच्या सांगण्यावरूनच अमृतमंथन करविले असल्यामुळे त्यांची या सर्व गोष्टीकडे नजर होतीच. त्यांनी देवांना अभय प्रदान करून तत्काळ आपली मोहमयी विष्णुमाया दैत्यांवर सोडली. या महामायेच्या प्रभावामुळे दैत्यगण अमृतप्राप्तीसाठी आपसात भांडू लागले. त्याच वेळेस श्रीविष्णूने आपल्या योगनिद्रा शक्तीला आवाहन करून त्रिभुवनसुंदरी मोहिनीरूपाचा अवतार धारण केला. मोहिनीचे सौंदर्य मादक आणि तारुण्याने मुसमुसलेले होते. रंभा, मेनका, ऊर्वशी, तिल्लोत्तमासारख्या अप्सरा तसेच रतीलाही लाजवणारे असे ते अलौकिक सौंदर्य होते.

नयनबाणाने घायाळ करीत, नाजूक पदन्यास करीत येणाऱ्या त्रैलोक्यसुंदरी मोहिनीस पाहताक्षणीच फक्त दैत्यगण नव्हे तर देवगणही आपले सर्वस्व विसरून संभ्रमित व कामविव्हल झाले. दैत्यगणांना अमृतकलशाचा विसर पडला. देहभान हरपून ते मोहिनीचेच अवलोकन करू लागले. मोहिनीची मर्जी संपादन करून तिला प्राप्त करण्यासाठी त्यांच्यातच चढाओढ सुरू झाली. तेव्हा तिने मादक हास्य करीत असुरांना त्यांच्यातील चढाओढीचे व भांडणाचे कारण विचारले. देव आणि दानव दोन्हींकडूनही अमृतमंथनाची हकीकत त्रैलोक्यसुंदरी मोहिनीला ऐकवली गेली. मोहिनीने अत्यंत लाडिकपणे व मदनबाण सोडत असुरांना आपलेसे केल्यामुळे दैत्यराज बळीने आपल्या हातातील अमृतकुंभ मोहिनीच्या स्वाधीन केला, त्याचबरोबर अमृताचे वाटप करण्याची विनंतीही त्याने मोहिनीला केली. जगन्मोहिनी दानवांना म्हणाली, ''श्रीशंकराने प्रथम कालकुट विष प्राशन करून मोठ्या संकटाचे निवारण केल्यामुळेच अमृत मिळविणे शक्य झाले. प्रथम देवांना व नंतर दैत्यांना असे आलटून पालटून अमृताचे वाटप केले तर ते न्यायाला धरून होईल.'' विष्णुरूपी जगन्मोहिनीच्या महामायेत गुरफटलेल्या दानवांनी त्याला तत्काळ संमती दर्शविली.

ठरल्याप्रमाणे देव आणि दैत्यगण अमृतप्राप्तीसाठी समोरासमोर येऊन पंक्तीत बसले. थोड्याच वेळात भरजरी नील वस्त्र धारण केलेली, पायात नुपूर घातलेली, रत्नजडित सुवर्णालंकाराने नटलेली, श्यामल-नील वर्णाची, सर्वांना आपल्या अलौकिक आणि मादक सौंदर्याने संमोहित करीत जगन्मोहिनी नाजूक व आकर्षक पदन्यास करीत तेथे अवतीर्ण झाली. त्याच वेळेस आपल्या सौंदर्याने देव भ्रमिष्ट होऊ नयेत म्हणून श्रीविष्णूने त्यांच्यावरील आपली मोहिनीमाया हटविली. त्यामुळे देवगणांना 'मोहिनी' श्रीविष्णूच्या रूपात तर दैत्यगणांना ती त्रैलोक्यसुंदरी मोहिनीच्या रूपात दिसू लागली. दैत्य हे तमोगुणी असल्यामुळे त्यांना अमृत पाजल्यास ते अमर होतील व देवतांसहित सर्व जीवमात्रांना आपल्या अंकित ठेवून अखिल विश्वामध्ये अधर्म माजवतील, त्यामुळे त्रिभुवनात हाहाकार माजेल, सगळीकडे असुरक्षिततेची भावना निर्माण होईल, हे ओळखून मोहिनीसुंदरीने देवगणांना अमृत तर दैत्यांना सुरा म्हणजे मदिरा आलटून पालटून पाजायला सुरुवात केली. त्या वेळेस विष्णुरूपी मोहिनीच्या महामायेने संभ्रमित आणि मोहित झालेल्या दैत्यांना आपण अमृतच प्राशन करीत आहोत, असे वाटले.

तरीही एका चाणाक्ष आणि चतुर अशा मायावी दैत्याला यात काही तरी काळेबेरे आहे, असा संशय आल्यामुळे तो वेष पालटून देवगणांच्या पंक्तीत शेवटी जाऊन बसला. मोहिनीसुंदरीने त्याला अमृत देताच त्याने ते घाईघाईने प्राशन केले. तेवढ्यात त्या दैत्याच्या शेजारी बसलेल्या चंद्र-सूर्य देवांना त्याचा संशय आल्यामुळे त्यांनी मोहिनीला त्याबद्दल खुणावले. दैत्याचा कावा लक्षात येताच त्रिजगतसुंदरी मोहिनीरूपातील श्रीविष्णूने सुदर्शन चक्राला आवाहन करून त्याचा शिरच्छेद करविला. परंतु त्याआधीच दैत्याच्या घशाखाली अमृत गेल्यामुळे वेगवेगळे झालेले शिर आणि धड दोन्हीही जिवंत राहिले व मोहिनीच्या भीतीने दुसरीकडे पळू लागले. मोहिनीने शंकराच्या त्रिशुळाचे स्मरण केले व एका हाताने दैत्याचे शिर व त्रिशुळाने धड खेचून आपल्या पायाखाली दाबून धरले. अमृत पिऊनही आपली सुटका होणार नाही, हे लक्षात येताच शेवटी त्या दैत्याच्या शिर व धडाने मोहिनीपुढे शरणागती पत्करली.

झालेला सर्व प्रकार पाहून आपण देवगणांकडून फसविले गेलो हे दैत्यांच्या लक्षात आले. मोहिनीच्या महामायेतून मुक्त झालेल्या त्या दैत्यांनी सर्वशक्तीनिशी देवगणांबरोबर युद्ध सुरू केले. ते कित्येक वर्षे चालू राहिले. परंतु देवगण अमृत पिऊन बलशाली झाल्यामुळे दानवांचा शेवटी पराभव झाला. सगळीकडे आनंदीआनंद होऊन त्रिजगतात सुख, शांती, समृद्धी व समाधानाचा काळ सुरू झाला.

### भस्मासुर वध कथा

अनंत आणि अनादी काळापूर्वीची ही गोष्ट. कैलासावरील वास्तव्यात एकदा श्रीशिवशंकर अंगाला भस्म लावत असताना त्यात अपवित्र असा एक भस्माचा खडा आढळला. त्यामुळे अतिशय क्रोधायमान होऊन त्यांनी तो खडा एकदम जोरात भूमीवर आपटला. तत्क्षणी त्या खड्यातून एक अक्राळ-विक्राळ महादैत्य निर्माण झाला. त्याने शिवाला अनन्यभावे नमस्कार केला व शिवाज्ञेने तप करण्यासाठी वनात निघून गेला. काही काळानंतर दैत्याची उग्र तपश्चर्या पाहून भगवान शिवशंकर त्याच्यावर प्रसन्न झाले व त्याला त्यांनी वर मागावयास सांगितले. भस्मापासूनच दैत्याचा जन्म झाल्यामुळे त्याने 'ज्याच्या मस्तकावर हात ठेवीन, त्याचे भस्म व्हावे,' असा वर मागितला. त्याचबरोबर त्याने काही मायावी शक्तीही शंकराकडून मिळवल्या.

वर मिळाल्यानंतर भस्मासुर फारच उन्मत्त झाला. आपल्या विरुद्ध असलेल्यांच्या तसेच ऋषी-मुनींच्या मस्तकावर हात ठेवून तो त्यांना भस्म करू लागला. त्यामुळे पृथ्वीतलावर हाहाकार माजला. एकदा भस्मासुर श्रीशंकराच्या दर्शनासाठी आला असता पार्वतीचे लावण्य पाहून मोहित झाला व पार्वतीच्या प्राप्तीसाठी खुद्द वरदात्या शंकरालाच भस्म करायला धावला. भस्मासुराच्या या कृत्याने श्रीशंकर पार्वतीला घेऊन तत्काळ भूलोकातील भैरवक्षेत्री येऊन एका गुहेत लपून बसले आणि संकटातून आपली सुटका होण्यासाठी श्रीभगवान विष्णूचा धावा करू लागले.

दरम्यान, भस्मासुर श्रीशंकर-पार्वतीचा पाठलाग करीत भैरवक्षेत्री आला. तत्काळ श्रीविष्णूने त्रिजगतसुंदरी मोहिनीचे रूप घेतले. तिला पाहताक्षणीच दैत्य सम्मोहित व कामपीडित झाला. मोहिनीच्या महामायेत गुरफटल्याने शंकर-पार्वतीला विसरून दैत्याने मोहिनीलाच मागणी घातली. त्रिजगतसुंदरी मोहिनी भस्मासुराला म्हणाली, ''मी कुशल नर्तिका असून, जो कोणी माझ्यासारखं नृत्य करून मला हरवेल त्याच्याशीच मी विवाह करीन, असा मी 'पण' केला आहे.'' हे ऐकून भस्मासुराने मोहिनीला तत्काळ होकार दिला. कारण, त्याच्याजवळ मायावी शक्ती होती. त्यामुळे लगेच नृत्यकला आत्मसात करून तो मोहिनीबरोबर नृत्य करू लागला. भैरवक्षेत्री एका मोठ्या गुहेत दोघांचे नृत्य सुरू झाले. मोहिनी जसे नृत्य करीत होती अगदी तसेच हुबेहूब नृत्य भस्मासुर करू लागला. भस्मासुर देहभान विसरून नृत्यात मग्न असल्याचे पाहून मोहिनीने आपला उजवा हात स्वत:च्या मस्तकावर ठेवला. नृत्याच्या ओघात अगदी तसेच अनुकरण करीत भस्मासुरानेही आपला उजवा हात स्वत:च्या मस्तकावर ठेवला आणि तत्काळ तो पेटला. शंकराने दिलेल्या वराप्रमाणेच त्याचे भस्म झाले. श्रीविष्णूने त्रिजगतसुंदरी मोहिनीचे रूप टाकून मूळ रूप धारण केले. श्रीविष्णूने भस्मासुराची राख घेऊन जवळच लपलेल्या श्रीशंकराला दिली व भस्मासुर वधाची कथा त्यांच्यासमोर कथन केली. श्रीशंकर-पार्वतीने श्रीविष्णूचे आभार मानून कैलासाकडे प्रयाण केले. (श्रीधरस्वामी नाझरेकरांनी आपल्या 'शिवलीलामृत' या पौराणिक पोथीमध्ये, बाराव्या अध्यायामध्ये 'भस्मासुर वधा' ची कथा अतिशय सुरस आणि रसाळ भाषेमध्ये सांगितली आहे.)

कर्नाटकातील गोकर्णजवळ निसर्गरम्य घनदाट अरण्यात 'याण' नावाचे एक भैरवक्षेत्र आहे. तिथल्या जमिनीतील माती जळून काळी झाल्यासारखी वाटते. त्यामुळे स्थानिक पोथी व प्रचलित लोककथेनुसार याच ठिकाणी मोहिनीने भस्मासुराला भस्म केले, त्यामुळेच इथल्या जमिनीतील माती भस्मासारखी झाली आहे, असे येथील लोक सांगतात. इथे अतिशय उंच अशी शिलाशिखरे तसेच गुहा आहेत. येथील दोन शिलाशिखरांना अनुक्रमे भैरवेश्वर शिलाशिखर व मोहिनी शिलाशिखर असे म्हणतात. त्याखाली मोठमोठ्या अनेक गुहा आहेत. त्यांपैकी एका गुहेत भैरवेश्वर मंदिर असून तिथे नित्यनेमाने पूजा-अर्चा होत असते. दरवर्षी महाशिवरात्रीला येथे बरेच शिवभक्त एकत्र येऊन मोठा उत्सव साजरा करतात.

### दैत्यविरोचन वध कथा

पुरातन काळी विरोचन नावाच्या एका दैत्याने खडतर तपश्चर्या करून ब्रह्मदेव आणि शंकराकडून अनेक वर

प्राप्त करून घेतले. त्यामुळे तो अतिबलाढ्य आणि अजिंक्य झाला होता. देवांकडून मिळालेल्या एका वरानुसार त्याचे प्राण त्याच्या कंठात होते. त्यासाठी तो कवचासारखा राजमुकुट आपल्या मस्तकावर ठेवायचा. त्यामुळे त्याचा वध करणे अशक्यप्राय गोष्ट होती. त्याचा पराभव कुणीही करू शकत नसल्यामुळे महाउन्मत्त होऊन तो भूतलावरील सर्व ऋषी-मुनी व प्रजेला अतोनात छळू लागला. त्यामुळे सर्व लोक दैत्य विरोचनापासून संरक्षण व्हावे म्हणून श्रीविष्णूला शरण गेले. त्यांनी श्रीविष्णूची अनन्यभावे प्रार्थना केली. श्रीविष्णूने प्रसन्न होऊन सर्वांना अभय दिले व दैत्य विरोचनाचा वध करण्यासाठी पुन्हा त्रैलोक्यसुंदरी अशा जगन्मोहिनीचे रूप घेतले.

मोहिनीचे रूप, लावण्य तसेच विभ्रम पाहून दैत्य विरोचन तिच्यावर पूर्णपणे भाळला, सम्मोहित झाला. कामपीडेने विव्हल होऊन तिचा अनुनय करू लागला. ''मी सांगेन तसेच तुला करावे लागेल'' असे दैत्याकडून मोहिनीने वचन घेतले. कालांतराने योग्य वेळ पाहून एके दिवशी मोहिनी दैत्य विरोचनाला म्हणाली, ''तुझ्या डोक्याला तैलमर्दन करून नवस फेडायचा आहे. तेव्हा तुझ्या डोक्यावरील मुकुट काढ.'' मोहिनीच्या अप्रतिम सौंदर्याने सम्मोहित होऊन तिला वचन दिले असल्यामुळे व नवस फेडायचा असल्यामुळे दैत्य विरोचनाने नाइलाजास्तव आपल्या मस्तकावर परिधान केलेला तो रत्नजडित मुकुट काढला व मोहिनीकडून तैलमर्दन करून घेऊ लागला. तैलमर्दन करीत असतानाच योग्य वेळ साधून मोहिनीरूपातील श्रीविष्णूने दैत्य विरोचनाच्या केसांना धरून उचलले व मस्तकावर वज्रमुठीने जोरदार प्रहार करून त्याचा वध केला. त्या वेळेस त्रैलोक्यातून भगवान श्रीमहाविष्णूवर जयजयकारासह पुष्पवृष्टी झाली.

## चंडासुर वध कथा

स्कंदपुराणातील सह्याद्री खंडातील 'वरुणापूर' माहात्म्यात साधारणपणे पुढीलप्रमाणे कथा सांगितली आहे :

पुराणकाळात गोमंतकातील वरुणपुरात (सध्याचे वेर्णे) वरुण देवाने बांधलेले भव्य मंदिर प्रसिद्ध होते. या मंदिरात भगवान श्रीपरशुरामाने श्रीमहालसा देवीची स्थापना केली होती.

काही काळानंतर त्या परिसरात चंडासुर नावाचा महाबलाढ्य आणि महाउन्मत्त दैत्य आला व त्याने सर्वांना पीडा देण्यास सुरुवात केली. तेव्हा, तिथली प्रजा श्रीपरशुरामास अनन्यभावे शरण गेली. श्रीपरशुरामाने त्यांना स्वतः स्थापन केलेल्या श्रीमहालसादेवीला शरण जाण्यास सांगितले. त्याप्रमाणे सर्वांनी महालसादेवीला शरण जाऊन सर्व वरुणापूरवासीयांचे रक्षण करण्यासाठी प्रार्थना केली. त्या वेळी श्रीमहालसादेवीने सर्व भक्तांना अभय देऊन चंडासुर दैत्याचा वध केला व वरुणपूरच्या भक्तांबरोबरच सर्व गोमंतकवासीयांचे रक्षण केले.

## श्रीमहालसा माहात्म्य

स्कंद पुराणात सह्याद्री खंडातील 'वरुणापूर माहात्म्या'त वर्णन केल्याप्रमाणे भगवान श्रीपरशुरामाने महालसा देवीला गौड (बंगाल) देशातून गोमांतकात (गोवा) आणले व वरुणापूर (वेर्णे) येथे तिची प्रतिष्ठापना केली. देवीच्या प्रतिष्ठापनेनंतर श्रीपरशुरामाने सर्व वरुणापूरवासीयांना सांगितले की, ''तुमच्या सर्वांच्या सुख-समृद्धीसाठी, तसेच दानवांच्या संहारासाठी मी या देवीची स्थापना केली आहे. ही देवी सर्व लक्षणसंपन्न, मायायुक्त व सर्व प्रकारे पूजित आहे. लोकपावनी अशी ही देवी रत्नजडित नुपूरधारी असून हिची बाला, कन्या, कुमारी, मनमोहिनी, युवती, शासनकर्ती, सर्वेच्छा पूर्ण करणारी, ज्येष्ठा, शुद्धा अशी अनेक रूपे आहेत.

प्रात:काल, पूर्वान्ह, मध्यान्ह, अपरान्ह, सायंकाल, प्रदोष, रात्र, मध्यरात्र, अपररात्र या नऊ वेळा पृथ्वीवरून नऊ रूपे धारण करणारी ही देवी आदिशक्ती, महामाया, मूलप्रकृति, ईश्वरी, दुराधर्षा, गंधद्वारा, करीषिणी, नित्यपुष्टा, श्रीदेवी अशा नऊ नावांनी ओळखली जाते.

याशिवाय दुर्गा, विजया, भद्रकाली, कुमुदा, वैष्णवी, कृष्णा, कन्यका, दण्डिका, माधवी, शांता, माया, नारायणी, अंबिका, शारदा, महायोगिनी, कात्यायनी, बालदुर्गा, कालरात्री, योगनिद्रा, अधीश्वरी, महालक्ष्मी, मोहिनी, भारती, सर्व देवनमस्कार्या अशा २४ नावांनी तिला आवाहन करून पूर्जाअर्चना करा म्हणजे ती तुम्हाला प्रसन्न होऊन तुमच्या मनोकामना पूर्ण करील, तुमचे रक्षण-पालन करील.''

## श्रीमहालसा देवीचे भक्तगण

भारद्वाज, कौशिक, अत्री, गार्ग्य आणि वत्स अशा पाच गोत्रांचे वैष्णवपंथी गौड सारस्वत ब्राह्मण

श्रीमहालसादेवीला आपली कुलदेवता मानतात. बहुतांश महालसा मंदिरांत हेच महाजन म्हणून कार्यभार करतात. वरील गोत्रे असणाऱ्या काही कऱ्हाडे बाह्मणांची तसेच दैवज्ञ ब्राह्मणांचीही ही कुलदेवता आहे. कर्नाटकात विशेषकरून, सोनार, शेट्टी, गुडिगार या देवीचे उपासक आहेत. गोव्यात हिंदूंव्यतिरिक्त काही ख्रिश्चनही हिचे भक्त आहेत. एकंदरीत महाराष्ट्र, गोवा, कर्नाटक, केरळ तसेच नेपाळमध्ये अठरापगड जाती-धर्मांचे लक्षावधी भक्तजन या देवीची उपासना करतात.

## विविध राज्यांतील म्हाळसा स्थलदर्शन

### महाराष्ट्र

**श्रीक्षेत्र नेवासा :**

श्री क्षेत्र नेवासा (ता. नेवासा, जि. अहमदनगर) हे पुणे-अहमदनगर- औरंगाबाद या राज्य महामार्गावर वसले असून, अहमदनगर ते नेवासे हे अंतर सुमारे ६६ कि. मी. आहे. शिर्डीवरून श्रीरामपूरमार्गेही नेवासेला जाता येते. हे अंतर सुमारे ८५ कि. मी. आहे. पुणे ते नेवासे हे अंतर सुमारे १८५ कि. मी. आहे.

नेवासे येथील श्रीमोहिनीराज मंदिर हे श्रीविष्णूच्या मोहिनी अवतारातील प्रसिद्ध असलेले महाराष्ट्रातील एकमेवाद्वितीय असे मंदिर आहे. यालाच म्हाळसा तथा महालसा मंदिर म्हणतात. हेमाडपंथी रचनाशैलीतील या मंदिराचे संपूर्ण काम दगडी आहे. मंदिराचे शिखर सुमारे ५५ फूट उंचीचे आहे. मंदिरावर व आतील गाभाऱ्यात आकर्षक असे नक्षीकाम केले आहे. गाभाऱ्याच्या मध्यभागी श्रीमोहिनीराजाची मूर्ती ठेवलेली आहे. शेजारी महालक्ष्मीची मूर्ती आहे. मात्र, दुसऱ्या मूर्तीची स्थापना नंतर केली आहे, असे येथील जाणकार लोकांचे म्हणणे आहे.

श्रीमोहिनीराजाची मूर्ती चतुर्भुज असून, उजव्या बाजूच्या वरच्या आणि खालच्या हातामध्ये अनुक्रमे सुदर्शनचक्र, गदा असून, डाव्या बाजूच्या वरच्या आणि खालच्या हातामध्ये अनुक्रमे शंख आणि अमृतकलश आहे. तसेच उजव्या पायाखाली राहू दैत्याला दाबून ठेवले आहे. ही मूर्ती अर्धनारी-नारायण स्वरूपातील असून, मूर्तीचे उजव्या बाजूचे अंग श्रीविष्णूचे तर डाव्या बाजूचे अंग मोहिनीचे दाखविले आहे. त्यामुळे मूर्तीचा श्रृंगार, वेशभूषा व अलंकारही उजवीकडी अर्ध्या अंगाला श्रीविष्णूप्रमाणे आणि डावीकडील अर्ध्या अंगाला मोहिनीप्रमाणे केले जातात. श्रीमोहिनीने देवांना शंखातून अमृतपान करविल्याचे प्रतीक म्हणून मूर्तीच्या डाव्या हातात शंख दाखविलेला आहे. श्रीविष्णू हे अमृतवाटप करताना, देवगणांना श्रीविष्णूच दिसत होते, तर दैत्यांना श्रीमोहिनी दिसत होती. या कथेवरून ही मूर्ती अर्धनारी-नारायण स्वरूपात तयार केली असावी. भारतात फक्त नेवाशातच अशा स्वरूपाची मूर्ती आढळते, हे येथील वैशिष्ट्य आहे.

**पौराणिक क्षेत्रमाहात्म्य :**

महालयमाहात्म्य आणि स्थानिक पोथीत वर्णन केल्याप्रमाणे अमृतमंथनानंतर नेवासे येथील मुळा-प्रवरा नद्यांच्या संगमापासून ते गोदावरी नदीच्या संगमापर्यंतच्या पंचक्रोशीत अमृतासाठी देव-दानवांची पंगत बसली होती. इथेच अमृतवाटप झाले. तेव्हा, देवांना अमृत पाजून व राहू दैत्याचा सुदर्शनचक्राने शिरच्छेद करून त्याच्यावर पाय रोवून श्रीविष्णू जगत्‌जननी श्रीमोहिनीच्या रूपात येथेच उभे ठाकले आहेत. म्हणून श्रीमोहिनीला 'श्रीमहालया' तथा 'महालसा' असे नाव पडले.

**ऐतिहासिक माहिती :**

पुरातन काळी नेवासे गावाजवळील प्रवरा नदीच्या काठी श्रीमहालया देवीचे मंदिर होते. कालांतराने नदीचे पात्र बदलल्याने, तसेच मोगलकालीन यवनांकडून आक्रमण झाल्याने मंदिर पूर्णपणे उद्ध्वस्त झाले. त्याचे काही अवशेष आजही पाहावयास मिळतात. **कालांतराने होळकरांचे दिवाण खंडोबाभक्त श्री. चंद्रचुडांनी हे मंदिर नव्याने बांधले. इ.स.१७७४ मध्ये हे मंदिर बांधून पूर्ण झाले.**

**उत्सव :**

श्रीमोहिनीराज हे नेवासे गावचे आणि परिसराचे ग्रामदैवत आहे. महाराष्ट्रातील लाखो लोकांचे कुलदैवत

आहे. वर्षभर येथे बरेच उत्सव होत असतात. सर्वांत मोठा वार्षिक उत्सव रथसप्तमी ते माघ शुद्ध पौर्णिमा व त्यापुढे पंचमीपर्यंत साजरा होतो. अमृतवाटपाचे प्रतीक म्हणून पाच दिवस मुक्तद्वार मिष्टान्न भोजनाच्या पंगती उठतात. या कालावधीत महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून लाखो भाविक दर्शनासाठी नेवासे येथे येऊन श्रीमोहिनीराजाच्या दर्शनाचा लाभ घेतात.

महाराष्ट्रात याशिवाय श्रीमहालसा (म्हाळसा) तथा मोहिनीची मंदिरे वालसेंग (जि.औरंगाबाद), भोगावती (पैठण, जि.औरंगाबाद), नांदुरा (जि.बीड), त्र्यंबकेश्वर (जि. नाशिक) येथे असल्याच्या वाङ्मयीन नोंदी आढळतात.

## गोमंतक (गोवा)

**श्रीक्षेत्र म्हार्दोळ :**

पणजीपासून सुमारे २१ कि. मी. अंतरावर पणजी-फोंडा रस्त्यावर म्हार्दोळ आहे. मडगाववरून येणाऱ्यांसाठी मार्ग असा : मडगाव ते फोंडा (२० कि. मी.) व फोंडा ते म्हार्दोळ (७ कि. मी.). मुंबईवरून म्हार्दोळला रेल्वेने जायचे झाल्यास मडगावच्या अलीकडे करमाळी स्टेशनवर उतरून म्हार्दोळला जाता येते. करमाळी स्टेशन ते म्हार्दोळ हे अंतर २७ कि. मी. आहे.

म्हार्दोळ येथे श्रीमहालसा नारायणीचे सर्वांत पुरातन, सर्व सोयींनी युक्त असे भव्य मंदिर संकुल आहे. महालसा नारायणीच्या, देशातील सर्व मंदिरांमध्ये हे मंदिर सर्वांत मोठे असून तेच मुख्य पीठ मानले जाते.

या मंदिराची स्थापना सुमारे ४३६ वर्षांपूर्वी झाली असून, त्यापूर्वी हे मंदिर वरुणापूर म्हणजे सध्याचे वेर्णे येथे होते. इ.स.१५६७ साली पोर्तुगीज राजवटीत हे मंदिर धर्मांध पोर्तुगिजांनी जमीनदोस्त केले. तत्कालीन सामाजिक परिस्थितीमुळे आधीच अंदाज आल्यामुळे, मंदिर पाडण्यापूर्वीच त्यातील श्रीमहालसाची मूर्ती भक्तांनी म्हार्दोळ येथे स्थलांतरित केली. काही दिवस ही मूर्ती येथील देसाईंच्या वाड्यात ठेवण्यात आली. कालांतराने तेथे छोटे मंदिर बांधून त्यात मूर्तीची विधिवत प्राणप्रतिष्ठा करण्यात आली. तेव्हापासून पुनर्बांधणी, जीर्णोद्धार, नवीन बांधकामे इत्यादी होत होत सद्यःस्थितीत भव्य मंदिराचे संकुल उभे आहे.

संकुलात प्रवेश करण्यासाठी अग्रभागी तीन कमानीयुक्त महाद्वार असून, तिथेच चौघडा वाजविण्याची जागा आहे. संकुलात मध्यभागी श्रीमहालसादेवीचे ताम्रपट्ट्यांनी आच्छादिलेले भव्य मंदिर आहे. मंदिराच्या उजवीकडे श्रीसांतेरी लक्ष्मी-नारायणाचे वेगळे मंदिर आहे. मुख्य मंदिरात प्रवेश करताना प्रथम भव्य दगडी सभामंडप, नंतर नगारखाना व त्यानंतर लाकडी खांबांनी युक्त आणि काष्ठशिल्पांनी नटलेला असा मुख्य चौक लागतो. याच ठिकाणी बसून भक्तगण श्रीदेवीचे दर्शन घेतात. कुलाचाराप्रमाणे सेवा करतात. येथून पुढे गाभाऱ्याचा प्रदक्षिणा मार्ग आहे. मंदिराच्या मागे श्रीमहालसा व श्रीसांतेरी देवीच्या परिवारदेवता आहेत. त्यात श्रीग्रामपुरुष, श्रीभगवती, श्रीसंहारभैरव, श्रीचौसष्ट योगिनी, श्रीदाडदेव, श्रीकाळभैरव, **श्रीमल्हार** इत्यादी देवांची लहान लहान मंदिरे आहेत. प्रत्येक देवाची कुलधर्मानुसार भाविकांकडून पूजा केली जाते.

मंदिराच्या मागे चौफेर मोठे तळे असून त्यात महालसा देवीचा नौकाविहार, दीपोत्सव अशासारखे कार्यक्रम साजरे होतात. मंदिराच्या डाव्या बाजूला श्रीवाडे सांतेरी व श्रीसिंहपुरुषाची मंदिरे आहेत. त्यांची पूजा-अर्चना कुळाव्यांकडून होते.

मुख्य मंदिरासमोर उंच अशी भव्य दीपमाळ आहे. तिच्याजवळच पंचधातूंनी बनविलेली अद्वितीय अशी ४० फूट उंचीची, २१ माळ्यांची, ६५० वातींची महाज्ञानदीप समई आहे. काही महत्त्वाच्या प्रसंगी व उत्सवाच्या वेळेला यातील सर्व दिवे प्रज्वलित केले जातात. त्यामुळे संपूर्ण परिसर उजळून निघतो. मंदिराच्या उंच शिखरावर साडेतीन किलो वजनाचा सुवर्णकळस असून त्याची चमक भाविकांचे लक्ष वेधून घेते.

मुख्य मंदिरात गंडकी नदीतील चक्रांकित शालीग्रामची श्रीमहालसा देवीची मूर्ती आहे. रोज सकाळी बालिका, दुपारी तरुणी व संध्याकाळी प्रौढा असा तिचा श्रृंगार केला जातो व त्याचप्रमाणे अलंकारही घातले जातात.

म्हार्दोळ येथे पूर्वीपासून स्थायिक असलेल्या श्रीसांतेरी देवीने वेर्णेहून आलेल्या श्रीमहालसादेवीला आपल्या जागेजवळच राहण्यास संमती दिल्याने महालसा देवीनेही आपल्या बरोबरीचे सर्व मानसन्मान श्रीसांतेरी देवीला दिले, असा येथे लोकप्रचलित समज आहे. त्या अनुषंगाने श्रीमहालसा देवीने दिलेल्या दृष्टांतानुसार सांतेरी देवीची पूजा-आरती श्रीमहालसा देवीच्या पूजेच्या आधी करण्यात येते. **रविवार** हा श्रीमहालसा देवीचा वार असल्यामुळे त्या

दिवशी विशेष उत्सव साजरा होऊन पालखी प्रदक्षिणेचा कार्यक्रम होतो.

श्रीमहालसा मंदिराचा परिसर भव्य असून त्यात कुळावे आणि बाहेरून येणाऱ्या भाविक भक्तांना राहण्यासाठी सर्व सोयींनी युक्त अशा एकूण ५० खोल्या आहेत. याशिवाय एक मोठा हॉल आहे. लग्न-मुंज इत्यादी मंगलकार्ये करण्यासाठी मंदिराच्या परिसरात तीन सभागृहे आहेत. मंदिर संकुलात मंदिर समितीच्या मालकीचे मोठे उपाहारगृह असून, तेथे अल्प दरामध्ये चहा-नाश्ता तसेच दुपारच्या व रात्रीच्या (आरतीनंतर) जेवणाची सोय मंदिर व्यवस्थापनाने केली आहे.

गौड सारस्वत ब्राह्मण शाखेच्या वैष्णवपंथी श्रीगोकर्ण पर्तगाळी संस्थानच्या मठाधीशांच्या मार्गदर्शनानुसार या मंदिरात वर्षभर धार्मिक कार्ये चालतात.

**श्रीक्षेत्र वेर्णे :**

वेर्णे हे ठिकाण मडगाव-वास्को रस्त्यावर आहे. तेथील चर्चजवळ उतरून रस्त्याच्या उजव्या बाजूच्या रस्त्याने ३-४ कि. मी. अंतरावरील डोंगरमाथ्यावर गेल्यास रस्त्याच्या उजव्या बाजूला निर्माण होत असलेले श्रीमहालसा देवीचे भव्य मंदिर दिसते.

दि. ७ मार्च १५६७ रोजी पोर्तुगिजांनी या मंदिराचा विध्वंस करून जवळचा परिसर उजाड केला. पोर्तुगिजांपासून गोमंतक (गोवा) स्वतंत्र झाल्यानंतर वेर्णे येथे पुरातत्त्व खात्याने उत्खनन केले असता तेथे जुन्या मंदिराचे अवशेष सापडले आहेत. त्यात सुमारे ११० फूट x ७० फूट एवढ्या विशाल मंदिराचा, षट्कोनी गाभाऱ्याचा पाया सापडला आहे. तसेच मंदिराच्या समोर सुमारे १६५ फूट x १०० फूट तळ्याचाही शोध लागला आहे.

सध्या वेर्णे येथे पोर्तुगिजांनी पाडून टाकलेल्या मंदिराच्या परिसरातच एका तात्पुरत्या बांधलेल्या जागेत श्रीमहालसा देवीची मूर्ती ठेवण्यात आली आहे. तिची पूजा-अर्चा नित्यनेमाने होते. परंतु बाहेरून येणाऱ्या भक्तगणांना या लहानशा मंदिराबद्दल फारशी माहिती नसल्यामुळे क्वचितच भक्त तिथे जातात.

गोवा स्वतंत्र झाल्यानंतर पूर्वीचे मंदिर पाडले. त्याच जागी इ.स. १९७५ पासून नूतन भव्य महालसा मंदिर संकुलाचे काम सुरू झाले. अद्याप ते सुरूच आहे. दाक्षिणात्य आणि पुरातन स्थापत्यशास्त्रानुसार बांधण्यात येणारे हे भव्य मंदिर सुमारे १६५ फूट x १०० फूट आकाराचे असून त्याची उंची सुमारे ७२ फूट आहे. नियोजित विकास आराखड्यानुसार श्रीमहालसा, श्रीसांतेरी, श्रीमहालक्ष्मी, श्रीलक्ष्मीनारायण, परिवार देवता, सभामंडप व संबंधित इतर बांधकामे पूर्ण झाल्यानंतर या संकुलात महाद्वार, गरुडस्तंभ, ज्ञानदीप, दीपस्तंभ, कल्याण मंडप, सेवेकऱ्यांसाठी तसेच भक्तगणांसाठी निवासस्थाने, देववन तसेच देवसंस्थानचे कार्यालय इत्यादी बांधकामे होणार आहेत. मंदिर बांधण्याचे काम सध्या जोरात सुरू आहे.

## कर्नाटक

**श्रीक्षेत्र कुमटा :**

कुमटा हे कारवार जिल्ह्यातील तालुक्याचे ठिकाण असून, ते पश्चिम किनारा मार्गावर आहे. कारवार, मडगाव, बेळगाव, हुबळी, उडुपी, मंगरूळ येथून बसने कुमट्याला जाता येते. कोकण रेल्वेने गेल्यास कुमटा रेल्वे स्टेशनवर उतरावे लागते. तेथून ३ कि. मी. अंतरावर हे मंदिर आहे. जाण्या-येण्यासाठी रिक्षाची सोय आहे.

गोमंतकातून पोर्तुगिजांच्या अत्याचारांना कंटाळून आलेल्या गौड सारस्वत ब्राह्मणांनी व इतर भक्तांनी मिळून १५६५ च्या सुमारास येथे श्रीमहालसादेवीचे मंदिर बांधल्याचे समजते. तेव्हापासून आजतागायत पुनर्बांधणी, जीर्णोद्धार, नवीन बांधकामे इत्यादी करत सद्य:स्थितीला गावाच्या मध्यभागी हे भव्य व सुंदर मंदिर उभे आहे. गाभाऱ्यात श्रीमहालसादेवीची पंचधातूची सुबक मूर्ती आहे. भक्तलोक तिथे त्यांना आवश्यक वाटणारी देवकार्ये करतात. मंदिर परिसरातच श्रीसांतेरी देवी, ग्रामपुरुष भगवतीदेवी, दाडदेव, काळभैरव इत्यादी दैवतांची लहान लहान मंदिरे आहेत.

पोर्तुगिजांच्या राजवटीत म्हार्दोळ येथे श्रीमहालसा देवीच्या दर्शनाला जाता येणे शक्य नसल्याने गोव्याबाहेरील कुळावे आणि इतर भक्तांना येथे येणे सुरक्षित वाटत असल्यामुळे हेच मंदिर महत्त्वाचे झाले होते. शिवाय कर्नाटकातील इतर महालसा मंदिरांमध्ये हे मंदिर सर्वांत जुने असल्याने कुळाव्यांची आणि इतर भाविक भक्तांची दर्शनासाठीची वर्दळ येथे रोजच पाहावयास मिळते.

**श्रीक्षेत्र मादनगेरी :**

प्रसिद्ध पुण्यक्षेत्र गोकर्ण-महाबळेश्वरच्या अलीकडे सुमारे ८-१० कि.मी. अंतरावरील मादनगेरी या छोटेखानी गावात श्रीमहालसा-सिद्धिविनायक मंदिर आहे. कारवार, उडुपी, मंगळूर, हुबळी येथून मादनगेरीला जाण्यासाठी बसची सोय आहे. तसेच गोकर्णला जाणाऱ्या सर्व बस येथे थांबतात. कोकण रेल्वेच्या गोकर्ण रोड या स्टेशनपासून हे मंदिर सुमारे अर्ध्या किलोमीटर अंतरावर आहे.

श्रीमहालसा-सिद्धिविनायक मंदिर हे नव्यानेच बांधले आहे. मंदिराच्या गाभाऱ्यात श्रीमहालसेची मुख्य मूर्ती असून, त्याखाली श्रीसिद्धिविनायकाच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली आहे. श्रीमहालसादेवीने आपले व श्रीसिद्धिविनायकाचे असे एकत्र मंदिर बांधावे, असा येथे एका भक्ताला दृष्टांत दिला होता. त्यानुसार सध्याचे भव्य मंदिर बांधण्यात आले आहे, असे येथील स्थानिक रहिवाशांकडून ऐकावयास मिळते.

मंदिरात रोज त्रिकालपूजा, अभिषेक, कुंकुमार्चना, नैवेद्य, आरती इत्यादी सेवा केल्या जातात. याशिवाय येथील स्थानिक व पंचक्रोशीतील भक्तलोक श्रीसिद्धिविनायकाचे संकष्टी, गणहोम इत्यादी तसेच महालसा उत्सव साजरे करतात.

**श्रीक्षेत्र मुडगेरी :**

मुडगेरी हे छोटेखानी गाव कारवार तालुक्यात असून, गोव्याच्या दक्षिण सीमेजवळील माजाळी या गावापासून सुमारे ३ कि.मी. अंतरावर आहे. कारवारपासून सुमारे १५ कि. मी. अंतरावर आहे.

येथील माहितीनुसार येथील महालसा मंदिर सुमारे १६० वर्षांचे जुने आहे. सुरुवातीला ज्योतिर्बिंबस्वरूपात, नंतर लहान मंदिर आणि त्यानंतर म्हणजे सद्यःस्थितीत भव्य मंदिर, अशा टप्प्याटप्प्याने या मंदिराची उभारणी झाली आहे. मंदिरात मध्यभागी असलेल्या अष्टकोनी गाभाऱ्यात श्रीमहालसा देवीची मूर्ती आहे. तिच्या उजव्या बाजूस वेगळ्या गाभाऱ्यात श्रीसांतेरी देवी, तर डाव्या बाजूच्या वेगळ्या गाभाऱ्यात श्रीगणेशाची मूर्ती आहे.

मंदिरात रोजची पूजा, आरती, अभिषेक, कुंकुमार्चना, नैवेद्य वगैरे सेवा केल्या जातात. स्थानिक भक्तांकडून कार्तिक पौर्णिमा, रथसप्तमी, **चंपाषष्ठी**, नवरात्र, दसरा इत्यादी उत्सव थाटामाटात साजरे केले जातात. या मंदिराचे व्यवस्थापन येथील रेवणकर कुटुंबीयांकडे आहे.

**श्रीक्षेत्र बिनगा :**

कारवारच्या दक्षिणेस सुमारे ४ कि.मी. अंतरावर बिनगा येथे श्रीमहालसा देवीचे मंदिर आहे. सुमारे शंभर वर्षांपासून येथे श्रीमहालसा देवीची पूजा-अर्चा चालत आली असून, इ.स.१९७२ साली श्रीदेवीच्या नव्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यात आली आहे. इथल्या महालसाच्या शिलामूर्तीचे वैशिष्ट्य हे की, श्रीमहालसा दैत्याच्या शरीरावर उभी नसून ती कासवावर उभी आहे. येथे रोजची देवकार्ये तसेच इतर उत्सव स्थानिक भक्तलोक साजरे करतात.

**श्रीक्षेत्र काजुबाग :**

कारवारजवळ असणाऱ्या काजुबाग येथील महालसाचे छोटेखानी मंदिर सुमारे २५ वर्षांपूर्वी बांधले असून, इ.स. १९९८ मध्ये मंदिराचा जीर्णोद्धार केला आहे. येथे रोजची धार्मिक कार्ये व इतर उत्सव स्थानिक भक्तलोकांकडून साजरे केले जातात.

**श्रीक्षेत्र नंदनगद्दा (गिरीवाडा) :**

कारवारजवळ असणाऱ्या नंदनगद्दा (गिरीवाडा) येथील महालसा मंदिर हे येथील वेर्णेकर कुटुंबीयांच्या मालकीचे असून, इ. स. १९९८ मध्ये या मंदिराचा जीर्णोद्धार केल्याचे समजते. या मंदिराचे नाव जरी 'श्री महादेव-महालसा-वैष्णवी' असे असले तरी गाभाऱ्यात मध्यभागी श्रीमहालसा देवीची मोठी शिलामूर्ती असून, खाली श्रीमहादेव आणि श्रीवैष्णवी देवी यांच्या लहान मूर्ती आहेत. येथे रोजची धार्मिक कार्ये व इतर उत्सव स्थानिक भक्तलोकांकडून साजरे केले जातात.

**श्रीक्षेत्र बसरूर :**

बसरूर हे गाव उडुपी जिल्ह्यातील कुंदापूरजवळ असून, येथे मोठे महालसा मंदिर आहे. पणजी, कारवार, मंगळूर, उडुपी, हुबळी येथून कुंदापूरला बसने जाता येते. तेथून सुमारे ८ कि. मी. अंतरावर बसरूर आहे. कोकण रेल्वेने गेल्यास कुंदापूर रेल्वे स्टेशनवर उतरावे लागते. तेथून बसरूर सुमारे ३ कि. मी. अंतरावर आहे.

सुमारे ४००-५०० वर्षांपूर्वी श्रीमहालसा देवीचे मंदिर फारच लहान होते, अशी येथे माहिती मिळते. कालांतराने त्यात वाढीव बांधकामे, विस्तार इत्यादी करत इ.स.१९९९ मध्ये मोठे मंदिर बांधून श्रीमहालसा देवीची पुन:प्रतिष्ठापना करण्यात आली. त्या वेळेस मोठा उत्सवही साजरा करण्यात आला. मंदिराच्या गाभाऱ्यात श्रीविठ्ठल,

श्रीव्यंकटरमण देवाच्या मूर्ती तसेच शालिग्राम संपुष्ठ इत्यादींची स्थापना करण्यात आली आहे. मंदिराचा सर्वच परिसर सुंदर व स्वच्छ असून प्रवेशद्वार, यज्ञमंडप, अग्निशाळा तसेच कलशकुंभाची विहीर इत्यादींनी युक्त आहे. मंदिराच्या जवळूनच वाहणाऱ्या वराही नदीमुळे हा परिसर अतिशय शांत व रमणीय बनला आहे. मंदिरात रोज नित्यनेमाने पूजा, आरती, नैवेद्य, अभिषेक, कुंकुमार्चना इत्यादी देवकार्ये केली जातात. तसेच नवरात्रोत्सव व इतर महत्त्वाचे वार्षिक उत्सवही स्थानिक भक्तांकडून साजरे केले जातात.

गौड सारस्वत ब्राह्मण शाखेच्या वैष्णवपंथी श्रीकाशीमठ संस्थानच्या स्वामींच्या मार्गदर्शनानुसार येथील मंदिरात वर्षभर धर्मकार्ये चालतात.

**श्रीक्षेत्र कोचांडी :**

मंगळूरपासून ७ कि.मी. अंतरावरील कोचांडी येथे श्रीमहालसा देवीचे मोठे मंदिर आहे. एका भक्ताला दृष्टान्त दिल्याप्रमाणे देवीच्या सांगण्यावरून मंदिर बांधण्यात आले आहे, असे येथे सांगितले जाते. या मंदिराचे बांधकाम १९८७ मध्ये झाल्याचेही येथील लोक सांगतात. मंदिराच्या प्रदक्षिणामार्गावर श्रीविघ्नेश्वर व श्रीभुवनेश्वरी देवी यांची लहान मंदिरे आहेत. येथील महालसा देवीच्या शिलामूर्तीचे वैशिष्ट्य हे की, देवीच्या चरणाखाली दैत्य नाही. तसेच डाव्या हातातील मुंडक्याच्या खाली रक्त चाटणारा वाघासारखा प्राणीही नाही.

मंदिरात रोज नित्यनेमाने नैवेद्य, पूजा, आरती, अभिषेक, कुंकुमार्चन इत्यादी सेवा केल्या जातात. तसेच महाविष्णू हवन, सर्वालंकार पूजा इत्यादी देवकार्येही येथे पार पडतात. देवीचा वार **रविवार** असल्यामुळे तो दिवसही उत्साहाने साजरा केला जातो. नवरात्रोत्सव, मार्गशीर्ष दशमी, प्रतिष्ठापना दिवस, माघ पंचमी इत्यादी वार्षिक उत्सवही साजरे केले जातात. श्रीविघ्नेश्वर व भुवनेश्वरी यांच्याही रोज पूजा-अर्चा होतात. काही महत्त्वाचे उत्सवही साजरे होतात.

मंगळूर हे शहर मोठे असल्यामुळे या परिसरातील कुळावे व भक्तगणांची या मंदिरात दर्शनासाठी रोजच गर्दी असते. श्रीकाशीमठ संस्थानच्या स्वामींच्या मार्गदर्शनानुसार मंदिरातील धार्मिक कार्ये वर्षभर साजरी केली जातात. मंदिराची अतिरिक्त माहिती www.mahalasabasrur.org या संकेतस्थळावर पाहावयास मिळते.

**श्रीक्षेत्र हरिखंडिगे :**

उडुपी शहरापासून ३० कि.मी. अंतरावरील हरिखंडिगे भागातील, अरण्यात इ.स.२००२ मध्ये या मंदिराचे भव्य संकुल बांधण्यात आले आहे. उडुपीवरून पेर्दुरमार्गे या स्थळाला जाता येते. येथेही देवीच्या दृष्टान्तानुसारच या भव्य मंदिराचे संकुल बांधले गेल्याचे सांगण्यात येते.

संकुलाच्या महाद्वारातून सरळ पुढे गेल्यानंतर डाव्या बाजूला वळून काही अंतरावरील दोन चौथरे चढून वर गेल्यानंतर भाविकांना सभामंडपात प्रवेश करता येतो. श्रीमहालसादेवीच्या मूर्तीच्या समोरच मंदिराच्या बाहेर त्याच उंचीवर श्रीमारुतीचे लहानसे मंदिर आहे. याशिवाय येथे संकुलात गुरुपाद स्थळ असून, श्रीमहागणपती आणि श्रीशंकराचे मंदिर, यज्ञमंडप व गुरुकुलही आहे. येथे एक छोट्या आकाराचे तळेही बांधण्यात आले आहे. श्रीमहालसा देवीच्या दैनंदिन पूजेबरोबरच येथे गरिबांसाठी शिक्षण, आरोग्यसेवा इत्यादी सामाजिक कार्यही चालते. येथील एकूणच परिसर अत्यंत शांत, रमणीय व प्रसन्न आहे.

मंदिरात नेहमीची देवकार्ये नित्यनेमाने केली जातात. मुख्य वार्षिक उत्सवही थाटामाटात साजरा केला जातो. दर **रविवारी** स्थानिक भक्त येथे जमतात. नेहमीच्या पूजा-अर्चेबरोबरच देवीसमोर भजन सादर करतात.

**श्रीक्षेत्र शिर्वमंचकल :**

उडुपीपासून सुमारे २० कि.मी. अंतरावर वसलेल्या शिर्वमंचकल या गावी हे महालसा मंदिर आहे. उडुपीवरून कटपाडीमार्गे या क्षेत्री जाता येते. पूर्वी या जागी इ.स.१९२६ मध्ये शेणॉय कुटुंबीयांनी बांधलेले छोटे मंदिर होते. ते त्यांच्या खासगी मालकीचे होते. परंतु १९६८ मध्ये शेणॉय कुटुंबीयांनी या मंदिराचे सर्वाधिकार श्रीसंस्थान काशीमठ यांच्याकडे दिल्यानंतर याच ठिकाणी मोठे मंदिर बांधण्यात आले. तेव्हापासून या मंदिराची भरभराट सुरू आहे. येथे रोज त्रिकाळ पूजा, आरत्या, नैवेद्य इत्यादी देवकार्ये नित्यनेमाने होतात, तसेच वार्षिक देवोत्सवही उत्साहात साजरे केले जातात. श्रीकाशीमठ संस्थानच्या स्वामींच्या मार्गदर्शनानुसार मंदिरातील व्यवस्थापन व धर्मकार्ये चालतात.

**श्रीक्षेत्र मुडबिद्री :**

मंगळूरपासून सुमारे ३५ कि.मी. अंतरावरील मुडबिद्री गावात श्रीमहालसा देवीचे मंदिर आहे. येथील दररोजची देवकार्ये व वार्षिक उत्सव साधारण इतर ठिकाणांप्रमाणेच होतात.

## केरळ

**श्रीक्षेत्र अंबलमेडु :**

केरळमधील कोच्ची (कोचीन) जवळ असलेले अंबलमेडु हे गाव एर्नाकुलम रेल्वे स्टेशनपासून सुमारे २० कि. मी. अंतरावर आहे. या गावात इ. स. १९९३ मध्ये एकूण आठ कुलदैवतांचे संकीर्ण मंदिरसंकुल बांधले असून, त्यात प्रामुख्याने श्रीमहालसा देवीचा समावेश करण्यात आला आहे.

## गौडदेश (बंगाल)

**श्रीक्षेत्र त्रिहोत्रपूर :**

स्कंद पुराणातील वर्णनानुसार सारस्वत ब्राह्मणांनी येथूनच श्रीमहालसादेवी गोमंतकात आणली, असा उल्लेख आहे. तेव्हा या गावी पुराणकालापासून श्रीमहालसा देवीचे मंदिर असावे असे वाटते.

**स्मरणाद्धरंते विघ्नान् सत्यं सत्यं वदाम्यह । महालक्ष्मीर्महादेवी जगन्माता महालसा ।।**
**शांतादुर्गा, महामाया नागेश: साग्रदेवत: । एवंच देवता: पुत्र हयानीता भार्गवेण तु ।।**
(सह्याद्री खंड - अध्याय ३ रा, श्लोक १९-२०)

म्हणजेच फार पुरातन काळी भगवान श्रीपरशुरामाने आपण निर्माण केलेल्या सप्तकोकणातील गोमांतक क्षेत्रात गौड देशाजवळील त्रिहोत्रपुराहून दशगोत्री सारस्वत ब्राह्मणांना त्यांच्या श्रीमहालक्ष्मी, महालसा, शांतादुर्गा, महामाया, नागेश इत्यादी कुलदेवतांसह सर्व धार्मिक कार्ये करण्यासाठी आणले होते. परंतु आज हे त्रिहोत्रपूर अस्तित्वात आहे की नाही हे सांगता येणार नाही. असल्यास त्याचे वर्तमानकालीन नाव काय, याचाही अंदाज लागत नाही.

## नेपाळ

**श्रीक्षेत्र काठमांडू :**

जगात एकमेव हिंदू राष्ट्र असलेल्या नेपाळच्या राजघराण्याची कुलदेवता श्रीमोहिनी-महालसा असून, तिचे भव्य मंदिर-संकुल काठमांडूत राजवाड्याजवळील मोहिनी चौकात आहे. परंतु हे राजघराण्याचे खासगी मालकीचे मंदिर असल्याने बाहेरील भाविकांना इथे प्रवेश नाही. खासगी मालकीच्या या मंदिरात बाहेरील भाविक भक्तांना देवीच्या दर्शनासाठी मनाई असल्यामुळे वर 'श्रीक्षेत्र' म्हणून या स्थळाचा उल्लेख केला असला तरी ही उपाधी तितकीशी संयुक्तिक वाटत नाही.

नेपाळचे राजघराणे हे महालसादेवीचे भक्त असल्याने तत्कालीन राजाने आपल्या राजवाड्याचे नाव महालसा देवीच्या नावावरून 'नारायणहिती' असे ठेवले आहे.

याशिवाय नेपाळमध्ये हिमालयात मुक्तिनाथ क्षेत्रात, कृष्ण गंडकी नदीच्या संगमाजवळील देवघाट परिसरात श्रीमोहिनी-महालसाचे पुरातन मंदिर आहे.

## संत साहित्यातील श्रीमोहिनी तथा म्हाळसा दर्शन

म्हाळसा हे मोहिनीचे पर्यायी नाव आहे. म्हाळसाबद्दलच्या अनेक प्रचलित कथांत प्रथम ती मोहिनी असल्याचे सांगितले आहे. समुद्रमंथन कथेत म्हाळसा प्रथम मोहिनीरूपात प्रकट झाल्याचे आपण खंडोबा-म्हाळसा विवाहकथेत तसेच 'आणखी एक समुद्रमंथन कथा' मध्ये पाहिलेच आहे. ब्रह्मपुराणांतर्गत समजल्या जाणाऱ्या गौतमीमाहात्म्यात नेवासे हे मोहिनी-शिवाचे वसतिस्थान असल्याचे नमूद केले आहे. नेवासे आणि म्हार्दोळ येथील म्हाळसाचे स्वरूप मोहिनीशी ऐक्य पावल्याचे आहे.

## संत ज्ञानेश्वर

ज्ञानेश्वरांनी 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथाच्या शेवटी रचनास्थळाचे वर्णन करताना म्हाळसादेवीचा गौरव पुढीलप्रमाणे केला आहे :

**त्रिभुवनैक पवित्र। अनादि पंचक्रोश क्षेत्र ॥**
**जेथ जगाचे जीवनसूत्र । श्रीमहालसा असे ॥**[१]

### श्री. बहिरा जातवेद

पुराव्याअभावी या कवीचा कार्यकाल सांगता येत नसला तरी ते ज्ञानेश्वरांनंतर अंदाजे शंभर वर्षांनंतर होऊन गेले असावेत असे मानतात. त्यांनी लिहिलेल्या ‘दशमटीका’ नामक ग्रंथात पुढीलप्रमाणे उल्लेख आला आहे :

**ऐसी संतकृपा जालि । तंव कुळदेवता स्मरलि ।**
**जे मुळ कुळें विस्तारलि । येथवरि ॥**
**जे उजवेनि अंगें भातारू । डावेनि अंगें जगविस्तारू ।**
**ब्रह्मादिकां नारि किं नरू । निर्धारवेना ॥**
**विरंचि म्हणे माझि माये । कवण पां जवं पाहों जाये ।**
**तवं दोहि तोचि आहे । जनकु जननी ॥**
**तरि प्रियुचि प्राणेस्वरि । येणें लाघवें घराचारिं ।**
**सांतवितसें नारि । बाळें जगाऐसिं ॥**
**ते समस्तां कुळां कुळदेवता । देवां दानवां नेमितां ।**
**जिचिये येकध्वर सत्ता । तिहिं लोकिं ॥**
**त्या योग्य अयोग्य जाणितलें । देव दैत्य समजाविले ।**
**ज्या अमृत विभागिलें । म्हाळसादेवि ॥**
**वाचाकमळनिचा कमळिं । येहि पांचै पुष्पांजुळि ।**
**ते कुळदेवता सांवळि । नमस्कारिली ॥**[२]

### संत एकनाथ

नाथांच्या ‘एकनाथी भागवत’, ‘रुक्मिणी स्वयंवर’, ‘भावार्थ रामायण’ या तिन्ही प्रमुख ग्रंथांत अनुक्रमे पुढीलप्रमाणे वर्णने आढळतात :

१) **समुद्रमंथनाच्या शेवटीं । क्षीरसागराचे तटीं ।**
**सुरा-असुरां कळी मोठी । अमृतासाठी मांडली ॥**
**तेव्हा अमृत विटे जें देखोनि । तो अवतार घेतला मोहिनी ।**
**तेणें असुरां सुरापानी । अमृतदानी देवांशी ॥**
**तेथें चोरूनि घेतां अमृतग्रासा । निवटीला राहूचा घसा ।**
**त्याच्या कंबधावरी म्हाळसा । वास नेवासा स्वयें केला ॥**[३]

२) **कृष्णाची आणीक काहाणी । तो स्त्री जाहला मोहिनी ।**
**सुरां असुरां ठकवूनी । महादेव मोहिला ॥**
**शेखीं जाहला तो म्हाळसा । वास केला त्या निवासा ।**
**त्याचेचि धर्मे राहू कैसा । रविचंद्राशी लागला ॥**[४]

३) **मोहिनी बैसूनि उरावरी। वास करी नेवासी।।**[५]

### श्री. गोपाळ कवी

हे कवी इ. स. १७६८ च्या सुमारास नेवासे येथे होऊन गेले. त्यांनी आपल्या ‘महाभारत’ या ग्रथांत म्हाळसाला वदन करताना लिहले आहे...

**पुण्योदकें या मेदिनी । प्रवरा नामें वरतटिनी ।**
**मोहिनीरूपें चक्रपाणि । साक्षात् असे तटाकीं ।।**
**महालया नामें सत्क्षेत्र । भूमंडळीं परमपवित्र ।**
**सर्व पुराणांतरीं चरित्र । वर्णिलें असें द्वैपायनें ।।**
**मोहिनीचरणपद्मभ्रमर । असे तेथें कविकिंकर ।**
**सेवूनिया प्रवरातीर । देवीलार्गी ध्यातसे ।।**

गोपाळ कवीच्या नावावर 'महालयामाहात्म्य' आणि 'मल्हारीमाहात्म्यं' हे दोन ग्रथ लिहिल्याची नोंद आढळते.

## श्री. यदूमाणिक

गोपाळ कवीनंतर होऊन गेलेले नेवासेचेच हे दुसरे कवी. त्यांनी लिहिलेल्या गणेशटीकेत प्रत्येक अध्यायाच्या सुरवातीस

**'श्रीमहागणपति-महालया-माणिकेश्वर- चरणारविंदेभ्यो नमः।'**

अशा प्रकारचे वंदन आढळते. ग्रंथात एके ठिकाणी ते लिहितात :

**देखोनि त्वत्कृपाकटाक्षासी । हर्ष जाला कुळदेवतेसी ।**
**ते मोहिनीनें आश्वासनासी । दिल्हें त्वद्गुणासी बोलावया ।।**

## संस्कृत पुराणग्रंथातील श्रीम्हाळसा दर्शन

**श्लोक :**

श्री महालसा-नारायणी-मोहिनीसंबंधी वेगवेगळ्या पुराणांतील महत्त्वाचे काही निवडक श्लोक :

१) **सर्व मंगल मांगल्ये शिवे सर्वार्थसाधिके ।**
**शरण्ये त्र्यंबके गौरी नारायणी नमोऽस्तुते ।।**

सर्व मंगलांचे मंगल असणारी, कल्याण करणारी, सर्व गोष्टी प्राप्त करून देणारी, आश्रय देणारी, त्र्यंबकरूपिणी, गौरी, नारायणी तुला नमस्कार असो.

२) **शरणागत दीनार्त परित्राण परायणे ।**
**सर्वस्यार्ति हरे देवी नारायणी नमोऽस्तुते ।।**

(श्रीमहालसा नारायणी स्तोत्रम - भविष्योत्तरपुराण)

शरण आलेल्या, दीन-दुबळ्यांच्या रक्षणात तत्पर असणाऱ्या, सर्वांचे दुःख दूर करणाऱ्या देवी नारायणी तुला नमस्कार असो.

३) **शृणु देव महाप्राज्ञ सर्व शास्त्र विशारद ।**
**कवचं महालसा देव्या महासिद्धिकरं परम् ।।**

(श्रीमहालसा कवचम्-भविष्योत्तरपुराण)

अतिशय बुद्धिमान, सर्व शास्त्रांमध्ये पारंगत असणाऱ्या देवा, ऐक, म्हाळसादेवीचे कवच मोठी सिद्धी प्राप्त करून देणारे आहे.

४) **शरणागत भक्तानां दुःखक्लेश विदारिके ।**
**ज्ञानाभय प्रदानेन पाहि सर्वान् महालसे ।।**

(श्रीमहालसा नारायणी स्तोत्रम्-भविष्योत्तरपुराण)

शरण आलेल्या भक्तांच्या दुःखांचे व क्लेशांचे विदारण करणाऱ्या म्हाळसे, ज्ञान व अभय देऊन सर्वांचे रक्षण कर.

५) **महालसा विष्णुशक्तीः महामाया महालया ।**
**ॐकाररूपा नित्याच नयानानंददायिनी ।।**

(श्रीमन्महालसा सहस्रनाम स्तोत्रम्- श्रीभविष्योत्तरपुराण)

म्हाळसा विष्णुशक्ती, महामाया, महालया, ओंकाररूप व डोळ्यांना नेहमी आनंद देणारी आहे.

६) **देवानाम् अभयम् दात्रीम् असुराणाम् विमोहिनीम् ।**
**वैष्णवीम् मोहिनीम् मायाम् वंदेऽ हम् त्वां महालयाम् ।।**

देवांना अभय देणाऱ्या, असुरांची मोहिनी असणाऱ्या वैष्णवी, मोहिनी, महालये, माये मी तुला नमस्कार करतो.

७) **श्री महालसास्तोत्रमिदम् परं शुभम् सर्वेष्टदं पुत्रधनादि साधनम् ।**
**भक्तिप्रदं विष्णुपदप्रदं तर्त जपेत्सदायुर्लभते च वांछितम् ।**

(श्रीमहालसाष्टकम्-ब्रह्मांडपुराण)

हे महालसास्तोत्र अत्यंत शुभ, पुत्र, धन इत्यादींचे साधन, सर्व इष्ट गोष्टी प्राप्त करून देणारे, भक्ती देणारे, विष्णपुद देणारे (त्याचा) जो सतत जप करेल त्याला आयुष्य व इच्छिलेले (सर्व) मिळते.

८) **विद्युलतासमाभांसा कोटिसूर्य समप्रभाम् ।**
**मोहिनीं मोहजननीं तां वंदेहं महालसाम् ।।**

(श्रीमहालसाष्टोत्तर शतनाम स्तोत्रम- मार्कंडेयपुराण)

विद्युल्लतेप्रमाणे तेज असणाऱ्या, कोटी सूर्याप्रमाणे प्रभा असणाऱ्या, मोहिनी, मोहाची जननी असणाऱ्या त्या म्हाळसेला मी नमस्कार करतो.

९) **या देवी सर्व भूतेषु विष्णूमायेति शब्दिता ।**
**नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः।।**

(श्रीदेवी स्तुती - श्रीदुर्गासप्तशती)

जी देवी सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी विष्णुमाया म्हणून म्हटली जाते तिला त्रिवार नमस्कार असो.

## मार्कंडेयपुराणातील श्रीमहालसाष्टोत्तर शतनामावली

**'अ'**

१) ॐ अट्टहासायै नमः
२) ॐ अम्बिकायै नमः

**'उ'**

३) ॐ उग्रतेजसे नमः

**'क'**

४) ॐ कनकाम्बरायै नमः
५) ॐ कमलायै नमः
६) ॐ कमलासनायै नमः
७) ॐ कलकलायै नमः
८) ॐ कलकलायै नमः
९) ॐ कलायै नमः
१०) ॐ कामिन्यै नमः
११) ॐ काल्यै नमः
१२) ॐ कुलांगनायै नमः
१३) ॐ कूष्माण्डयै नमः

**'ग'**

१४) ॐ गरुडध्वजायै नमः
१५) ॐ गरुडासनायै नमः
१६) ॐ गरुडासनायै नमः
१७) ॐ गारुड्ये नमः
१८) ॐ गौतम्य नमः
१९) ॐ गौतम्य नमः

**'च'**

२०) ॐ चक्रहस्तायै नमः
२१) ॐ चलितायै नमः
२२) ॐ चामुण्डाये नमः

**'ज'**

२३) ॐ जगन्मात्रे नमः
२४) ॐ जनरंजनदीपिकायै नमः
२५) ॐ जयन्त्यै नमः
२६) ॐ ज्वलितायै नमः

**'त'**

२७) ॐ तरुणीसुखायै नमः
२८) ॐ तुलस्यै नमः

२९) ॐ तुष्ट्यै नम:

**‘द’**

३०) ॐ दुर्गायै नम:

३१) ॐ दुर्गार्ति नाशिन्यै नम:

३२) ॐ देव्यै नम:

**‘न’**

३३) ॐ नारसिंहम्यै नमः

३४) ॐ नारायण्यै नम:

३५) ॐ निबर्हिण्यै नम:

**‘प’**

३६) ॐ पतितावनश्रीमुखायै नम:

३७) ॐ पद्मिन्यै नम:

३८) ॐ परब्रह्माण्यै नम:

३९) ॐ परमानन्दायै नम:

४०) ॐ पार्वत्यै नम:

४१) ॐ पूर्णपूर्णायै नम:

४२) ॐ पुष्ट्यै नम:

४३) ॐ पुष्टिदायै नम:

४४) ॐ पुरजान्यै नम:

४५) ॐ प्रकृत्यै नम:

४६) ॐ पांचाल्य नम:

**‘ब’**

४७) ॐ बद्धहस्तायै नम:

**‘भ’**

४८) ॐ भगिन्यै नम:

४९) ॐ भद्रायै नम:

५०) ॐ भस्मांग्यै नम:

५१) ॐ भास्करद्युत्यै नमः

५२) ॐ भीमायै नम:

५३) ॐ भृकुट्यै नम:

**‘म’**

५४) ॐ महालसायै नम:

५५) ॐ महातेजसे नम:

५६) ॐ महाकाल्यै नम:

५७) ॐ महामायायै नम:

५८) ॐ महारात्र्यै नम:

५९) ॐ महिषासुरनाशिन्यै नम:

६०) ॐ महिषासनायै नम:

६१) ॐ मन्त्राणाम् नम:

६२) ॐ मदिरेक्षणायै नम:

६३) ॐ माधव्यै नम:

६४) ॐ म्हालसायै नम:

६५) ॐ मुक्तांगायै नम:

६६) ॐ मेनकाये नम:

६७) ॐ मोहिन्यै नम:

६८) ॐ मोहजनन्यै नम:

६९) ॐ महापातयै नमः

**‘र’**

७०) ॐ रक्तबीजवधायै नम:

७१) ॐ रंजितायै नम:

७२) ॐ राजमान्यवशीकृततायै नम:

७३) ॐ ऱ्हीं बीजायै नमः

७४) ॐ रौद्रयै नम:

**‘ल’**

७५) ॐ ललनायै नम:

७६) ॐ ललितायै नम:

७७) ॐ लक्ष्म्यै नम:

७८) ॐ लोकमात्रे नम:

**‘व’**

७९) ॐ वरशासनायै नम:

८०) ॐ वरदात्र्यै नम:

८१) ॐ वरांगनायै नम:

८२) ॐ वज्रिण्य नम:

८३) ॐ वाराह्यै नम:

८४) ॐ वेदिकायै नम:

८५) ॐ विद्याय नम:

**‘श’**

८६) ॐ शंखासुर विनाशिन्यै नम: ८७) ॐ शिववन्दितायै नम:
८८) ॐ शुक्रवल्लभायै नम: ८९) ॐ शुभदायिन्यै नम:
९०) ॐ शुभप्रियाये नम: ९१) ॐ शुभोदयायै नम:
९२) ॐ शुद्धहस्ताय नम: ९३) ॐ शूलहस्तायै नम:

**'ष'**

९४) ॐ षष्ठ्यै नम:

**'स'**

९५) ॐ समिधायै नम: ९६) ॐ सरस्वत्यै नम:
९७) ॐ साध्यमात्रे नम: ९८) ॐ साध्व्यै नम:
९९) ॐ सावित्र्यै नम: १००) ॐ सिद्धायै नम:
१०१) ॐ स्त्रीरूपायै नम: १०२) ॐ सुभगायै नम:
१०३) ॐ सुरप्रियायै नम: १०४) ॐ सुस्वरूपायै नम:
१०५) ॐ सौभाग्यायै नम:

**'ह'**

१०६) ॐ हरिप्रियायै नम: १०७) ॐ हासिन्यै नम:

**'क्ष'**

१०८) ॐ क्षीरसिन्धुप्रियायै नम:

## म्हाळसाचे मूर्तिवैज्ञानिक स्वरूप व महानुभावी वाङ्मयातील म्हाळसा

नेवासे आणि म्हार्दोळ येथील मोहिनी म्हाळसाच्या मूर्ती चतुर्भुज आहेत. नेवासे येथील म्हाळसा-मोहिनीराजाच्या उजव्या दोन हातांत अनुक्रमे चक्र व गदा आहे, तर डाव्या हातात अनुक्रमे शंख व पानपात्र आहे. या मूर्तीचे वैशिष्ट्य असे की, ती अर्धनारी-नारायण रूपातील आहे.

म्हार्दोळच्या म्हाळसाच्या उजव्या एका हातात त्रिशूळ तर दुसऱ्या हातात दैत्याचे केस धरलेले आहेत. डाव्या दोन हातांत अनुक्रमे अमृतकलश आणि रक्त गळत असलेले दैत्यशिर आहे. म्हाळसाने चंडासुरदैत्याचा वध केल्याची कथा स्कंदपुराणातील सह्याद्री खंडातील 'वरुणापूर' महात्म्यामध्ये आढळते हे आपण पाहिलेच आहे.

खंडोबाची पत्नी या नात्याने अश्वारूढ खंडोबाच्या मागे बसलेली तसेच शेजारी स्वतंत्र मूर्तिरूपात किंवा स्वयंभू लिंगाच्या स्वरूपात म्हाळसाच्या मूर्ती आढळतात.

जेजुरी येथील मंदिरात असलेल्या म्हाळसाच्या तीन मूर्ती द्विभुजा असून, त्यांच्या उजव्या हातात कमलकलिका व उत्पल असून डावा हात गजहस्त मुद्रेत दाखविला आहे.

निमगावची म्हाळसा मूर्ती द्विभुज असून, मूर्तीच्या दोन्ही हातांत अनुक्रमे कमलकलिका व पानपात्र धारण केलेले आहे.

ज्याप्रमाणे म्हाळसाची मूर्ती खंडोबाच्या शेजारी असते, त्याप्रमाणे काही ठिकाणी ती स्वतंत्र मंदिरातही अधिष्ठित झालेली दिसते. मैलार-देवरगुड्ड, मैलार-बळ्ळारी अशा महत्त्वाच्या खंडोबाक्षेत्री तिची स्वतंत्र मंदिरे आहेत. या ठिकाणच्या म्हाळसाच्या मूर्ती चतुर्भुज असून प्रत्येक हातात अनुक्रमे खड्ग व पानपात्र आहे.

लीळाचरित्रातील चक्रधर आणि त्यांची शिष्या साधे यांच्या संवादावरून तत्कालीन म्हाळसा स्वरूपाचा मूर्तिवैज्ञानिक उलगडा होत जातो. तो असा :

एकदा चक्रधर नेवासे येथे मुक्कामी असताना सकाळचा पुजवस्वर आटोपल्यानंतर दर्शनासाठी म्हाळसा मंदिरात गेले. म्हाळसादेवीचे दर्शन करून गोपाळाच्या मंदिरात शिरताना ते उत्तरेच्या ओट्यावर थोडा वेळ बसले. तेवढ्यात साधे नावाची त्यांची शिष्या तिथे आली. स्वामींनी तिलाही देवदर्शनासाठी म्हाळसा मंदिरात पाठविले. साधे देवीदर्शन आटपून पुन्हा तिथे आल्यानंतर स्वामींनी तिला विचारले,

**''साधे हो, म्हाळसा देखिली ?''**

**''जी, देखिली. आहे काळी बीटीकी.''**

**सर्वज्ञें भणीतलें, ''तुमतें कोण्ही पुसैल, तया पुढें काई ऐसी सांघाल ? एक वेळ पाहा जा.''**

**''हो का ? जी.''**

**मागुती गेली, तवं श्रींघारू केलां असे, ऐसी देखिली. आली.**

**मग गोसावी पुसिले, ''साधे हो, म्हाळसी देखिली ?''**

**''जी, देखिली. पाटाऊ, साडले नेसली असे. पाटाऊ, चोळी, कांकणे, कळावीया, सानैपाची तानवडें, भवरीया, भांगु, टिळा,नाकी मोती-जी, ऐसी देखिली.''**

**सर्वज्ञें भणीतले, ''आता होए.''**[८]

या वर्णनावरून म्हाळसाची मूर्ती कृष्णपाषाणाची होती, हे समजते. तसेच, देवीला चढविल्या जाणाऱ्या वस्त्रालंकारांचा तपशीलही विस्ताराने मिळतो.

## संशोधकांच्या नजरेतून म्हाळसा

महाराष्ट्रात 'म्हाळसा' आणि कर्नाटकात 'माळव्व' या नावाने जरी ही देवी प्रसिद्ध असली तरी 'म्हालसा', 'म्हालसिका', 'म्हालजा', 'माळजदेवी', 'मालचिदेवी', 'मालचि', 'मालती', 'माळवी', 'महालया', 'महालाय' या नावांनीही ती ओळखली जाते.

कित्येक वर्षांपूर्वी श्रीक्षेत्र जेजुरी येथे निर्माण झालेल्या 'जयाद्रिमहात्म्य' नामक संस्कृत ग्रंथात 'म्हाळसा' नावाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे दिले आहे : 'म' म्हणजे ममत्व (माया), 'हा' म्हणजे हर्ष (आनंद) आणि 'ल' म्हणजे लसत्व (तेज).

'महिकावतीची बखर' या ग्रंथामध्ये 'महालय' नावाच्या एका कुलदेवतेच नाव आले आहे. ती म्हाळसाच असावी असे वाटते. महाराष्ट्र धर्मनिरूपणाचा प्रसंग 'म्हालजापूर' स्थानी घडल्याचेही या ग्रंथात सांगितले आहे.[९]

विख्यात महाराष्ट्रीय तंत्रभाष्यकार भास्करराय यांनी आपल्या 'ललितासहस्रनामभाष्यम्' या ग्रंथात 'महाल' नावाच्या दैत्याचा म्हाळसाशी संबंध कल्पिला आहे.[१०] तो पुढीलप्रमाणे :

**महालनामकं दैत्यं स्यति क्षपयतीति च ।**
**महालसा महालक्ष्मीरिति च ख्यातिमागता ॥**
**उपत्यकायां सह्याद्रेः पश्चिमोदधिरोधसि...**

परंतु ही केवळ कल्पनाच आहे; असा संबंध खंडोबा-म्हाळसाच्या कोणत्याही प्रचलित लोककथेत आढळत नाही. मात्र, खंडोबाच्या यात्रा-उत्सवांत मिरवल्या जाणाऱ्या काठ्यांना, विजयपताकांना 'महाल' असे म्हणतात. श्री. राजारामशास्त्री भागवत यांनी 'मराठ्यांच्या संबंधाने चार उद्‌गार' या आपल्या ग्रंथात 'मामेबहिणीशी लग्न करण्याची प्रथा' या विषयावर लिहिताना म्हाळसाचे स्पष्टीकरण असे दिले आहे :

'' 'म्हाळ' शब्द 'महालय' शब्दाचा अपभ्रंश समजतात पण 'महालय' शब्द अस्सल धर्मभाषेत आढळत नाही. तेव्हा 'म्हाळ्या' शब्दासच 'महालय' हे संस्कृत रूप ब्राह्मणांनी महाराष्ट्रदेशात आल्यानंतर दिले, हे म्हणणे अधिक सयुक्तिक होय. 'म्हाळसा' म्हणून एक देवी महाराष्ट्रात प्रसिद्ध होती व तीस 'महालया' असे ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरीत म्हटले आहे. या 'महालया' किंवा 'म्हाळ्या' देवीचा 'म्हाळ' या शब्दाबरोबर संबंध नसेल ना? 'म्हाळ' काही पितृ-पितामह-प्रपितामहांच्याच नावाने होत नाही, तर सर्व पितरांच्या नावाने होतो. अशा प्रकारची पितृपूजा प्राचीनकाळी रुमी लोकांमध्ये देखील होती. जर 'महालया' देवीचा 'म्हाळाबरोबर' संबंध असला, तर त्या देवीपुढे पितरांच्या नावाने मद्यमांस ठेवणे हा 'म्हाळ' शब्दाचा मूळचा अर्थ असावा.''[११]

श्री. ग. ह. खरे यांनी आपल्या 'महाराष्ट्राची चार दैवते' या ग्रंथात म्हाळसा नावाची उत्पत्ती 'मदालसा-महालसा-म्हालसा-म्हाळसा' अशी देऊन 'खंडोबाप्रमाणे याच्या बायकोचे नावही मूलतः प्राकृत नसून संस्कृत आहे; कारण ते प्राकृत समजले तर त्याचाही अर्थ नीट लागत नाही,' असे मत व्यक्त केले आहे.[१२]

डॉ. रा. चिं. ढेरे 'म्हाळसा' या नावाबद्दलचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे देतात : ''म्हाळसा ही मैलाराची पत्नी, म्हणून मैलार-मैराळ याची स्त्रीलिंगी रूपे मैळी-मैराळी अशी म्हाळसेच्या नाम-संभारात समाविष्ट झाली. तिची मूळची 'माळ-ज', 'माळ-चि', 'माळ-अव्व', 'माल्ह-आइसा' ही नावे तपासली तर त्यात सर्वत्र 'माल-माळ-माल्ह' हा अंश समान दिसतो. माल-माळ म्हणजे डोंगर किंवा उंच प्रदेश. 'मैलार' या नावाचे रहस्य जर 'मले'

वा 'मलै' या पर्वतवाचक द्राविड शब्दांशी संबद्ध असेल, तर 'माल-माळ' (=डोंगर) या शब्दापासून म्हाळसेचे नाव बनणे सुसंगतच ठरेल.''[१३]

शिवशक्ती आणि मोहिनी यांचे संदर्भ खंडोबा आणि म्हाळसाशी कसे निगडित आहेत याचा विस्तृत आढावा घेतला. त्यातल्या काही नोंदी, काही निरीक्षणे पुढे आणतात.

१. जिथे जिथे पुरुषाचे शौर्य शरीरबळ कमी पडले, तिथे तिथे स्त्रीने पुढाकार घेऊन शत्रूवर विजय मिळवला.

२. स्त्री हे केवळ सौंदर्यरूप नाही तर शक्तीरूप, वैभवरूप आणि चातुर्यरूप आहे.

३. जिथे जिथे स्त्री रूपाला वंदनीय मानले जाते, मातृरूपात पाहिले जाते, तिथे तिथे ती कुलदेवताच्या रूपात पुजली जाते.

वेगवेगळ्या पंथीय वाङ्मयात खंडोबावर टीका केल्याचे आढळते, त्याबद्दल आगामी प्रकरणात माहिती घेऊ.

[]

## संदर्भ - टिपा

✲ सदर प्रकरणातील म्हाळसासंबंधीच्या विविध चार कथांच्या सारांश लेखनासाठी श्रीमद्भागवत, मार्कंडेयपुराण, स्कंदपुराण, नारदपुराण, बह्मांडपुराण भविष्योत्तरपुराण, श्रीदुर्गासप्तशती, शिवलीलामृत तसेच अलिकडच्या काळात प्रसिद्ध झालेली याविषयीची छोटी गोष्टीरूप पुस्तके तसेच मौखिक परंपरेतून सांगितलेल्या लोककथांचा उपयोग झाला आहे.


१. दांडेकर श. वा. (सं.), ज्ञानेश्वरी, अ. १८ ओ. १७८२.
२. मराठी संशोधन पत्रिका, व. २, अं. २, पृ. - १९.
३. जोशी काशिनाथ अनंत (सं.), सार्थ एकनाथी भागवत, अ. ४- ओ. २३२-२३४.
४. (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर (सं.), श्रीसंत एकनाथ महाराज विरचित 'रुक्मिणी स्वंयवर', अ. २ - ओ. १८-१९.
५. एकनाथ विरचित भावार्थ रामायण, अ. ५० ओ. ५९-६३.
६. आजगावकर ज. र. (सं.), महाराष्ट्र कविचरित्र भाग - २, पृ. १०२.
७. मराठी संशोधनपत्रिका, व. ७, अं. १, पृ. १०.
८. तुळपुळे श. गो. (सं.), म्हाईंभटकृत लीळाचरित्र-उत्तरार्ध, लीळा, १८४.
९. भास्करराय विरचित, ललितासहस्रनामभाष्यम, पृ. ६९.
१०. राजवाडे वि. का. / केशवाचार्य (सं), महिकावतीची बखर उर्फ माहीमची बखर, पृ. १५, २४, ७१.
११. भागवत रामरामशास्त्री, मराठ्यांच्या संबंधाने चार उद्गार, पृ. - ७६.
१२. खरे गणेश हरी, महाराष्ट्राची चार दैवते, पृ. १६९.
१३. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. ६४-६५.

## मराठी व अन्य प्रादेशिक संतांची मत-मतांतरे

बहुजनांच्या एखाद्या लोकदैवताचा लक्षवेधी श्रद्धात्मक विकास होत असताना, समाजातून त्याचे भरण-पोषण होत असताना त्यावर टीका होणे हे त्या दैवताच्या विकसनप्रक्रियेतील अडथळा नसून त्याच्या लोकप्रियत्तेच्या व्यापकत्वाचे द्योतक असते. संबंधित दैवताच्या क्षेत्रस्थळी दर्शनासाठी दिवसेंदिवस वाढत जाणारे जनसामान्य भक्तांचे लोंढे, त्या संक्रमणातून संबंधित दैवताची उत्तरोत्तर वाढत जाणारी, 'बहुजन लोकप्रियता' यामुळे तत्कालीन काही संकुचित वृत्तीच्या व्यक्ती किंवा विशिष्ट वैचारिक शैलीच्या जनसमूहाकडून त्या दैवतावर टीका होण्याची दाट शक्यता असते. कधी कधी पूर्वसुरींचे अनुकरण करण्याच्या भावनेतूनही टीका केली जाते. त्यामागे स्वहेतू, विशिष्ट तत्त्वाचा आग्रह असे काहीच नसते. अर्थात, एखाद-दुसऱ्या व्यक्तीच्या टीकेमुळे त्या दैवताच्या लोकप्रियतेमध्ये अथवा त्याच्यावरील जनश्रद्धेमध्ये यत्किंचतही फरक पडत नसतो. मग टीका करणारी व्यक्ती कितीही मोठी असो. ती संत असो किंवा तथाकथित महात्मा ! उलट याचा परिणाम असा होतो की, संबंधित दैवताच्या भक्तीची कास धरून चालणाऱ्या समाजमनावर त्या दैवतावरील श्रद्धेचा पगडा व्यापक प्रमाणावर वाढत जातो. 'देव भक्तीचा भुकेला' या जनश्रद्धेनुसार समाज भक्तिभावाने त्या दैवताची सेवा करण्यातच 'भक्तिपुरुषार्थ' मानतो. टीका करणाऱ्या व्यक्तीबद्दल समाजमनात द्वेषभावना निर्माण होते.

यादवराजांच्या काळापासून थेट उत्तर पेशवाईपर्यंत विविध पंथ-संप्रदायातील अनेक संतांनी खंडोबाबाबत अव्दैत भक्तीचा पुरस्कार केल्याचे आढळून येते. ज्या कोणी संतांनी खंडोबावर टीका केली आहे, त्यांची संख्या अगदीच नगण्य म्हणजे बोटावर मोजण्याइतपत आहे. त्यातील, जनसामान्याच्या हृदयात अढळस्थान निर्माण केलेल्या दोन महत्त्वाच्या सुप्रसिद्ध संतांचा अपवाद सोडल्यास इतर संतांची नावे व त्यांची धर्मिक क्षेत्रातील कार्ये सामान्यजनाला माहीत नाहीत ही 'वस्तुस्थिती' आहे.

पंथ अथवा संप्रदायाच्या पातळीवर विचार केल्यास, काही अपवाद वगळता बहुतांशी पंथ-संप्रदाय अद्वैतवादाचा पुरस्कार करणारे आहेत. तरीही त्यांच्या अनुयायाचे दुसऱ्या दैवतावर टीका करण्याचे प्रयोजन समजत नाही. अद्वैत तत्त्वज्ञान सांगते, 'विविध रूपातल्या ईश्वराचे अत:स्वरूप एकच आहे,' मग 'दुसऱ्या दैवतावर टीका करणे म्हणजे आपण मानत असलेल्या कोणत्याही दैवतावर टीका करण्यासारखेच आहे,' हे या टीकाकारांना का समजू नये. इतरांचा पंथ, संप्रदाय किंवा उपास्य दैवत, कुलदैवतावर टीका करायची व आपण मानत असलेला पंथ, संप्रदाय किंवा उपास्यदैवत, कुलदैवताचा प्रसाराच्या अतिरेकी भावनेतून 'उदो, उदो करायचा, या धार्मिक-वैचारिक विकृतीतून संत, महात्म्येही सुटू शकले नाहीत ही विशेष अभ्यासनीय बाब आहे.

खंडोबावर टीका करणाऱ्या काही संत-महात्म्यांचा संप्रदाय, पंथ, त्याचे कार्ये आणि त्याच्या उलट त्या संताचे 'बौद्धिक आचरण' किंवा 'वैचारिक धार्मिकता' आहे. खंडोबावरील काव्यरचना करताना अपवाद म्हणून का होईना काही लोकप्रिय संतांचाही 'बौद्धिक गोंधळ' उडालेला दिसतोय. एकीकडे हे संत अद्वैत भक्तीतून आलेल्या आत्मानुभूतीतून खंडोबावर पारमार्थिक रूपके रचतात, तर दुसऱ्या ठिकाणी याच विश्वरूप परमात्म्यावर द्वैत भावनेतून टीका करताना दिसतात. कदाचित लेखनातील वैविध्य व विचारांमधील नावीन्य दाखविण्याच्या हव्यासापोटी अशा दुय्यम भूमिकेतून लेखन करण्याचे त्यांचे प्रयोजन असावे. परंतु अशा दुटप्पी भूमिकेमुळे रचनाकर्त्याच्या मूळ रचनेबद्दल जनसामान्यांच्या मनामध्ये संभ्रमाचे भाव उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीत.

## श्रीमहात्मा बसवेश्वर

बसवेश्वर हे स्वत: शिवभक्त होते. 'मार्तंडभैरव' हा शिवावतार आहे, हे सर्वज्ञात असूनही त्यांनी मार्तंडभैरवावर म्हणजेच मैलारावर टीका केली आहे.

बसवेश्वरांनी मैलारावर केलेल्या टीकेवरची वचने खालीलप्रमाणे आहेत :

(१) एका वचनात त्यांनी मरैया, बिरैया, अंतर, बेंतर, मलैया, कटैया अशा उपाध्या वापरून या देवताच्या 'बळी' मागण्याच्या प्रथेवर टीका केली आहे.[१]

(२) ठाकठाकीच्या मैलाराच्या आत सगळे सणच, वरपांगी रंग मात्र किती छानदार! कुत्र्याची झोप आणि अज्ञानाचे तप, यासारखी माझी मती, कुडलसंगमदेवा.'

(३) ठाकठिकीच्या मैलाराच्या श्रृंगाराप्रमाणे वेश्येचे उष्टे खाणाऱ्या दासाच्या संसारासारखी कुडलसंगमाच्या

शरणांना न जाणणाऱ्या हतभाग्यांची अवस्था आहे.'[२]

एकूणच त्यांच्या वचनसंग्रहात अशा प्रकारची काही वचने आढळतात.

बसवेश्वरांनंतर होऊन गेलेला तेराव्या शतकातला वीरशैव कवी हरिहर याने आपल्या शिवचरित्रपर ग्रंथात अकराव्या शतकातल्या 'शंकरदासिमय्य' नावाच्या शिवभक्ताने मैलारदेवाचा पराभव केल्याची चमत्कारिक कथा लिहिली आहे. तसेच सतराव्या शतकातील मल्लिकार्जुन नावाच्या कवीनेही आपल्या 'शंकरदासिमय्य' पुराणात शंकरदासिमय्याच्या चमत्कारिक पराक्रमाच्या कथा सांगताना मैलार-खंडोबाविषयी टीका केली आहे.

आश्चर्याची गोष्ट अशी की, कालांतराने खंडोबादेवाची बहुजन समाजातील वाढती लोकप्रियता पाहून वीरशैव संतांचा आणि ग्रंथकारांचा विरोध मावळला आणि ते खंडोबाला शिवस्वरूप मानू लागले. लिंगायत आणि त्यांचे पौरोहित्य करणारे जंगम यांनी अनेक ठिकाणी खंडोबाच्या पूजेअर्चेची व्यवस्था आपल्याकडे घेतली. बसवेश्वरांच्या खंडोबाविरोधातील वचनांकडे दुर्लक्ष करून या लोकांनी आपणहून स्वीकारलेली खंडोबा उपासना, यावरून एकच वास्तव पुढे येते. ते बसवेश्वरांच्याच शब्दांत सांगावयाचे झाल्यास असे सांगता येईल की, **'ईश्वरापेक्षा कोणी सान नाही.'**

(शब्दार्थ : शिवशरण -शिवभक्त. कुडलसंगमदेव - कृष्णमलप्रभा संगम येथील संगमेश्वर महादेव)

### श्रीचक्रधर

मूळ नाव हरपाळदेव. महानुभव पंथाचे संस्थापक (बारावे शतक). त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा शिष्य म्हाइंभट्ट (मराठीतील आद्यचरित्रग्रंथकार) यांनी गावोगाव फिरून चक्रधरांच्या 'अवतार लीळा' गोळा केल्या आणि त्याचे संकलन करून 'लीळाचरित्र' हा ग्रंथ तयार केला. साडेनऊशे लीळांच्या या ग्रंथाच्या उत्तरार्धात एके ठिकाणी श्रीचक्रधर यांनी आपली शिष्या महदाइसेला कलिधर्मनिरूपण करताना

**''कलियुगीची अंती शिवालये, विष्णुग्रहे लोपती**
**मैराळक्षेत्रपाळाचिया स्थापना होती ''**[३]

अशी खंत व्यक्त केल्याचे म्हाईंभटांनी उद्धृत केले आहे.

खंडोबावर या पंथाने टीका करण्याची कारणे पुढीलप्रमाणे सांगता येतील :

१) बाराव्या शतकात यादवकाळाच्या उत्तरार्धात वरील पद्यपंक्तीवरून आणि ज्ञानदेवांच्या नावावर असलेल्या 'योगवासिष्ठ्या'तील खंडोबा वर्णनावरून असा निष्कर्ष काढता येईल की, त्याकाळी खंडोबाची उपासना बहुजन समाजात चांगलीच रूढ झाली असावी. समाजात कुळधर्म-कुळाचाराचा विधी नजरेत भरण्याइतपत होत असावा. त्यामुळे भक्तीचे प्रतीक म्हणून काही ठिकाणी खंडोबा मंदिराची स्थापना होण्यास सुरुवात झाली असावी .

२) महानुभव पंथ हा द्वैती आहे. आत्मा व परमात्मा वेगळा मानणारा आहे. त्यामुळे संप्रदायबाह्य देव-देवतांना तुच्छ मानणारा आहे.

### संत एकनाथ

संत एकनाथांनी भारुडातून वाघ्या-मुरळीवर पारमार्थिक रूपके रचली आहेत, हे सर्वश्रुत आहेच. 'एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, रुक्मिणी स्वयंवर' या तिन्ही प्रमुख ग्रंथांत म्हाळसाबद्दलचे काही स्तुतिवाचक उल्लेख आले आहेत. एकनाथांसह अनेक मराठी संतांच्या भक्तिवाङ्मयात खंडोबाबद्दलची काही साम्यस्थळे आढळतात. शेख महंमद श्रीगोंदेकर, मुक्तेश्वर, महिपती अशा मोजक्या संतांचा अपवाद सोडल्यास अनेक संतांनी खंडोबावर पारमार्थिक रूपके रचून खंडोबाभक्तीला अद्वैत भक्तीचे अधिष्ठान प्राप्त करून दिले आहे.

वाघ्याबद्दल :

**अहं वाघ्या सोहं वाघ्या प्रेमनगारा वारी ।**
**सावध होऊनि भजनी लागा देव करा कैवारी ।**
**मल्लारीची वारी माझ्या मल्हारीची वारी ।**

किंवा मुरळीबद्दल :

**मन घुंगरू वाजे छुनछुन । नाचत जेजुरी गेले ॥**
**गड देखिला जेजुरी । आत्मा नांदतो मल्हारी ।**
**जाऊनि बसले मी मांडीवरी । एका जनार्दनी बोले ।**

असे खंडोबाचे गुणगान गाणारे नाथमहाराज खंडोबा उपासनेबद्दल टीकात्मक सूर काढतात.

**पुजिती खंडेराव पतर भरिती । विठ्ठल विठ्ठल न म्हणतीं अभागी ते ॥**
**लावूनी भंडार दिवटा घेती हातीं । विठ्ठल म्हणतां लाजती पापमति ॥**
**ऐसियासी भाव सांगावा तो कवण । एका जनार्दनी काया वाचा मरण ॥**[४]

हा निषेध खंडोबाचा नाही, त्याच्या भक्तांचा आहे.

**मैराळ देव कानडे । करती राक्षसांच्या दाढ्या खांडे ।**
**आरसा न दाविती जयापुढे । तोचि रोकडे बुकाळी ॥**[५]

किंवा

**कामखंडेरायापुढे । एक कुतरे झाले गाढे ।**
**कोण्ही आलिया दारापुढे । वसवसूनि उठती ।**[६]

याशिवाय, आणखी एका ठिकाणी गोंधळावरील 'फुलवरा' नावाची रचना लिहून नाथांनी खंडोबा आणि मुरळीवर टीका केली आहे.

**खंडोबासी नवस करूनी मुरळी होऊनी बैसले वो ।**
**आपुले जे का सुखे सज्जन ते विवंचुनी भरी भरली वो।**
**वारी मागता पोट भरेना बहू श्रम पावले वो ।**
**श्वानाचीये परी वृथा गुरगुरी ।**
**जाय चाचरी ॥**
**परी तो हरि नाही देखिला ॥**[७]

या फुलवऱ्यात भैरव, मुंजाबा, आदिशक्ती भवानी, मेसाई, भैरव यांच्यावर आणि त्यांच्या उपासकांवर नाथांनी अशाच प्रकारे टीका केली आहे आणि विठोबालाच जगदंबा मानून त्याचे गुणगान गायिले आहे. जगदंबा म्हणजे आदिशक्ती भवानी. एकीकडे नाथ विठ्ठलाला जगदंबेच्या रूपात पाहून गुणगान गात आहेत, तर दुसरीकडे आदिशक्ती जगदंबा रूपातल्या भवानीवर टीका करित आहेत.

### संत तुकाराम

**अनंत युगाचा देव्हारा ।**
**निज बोधाचा धुमारा ।**
**अवचित भरला वारा ।**
**या मल्हारी देवाचा ॥**

किंवा

**या देवाचे भरता वारे ।**
**अंगी प्रेमाचे फेफरे ।**
**गुरगुर करी वेडे चारे ।**
**पाहा 'तुके' भुंकविले ।**

असे लिहिणाऱ्या जगत्‌गुरू तुकोबारायांची खंडोबावरील टीकात्मक रचना एके ठिकाणी आढळते. ती अशी :

नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मणाबाई ॥१॥
बाळिया माझा पंढरीराव । जो या देवांचाहि देव ॥२॥
रंडी चंडी शक्ति । मद्य मांसारे भक्षिती ॥३॥
**बहिराव खंडेराव । रोटी सुटीसाठी देव ॥४॥**
गणोबा विक्राळ । लाडू मोदकांचा काळ ॥५॥
मुंजा म्हैसासुरे । हे तो कोण लेखी पोरे ॥६॥

वेताळे फेताळे । जळो त्यांचे तोंड काळे ॥७॥
तुका म्हणे चित्ती । धरा रखुमाईचा पति ॥८॥[८]

या व्यतिरिक्त तुकोबांची आणखी एक टीकात्मक रचना आढळते ती अशी :

साधुच्या दर्शना लाजशी गव्हारा। वेश्येचिया घरा पुष्पे नेसी ॥१॥
वेश्या दासी **मुरळी** जगाची ओवळी । ते तुज सोवंळी वाटे कैशी ॥२॥
तुका म्हणे आता लाज धरा बुच्या । टाचरांच्या कुच्या मारावेगी ॥३॥[८]

## मुस्लिम संत शेख महंमद

शेख मंहमद यांचा 'योगसंग्राम' हा प्रमुख ग्रंथ असून, त्यांनी या ग्रंथात अनेक हिंदु देवता आणि त्यांच्या उपासना पद्धतीवर कडाडून टीका केली आहे. विशेषकरून खंडोबा आणि मुरळ्यांच्या पद्धतीवर त्यांचा विशेष कटाक्ष आहे.[९] मुरळ्यांवर प्रखर शाब्दिक हल्ला चढविताना ते म्हणतात :

**ज्या मुरळ्या करिती अनाचार । चालविती उन्मत्ताचे घरचार ।**
**त्यांस म्हणती लावी भंडार । आपलेन हाती ॥**
**पुण्याचार न ये मुरळ्यांच्या चित्ता । भलत्याच्या होतील कांता ।**
**त्याचा हात भाळास लाविता । कोण तरला सांग बा ॥**
**भाळ बाडवी, पुढें ओढवी । म्हणे तूं आपल्या हातें लावी ।**
**मुरळी डोळे घालूनी खुणावी । त्या मुरळ्यालागूनी ॥**
**जे आपल्या कुळस्वामीची मुरळी । तिसी कैसे खेळती ढवाळी ।**
**ऐसी कलियुगीं प्रभावळी । पापाची वर्तते ॥**
**मुरळ्या कुळस्वामीच्या दासी । त्यांसी रमतां कंटाळेतना अपेसी ।**
**स्वामीही करेना काही त्यांसी । कां सत्वें सांडवला ।**
**कुळकन्येस बोल लाविला मल्हारीनें । ऐसे विटंबिली त्याच्या देवपणें ।**
**तो पुजिल्या केंवी तुटती बंधनें । लक्षी चौऱ्यांसीची ।**

याशिवाय, आणखी एका ठिकाणी ते म्हणतात :

**मुरळी म्हणजे हे कल्पना । श्रीहरि न ये तिच्या मना**
**जन विषयलंपट जाणा । तिच्या गुणासंगें ॥**
**सडेसमार्जन घातली रांगोळी । बैसो जाता करून आंघोळी ।**
**तो वासना करी खंदळी । सवे पाच हीन ॥**
**ऐशी मुरळी अंगसंगे उदास । वागवून म्हणविती हरिदास**
**ते सर्व विधीचा करी नाश । चहू अवस्था माजी**
**मुरळी वासना अविचारीन । तिच्या संगे देवी देवताभजन**
**ते उघड करून सांगेन । सभेश्रोत्या लागूनी**

''हिंदु देवतांप्रमाणे इस्लाम धर्मातही काही पंथीय मुसलमानांत दर्ग्याला मुली अर्पण करण्याची प्रथा आहे. अर्पण केलेल्या मुलींना 'अच्छुती' म्हणतात. उत्तर प्रदेशातील लखनौ शहरात आजही या अच्छुतीचं वास्तव्य असून 'वेश्याव्यवसाय' हाच त्यांच्या उपजीविकेचा मार्ग आहे. इस्लाम धर्मातही मुलीचं लग्न कुराणाशी लावून त्यांना देवदासी बनविलं जातं. तो विधी लग्नासारखाच असतो. काझी मुलीच्या कानात काहीतरी मंत्र सांगतो. मग निकाहाचं पठण केलं जातं. त्यानंतर 'मुबारक हो ! मुबारक हो !' असं म्हणतात. 'पवित्र कुराण' मुलीच्या ओटीत घातलं जातं. त्यानंतर काझी 'दुल्हनने दुल्हेका स्वीकार कर दिया' असं सर्वांना सांगतो. त्या देवदासी मुलीला 'बीबी' असं म्हणतात. एकदा पवित्र कुराणाबरोबर लग्न झाल्यानंतर तिला पुन्हा पुरुषाबरोबर दुसऱ्यांदा लग्न करता येत नाही. तिला कुराणाचं भय घातलं जातं : 'तू जर पुन्हा विवाहाची इच्छा व्यक्त केलीस, तर पवित्र कुराणाचा तुला शाप लागेल. मग सात जन्म घेऊन सुद्धा तुला ते पाप फेडता येणार नाही.' त्या भीतीमुळे ती मुलगी जन्मभर अविवाहित राहते. ती लोकांची भोगदासी बनते आणि वेश्याव्यवसाय करते.''[१०]

पुढे या संताने खंडोबाच्या निंदेसाठी असेही लिहिले आहे की :

**मल्हारीपासून अनुसंधान । सांगता राहिले होते वचन ।**
**ते सांगो आरंभिले देवतालक्षण । संत श्रोत्याप्रति ।।**
**कामव्यसनी मल्हारी वेडा । धुंडित होता धनगराच्या पेडा ।**
**तो पुजिल्या केवी फिटे खोडा । लक्ष चौऱ्याशींचा ।।**
**जो नवसे दिवटी हळद मागे । देऊळे करा म्हणऊन भक्तांस लागे ।**
**चित्रलेपास नेसवी लुगडी झगे । आपण लेवो नेणे ।।**
**चिताऱ्याकुन करविले आपणास । तो केवी तारील पुजारियास**
**भंडार नाव ठेवी हळदीस । वेडेचार करूनीक ।।**
**निर्शून्यास भांडार बोलिजे वचनी । जेथुनी साकारल्या खाणी वाणी ।**
**साकार साठवे त्यात जाऊनी । बीजा माजी वट जैसा ।।**
**निर्शून्यास बोलिजे भांडार । येर भांडार म्हणता अनाचार ।**
**लटका बागूल म्हणवुनिया झकविले पोर । तदन्याय जने केला ।।**

वरील रचनेवरून असे निदान करता येईल की, त्या काळी चिताऱ्यांनी बनविलेले कपड्यांचे मुखवटे करून मूर्तींना सजविण्याची प्रथा प्रचलित असावी. कर्नाटकातील बाराव्या शतकातील संत महात्मा बसवेश्वर यांच्या वचन साहित्यातही तसा उल्लेख आढळतो. 'योगसंग्रामात' वेगवेगळ्या पानांवर वेगवेगळ्या प्रसंगरचनेत खंडोबावरील टीका निदर्शनास येतात. त्या अशा :

**(१) खंडेराव असे नापिक होऊनि । तराळी जगदंबा वाहे पाणी ।**
**दरबार झाडी ती भसो मायराणी । भैरव गस्ती करीतसे ।।**

**(२) सुवर्णाचा खंडेराव तेज्या स्वार । सुवर्णाची बाणाई पाठीशी सुंदर ।**
**घेऊन पळता दिसे जाहीर । तेथे अनाचारी कवण ।।**
**सुवर्णाची केली शुकरे श्वाने । ते पदरी बांधिली आंळगिल्याने ।**
**सराफे घेतली सोनेपणे । विप्रयातीचा असोनी ।।**
**ऐसा ईश्वर कोंदला असे विश्वरूपे । तेथे कोणे म्हणावी इंद्रियपापे ।**
**जैसी भिंतीशी शोभती चित्रलेपे । तैसे निर्गुणी सगुण ।।**

**(३) जधी आदितवार तधी म्हणती । आजि आम्ही पूजू म्हाळसापति ।**
**पेंबरीचा कुळस्वामी सति । जेजुरीचा न होय ।।**
**प्रत्यक्ष एक असता खंडेरावो । त्यास वेगळा धरिती भावो ।**
**देखता थोर पडलासे संदेहो । चंचळ भक्तालागी ।।**

**(४) घडिक दोम दोम ऐसे पुकारी । घडिक म्हणे एळकोट मल्हारी ।**
**घडिक उदो उदो होणे अविचारी । परब्रह्म सांडोनिया ।।**

**(५) घडिक स्मरतसे मल्हारीराव । घडिक म्हणे हा नागोबादेव ।**
**घडिक म्हणे ब्रह्मा विष्णू शिव । कुळस्वामी माझा ।।**

**(६) मूढ घडिक सूर्य नमस्कारी ।घडिक भुंके मागतसे करी ।**
**घडिक चांग बोला पुकारी । जोगेश्वरी भैरवांचा ।।**

**(७) पुढे षष्ठी आलिया उपरी । सडेसमार्जने करी ।**
**मुरळ्यांची पत्रे भरी । पालथा पडोनिया ।।**

(८) **ऐसे सांडोनिया श्रीपती । लेकीस करतो मुरळी भूपति ।**
**कुमारास श्वाने करून भुंकविती । मनुष्य असता ॥**
**हळदीभंडार विकी वाणी । तैसी देवातंची केली झकवणी ।**
**जेथून साकारल्या खाणी वाणी । त्यास भांडार बोलिजे ॥**
**वाणी ईश्वराविण नाही तत्वता । जेथे इच्छिल्या केण्या नाही न्यूनता ।**
**हळद मागती भक्तांसी देवता । भांडार म्हणऊनी ॥**

शेख महंमद यांच्या इतर ग्रंथीय रचनांमध्येही खंडोबा, वाघ्या-मुरळी यांच्यावर टीका केल्याचे आढळते. वा. सी. बेंद्रे संपादित 'शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह' यामध्ये वेगवेगळ्या ठिकाणी विखुरलेल्या स्फुट रचना पुढीलप्रमाणे :

(१) **वाघे भुते मुरळ्या । शुक्री खडो खंडोबाच्या वोविळ्या ।**
**त्यांसी खेळत रळ्या, भक्तें भोगुनी ॥** (पृ. ३३)

(२) **न हो बसव्या मुरळ्या । शुक्री खंडोबाच्या वोविळ्या ।** (पृ. ५६)

(३) **श्रीहरी न ये जयाच्या चित्ता । त्यास गांजिती देवता ।**
**मनुष्यास केलें वाघा भुता । मुंकी श्वानाची भुंकवी ॥** (पृ. ५७)

(४) **दासी वेश्या मुरळी । सदा ती ओवळी ।**
**ते तुज सोवळी । जाली कैसी ॥** (पृ. ८८)

(५) **वेश्या अराधे नी मुरळ्या गोसाविणी** (पृ. ९३)

(६) **भक्ताचे लेकीकून मल्हारी, मागवी वारी वाघा वाजवी घोळ**
**मनुष्याच्या आकारें असती, श्वान म्हणविती पिवळें करूनि भाळ** (पृ. १०९)

महाराष्ट्रीय संतप्रभावळीत मानाचे स्थान असलेल्या शेख महंमदानी अशा रीतीने खंडोबावर, वाघ्या-मुरळीवर टीका केलेली आहे. इतिहासपुरुष औरंगजेब बादशाहाने जेजुरीच्या खंडोबाला 'मल्लुखान' म्हंटले आणि शाहिस्तेखानानेही पालीच्या खंडोबाचा 'अजामतखान' म्हणून गौरव केला आहे. हे सर्वज्ञात आहे.

### संत मुक्तेश्वर

मुक्तेश्वरांनी आपल्या 'संक्षेप रामायण'मध्ये (सुंदरकांड) मैराळ विडंबन पुढीलप्रमाणे केले आहे :

**लोभमल्हारीचा चोहटा । दांभिक वाघे हळदीकुटा ।**
**मिथ्याचारें लावोनि पोटा । साठीं श्वान जे झाले ॥** [११]

### संत महिपती

अनेक संतांनी खंडोबा आणि विठ्ठल ही एकाच परमात्म्याची दोन भिन्न रूपे आहेत, असे मानले. परंतु महीपती बोवांनी आपल्या 'भक्तविजय' या ग्रंथामधील अठ्ठाविसाव्या अध्यायात खंडोबावर टीका केली आहे, ती अशी :

**मार्तंड नापिक होऊन । श्मश्रु करे स्वकरेंकरून ।**
**गर्दभ राखी गजवदन । मनांत लाज न धरितां ॥** [१२]

महिपतीबोवांचे परमार्थ गुरू तुकाराममहाराज

**या देवाचे भरता वारे ।**
**अंगी प्रेमाचे फेफरे ।**
**गुरगुर करी वेडे चारे ।**
**पाहा तुके भुंकविले ।।**

असे वाघ्यावर पारमार्थिक रूपक रचून खंडोबाच्या भक्तीप्रेमापोटी स्वत:ला खंडोबाचे कुत्रे (वाघ्या) म्हणूवन घेतात आणि तुकारामांचे शिष्य असलेले महिपतीबोवा त्याच परमात्म्यावर टीका करताना दिसतात.

महिपतीबोवांचे आराध्य दैवत विठ्ठल. भगवान विष्णूचा एक अवतार विठ्ठल तर दुसरा अवतार राम. महिपतीबोवांच्या अगोदर होऊन गेलेले, तुकारामांचे समकालीन समर्थ रामदास हेसुद्धा विठ्ठल आणि खंडेराय यांचे सख्यत्व वर्णन करताना म्हणतात :

**रामनाम जपतो महादेव ।**
**त्याचा अवतारी हा खंडेराव ।**

खंडोबावर टीका करणाऱ्या वरील भागवतधर्मीय संतांच्या कारकिर्दीचा विचार केल्यास पहिली टीका एकनाथांनी केली. नंतर, बसवेश्वरांच्या वचन संग्रहातील टीकेला काहीसे साम्य दर्शविणारी टीका (त्यावेळच्या देवतांना चढविले जाणारे कपड्याचे मुखवटे या उल्लेखावरून) शेख महंमदांनी केली. नाथमहाराज आणि शेख महंमद हे समकालीन होत. मात्र, नंतरच्या कवींचा विचार केल्यास पहिल्या पिढीचे दुसऱ्या पिढीने अनुकरण केले असा निष्कर्ष निघू शकतो.

## ख्रिस्ती साहित्यातील टीकात्मक खंडोबा

ख्रिस्ती संत किंवा ख्रिस्ती साहित्यिकांनी कायमच आपली लेखणी आणि विचार स्वधर्म प्रचार-प्रसारासाठी खर्ची घातली. हा प्रसार-प्रचार करताना स्वधर्माचे मंडन आणि परधर्मीय तत्त्वांचे खंडण हेच तत्त्व जगभर अवलंबिले आहे. खंडोबाबाबतचे त्यांनी निर्माण केलेले साहित्यही याला अपवाद नाही.

रेव्हरंड जे. मरे मिचल नावाच्या स्कॉटिश मिशनऱ्याने 'खंडोबाची गोष्ट' नावाचे छोटे विडंबनात्मक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. तो धर्मप्रसाराच्या हेतूने इ. स. १८३८ च्या नोव्हेंबर महिन्यात भारतात आला. 'महाराष्ट्रात भाषा अवगत असणे अपरिहार्य आहे', हे ओळखून त्याने त्याचवेळी इंग्रजी भाषेचे जाणकार कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या मार्गदर्शनाखाली मराठीचे रीतसर शिक्षण घेतले. मराठीतून ग्रंथनिर्मिती करणे हा मराठी शिकण्यामागील त्याचा मूळ उद्देश होता. 'आळंदीची यात्रा', 'पंढरपूरची यात्रा', 'खंडोबाची गोष्ट' ही त्याची विडंबनात्मक पुस्तके यात्रातून ख्रिस्ती धर्माचा प्रचार करण्याच्या हेतूने लिहिलेली आहेत. त्यातही त्याच्या टीकेचा जास्त भर 'खंडोबा'वर आहे. लेखक स्वत: गंगाधरशास्त्री नावाच्या कोकणस्थ ब्राह्मण मित्राकडे बसला आहे. तिथे आणखी एक देशस्थ ब्राह्मण बसला आहे. तेवढ्यात शास्त्रीबुवांकडे एक ओळखीचा कुणबी येतो. भंडाऱ्याने अंगभर माखलेला आणि गळ्यात रूप्याचा गाठा बांधलेला, अशा त्या कुणब्याला पाहताच हा लेखक त्याच्याविषयी शास्त्रीबुवांना प्रश्न विचारू लागतो आणि त्यांच्यामध्ये संवाद चालू होतो. साधारण अशा स्वरूपाची 'खंडोबाची गोष्ट' या पुस्तकाची बैठक आहे. या प्रश्नोत्तरांच्या संवादातून मरे मिचेलने खंडोबाची उपासना कशी त्याज्य आहे, हे पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. पुढील दोन उतारे त्याच्याच शब्दांत.[१३]

**खंडोबाबद्दल**

**भटजीबावा :** जर आम्ही काही कुलधर्म चुकलो तर तो लागलीच पीडा करितो.

**साहेब :** या प्रकारची पीडा करणे हे कोणाचे काम ? हे भुताचे काम, असे तुमचे लोक बोलत असतात नाही बरे?

**भटजीबावा :** होय, बोलत असतात खरे.

**साहेब :** तर मग हा तुमचा देव खंडोबा भूत आहे किंवा देव आहे ?

**शास्त्रीबाबा :** या बोलण्यावरून तर तो भूत असावा, असे मला वाटते.

**मुरळ्यांबद्दल**

<u>**साहेब :** ते लोक (वाघ्या-मुरळी) लग्न करीतात की काय ?</u>

**पाटील (कुणबी) :** वाघे लग्न करितात. मुरळ्या लग्न करीत नाहीत.

**साहेब :** त्या लग्न करीत नाहीत, हे योग्य आहे ?

**पाटील :** त्या देवाच्या बायका आहेत ना? त्यांचे लग्न खंडेरावाशी लागलेच आहे. असा नवरा मिळाला असता, दुसरा का करावा बरे ?

**साहेब :** हे काम चांगले आहे. 'शेताआड चोरी आणि नवऱ्याआड छिनाली' त्यांनी खंडोबाचे नाव करून इच्छेस येईल त्याप्रमाणे वागावे, नाही बरे ? शास्त्रीबावा, त्या पतीव्रता तरी असतात काय ? सर्व मुरळ्या व्यभिचारणी असतात असे माझ्या ऐकण्यात आहे, हे खरे काय?

**शास्त्रीबावा :** साहेब, आपण म्हणता ती गोष्ट खरी. त्या वाईट असतात.

**साहेब :** पाटील, अशा मुरळ्यांचे जागरण ऐकून आपल्या बायकांचा नाश करावा हे तुम्हास योग्य वाटते ना ?

अशा प्रकारच्या संवेदनात्मक विडंबनावरून कोकणस्थांची देशस्थांच्या खंडोबाविरुद्ध साक्ष काढण्याचा ख्रिस्ती मिशनऱ्यांचा कावा लक्षात येतो. फादर क्रुवा या ख्रिस्ती धर्मप्रचारकानेही आपल्या 'पिटर पुराणा'त अनेक हिंदू दैवतांची विडंबने केली आहेत. यावरूनच त्या काळीही खंडोबादेवाची लोकप्रियता किती शिगेला जाऊन पोहोचली होती, याचा अंदाज येतो.

पुर्वीच्या काळी ख्रिस्ती धर्मामध्येही काही अनिष्ठ प्रथा रूढ होत्या, हे पुढील उताऱ्यावरून लक्षात येते.

''प्राचीन काळी इजिप्त, बॉबिलोनिया, सीरिया, अरेबिया, फोनेसिया इत्यादी देशांतील लोक कोणत्याही स्त्रीशी लैंगिक संबंध ठेवणे हा देवीच्या पूजाविधीतील एक महत्त्वाचा धार्मिक विधी मानत असत. जेरुसलेम देशातही ही प्रथा असल्याचे पुरावे ख्रिश्चनांचा धार्मिक ग्रंथ असलेल्या 'बायबल'मध्ये आढळतात. 'मेरी' ही कुमारिका एका चर्चला अर्पण केलेली देवदासी होती. ती वयाच्या चौदाव्या वर्षापर्यंत चर्चमध्येच राहत होती. त्या 'कुमारी'ला जोसेफ याच्याबरोबरील संबंधातून मुलगा झाला. तोच मुलगा पुढे देवाचा पुत्र 'येशू ख्रिस्त' म्हणून प्रसिद्धीस आला, असा भाग बायबलमध्ये आहे. 'The Decease Joseph' या ग्रंथातही या घटनेची नोंद आढळते. बायबलमधील 'जुना करार'मध्ये त्याचा पुरावा सापडतो.

मध्ययुगीन काळात ख्रिस्ती धर्मात जोगतिणीसारखाच प्रकार असलेल्या 'नन्स' यांची धार्मिक कार्यासाठी एक धर्मसंस्था स्थापन झाली. त्या नन्स आजन्म अविवाहित राहत. त्यांचे वास्तव्य चर्चमध्येच असे. त्यांना ख्रिस्तवधू मानलं जाई. फादर म्हणजे 'धर्मगुरू' या नन्सबरोबर अनैतिक शरीरसंबंध ठेवीत. कामेच्छा होईल त्या त्या वेळेस 'फादर' त्या नन्सचा शरीरभोग घेत असत. त्या संबंधातून नन्सना मुलं झाली की, जन्मजातच त्यांना चर्चजवळील तलावात बुडवलं जाई. धर्माच्या नावाने चाललेला आणि समाजमान्यता असलेला तो एक 'जाहीर लैंगिक दुराचार' होता.

मार्टिन ल्यूथर किंग यांनी आपल्या एका ग्रंथात लिहून ठेवलं आहे की, ''एकदा पोप ग्रेगरीच्या हुकुमावरून रोम येथील तलावाची सफाई करण्यात आली. त्यावेळी त्या तलावात अर्भकांच्या सहा हजार डोकीच्या कवट्या सापडल्या. तसाच प्रकार आस्टिया येथील चर्चमध्ये घडल्याचं आढळून आलं. तसेच १५०७ सालच्या फ्रान्समधील एका सनदेत लिहून ठेवलं आहे की, मध्ययुगातील सरंजामशाहीच्या काळात युरोपीय देशात लग्नाआधी वधूचा पहिला भोग घेण्याचा हक्क तेथील राजे, सरंजामदार व पुजाऱ्यांना होता.''[१४]

## जैन साहित्यातील टीकात्मक खंडोबा

कर्नाटकात वीरशैवांइतकेच जैन प्रबळ होते. जैन ग्रंथकारांनी ज्या हिंदू दैवतांची निंदा केली आहे, त्यात प्रामुख्याने मैलार खंडोबाचा समावेश करण्यात आला आहे.

''मैलार हा जैन असून तो एका संघर्षात मोठ्या शौर्याने लढत असताना मरण पावला. तोच पुढे मैलारदेव

म्हणून प्रसिद्ध झाला. परंतु जैन असूनही त्याने हिंसेचा मार्ग पत्करल्यामुळे जैनांनी त्याला शूद्रदेव मानले,'' असे मत ब्रह्मशिवाने आपल्या 'समयपरीक्षा' (१२ वे शतक) या ग्रंथात व्यक्त केले आहे. आणखी एका ठिकाणी हा जैन कन्नड कवी मैलारावर टीका करताना लिहितो, ''काय विचित्र पहा! मनेवेग्गडे चट्टपाने कालच पुढे आणलेल्या मैल आणि माळची या देवता लोकप्रिय झाल्या, मग प्राचीन हरिहरांची काय कथा!'' यातील 'लोकप्रिय' या शब्दाचा विचार केल्यास मैलारची त्यावेळची बहुजनव्यापक अफाट लोकप्रियता जवळून अनुभवल्यामुळेच त्यावर या कवीला टीका करावीशी वाटली असेल. याशिवाय, गुणकीर्तिकृत 'धर्मावृत' (इ.स.१५९२ पूर्वी) या जैन ग्रंथात मैलार-खंडेरायाविषयी तुच्छता व्यक्त केली आहे. परंतु, पुढे वीरशैवाप्रमाणे जैनांचाही मैलारविषयक विरोध मावळला. मैलारची उत्तरोत्तर वाढत जाणारी लोकप्रियता पाहून महाराष्ट्र-कर्नाटकातील प्रमुख खंडोबास्थळी खंडोबाच्या तथा मैलाराच्या दर्शनार्थ जैनांच्याही काही प्रमाणात वाऱ्या सुरू झाल्या.

एवढेच नव्हे तर जैन पंथातील काही लोकांनी 'मल्हारी म्हणजेच आपला तीर्थंकर मल्लिनाथ आहे,' असे समजून जेजुरीच्या खंडोबा मंदिरात गाभाऱ्याच्या बाहेरील कोनाड्यात मल्लिनाथाचा यक्ष 'कपर्द किंवा कपर्दी' मूर्ती बसविली आहे. त्याखाली संवत १३०३ (शके ११६८, इ.स.१२४६) चा लेख असून त्यात 'धउल्लक' नावाच्या कोणा भक्ताने उपर्युक्त यक्षाची मूर्ती करविल्याचे सांगितले आहे. याशिवाय, जैन अपभ्रंशकवी पुष्पदंत याचे 'खंड-खंडू' हे नाव तर ऋषभनाथाचे 'नाभिमल्हार' हे पर्यायनाम आढळते. यावरून जैनांनीही खंडोबाचा स्वीकार केल्याचे स्पष्ट जाणवते.

अद्वैती भागवत संप्रदाय, द्वैती महानुभाव, सुफींशी साधर्म्य दाखविणारे संप्रदाय, ख्रिश्चन, मुस्लिम आणि जैन धर्मीय या संगळ्यांनीच खंडोबा दैवताविषयी आपापल्या तत्त्वचिंतनानुसार मते मांडली. काही आक्षेप नोंदवले. या सर्वांचा चिकित्सक परामर्ष या प्रकरणातून घेण्याचा प्रयत्न केला.

शेवटच्या 'उपसंहार' प्रकरणात एकूणच प्रबंधसहिंतेचा गोषवारा पाहू.

[]

**संदर्भ-टिपा**


१. अय्यंगार मास्ती व्यंकटेश, पॉप्युलर कल्चर इन् कर्नाटक , पृ. १८.
२. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण, खंडोबा, पृ. १३.
३. तुळपुळे श. गो. (सं.), म्हाईंभटकृत लीळाचरित्र, उत्तरार्ध (भाग २), लीळा- पृ. २९८.
४. आपटे दत्तात्रय अनंत / किंजवडेकर - शास्त्री रामचंद्र दत्तात्रय (सं.) श्री संत एकनाथ महारज यांची अंभगाची गाथा, अ. २५९०, पृ. ४३३.
५. एकनाथ विरचित, भावार्थ रामायण - अयोध्याकांड, अ.३ ओ. ४-१४.
६. (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर (सं), श्रीसंत एकनाथ महाराज विरचित 'रुक्मीणी स्वंयवर' अ.११.६२.
७. आपटे दत्तात्रय अनंत / किंजवडेकर - शास्त्री रामचंद्र दत्तात्रय (सं.) श्री संत एकनाथ महारज यांची अंभगाची गाथा, पृ. ८५५.

लोकदैवत खंडोबा विषयीच्या अभ्यासाचे विविध पैलू प्रत्यक्ष पडताळून पाहण्याचा प्रयत्न या अभ्यासाद्वारे केला आहे.

देवताविज्ञान ही भारतीय इतिहासाची शाखा आहे. देवतांच्या विकसनप्रक्रियेचा शोध यामध्ये घेतला जातो. तसा शोध मी माझ्या प्रबंधामध्ये घेण्याचा प्रयत्न केला आहे. खंडोबा देवता ज्या ज्या परिसरात प्रगटलेली आहे अथवा मूर्तिरूपात मंदिरामध्ये स्थानापन्न झाली आहे, त्या मुख्य चौदा खंडोबास्थानांचा अभ्यास यामध्ये करण्यात आला आहे. तसेच या देवतेचा त्याच भैरव श्रेणीतील इतर दैवतांशी तुलना करून, त्यांच्यामधील साम्यस्थळे व विरोधी भासणारी स्थळे शोधून 'खंडोबा' हा व्यापक प्रमाणात लोकप्रिय कसा झाला याचे साधार विवेचन या प्रबंधात करण्यात आले आहे. हा अभ्यास करीत असताना जुनी शस्त्रास्त्रे, अनेक प्रकारच्या वास्तू, वीरगळ, शिलालेख, ताम्रपट, हस्तलिखिते, बखरी, मौखिक परंपरा, लिखित संदर्भ-साहित्य यांचा प्रामुख्याने आधार घेतला आहे.

खंडोबा उपासनेची पार्श्वभूमी समजून घेण्यासाठी महाभारतकालीन वेदव्यासांपासून यादव काळातील महानुभावांच्या लीळाचरित्रापर्यंत खंडोबा उपासनेची पार्श्वभूमी कशी आढळून येते याचा शोध विविध संदर्भांच्या आधारे पहिल्या प्रकरणात घेतला आहे. तसेच, मल्हारीमाहात्म्य कथासारामागचे लोकतत्त्व देवताविज्ञानाच्या अंगाने तपासून पाहण्याचा प्रयत्न केला आहे.

त्रेता युगात 'मल्लारिमाहात्म्यम्' ची रचना झाली असली तरी इसवीसनाच्या आसपास ती प्रचार आणि प्रसारात आली असावी. असा तर्क केला तरी, तेव्हापासून ते थेट सातवे शतक आणि तिथून बाराव्या शतकापर्यंत म्हणजे मधल्या दोन्ही प्रदीर्घ कालखंडामधील खंडोबाविषयीची संदर्भ सामग्री आजपर्यंत अद्याप उजेडात आली नाही. त्यामुळे खंडोबाच्या विकसनप्रक्रियेच्या चढत्या आलेखाची संगतवार मांडणी करणे अभ्यासकांना एक आवाहन आहे असे मला वाटते.

युद्धनायक असलेल्या दैवतचारित्रांचा तुलनात्मक अभ्यास केल्यानंतर, भगवद्गीतेत सांगितल्याप्रमाणे, ''भूतलावर ज्या ज्या वेळेस धर्माला ग्लानी येते त्या त्या वेळेस भगवंत नवा अवतार धारण करून दुष्ट प्रवृत्तीचे पारिपत्य करतो आणि सकल भूलोक भयमुक्त करतो.'' हेच तत्त्वज्ञान अनेक दैवतचरित्रांमध्ये समान पातळीवर परावर्तीत झाल्याचे निदर्शनास येते. याचेच द्योतक म्हणजे 'मल्लारिमाहात्म्यम्' चा प्रमुख नायक असणाऱ्या शंकराने 'मार्तंडभैरव' हा नवा अवतार धारण करून मणि-मल्ल दैत्यांचे केलेले पारिपत्य होय.

खंडोबा या लोकदैवताचा क्षेत्रीय पद्धतीने अभ्यास करण्यासाठी म्हणून मी विविध स्थानांना भेटी दिल्या. त्या स्थानांचे माहात्म्य, तिथला भौगोलिक परिसर, त्या स्थानांचा इतिहास यांचा अभ्यास केला आणि मग आलेली निरीक्षणे नोंदविली.

महाराष्ट्र - कर्नाटकात खंडोबाची महत्त्वाची आणि प्रख्यात अशी चौदा ठाणी मानली जातात, की जिथे मुख्य यात्रांना अडीच ते तीन लाखांच्या पुढे भाविक-भक्तांची उपस्थिती असते. पैकी अहमदनगर जिल्ह्यातील दोन्ही ठाणी काहीशी दुर्लक्षित आणि प्राथमिक अवस्थेत वाटतात. त्यातही 'शेगुड' या स्थानाचा विकास आणि जीर्णोद्धाराचे काम सध्या सुरू आहे. परंतु 'नेवासा' हे ठिकाण खंडोबाची सासुरवाडी म्हणून ओळखले जात असले तरी तिथे खंडोबाचे एखादे मोठे मंदिरही आढळत नाही. गावात अगदीच छोटी-छोटी तीन-चार मंदिरे असली तरी, बाहेरून येणाऱ्या खंडोबाभक्तांना या मंदिरांचे आस्तित्व सहज जाणवत नाही. महाराष्ट्र-कर्नाटकातील खंडोबाची महत्त्वाची ठाणी एकमेकांपासून कधी ९५ कि. मी. तर कधी ९६५ कि. मी. किंवा त्याहूनही अधिक अंतरावर आहेत. या स्थानाव्यतिरिक्त दोन्ही राज्यांत खंडोबाची अनेक गाजती स्थाने आहेत. महाराष्ट्रात मुख्य खंडोबास्थानाशिवाय अशी काही खंडोबास्थाने आहेत की, तेथील मुख्य यात्रेत पन्नास हजारांपेक्षा जास्त लोकांची उपस्थिती असते. 'ग्रामदैवत' म्हणून महाराष्ट्रातील खंडोबामंदिरांची संख्या सहजरीतीने मोजता न येण्याएवढी आहे. महाराष्ट्र, कर्नाटक, मध्य प्रदेश, छत्तीसगड, आंध्र प्रदेशच्या काही भागातील अनेक प्रख्यात खंडोबास्थानी, स्थानिक राज्य तसेच परराज्यातून दर्शनासाठी येणाऱ्या भाविक भक्तांची बाराही महिने वर्दळ असते. केरळ आणि गुजरातच्या काही भागामध्येही खंडोबाची मंदिरे आहेत असे लिखित आणि मौखिक पुरावे आढळतात.

बऱ्याच ठिकाणी खंडोबा मंदिरांची प्रवेशद्वारे पूर्वाभिमुखी आढळतात. काही मंदिरे जमीनसपाटीवर तर काही उंच टेकड्या, डोंगरावर वसलेली आढळतात. प्रातिनिधिक स्वरूपात खंडोबाचे म्हाळसासह घोड्यावर स्थानापन्न झालेले छायाचित्र सर्वत्र प्रख्यात असले तरी प्रत्येक ठिकाणच्या मंदिरात खंडोबा-म्हाळसा-बाणाई मूर्तींचे चेहरे भिन्न स्वरूपात दाखविलेले आढळतात. प्रत्येक महत्त्वाच्या खंडोबाक्षेत्री अंशात्मक स्थानिक रीतिरिवाज, परंपराचा

अपवाद वगळता रविवार, सोमवती अमावास्या, चैत्र-श्रावणी-माघी पौर्णिमा आणि मार्गशीर्ष शुद्ध (चंपाषष्ठी) या खंडोबा उपासनेत महत्त्वाचे मानलेल्या दिवसांना समान स्वरूपात यात्रा -उत्सव होतात, कुळधर्म - कुलाचार साजरे केले जातात. सर्वत्र 'भंडारा' तथा 'हळदी' चा वापर मुबलक प्रमाणात केला जातो.

महाराष्ट्र-कर्नाटकमध्ये माझी शोधयात्रा सुरू असताना खंडोबापत्नी बाणाईने प्रामुख्याने माझे लक्ष वेधले.

कर्नाटकमध्ये बाणाईला कुरूबत्यव्व किंवा कुरूबत्यम्म अशा नावांनी ओळखले जाते. कुरी म्हणजे मेंढी आणि कुरूब म्हणजे मेंढपाळ धनगर. कुरूबत्ती म्हणजे मेंढपाळ धनगर स्त्री. या कुरूबत्ती शब्दाला अव्व (बाई), अम्म (आई) हे प्रतिष्ठासूचक शब्द जोडल्यांमुळे कुरूबत्यव्व-कुरूबत्त्यम्म ही नावे तयार झालेली असली तरी कर्नाटकात तिला 'देवाची राख' म्हणजे 'ठेवलेली बाई' असे समजतात. त्यामुळे तिचे स्थान बहुदा गावाबाहेर मरडीवर म्हणजेच टेकडीवर आढळते. खंडोबादेवाला वर्षातून एकदा तिला भेटण्यासाठी पालखीतून वाजत-गाजत नेतात.

म्हाळसाला उच्च संस्कृतीमध्ये स्थान मिळाले असले तरी बहुजन समाजात बाणाईचे जिव्हाळ्याचे स्थान आहे. कर्नाटकात खंडोबाची उपासना सुरू झाल्यानंतर प्रारंभीच एखाद्या धनगरद्वेष्ट्या कर्मठ आणि सनातनी व्यक्तीने एखाद्या प्रसिद्ध खंडोबाक्षेत्री जाणूनबुजून बाणाईची मूर्ती गावाबाहेरील एखाद्या उंचवट्यावरील जागेवर किंवा टेकडीवर हलवून तिथे नवीन मंदिर बांधून त्यात बाणाईची प्रतिष्ठापना केली असेल आणि 'बाणाई देवाची राख आहे' असा अपप्रचार करून, वर्षांतून एकदा तिला खंडोबाला भेटण्यासाठी पालखीतून वाजत-गाजत न्यायची प्रथाही त्यानेच पाडली असेल. कालपरत्वे संस्कृती संक्रमणातून खंडोबाच्या इतर महत्त्वाच्या क्षेत्रीही असा मतप्रचार झाला असावा. त्यामुळे प्रत्येक ठिकाणी बाणाई मंदिराची वेगळी व्यवस्था करण्यात आली असेल. टप्प्याटप्प्याने संपूर्ण कर्नाटकातच बाणाईविषयी अशा प्रकारे जनश्रद्धा रूढ झाली असावी.

पुढे या मतप्रचाराचा द्वेशमूलक प्रवाह अंशात्मक का होईना महाराष्ट्र भूमीत येऊन स्थिरावला असेल. त्याचा परिणाम म्हणून येथील खंडोबा मंदिरामध्ये बाणाई लिंगाची व्यवस्था खंडोबा- म्हाळसाच्या लिंगापासून काहीसी अलग केली असेल. देवताविज्ञानाच्या परिभाषेत याला 'भारतीय देवतामंडलातील अस्पृशता' ही संज्ञा योग्य वाटते! अर्थात, आपण हे सुद्धा ध्यानात घेतले पाहिजे की, ही प्रथा ईश्वरनिर्मित नसून मानवनिर्मित आहे. असे असले तरी बहुजन समाजातील अठरापगड जाती-धर्मांमध्ये म्हाळसापेक्षा बाणाईच जिव्हाळ्याचा विषय होऊन राहिली आहे. हे 'दैवतवैज्ञानिक सत्य' कुणीही नाकारू शकणार नाही असे मला वाटते !

मंगसुळी (जिल्हा बेळगाव) येथे मात्र अपवादाने बाणाईचे स्थान गावाबाहेर नसून खंडोबा मंदिरातच आहे. मंगसुळी हे गाव महाराष्ट्र-कर्नाटक सीमेलगत असल्यामुळे तिथे मराठी भाषकांची संख्या तुलनेने जास्त आहे. त्यामुळे महाराष्ट्रातील खंडोबा मंदिरामध्ये जशी व्यवस्था असते, तशीच व्यवस्था थोड्याफार फरकाने मंगसुळीच्या खंडोबामंदिरात पाहावयास मिळते.

छत्रपती शिवाजीमहाराजांच्या ''शिवकालापासून ते उत्तर पेशवाईपर्यंत राजे, सरदार आणि सर्वसामान्य योद्धे सैनिक यांच्या जीवनावर खंडोबा दैवताचा कसा प्रभाव होता हे वेगवेगळ्या घटना-प्रसंगातून पाहावयास मिळाले.''

देवतामाहात्म्य म्हणजे संबंधित देवतेचे स्तुतिवाचक पद्यमय चरित्र. हा आख्यानकाव्यासारखा प्रकार प्रत्येक देवतेच्या लोकप्रियतेसाठी कमी-जास्त प्रमाणात कारणीभूत ठरला आहे. परंतु 'खंडोबा' या एकाच दैवताच्या चरित्रकथेवर महाराष्ट्र-कर्नाटकात शेकडो मल्हारीमाहात्म्य रचली गेली. त्यातही सामान्य खंडोबाभक्त-रचनाकारांप्रमाणे, संतप्रभावळीतील विख्यात आख्यानकवी श्रीधरस्वामी नाझरेकर, जेजुरीचे गंगाधर कवी, पंडितकवी मोरोपंत, दत्तवरद विठ्ठलकवी, दत्तावतार माणिकप्रभू यांसारख्या अध्यात्म क्षेत्रातील महान विभूतींच्या हातून मल्हारीमाहात्म्यासारखे लोकप्रिय काव्य लिहून झाले ही विशेष बाब म्हणावी लागेल.

विविध कवींनी केलेल्या 'मल्लारिमाहात्म्यम्' च्या मराठी अवतारांचा तुलनात्मक अभ्यास केल्यानंतर असे अनुमान काढता येऊ शकते की, सर्व मल्हारीमहात्म्यांमध्ये एकत्व भावनेचेच पडसाद उमटलेले आहेत. प्रत्येक माहात्म्यकाराच्या लेखनशैलीचा बाज जरी निराळा असला तरी अंतिम सार एकच आहे. म्हणजे साधने अनेक असली तरी 'साध्य' एकच आहे.

ज्याप्रमाणे अनेक मराठी संतांनी विठोबाला आपले परमदैवत मानून त्याच्याच भावनारूपी कृपाशीर्वादाने आपल्या प्रासादिक वाणीतून रसाळ अभंगरचना निर्माण केल्या त्याचप्रमाणे भक्तिरसाने ओथंबलेली व भक्तांच्या अंत:करणात खंडोबा देवाबद्दल अनन्यभाव निर्माण करणारी भक्तिरचनाही त्यांनी केली. नरहरी सोनार, जनाबाई,

एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादींसारख्या मूळ भिन्न भिन्न संतप्रवृत्तीच्या व वेगवेगळ्या संप्रदायांतील अनेक संतमाहात्म्यांनी आपल्या अद्वैत भक्तीतून खंडोबाचे ज्ञानस्वरूप उभे केले आणि बहुजन समाजात शुद्ध भक्तीचे तत्त्वज्ञान रुजविले.

खंडेरायाचे लीलास्वरूप, जेजुरी, वाघ्या, मुरळी, जागरण यांच्यावर आध्यात्मिक रूपके रचून आणि 'आरती'रूपाने देवाचे महिमान गाऊन संतांनी लौकिकार्थाने खंडोबाभक्तांना परमार्थ मार्गदर्शन केले आहे. अद्वैत भक्तीतून आलेल्या आत्मानुभूतीतून 'आत्मस्वरूप परमात्मा' अशी खंडेरायाची वेगळी ओळख सामान्य जनांना करून दिली आहे. खंडोबावर विपुल भक्तिमय रचना करून 'खंडोबा भक्तिवाङ्मय' सुदृढ आणि समृद्ध केले आहे.

वाघ्याचे कन्नड नाव ओग्गय. महाराष्ट्रीय वाघ्या आणि कर्नाटकीय वाघ्या यांच्या वेशभूषेमध्ये फरक असला तरी त्यांच्या आचारांमध्ये फारसा फरक आढळत नाही. आज दोन्ही राज्यात खंडोबाला वाघ्या सोडण्याची प्रथा अस्तित्वात आहे. मुलींना 'मुरळी' सोडण्याच्या प्रथेवर महाराष्ट्रात कायद्याने बंदी असली तरीही नवसाच्या मुलींना चोरून मुरळीची दीक्षा देण्याचे प्रकार महाराष्ट्रातील प्रख्यात खंडोबाक्षेत्री आजही तुरळक प्रमाणात होताना दिसतात. महाराष्ट्र शासन म्हणते, 'महाराष्ट्रात मुरळी प्रथेवर कायद्याने बंदी आहे.' मग वाघ्या-मुरळ्यांच्या ताफ्यामध्ये कोवळ्या व जवान मुरळ्या येतात कुठून ? हा प्रश्न शेवटी अनुत्तरितच राहतो.

देवदासी प्रथेचा उगम प्रथम ग्रीक देशात सुमारे इ. स. ३००० वर्षांपूर्वी झाला. नंतर टप्प्याटप्प्याने इजिप्त, बॅबिलोनिया, सुमेरिया, सिरिया, अरेबीया, फोनेसिया, जेरूसलेम इत्यादी देशांत प्रसार झाला. पुढे आर्यांच्या आगमनाबरोबर 'पर्यटन संस्कृती-संसर्गा' च्या माध्यमातून ही प्रथा भारतात आली. नंतर कर्नाटक, आंध्र प्रदेश, केरळ, महाराष्ट्र तसेच इतर राज्यांच्या काही भागात या प्रथेचा फैलाव फार झपाट्याने झाला.

''प्राचीनकाळी पाश्चिमात्य देशांत पोप धर्मगुरूंनी व भारतात ब्राह्मण पुराहितांनी आपल्या कामवासना शमविण्यासाठी देवाधर्माच्या नावावर, देवभोळ्या समाजामध्ये देवदासींसारख्या अनेक अनिष्ट प्रथा निर्माण करून ठेवल्या आहेत.'' असे वाङ्मयीन संदर्भ आढळतात. (देवदासी शोध आणि बोध, पृ. २४)

महाराष्ट्रात खंडोबा उपासनेला प्रारंभ झाल्यानंतर, सुरुवातीला 'मुरळी' या संकल्पनेचे मूळ पवित्र आणि उदात्त स्वरूपाचे असावे असे वाटते. परंतु कालपरत्वे राजे-राजवाडे तसेच वतनदार-मनसबदार-जहागीरदार, पाटील, कुलकर्णी, अशांसारख्या घटक-सत्ताकेंद्रांच्या उपभोगासाठी सनातनी पुराहित वर्गाच्या सक्रिय पाठिंब्याने मुरळीची देवदासी, जोगिनी, भाविनी यांच्या जगण्याशी सम पातळीवर संबंध जोडला गेला असावा. पुढे सश्रं गतीने चालणाऱ्या संस्कृती संक्रमणाच्या दीर्घ प्रक्रियेतून तावून-सुलाखून निघालेल्या मुरळीची ओळख 'देवदासी,' 'वेश्या', 'उपभोग्यवस्तू' अशी ठाम झाली असावी.

जागरण ही खंडोबाची स्वतंत्र ओळख आहे. खंडोबा आणि त्याच्या दोन बायका म्हाळसा व बाणाई यांच्या व्यतिरिक्त इतर देवदेवतांचे जागरण घातले जात नाही. खंडोबाचा गोंधळ घातला जात नसला, तरी त्याच शिवावतार भैरवश्रेणीतील इतर देवांचे गोंधळ घातले जातात. उदा. जोतिबा, श्रीनाथ म्हस्कोबा, भैरव इत्यादी... यांसह इतर शिवावतार भैरवमूर्तींचा आणि मार्तंडभैरव मूर्तीचा मूर्तिवैज्ञानिक दृष्टिकोनातून तुलनात्मक अभ्यास केल्यास यांच्यामध्ये बरीच साम्यस्थळे आढळतात. मग मार्तंडभैरवाचे 'जागरण' आणि इतर भैरवांचे 'गोंधळ' असे का ? हा मला पडलेला प्रश्न आहे, परंतु चरित्रकथांच्या भिन्नतेमुळे हा फरक असावा असे वाटते.

म्हाळसा, बाणाई ही आदिशक्तीचीची रूपे आहेत. यांचेही गोंधळ घातले जातात ते फक्त नवरात्राच्या काळात खंडोबास्थानी किंवा खंडोबाभक्तांच्या घरी. म्हाळसा आणि बाणाई यांचे सान्निध्य खंडोबाशेजारीच कायमस्वरूपी असल्याने अर्थातच गोंधळविधीत म्हाळसा-बाणाईबरोबर खंडोबालाही सामील करून घेतले जाते.

आसुरी शक्तीविरुद्ध दैवी शक्तीने ज्या काळात युद्ध केले त्याचे प्रतीक म्हणून दर वर्षी अश्विन महिन्यात 'शारदीय नवरात्र' साजरे केले जाते. देवीच्या नवरात्राप्रमाणेच राम, कृष्ण, पांडुरंग, दत्त, खंडोबा इत्यादी देवतांची नवरात्रे साजरी करण्याची प्रथा भारताच्या काही भागांत पाहावयास मिळते. अपवाद फक्त खंडोबाचे नवरात्र अश्विन महिन्यात नाही, तर मार्गशीर्ष महिन्यात व तेही सहा दिवसांचे 'षड्रात्रौत्सव' म्हणून साजरे केले जाते. या काळात

खंडोबासह म्हाळसा-बाणाईचेही जागरण घातले जाते, गोंधळ घातला जात नाही. शारदीय नवरात्रामध्ये 'गोंधळ' आणि चंपाषष्ठी नवरात्रामध्ये 'जागरण' घातल्या जाणाऱ्या अखिल देवतामंडलामध्ये एकमेव दोनच देवता आहेत, त्या म्हणजे म्हाळसा आणि बाणाई, हे विशेष ! म्हाळसा ही 'स्वतंत्र देवता' म्हणून प्रसिद्ध पावल्यामुळे तिला गोंधळाची स्वतंत्र उपास्य कुलदेवता म्हणूनही ओळखले जाते.

खंडोबा देवासंबंधित लोकगीतांमध्ये चरित्रात्मक गीते, अख्यान गीते, स्थलमाहात्म्य गीते, यात्रा वर्णनपर गीते, वाघ्या-मुरळीची जागरणप्रसंगी म्हणावयाची गीते, गोंधळगीते, आवतनं, आरती, भूपाळ्या, अभंग, मल्हारी सप्तक-अष्टक,मल्हारीकवच, इत्यादी स्तुतीपर गीतांचा अंतर्भाव होतो. यातील सर्वच गीते खंडोबाच्या विधींशी संबंधित आहेत. म्हणून या गीतांना 'विधिगीते' असेही म्हटले जाते. थोडक्यात, खंडोबाच्या कुलधर्म, कुलाचारासमयी जे विधी केले जातात, त्यावेळेस प्रसंगारूप म्हटली जाणारी गीते म्हणजेच विधिगीते होय.

खंडोबाचे उपासक वाघ्या-मुरळी, लोकवाणीतील खंडोबा व शाहिरी वाङ्मयातील खंडोबा, खंडोबाची प्रतीके आणि उपासनापद्धती या प्रकरणांतील गीतांचा लोकतत्त्वीय दृष्टिकोनातून विचार केल्यास पुढील निष्कर्ष हाती येतात.

* परंपरा व लोकश्रद्धा ही प्रमुख वैशिष्ट्ये तर सहजता, अकृत्रिमता, स्वंयस्फूर्तता ही प्रमुख लक्षणे खंडोबावरील लोकगीतांमध्ये आढळून येतात.
* या गीतांमधून पारंपरिक रूढी, रीतिरिवाज, कुलदैवतावरील श्रद्धा अशा संकेतात्मक समूहमनाच्या उत्कट आविष्काराचे यथार्थ दर्शन घडते.
* 'क्षेत्रपाळ' म्हणून 'खंडोबा' लोकसंस्कृतीशी एकरूप झाल्याचे स्पष्ट चित्र या लोकगीतांमधून प्रत्ययास येते.

खंडोबादेवाच्या पूजेचे अनेक विधी-उपचार 'मार्तंडविजय' ग्रंथामध्ये विस्तृतपणे वर्णिले आहेत. त्यापैकी मानसपूजा, मार्तंड लिंगार्धनविधी, गंधपूजाविधी हे पूजाविधी सद्य:स्थितीत प्रचारात आढळतात.

महापूजा किंवा अभिषेक करणे, नैवेद्य दाखविणे, तळीभंडार करणे, तुला करणे, कोंटंबापूजन करणे, जागरण-गोंधळ घालणे, लंगर तोडणे या खंडोबा उपासनेत प्रमुख मानल्या गेलेल्या विधीसमयी विधिगीतांचे सादरीकरण केले जाते. या विधिगीतांची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे असली तरी इतर लोकदैवतांच्या विधिगीतांचे स्वरूप-वैशिष्ट्ये ही थोड्याफार फरकाने अशीच असतात.

* विधिगीतांचे सादरीकरण विशिष्ट विधींच्या वेळेसच केले जाते.
* जागरणात बऱ्याच विधींचा समावेश असतो. प्रत्येक विधीच्या अनुषंगाने त्या त्या गीतांचे सादरीकरण केले जाते.
* या विधिगीतांमध्ये बोलीभाषेचा वापर खुबीने केलेला आढळतो. त्यामुळे ही गीते रचनेच्या अंगाने सुंदर व भाषेच्या अंगाने समृद्ध वाटतात.
* रचनासौंदर्य, अर्थसौंदर्य, भावसौंदर्याच्या अंगाने विचार केल्यास प्रत्येक विधिगीत एक दुसऱ्यापेक्षा वेगळे तसेच स्वत:च्या वेगळ्या वैशिष्ट्यांनी नटलेले दिसून येते.
* या गीतांमध्ये वेगवेगळी जातीवृत्तेदेखील आलेली आहेत. तसेच यमक, अनुप्रास हे शब्दालंकारही यात विपुल प्रमाणात आढळतात. परंतु त्यांची रचना हेतुपूर्वक केलेली नसून भावप्रकटीकरणात ओघवतेपणाने गीतांमधून डोकवताना दिसते.
* अनेक विधिगीतांमध्ये आशय आणि रचनेची पुनरावृत्ती दिसून येत असली तरी प्रत्येक गीत स्वत:चे वेगळे वैशिष्ट्य घेऊन अवतरल्याचे दिसून येते.
* ही सर्व विधिगीते क्रियासंबंधीत आहेत. प्रत्येक विधी आणि त्या अनुषंगाने येणारे गीत यांचा परस्परसंबंध अविभाज्यपणे जोडलेला असतो. त्याचा प्रत्यय गीताच्या ओळी-ओळीतून, एकंदरीतच त्याच्या स्वरूपावरून दिसून येतो. मग ती आरती असो की भूपाळी, तळीभंडार असो की अभंग. प्रत्येक विधीप्रमाणे त्या गीताची चाल, ताल, लय, ठेका, असतो आणि स्वरांचे माधुर्य असते.
* मौखिक परंपरेतून चालत आलेल्या खंडोबावरील लोकगीतांच्या सर्वच शाखांमध्ये (उदा. तळीभडांर मंत्र, म्हाळसा-बाणाईमधील सवतीमत्सर) प्रत्येकी गीताचा ढाचा त्या त्या प्रादेशिक बोलभाषेतील शब्दामुळे आणि त्यात नव्याने उधृत केलेल्या पद्यपंक्तीमुळे बदलत गेल्याचे दिसते. तरीही किंचित बदल सोडला तर त्या गीताचा मूळ अर्थ तोच राहतो. हे या गीतांचे प्रधान वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

खंडोबा दैवताच्या विकसनप्रक्रियेत टप्प्याटप्प्याने त्याची प्रतीके निर्माण होऊन निरनिराळ्या उपासनापध्दती रुढ झाल्या व नंतर वेगवेगळ्या विधी, सण, उत्सव साजरे होऊ लागले.

लोकवाणीतील खंडोबा व शाहिरी वाङ्मयातील खंडोबा, खंडोबाचे उपासक वाघ्या-मुरळी, खंडोबाची प्रतीके आणि उपासनापद्धती या प्रकरणांतील गीतांचा लोकतत्त्वीय दृष्टिकोनातून विचार केल्यास पुढील निष्कर्ष हाती येतात.

* परंपरा व लोकश्रद्धा ही प्रमुख वैशिष्ट्ये तर सहजता, अकृत्रिमता, स्वंयस्फूर्तता ही प्रमुख लक्षणे खंडोबावरील लोकगीतांमध्ये आढळून येतात.

* या गीतांमधून पारंपरिक रूढी, रीतिरिवाज, कुलदैवतावरील श्रद्धा अशा संकेतात्मक समूहमनाच्या उत्कट आविष्काराचे यथार्थ दर्शन घडते.

* 'क्षेत्रपाळ' म्हणून 'खंडोबा' लोकसंस्कृतीशी एकरूप झाल्याचे स्पष्ट चित्र या लोकगीतांमधून प्रत्ययास येते.

खंडोबा भक्तीचा मूळ उगम कानडीभूमीतला. तिथून त्याच्या भक्तिगंगेचा प्रवाह पिढ्यान् पिढ्या महाराष्ट्र, मध्य प्रदेश, छत्तीसगड आंध्र प्रदेश तसेच गुजराथ आणि केरळच्या काही भागात अखंड वाहतो आहे. कर्नाटकात मैलार, मल्लय, मल्लया, मैलप्पा तर आंध्रात मल्लन्न किंवा मल्लन्ना या नावाने ओळखला जाणारा हा लोकदेव महाराष्ट्रात खंडोबा, खंडेराय, खंडेराव, मार्तंड, मार्तंडभैरव, मल्हार, मल्हारी, मल्हारीमार्तंड, म्हाळसाकांत, मालू, मालोजी, महिपती इत्यादी नावांनी ओळखला जातो.

खंडोबा ही युद्ध देवता तथा वीरदेव असून त्याला रुद्राचा अवतार मानतात. रुद्राला 'पर्वतांचा राजा' मानतात. मल्लारिमाहाम्यम्‌मध्ये केलेल्या वर्णनाप्रमाणे, 'शंकराने मार्तंडभैरव अवतार धारण करून मणि-मल्ल दैत्यांचा व त्यांच्यां दैत्यसेनेचा समूळ निपात्त केला आणि मणिचूल पर्वतावर आपले स्वामित्व प्रस्थापित केले. यावरून रुद्रावतार खंडोबास 'पर्वतांचा राजा' ही उपाधी योग्य वाटते. उपासना क्षेत्रांमध्ये बहुतांशी ठिकाणी खंडोबाची मंदिरे उंच माळ, टेकडी किंवा डोंगरावरच प्रामुख्याने आढळून येतात. वेदामध्ये रुद्राला 'जनदेवता' (Flok-daity) म्हटले आहे. मुळात एत्तदेशीयांची जनदेवता असलेल्या खंडोबाचे पुढे संस्कृतीकरण होऊन तो सनातन वैदिक-पौराणिक धर्म परंपरेत समाविष्ट झाला असावा, असाही महाराष्ट्रात एक प्रवाद आढळतो.'

खंडोबाला कृषीसंस्कृतीचे प्रतीक म्हणूनही ओळखले जाते. विविध स्तरातील जनमानस या दैवताचे उपासक असले तरी कृषीसमाज खंडोबाभक्तीत अधिक रममान झालेला आढळतो. खंडोबा उपासना क्षेत्राच्या प्रांतीय परिघात प्रत्यक्ष भ्रमण केल्यानंतर याची सत्यता पटते. महाराष्ट्रीय खान्देशातील गावागावात आणि घराघरात पुजला जाणाऱ्या खंडोबाला 'कृषीदैवत मतोबा' म्हणूनही ओळखले जाते. मतोबा या कृषीदैवताची निर्मिती खंडोबा या देवतेतून झाली आहे अशी जनधारणा आहे. खान्देशातील खेडोपाडी कुलधर्म-कुलाचारप्रसंगी मतोबाची तळी भरण्याचा विधी केला जातो. मतोबाची खानदेशात अनेक मंदिरे आहेत. उदा. चाळीसगाव तालुक्यातील 'शिरसगाव' या ठिकाणी मतोबाचे प्रसिद्ध मंदिर आहे. फक्त महाराष्ट्रातच नव्हे तर त्याच्या उपासनाक्षेत्रात सर्वत्रच कृषीसंस्कृतीमध्ये खंडोबाला 'भक्तांवर मायेचं छत्र धरणारा देव' म्हणून मानाचे आणि जिव्हाळ्याचे स्थान आहे.

आजतागायत इतिहासाचार्य वि.का.राजवाडे, ग.ह.खरे, कानडी पंडित पाडुरंग देसाई, आंध्रचे माणिक धनपलवार, डॉ. रा. चिं. ढेरे यांच्यापासून जर्मनीच्या डॉ. गुन्थर सोन्थायमर यांच्यापर्यंत आणि इतर अनेकांनी संबंधित संदर्भांचा आधार घेऊन आपल्या चतुरस्र प्रतिभेच्या जोरावर 'खंडोबा' कडे बौद्धिकदृष्ट्या वेगवेगळ्या कोनातून पाहून त्याच्या व्युत्पत्तीबद्दलची मत-मतांतरे मांडली आहेत. अर्थातच, त्यांनी खंडोबाविषयक व्यक्त केलेली मत-मतांतरे म्हणजे 'दैवतवैज्ञानिक अंतिम सिद्धात' नव्हेत. तर त्यांनी वळणा-वाकणांनी खंडोबाविषयी चिंतन करून, खंडोबा नक्की कोण असावा ? या कुतूहलापोटी तर्कवितर्काद्वारे घेतलेला अदमास आहे.

विष्णुरूप महालसा नारायणी आणि खंडोबापत्नी म्हाळसा या दोघी एकच असल्यातरी पुराणभेद, प्रादेशिकभेद आणि उपासनाभेदामुळे या देवीचे दोन वेगवेगळे भक्तिपंथ निर्माण झाले आहेत. महाराष्ट्रात 'म्हाळसा' ही देवी खंडोबापत्नी म्हणून सर्वश्रुत असली तरी याच देवीला गोवा-कर्नाटक-केरळ-बंगाल, नेपाळ इत्यादी ठिकाणी 'विष्णुरूप महालसा नारायणी' म्हणून ओळखतात.

तरीही, विविध राज्यांतील महाळसा स्थानांना प्रत्यक्ष भेटी देऊन केलेल्या क्षेत्रीय अभ्यासातून आणि वाङ्मयीन संदर्भाच्या आभ्यासातून पुढील निष्कर्ष निघू शकतो की, ''वेगवेगळ्या नावांनी ओळखल्या जाणाऱ्या आणि विविध अवतारकार्याच्या माध्यमातून अनेक कथांमध्ये अवतरलेल्या 'खंडोबापत्नी म्हाळसा' आणि 'विष्णूरूप मोहिनी महालसा' या दोन्ही देवी एकच आहेत.''

इतर संतांचे अनुकरण किंवा लेखनातील बहुश्रुतता दाखविण्याच्या हव्यासापोटी काही मराठी संतानी खंडोबावर टीका केलेली आहे असे वाटते. तर इतर धर्मीयांच्या अनुयायींनी पंथीय प्रचाराच्या अभिनिवेशातून खंडोबावर टीका केल्याचे निदर्शनास येते.

एखाद्या काल्पनिक किंवा वास्तव घटकाबाबत समाजात कुतूहल, प्रेम, आदर, आदरयुक्त भीती, आश्चर्य वाटू लागले की ती कल्पना किंवा संबंधित वास्तव घटक लोकमनाची पकड घेण्यात यशस्वी ठरतो आणि त्याचा भाषेवरील प्रभाव हळूहळू वाढत जातो. कालांतराने तो घटक जनसामान्यांच्या मनामध्ये कायमचे घर करून बसतो. त्याचे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमण होते. ही प्रचाराची आणि प्रसाराची प्रक्रिया वर्षानुवर्षे अखंडपणे चालणारी असल्यामुळे साहजिकच मूळ घटक लोकप्रियतेच्या शिखरावर विराजमान होतो. अनंत काळासाठी त्याला चिरंतनत्व प्राप्त होते.

याच सूत्रावरून काही लोकप्रिय दैवताचा विचार केल्यास त्यांच्याबाबतीतही काही शब्द, वाक्प्रचार तयार झाल्याचे आपणास आढळून येते. उदा. एखाद्या भोळ्या व्यक्तीला उपमा द्यायची झाल्यास त्याला 'भोळा शंकर' किंवा 'भोळा सांब' संबोधतात. अशा सोज्ज्वळ आणि सभ्य पुरुषाची पत्नीही तशाच स्वभावाची असल्यास तिला 'भोळ्या शंकराची भोळी पार्वती' असे म्हणतात. ('भोळ्या गं शंभूची भोळी गिरिजा' असे उल्लेख काही मराठी लोकगीतांत आढळतात.) एखाद्या पुरुषव्यक्तीचे पोट सुटले असल्यास त्याला 'गणपती' म्हणतात किंवा कोणतीही विवाहित पुरुष व्यक्ती कमालीची शांत स्वभावाची असल्यास त्याला 'गुळाचा गणपती' म्हणतात. एखाद्या माथेफिरू पुरुषास 'येडा पीर' म्हणतात, तर एखादी स्त्री रागीट स्वभावाची असल्यास तिला 'जमदग्नीचा किंवा दुर्गेचा अवतार' म्हणतात. विनाकारणच इकडे-तिकडे फिरणाऱ्या आणि चांभार चौकशा करणाऱ्या रिकामटेकड्या स्त्रीस 'भटकभवानी' किंवा 'आत्याबाई' या खास विशेषणाने ओळखले जाते. यावरून समाजमनात रूढ झालेल्या त्या त्या दैवतांविषयीच्या मूळ संकल्पनेचा किंवा प्रकृतीचा अंदाज तर येतोच; परंतु समाज मनातील त्या दैवतांचे स्थान आणि लोकप्रियता यांचाही आडाखा बांधता येतो.

मात्र, वरीलप्रमाणे म्हणी किंवा वाक्प्रचारांच्या बाबतीत तुलना केल्यास खंडोबा आणि त्याचा परिवार इतर देवतांना सरस ठरतो. मार्तंडभैरव अवतारामुळे आणि जनसामान्यातील त्याच्या अफाट लोकप्रियतेमुळे मराठी भाषेत त्यासंबंधीचे इतके शब्द आणि वाक्प्रचार दुसऱ्या देवतेसंबंधात तयार झाले नाहीत हे विशेष आणि वेगळेपण.

'खेळखंडोबा', 'सतरा गुणाचा खंडोबा', 'येडा मल्हारी', 'येडा मल्ल्या', 'खंडोबाचा कुत्रा' (पिंडीवरचा विंचूच्या अर्थाचा वाक्प्रचार), 'मैराळ भाऊ' (दणकट मनुष्य), 'तळी उचलणे' (एखाद्याचे अवास्तव समर्थन करणे), 'बेल-भंडार उचलणे' (शपथ घेणे किंवा प्रतिज्ञा करणे) हे खंडोबाच्या बाबतीत तर त्याच्या परिवाराचा विचार केल्यास 'म्हाळसा'पासून महालपार्य, म्हाळू ही प्रतिष्ठासूचक नावे गोव्यात रूढ आहेत. तर महाराष्ट्रात 'म्हाळी' किंवा 'येडी म्हाळी' असे शब्द बावळट, अस्ताव्यस्त वेशभूषा केलेल्या स्त्रीच्या बाबतीत वापरतात. तर म्हाळसाप्रमाणेच बाणाई ही स्वर्गीय लावण्याचे प्रतीक मानल्यामुळे 'खंडोबाच्या बाणूसारखीच दिसतेय' असा एखाद्या सुस्वरूप मराठमोळ्या स्त्रीला उद्देशून शब्द वापरतात. धनगर समाजात हा शब्द जास्त रूढ आहे. 'मुरळी' हा शब्द नटरंग्या व कामोत्तेजित हावभाव करणाऱ्या स्त्रीबाबत वापरतात. कामधंदा न करणाऱ्या, उत्तराला प्रत्युत्तर करणाऱ्या ग्रामीण भागातील कुमारी मुलीच्या आईस शेजारीण बाईने विचारले की, 'तुमची मुलगी कामधंदा का करीत नाही?' तेव्हा आईचे उपहासात्मक उत्तर पुढीलप्रमाणे ठरलेले असते - 'तिला खंडोबाची मुरळी सोडलीय (किंवा तिला खंडोबाची मुरळी सोडायची आहे) नुस्ती चार येळंला खातीय. काडीचं काम करायला नको वाटतंय रांडला!' मुरळ्या गावाकडे किंवा शहरातही काही अपवाद सोडल्यास कुणाच्या तरी रखेल असतात. रखेलीचाच ग्राम्य अर्थ 'रांड!' तर कामधंदा न करणाऱ्या ऐतखाऊ मुलास उद्देशून रागाने त्याचे आई-वडील कधी कधी म्हणतात, 'याला खंडोबाचा वाघ्या सोडलाय.' ग्रामीण भागात अशा शब्दरचना उच्चारताना त्यामध्ये कुठलेही तत्त्व किंवा उद्देश नसतो. या वाक्यरचना लोकप्रिय असल्यामुळेच केवळ त्या सहज उच्चारल्या जातात. यावरूनच खंडोबाच्या लोकप्रियतेचे रहस्य उलगडत जाते.

कर्नाटकातही कानडी भाषेत 'मैलारा'वरून अनेक शब्द व वाक्प्रचार रूढ झाले आहेत.

खंडोबा म्हणजे नटेश्वर शिवशंकरांचा मार्तंडभैरव अवतार. त्याचे भक्त वाघ्या-मुरळीला 'लोककलावंत' म्हणून राजमान्यता मिळाल्यापासून खंडोबाच्या चरित्रात्मक लोकगीतांचा प्रचार आणि प्रसार अवघ्या मराठी जगतात फार झपाट्याने झाला. पुढे या वाघ्या-मुरळ्यांचेच अनुकरण मराठी लोकधारा, लोकनाट्य, नाटक, चित्रपट इत्यादी माध्यमांतून होऊ लागले. अनेक मराठी चित्रपटांतून जेजुरी गडावरील खंडोबा मंदिर तसेच पालीसह इतर महत्त्वाच्या खंडोबा मंदिरांचे, तिथल्या यात्रा-उत्सवांचे दर्शन गीतांसहीत होऊ लागले. मराठी कलावंत आपल्या कलाविष्कारातून

खंडोबाला सादर करून जणू संगीतमय भक्ती करू लागले. सर्वसामान्य भक्तांबरोबर कलावंतांच्या भावजीवनालाही हा मराठमोळा देव किती व्यापून राहिला आहे, याची यावरून कल्पना येते.

धार्मिकदृष्ट्या हिंदू संस्कृतीमध्ये 'खंडोबा' हा 'शिवावतार' म्हणून जनमानसात पूर्णशाने रुजला आहे. मल्हारीमाहात्म्यातील 'शिवमार्तंडभैरव' ही खंडोबाची प्रतिमा लाखो साक्षर आणि निरक्षर भक्तांच्या हृदयात घर करून बसली आहे. श्रद्धा आणि अंधश्रद्धा यांच्यातील 'मध्य' म्हणजेच भक्ती ! अशा भक्तीतूनच या लोकदेवाच्या उन्नयन प्रक्रियेचा प्रवास हजारो वर्ष अखंडित सुरू आहे. म्हणूनच संतांनी रचलेल्या आध्यात्मिक रूपकांमध्ये तसेच आरत्यांमध्ये खंडोबाच्या शिवावताराचे उल्लेख येतात. शिव आणि खंडोबा यांच्यामध्ये अद्वैत अनुभवणारे समर्थ रामदास एका अभंगात म्हणतात,

**देव शिवाचा अवतार । जाऊन बसला गडावर।**

तर, संत निरंजन रघुनाथ वाघ्याच्या भूमिकेतून सांगतात,

**शिव झाला मार्तंड। मोडावया दैत्य बंड।**

संत नरहरी सोनार जेजुरी गडाची महती वर्णन करताना लिहितात,

**जेजुरीगड पर्वत शिवलिंगाकार। मृत्यलोकी दुसरे कैलास शिखर।**
**नाना परीची रचना रचिली अपार। तये स्थळी नांदे स्वामीशंकर।।**

संशोधनाच्या क्षेत्रात सतत नव - नवीन स्थित्यंतरे घडत असतात. त्यामुळे मी केलेले संशोधन साधार जरी असले तरी तो अंतिम टप्पा ठरत नाही. क्षेत्रीय अभ्यास करीत असताना आजवर झालेल्या संशोधनाच्या अंगाने मी नव्याने काही मांडण्याचा प्रयत्न केला आहे. कदाचित त्यात काही त्रुटीही असू शकतात. परंतु त्यामुळे संशोधनाचे मोल कमी होत नाही. हे संशोधन करताना काही निष्कर्षांप्रत पोचायचा मी प्रयत्न केलेला आहे, या निष्कर्षांचा परामर्ष प्रकरणांमध्ये विषयांनुसार घेतलेलाच आहे. उपसंहारामध्ये पुन्हा एकदा सारांश रुपाने अभ्यासकांसमोर ते निष्कर्ष माडत आहे.

- क्षेत्रीय अभ्यासाच्या निमित्ताने खंडोबा उपासनाक्षेत्राच्या प्रांतीय परिघामध्ये प्रत्यक्ष भ्रमण केल्यानंतर उपासना संदर्भातील विविध घटक - माध्यमांद्वारे खंडोबा हे लोकदैवत आहे आणि तो शंकराचा अवतार आहे हे सत्य निदर्शनास आले.
- ७ व्या शतकापासुन १८ व्या शतकातील कालखंडापर्यंत सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक आणि धार्मिक परिस्थिती जशी बदलली तसा त्या सर्वांचा परिणाम खंडोबाच्या लोकप्रियतेवर झाला हे या अभ्यासाद्वारे तपासून पाहण्याचा प्रयत्न केला आहे.
- मूर्तिविज्ञानाच्या अंगाने विचार केल्यावर खंडोबाच्या उपासनेमध्ये शैव-वैष्णव संस्कृतीचा मिलाफ महाराष्ट्रातील जेजुरी, पाली, शेगूड, अणदूर, सातारे तसेच कर्नाटकातील मंगसुळी, देवरगुड्ड, मैलार, मैलारपूर, धारवाड येथे आढळतो. शैवं-वैष्णवांची ही एकरूपता दिसुन आली ती खंडोबा, म्हाळसा, बाणाई, हेगडी प्रधान यांच्यामुळेच.
- खंडोबाबरोबर म्हाळसा आणि बाणाई या स्त्री-दैवतानांही कालमानानुसार, प्रादेशिक संदर्भानुसार विविध जाती-जमातींमध्ये दैवताचे स्थान मिळत गेले. शैव-वैष्णवांच्या बदलत्या संबंधाचे ऐतिहासिक रूप आजही या दैवतदांपत्यांच्या निमित्ताने पहायला मिळते.
- स्थापत्य शैलीच्या अंगाने विचार केल्यास बहुतांशी खंडोबामंदिरे हेमाडपंथी बांधणीची असली तरी कर्नाटकावर मोघल संस्कृतीच्या वर्चस्वाचा कालखंड राहिल्यामुळे मगंसुळी आणि देवरगुड्ड येथे मुसलमानी स्थापत्य शैलीचा प्रभाव आढळतो.
- शिव-शक्ती हे अव्दैत तत्वज्ञान 'वाघ्या-मुरळी', 'खंडोबा-म्हाळसा, बाणाई' यांच्या कथांमधून, लोकगीतांमधून सहज समोर येते.
- मल्हारी संस्कृतीचा अभ्यास करताना जीव आणि शिवाच्या ऐक्याचे पडसाद सर्वच ठिकाणी आढळतात.
- खंडोबावरील साहित्यातून म्हणजे लोकगीतांतून, कथांतून, लोकश्रध्दांचा, परंपरांचा अकृत्रिम, स्वयंस्फूर्त, रसरशीत,आविष्कार आढळतो.



परिशिष्टे

॥१॥

## चतुर्दश खंडोबा स्थलदर्शन संदर्भ छायाचित्रे



१. श्रीक्षेत्र जेजुरी, ता. पुरंदर, जि पुणे
येथील कऱ्हेपठार– श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र कऱ्हेपठार (कडेपठार) –
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती

जेजुरीगड (मल्हारगड/गडकोट)



जेजुरीगडावर क्षेत्रभेटीसाठी आलेले
विठ्ठल ठोंबरे



श्रीक्षेत्र जेजुरीगडावरील
श्रीखंडोबा मंदिर



जेजुरीगड – मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



२. श्रीक्षेत्र निमगाव, ता. खेड, जि. पुणे
येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र निमगाव–मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



३. श्रीक्षेत्र पाली (पाल), ता. कराड,
जि. सातारा, येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र पाली (पाल)–मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



४. श्रीक्षेत्र शेगूड, ता. कर्जत,
जि. अहमदनगर
येथील श्रीखंडोबा मंदिर आणि कोट





श्रीक्षेत्र शेगूड,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



५. श्रीक्षेत्र नेवासा, ता. नेवासा,
जि. अहमदनगर येथील
श्रीखंडोबा मंदिर




श्रीक्षेत्र नेवासा,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



६. श्रीक्षेत्र अणदूर, ता. तुळजापुर,
जि. उस्मानाबाद येथील
श्रीखंडोबा मंदिर




श्रीक्षेत्र अणदूर,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



७. श्रीक्षेत्र चंदनपूरी, ता. मालेगाव,
जि. नाशिक येथील
श्रीखंडोबा मंदिर

श्रीक्षेत्र चंदनपूरी,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



८. श्रीक्षेत्र सातारे, जि. औरंगाबाद
येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र सातारे,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



९. श्रीक्षेत्र माळेगाव, ता. लोहा,
जि. नांदेड येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र माळेगाव,
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



१०. श्रीक्षेत्र मंगसुळी, ता. अथणी,
जि. बेळगाव (कर्नाटक)
येथील श्रीखंडोबा मंदिर





श्रीक्षेत्र मंगसुळी, मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



११. श्रीक्षेत्र देवरगुड्ड, ता. राणेबेन्नूर,
जि. धारवाड (कर्नाटक)
येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र देवरगुड्ड, मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



१२. श्रीक्षेत्र मैलार, ता. हडगल्ली,
जि. बेळ्ळारी (कर्नाटक) येथील
श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र मैलार, मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



१३. श्रीक्षेत्र मैलारपूर – पेंबर,
ता. खानापूर, जि. बीदर (कर्नाटक)
येथील श्रीखंडोबा मंदिर

श्रीक्षेत्र मैलारपूर – पेंबर
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



१४. श्रीक्षेत्र मैलारलिंग
जि. धारवाड (कर्नाटक)
येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र मैलारलिंग
मंदिरातील श्रीखंडोबा मूर्ती



॥२॥

## खंडोबा विषयक इतर संदर्भ छायाचित्रे

श्रीक्षेत्र कोम्मीरेली, ता. चेरियल,
जि. वारंगल (आंध्रप्रदेश)
येथील श्रीखंडोबा मंदिर



श्रीक्षेत्र कोम्मीरेली मंदिरातील
श्रीखंडोबा मूर्ती



खंडोबा-म्हाळसा, घोडा, कुत्रा
यांचा उठावाच्या छापातील टाक



वाई, जि. सातारा येथील
बिरोबा मंदिरातील 'वीरगळ' स्वरूपातील
खंडोबा-म्हाळसा, घोडा, कुत्रा यांच्या मूर्ती



जागरण विधीच्यावेळी
नृत्य-गायनात मग्न झालेले
वाघ्या-मुरळी



॥३॥

# चतुर्दश खंडोबा स्थलदर्शन संदर्भ नकाशा



**सूची**

**॥१॥**

# संदर्भ - साहित्य सूची


**संस्कृत साधने**

१. (हस्तलिखित पोथी)
**महर्षीवेदव्यास विरचित मल्लारिमाहात्म्यम्.**

२. (संपादकाची नोंद नाही)
**भास्करराय विरचित ललितासहस्रनामभाष्यम्,** निर्णयसागर, मुंबई, १९९९.

३. (लेखक / संपादकाची नोंद नाही)
**श्रीतत्त्वनिधी,** वेंकटेश्वरा प्रेस, मुंबई, १९०१.

४. (लेखक / संपादकांची नोंद नाही)
**मल्लारिसहस्रनामस्तोत्रम्**

५. भट्ट कमलाकर,
**निर्णयसिंधु,** निर्णयसागर, मुंबई, १९०५.

६. तर्कपंचानन जयनारायण (सं.),
**आनंदगिरी विरचित शंङ्करविजय,** कलकत्ता, १८५५.

७. पंडित हेमाद्री,
**चतुर्वर्गचिंतामणि,** कलकत्ता, १९३४.

**मराठी साधने**

८. अनंतदास रामदासी (संपादक),
**समर्थांचा गाथा,** (प्रकाशक) सोलापूरकर-चिटणीस व्यंकटराव श्रीनिवास, वाई, प्रथम आवृत्ती - मार्गशीर्ष शके १८५०.

९. अवचट अनिल,
**वाघ्या - मुरळी,** मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती-जून २००८.

१०. आक्वर्थ ह्यारी आर्बथ्नाट व शालीग्राम शंकर तुकाराम (सं.),
**इतिहास प्रसिद्ध पुरूषांचे व स्त्रियांचे पोवाडे,** निर्णयसागर, मुंबई, सन १८९१.

११. आजगावकर जगन्नाथ रघुनाथ (सं.),
**महाराष्ट्र कविचरित्र (भाग २ रा),** दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, सन १८१६.

१२. आपटे दत्तात्रय अनंत / किंजवडेकर-शास्त्री रामचंद्र दत्तात्रय (सं.),
**श्रीसंत एकनाथ महाराज यांची अंभगाची गाथा,** चित्रशाळा, पुणे, पुनर्मुद्रण १९५६.

१३. आलुकर अनिल (जिल्हा माहिती अधिकारी, नांदेड),
**मालेगावची यात्रा** (स्मरणिका), २००५.

१४. ओक वामन दाजी (सं.),
**महाराष्ट्रकवि अमृतराय कवितासंग्रह,** निर्णयसागर, मुंबई, आवृत्ती - १९१०.

१५. काकतकर ना. वि. (सं.),
**संतकृपा (मासिक),** संतकृपा प्रतिष्ठाण, पुणे, फेब्रवारी २००३.

१६. काकतकर ना. वि. (सं.),
**संतकृपा (मासिक),** संतकृपा प्रतिष्ठाण, पुणे, ऑगस्ट २००५.

१७. कांबळे उत्तम (सं.),
सकाळ स्वरविहार, सकाळ पेपर्स लि. पुणे, नोव्हेंबर, डिसेंबर २००८-जानेवारी २००९.

१८. कालेलकर गोविंद मंगेश,
**मुंबई इलाख्यातील जाती,** बडोदे, इ. स. १९२८.

१९. काळे दि. वि.,
**छत्रपती शिवाजी,** बहि:शाल प्रशिक्षण मंडळ, पुणे विद्यापीठ, प्रथमावृत्ती - १९६०.

२०. कुलकर्णी ज. बा.,
**भारतीय इतिहास आणि संस्कृति** (त्रैमासिक), ऑक्टोंबर १९६८.

२१. केतकर श्रीधर व्यंकटेश (सं.),
**महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग १४ वा,** १९२५.

२२. केतकर श्रीधर व्यंकटेश (सं.),
**महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग १५ वा,** १९२५.

२३. कोल्हटकर यशवंत व्यंकटेश (सं.),
**निरंजन रघुनाथांचे ग्रंथ**, सांगली, १९३५.

२४. खरशीकर नरहरशास्त्री (सं.),
**श्री केशवस्वामीची कविता.**

२५. खरे गणेश हरी,
**मूर्तिविज्ञान,** भा. इ. स. मं. पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ३५, इ.स.१९३९.

२६. खरे गणेश हरी,
**महाराष्ट्राची चार दैवते,** भा. इ. स. मं. पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ५४, इ. १९५८.

२७. खाडे बापूराव खंडेराव,
**श्रीक्षेत्र जेजुरीमाहात्म्य,** (प्रकाशक) रघुवंशी रमेश विठ्ठल, श्री गजानन बुक मुंबई.

२८. (प्रा. डॉ.) प्रकाश खांडगे,
**खंडोबाचे जागरण**, लोकवाङ्मय गृह, मुंबई, २४ मार्च, २०१०.

२९. खोबरेकर वि. गो.,
**महाराष्ट्रातील स्वतंत्र लढे (इ.स.१८१८ ते १८८४)**, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, १९९४.

३०. खोबरेकर वि. गो. (सं.),
**शाहू दप्तरातील कागदपत्रांची वर्णनात्मक सूची, विभाग - २**, नागपूर शासकीय मुद्रणालय, १९७०.

३१. गायकवाड मेघा सुखदेव,
**दक्षिण भारतातील खंडोबा एक जागृत दैवत**, वसंत बुक स्टॉल, मुंबई, ऑगस्ट २००५.

३२. गुब्बी प्रल्हाद केशव (सं.),
**मध्वमुनीश्वरांची कविता**, भा.इ.स.मं.पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ३०.

३३. (प्रा.) गोरवाडकर विनोद,
**चंदनपुरीचा खंडोबा**, श्रीगणेश प्रकाशन, चंदनपुरी, ता. मालेगाव (नाशिक).

३४. गोंवडे श्रीकांत,
**खंडोबाच्या गोष्टी**, अनमोल प्रकाशन, पुणे, आवृत्ती - जानेवारी १९८८.

३५. (प्रा.) गोसावी र. रा.,
**जेजुरीचा खंडोबा : तथा मल्हारी मार्तंड**, रघुवंशी प्रकाशन, मुंबई.

३६. घारपुरे ज. र. / गद्रे ना. कृ. / जोशी वा. रा. / राजवाडे वि. का. (सं.),
**मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड -७)**, नेटिव ओपिनियन प्रेस, मुंबई.

३७. घोलप म. स.,
**गोष्टीरुप श्रीमल्हारी मार्तंड**, उमा पब्लिकेशन्स्, पुणे, नवीन आवृत्ती - १९९७.

३८. चव्हाण एन. बी.,
**कुलस्वामी खंडेराय लीलाग्रंथ**, श्री कुलस्वामी खंडेराय देवस्थान ट्रस्ट प्रकाशन, वडज.

३९. चांदोरकर गो. का. (सं.),
**श्रीज्ञानेश्वरकृत योगवासिष्ठ्य**, धुळे, शके १८३६.

४०. चाफेकर नारायण गोविंद,
**चित्पावन**, आर्यसंस्कृती मुद्रणालय, पुणे, शके १८६०.

४१. जहागिरदार विजया,
**कर्मयोगिनी**, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे., पुनर्मुद्रण : फेब्रुवारी २००७.

४२. जांभेकर गणेश गंगाधर (सं.),
**लोकशिक्षण** (मासिक), सप्टेंबर - नोव्हेंबर १९३२.

४३. जाधव भास्करराव,
**मराठे आणि त्यांची भाषा**, प्रो. दासराम बुक डेपो, कोल्हापूर, सन १९३२.

४४. जोशी काशिनाथ अनंत (सं.),
**सार्थ एकनाथी भागवत**, श्री संतवाङ्मय प्रकाशन मंदिर, पुणे दुसरी आवृत्ती - १९६६.

४५. जोशी द. दा.,
**श्रीमल्हारी कथासागर**, मे शारदा साहित्य, पुणे.

४६. जोशी मनोहर य. (सं.),
**प्रसाद** (खंडोबा विशेषांक), प्रसाद प्रकाशन, पुणे, १९७८.

४७. जोशी र. म. (निर्मळ गुरूजी),
**श्रीखंडोबाच्या गोष्टी**, मे शारदा साहित्य, पुणे, प्रथमावृत्ती - १९९०.

४८. जोशी वसंत स. (सं.),
**दक्षिण भारतातील मराठी वाङ्मयाचा इतिहास 'तंजावर खंड'**, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, प्रथमावृत्ती, - ऑक्टोबर १९९७.

४९. जोशी श. बा.
**मऱ्हाठी संस्कृति**, व्हीनस प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती १९८०.

५०. जोशी वि. कृ.,
**लोकनाट्याची परंपरा**.

५१. टांकसाळे मधुकर,
**पाऊलखुणा**, जलदीप प्रकाशन, पुणे, ऑगस्ट २००५.

५२. ढवळीकर म. के.
**पर्यावरण आणि संस्कृती**, १ जून २००४.

५३. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण (सं.),
**सकल संतगाथा**, वरदा बुक्स, वरदा प्रकाशन, पुणे, सन १९०८.

५४. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण,
**खंडोबा**, देशमुख आणि कंपनी, पुणे १९६१.

५५. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण (सं.)
**शेख महंमद श्रीगोंदेकरकृत योगसंग्राम**, वरदा बुक्स, पुणे, इ. स. १९८१.

५६. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण (सं.)
**श्रीस्वामी समर्थ (अक्कलकोट)**, अनमोल प्रकाशन, पुणे, पुनर्मुद्रण १९८९ (इ.स.)

५७. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण,
**शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव**, श्री विद्या प्रकाशन, पुणे इ. स. २००१.

५८. (डॉ.) ढेरे रामचंद्र चिंतामण,
**लोकदैवतांचे विश्व**, पुणे.

५९. (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर (सं.),
**श्रीसंत एकनाथ महाराज विरचित रूक्मीणी स्वंयवर**, अमोल प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती- २१ जुलै २००१.

६०. (डॉ.) तांदळे ज्ञानेश्वर,
**महाराष्ट्राचे कुलदैवत श्रीमल्हारी मार्तंड कथासार**, अमोल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - ३० मार्च २००४.

६१. तुळपुळे श. गो. (सं.),
**लीळाचरित्र, उत्तरार्ध : भाग १ व २**, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे, पहिली आवृत्ती सप्टेंबर १९६७.

६२. दांडेकर श. वा. (सं.),
**श्रीज्ञानेश्वरी**, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस, आवृत्ती तिसरी - इ. स. १९६३.

६३. दाते यशवंत रामकृष्ण / कर्वे चिंतामण गणेश (सं.),
**महाराष्ट्र शब्दकोश**, विभाग पहिला (अ-ए), वरदा, पुणे, दुसरी आवृत्तीः एप्रिल १९८८.

६४. दाते यशवंत रामकृष्ण / कर्वे चिंतामण गणेश (सं.),
**महाराष्ट्र शब्दकोश**, विभाग तिसरा (ग-ठ), वरदा, पुणे, एप्रिल १९८८.

६५. दाते यशवंत रामकृष्ण / कर्वे चिंतामण गणेश (सं.),
**महाराष्ट्र शब्दकोश (म-वृ)**, वरदा, पुणे, एप्रिल १९८८.

६६. (डॉ.) देखणे रामचंद्र,
**महाराष्ट्राचा लोकदेव खंडोबा**, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती ७/८/९२.

६७. देव शंकर श्रीकृष्ण (सं.),
**स्वानूभवदिनकर (रामदास आणि रामदासी, भाग - सहावा)**, श्री आत्माराम छापखाना धुळे, आवृत्ती - शके १८३३.

६८. देव शंकर श्रीकृष्ण (सं.),
**श्री दिनकरांची स्फूटकविता (रामदास आणि रामदासी, भाग-सोळावा)**, श्री आत्माराम छापखाना धुळे, आवृत्ती शके १८३९.

६९. देशपांडे रा. कृ. (सं.),
**श्री मौनीचरित्रामृत**, मुंबई, शके १८५८

७०. धनेश्वर त्र्य. ग.,
**वेरूळची लेणी**, अहमदनगर.

७१. नऱ्हे शंकर,
**उमाजी राजे**, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती : २००१.

७२. (पंडित) नाईक कृष्णकांत,
**येळकोट येळकोट जयमल्हार**, भक्ती-सुंगध प्रकाशन, पुणे, आवृत्ती - २६ नोव्हेंबर २००६.

७३. पगडी सेतुमाधव (सं.),
**मोगल आणि मराठे (तारीखे दिल्कुशा)**, ठोकळ प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती १९६३.

७४. पगार सयाजी निंबाजी,
**खानदेशातील ग्रामदैवते आणि लोकगीते**, का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे, १९९२.

७५. पडवळ विलासराव बबनराव (पुणे),
(यांनी तयार केलेली हस्तलिखित नक्कल) **कवि गंगाधर विरचित मार्तंडविजय**.

७६. पवार उर्मिला / मून मीनाक्षी,
**आम्हीही इतिहास घडविला**, सुगावा प्रकाशन, पुणे, द्वितीयावृत्ती- ८ मार्च २०००.

७७. पांगारकर लक्ष्मण रामचंद्र (सं.),
**मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड-दुसरा,** ऑक्टोबर १९३५.

७८. पांगारकर लक्ष्मण रामचंद्र (सं.),
**निरंजन माधवांचा कवितासंग्रह (भाग पहिला)**, पुणे, आवृत्ती - १९१९.

७९. पांगारकर लक्ष्मण रामचंद्र (सं.),
**श्रीसमर्थ ग्रंथ भांडार**, (प्रकाशक) ढवळे धनंजय बाळकृष्ण / ढवळे केशव भिकाजी, मुंबई, तिसरी आवृत्ती - १९८९.

७९. पाठक अरूणचंद्र श. (सं.),
**महाराष्ट्र गॅझेटिअर - इतिहास : प्राचीनकाळ (खंड -१)**, सांस्कृतिक कार्य विभाग महाराष्ट्र शासन, २००२.

८०. पानसे केशव रंगनाथ (सं.),
**पानसे घराण्याचा इतिहास**, भा. इ. स. मं. पुरस्कृत ग्रंथमाला क्र. - २०, सन १९२९.

८१. प्रियोळकर अनंत काकबा (सं.),
**मुक्तेश्वरकृत महाभारत-आदिपर्व (खंड पहिला)**, मराठी संशोधन मंडळ मुंबई, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९५१.

८२. प्रियोळकर अनंत काकबा (सं.),
**श्री. कविवर्य मोरोपंताचे समग्र ग्रंथ - १०, स्फूट काव्य (भाग पहिला)**, मराठी संशोधन मंडळ - मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, आवृत्ती - इ.स. १९६१.

८३. प्रियोळकर अनंत काकबा (सं.),
**श्री. कविवर्य मोरोपंताचे समग्र ग्रंथ - १२**, स्फूट काव्य (भाग तिसरा), मराठी संशोधन मंडळ, मुंबई. मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई, आवृत्ती १९६४.

८४. पुरंदरे ब. मो.,
**राजा शिवछत्रपती**, पुरंदरे प्रकाशन, बारावी आवृत्ती, १९९३.

८५. फडके विश्वनाथ केशव (सं.),
**श्रीभक्तीविजय**, यशवंत प्रकाशन, पुणे, शके १८९६.

८६. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.),
**एक होता राजा (भाग ३ रा)**, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती, पुणे, १९६४.

८७. (डॉ.) बाबर सरोजिनी (सं.),
**कुलदैवत**, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित, द्वितीय आवृत्ती - दीपावली १९९२.

८८. बारभाई आप्पासोा उर्फ शिवदास कोडिंबा,
**श्रीक्षेत्र जेजोरीचा खंडोबा**, मल्हारी प्रकाशन, जेजुरी, २००६.

८९. बेंद्रे वा. सी.,
**शेख महंमदबाबा यांचा कवितासंग्रह**.

९०. बिडकर न. वि.,
**सचित्र श्रीमल्हारी कथासार**, सारथी प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती - १९९७.

९१. भावे च. र. (संग्राहक),
**श्रीखंडेरायाचा येळकोट**, पुणे.

९२. भावे विनायक लक्ष्मण (सं.),
**श्रीरंगनाथस्वामी निगडीकरकृत कवितासंग्रह**, 'महाराष्ट्र कवी (मासिक)' आवृत्ती- शके १८२७.

९३. (डॉ.) भावे श्री. मा. (सं.),
**भा. इ. स. मं.**, त्रैमासिक, पुणे, एप्रिल १९९५.

९४. मराठे रा. शि.,
**मार्तंडभक्त श्रीभावे महाराज**, संतकृपा प्रतिष्ठाण, पुणे.

९५. मुलाटे वासुदेव (सं.),
**म. जोतिराव फुले लिखित गुलामगिरी**, स्वरूप प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती जानेवारी १९९९.

९६. मेहंदळे खडेराव चिंतामण (सं.),
**भा. इ. स. मं.**, अहवाल १८३२.

९७. मेहंदळे खडेराव चिंतामण (सं.),
**भा. इ. स. मं.**, वार्षिक इतिवृत्त, शके १८३५.

९८. मोरामकर ए. ए. (सं.),
विविधज्ञानविस्तार (मासिक), मार्च १९३३.

९९. राजवाडे वि. का. / केशवाचार्य (सं.),
**महिकावतीची उर्फ माहीमची बखर**, चित्रशाळा प्रेस, पुणे, शके १८४६.

१००. राजवाडे वि. का. (सं.),
**मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - १०)**, जगद्वितेच्छू छापखाना, पुणे, १९०९.

१०१. वाळके मार्तंड,
**खंडोबाचं लग्न**, प्राजक्त प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती - एप्रिल २००९.

१०२. विजापूरकर विष्णू गोविंद (सं.),
**मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - ६)**, श्रीसमर्थ छापखाना, कोल्हापूर, शके १८२७.

१०३. विव्दांस धोडों वासुदेव (सं.),
**सह्याद्रि** (मासिक), फेब्रुवारी १९३५.

१०४. (डॉ.) वैष्णव मंगला,
**संतकवी शिवदिन केसरी : व्यक्ती आणि वाङ्मय (पीएच.डी. प्रबंध - मराठवाडा विद्यापीठ)**,१२ जून १८८१.

१०५. (पंडित) शास्त्री विष्णू परशुराम (सं.),
**श्रीतुकारामबावांच्या अभंगाची गाथा (भाग पहिला)**, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, आवृत्ती,इ.स. १९५०.

१०६. (पंडित) शास्त्री विष्णू परशुराम (सं.),
**श्रीतुकारामबावांच्या अभंगाची गाथा (भाग दुसरा)**, गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई, आवृत्ती, इ.स. १९५०.

१०७. शाळिग्राम शंकर तुकाराम (सं.),
**होनाजी बाळा यांच्या लावण्या**, पुणे १९२४.

१०८. सरदेसाई गो. स. (सं.),
**उत्तरकालीन पेशवे कौटोबिंक राहणी (पेशवे दप्तर खंड - ३२)**, गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस मुंबई, इ.स. १९३३.

१०९. सरदेसाई गोविंद सखाराम (सं.),
**मराठी रियासत खंड (खंड - ७)**, पुनर्मुद्रण : सं. गर्गे स. मा., पॉप्युलर प्रकाशन मुंबई, दुसरी आवृत्ती १९९१.

**लेखक, संपादक, संग्राहक, प्रकाशन, आवृत्ती यापैंकी काही किंवा सर्वच नोंदी नसलेले संदर्भ साहित्य. यामध्ये प्रकरणांच्या क्रमानुसार संदर्भ साहित्याची यादी तयार केली असुन ग्रंथनाम प्रथम घेतले आहे.**


११०. **श्रीनामदेव गाथा,** (प्रकाशक) शासकीय मुद्रण व लेखन सामग्री, मुंबई, पुनर्मुद्रण - १९८२.

१११. **श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित हरिविजय.**

११२. **सिध्दपाळ केसरी विरचित मल्हारीमाहात्म्य,** धार्मिक प्रकाशन संस्था, मुंबई.

११३. **मराठी संशोधन पत्रिका** (त्रैमासिक), वर्ष ६ वे, अंक १ ला, मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसग्रंहालय, मुंबई.

११४. **पेशवे सरकारकडून जेजुरीच्या खंडोबा देवस्थानासाठी होणारा वार्षिक खर्च,** हा कागद जेष्ठ इतिहास संशोधक बलकवडे बाळासाहेब तथा पांडुरंग, पुणे यांनी पेशवे दप्तरातील हस्तलिखितांमधून शोधून दिला आहे.

११५. **शिवकालीन पत्रसार संग्रह, खंड - १,** (प्रकाशक) केळकर नरसिंह चिंतामण, आपटे दत्तात्रय विष्णु, पुणे, इ.स. १९३०.

११६. **ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड - ९,** भा. इ. स. मं. स्वीय ग्रंथमाला क्र. ८७, इ. स. १९५४.

११७. **मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - १).**

११८. **पेशव्यांची शकावली (राजवाडे खंड - २).**

११९. **मराठ्यांच्या इतिहासाची साधने (राजवाडे खंड - १८).**

१२०. **शाहू दप्तरातील कागदपत्रांची वर्णनात्मक सूची, विभाग - २.**

१२१. **संशोधनासाठी निवडलेले कागद वर्णनात्मक सूची, खंड - १,** विभाग दुसरा.

१२२. **न्यायनिवाड्याची दिव्य आणि त्यांची मंदिरे,** डॉ. कुलकर्णी अनुराधा यांनी भा.इ.स.मं. पुणे येथे वाचलेला निबंध, (लिखित संदर्भ).

१२३. **श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित मल्हारीमाहात्म्य.**

१२४. **श्रीमाणिकप्रभू विरचित मल्हारीमाहात्म्य,** रामतत्व प्रकाशन बेळगाव.

१२५. **मिलिंद माधव विरचित श्रीमल्हारीमाहात्म्य,** धार्मिक प्रकाशन संस्था, मुंबई.

१२६. **श्रीसाईलीलामृत,** श्रीसाईबाबा संस्थान शिर्डी प्रकाशन, आवृत्ती १७ वी २००१.

१२७. **दासोपंत दिंगबर (दासोपंत चरित्र),** महाराष्ट्र कविसंतमाला क्र. ४.

१२८. **मराठी संशोधन पत्रिका (त्रैमासिक),** मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, डिसेंबर १९८२.

१२९. **तैत्रव.**

१३०. **रेणुकामाहात्म्य (मराठी ओवीबध्द पोथी).**

१३१. **महाराष्ट्र लोकसाहित्य माला,** पुष्प पहिले.

१३२. **नवभारत,** नोव्हेंबर १९५७.

१३३. **श्रीधरस्वामी नाझरेकर विरचित शिवलीलामृत.**

१३४. **मराठी संशोधन पत्रिका (त्रैमासिक),** वर्ष २ रे, अंक २ रा, मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, जानेवारी १९५५.

१३५. **मराठी संशोधन पत्रिका (त्रैमासिक),** वर्ष ७ वे, अंक १ ला, मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, ऑक्टोबर १९५९.

**दैनिके व साप्ताहिके**

१३६. **(दै.) तरूण भारत,** ६ डिसेंबर १९५९.

१३७. **(दै.) लोकप्रभा,** ६ नोव्हेंबर १९८८.

१३८. **(दै.) लोकसत्ता,** १९ जानेवारी २००३.

१३९. **(दै.) प्रभात,** पुणे, २ ऑगस्ट २००६.

१४०. **(सा.) पुण्यश्लोक,** ऑक्टोबर २००२.

**इंग्रजी साधने**

141. Ayengar Masti Venkatesha,
**Popular Culture in Karnataka**, Banglore, 1937.

142. Cambel James M. (Editor),
**Gazetteers of the Bombay Presidency**, **Dharwad District,** Volume -20, 1984.

143. Cambel James M. (Editor),
**Gazetteers of the Bombay Presidency**, **Poona District,** Volume - 18, Part - 3, 1885, Pages 133-134.

144. Gupte B. A.,
**Hindu Holidays and Ceremonials**, Culcutta, 1916.

145. (Dr.) Kunte B. G. (Editor),
**Maharastra State Gazetteers**, **Nanded District,** 1971.

146. (Dr.) Kunte B. G. (Editor),
**Maharastra State Gazetteers, Osmanabad District**, 1972.

147. (Dr.) Kunte B. G. (Editor),
**Maharastra State Gazetteers, Aurangabad District**, 1977.

148. Pagdi Setu Madhavrao (Editor),
**Maharastra State Gazetteers, Satara District**,1963.

149. Palande M. R. (Editor),
**Maharastra State Gazetteers, Poona District**,1954.

150. Sarkar M. C.,
**History of Aurangzib**, Volume-I, M.C. Sarkar and sons, Culcutta, 1992.

151. Sen D. C.,
**Chaitanya and His Companions**, Culcutta, 1997.

152. (Dr.) Sontheimer Gunther Dietz,
**Pastoral Deities in western India** (Translated by Feldhaus Anne) oxford University Press New Youk, 1989.

153. (Dr.) Sontheimer Gunther Dietz,
**King of Hunters**, **Warriers, and Shepherds : Essayas on Khandoba,** (Edited by - Feldhaus Anne, Malik Aditya, Bruckher Heidrun), Indira Gandhi National Centre for the Arts, New Delhi, 1997.

154. **German News - Aug. 1992**
(German Indologist Dr. Gunther Dietz Sontheimer (21-04-1934 , 03-07-1992) An Indologist with a difference.)

॥ २॥

# व्यक्तिनाम सूची

॥ ३ ॥

# स्थलनाम सूची

॥ ४ ॥

## राज्यनाम सूची



॥५॥

## देशनाम सूची